# आशावादी

अथवा

## एका प्रवाहपतिताचें चरित्र


लेखक

**श्रीधर व्यंकटेश केतकर** एम्. ए. पीएच्. डी.

संपादक महाराष्ट्रीय ज्ञानकोश, पुणे समाचार इ.

नि शस्त्रांचे राजकारण, गोंडवनातील प्रियंवदा इत्यादि

पुस्तकांचे लेखक.


किंमत २ रुपये


मुद्रक आणि प्रकाशक

श्री व्यं केतकर, ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणे शहर.

१९२७

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना.

आशावादी ही कथा लिहितांना माझ्या डोळ्यासमोर अनेक व्यक्ती होत्या त्या व्यक्तींच्या आयुष्याचे एकीकरण करून हे कथानक तयार झालें आहे.

स्वामी ब्रह्मगिरि उर्फ दवीदासपंत अत्रे ही इंग्लंड, अमेरिका यासारख्या देशांत हिंडणाऱ्या मंडळींच्या चांगल्याच परिचयाची व्यक्ति आहे. या प्रकारच्या व्यक्तींच्या अंगीं अनेक विशिष्ट गुण आढळून येतात. आपलें चरित्र कायम ठशाचे होऊं नये ही भावना, लोककल्याणाची इच्छा, या गोष्टी ज्या तरुणमंडळींच्या अंगीं आहेत पण ज्यांचे आयुष्य निश्चित रस्त्यावर आलें नाहीं, अशा मंडळींचा हा नमुना आहे. असे तरुण परदेशीं गेले म्हणजे पुष्कळदा परतच येत नाहींत. या प्रकारच्या तरुणांत महत्त्वाकांक्षा मोठी असल्यामुळे यांची महत्त्वहीन स्थितींत रहाण्याची नाखुषी असते पण परदेशीं वाटेल तर अगदीं क्षुद्र स्थितींत रहावें ही मनाची तयारी आढळून येते. जर परदेशांत जाऊन लोकसुधारणेच्या अनेक कल्पना घेऊन आले तर आपल्या आगमनानें देशांत कांहीं सुधारणा झाली तरच आपल्या परत येण्याचा उपयोग झाला अशा कल्पना त्यांच्या मनांत असतात, आणि अशा गोष्टी करून, तशा सुधारणा करून अशा तऱ्हेच्या कल्पनांनी आपल्या आयुष्यास गति देऊं पहातात. असे लोक पुष्कळदां केवळ विचारबाहुल्यामुळें जवळ जवळ निष्कर्तव्यतेच्या सरहद्दीवर कसे जाऊं लागतात हे एक विशिष्ट चरित्र घेऊन दाखविलें आहे. या चरित्रात विदेशीं अनेक वर्षे राहिलेल्या पण निश्चित उद्योग नसलेल्या व्यक्तीचे जीवन चरित्र कसे होते हे दाखविलें आहे.

विवेचनासाठी ज्या अवस्था घेतल्या आहेत त्या म्हटल्या म्हणजे संसार आणि गृहस्थाश्रम या होत. संन्यासवृत्तीस आणि वैराग्यावस्थेस कितीं कर्तव्यक्षेत्र शक्य किंवा योग्य आहे. या संबंधाच्या अनेक बाजू या कथानकांत मांडलेल्या दिसतील. त्याचप्रमाणे आयुष्याचें नियमन करावयाचें ते पूर्वी एखादा कार्यक्रम आंखून ठेवून त्याप्रमाणे करावें की, आयुष्यास भवितव्य जशी गति देईल तशी देऊं द्यावी हा प्रश्नहि विचारास घेतला आहे.

आशावादी कादंबरी लिहितांना थोडीशी अपकर्षकता अगदीं निराळ्याच कारणामुळें उत्पन्न झाली असावी. आशावादी मनुष्याचें एकंदर स्वभावचित्र तयार करतांना परिस्थिति जराशी विरुद्ध होती. लेखकाचा कांहीं काळ अत्यंत तीव्र प्रकारच्या नैराश्यांत गेला. कादंबरीची कांहीं मनांत योजना केली, १५।२० कागद लिहून काढले, आणि विविधज्ञानविस्ताराच्या अंकांत जाहिरातहि दिली. त्यानंतर कादंबरीचा बहुतेक भाग अजून लिहावयाचाच होता.

नैराश्य उत्पन्न होण्याचें कारण असे झाले कीं, १२ फेब्रुआरी रोजी लेखकास पिसाळलेला कुत्रा चावला. अर्थात् पाश्चुर उपचार ताबडतोब केलेच, पण मनांतील नैराश्य एकाएकी गेलें नाहीं, कारण उपचार झाले तरी दर शेकडा कांहीं तरी लोक दगावतात, आणि त्या दगावणाऱ्या व्यक्तींत आपण कशावरून येणार नाहीं. अशा कल्पना मनांत येत. आपला अवतार आतां दोनचार महिन्यांत आटपणार, तर कादंबरी लिहावी किंवा लिहूं नये इत्यादि विचार चालत. मनांत असे येई कीं, एखादा मोठा कोश पुरा करणारा कोशकार कोश संपतांच मृत्युशय्येवर पडावा

असा महाराष्ट्राचा कांहीं दैवयोग नसेल ना? गीर्वाणलघुकोशकार ओकांच्या मृत्यूनंतर मला एक पत्र आले होते. त्या पत्रातील मजकूर गेले फेब्रुवारी व मार्च हे दोन्हीं महिने माझ्या मनांत एकसारखा घोळत होता. त्या पत्रांत असें लिहिले होते कीं, "एल. आर. वैद्य डिक्शनरी पुरी मुद्रित होण्यापूर्वी वारले, आपटे मुद्रित झाल्याबरोबर वारले, एन्. बी. रानडे आणि ओक हे ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर थोड्याच काळांत वारले, तर तुम्हीं संभाळून असा हे पत्र मला वारंवार आठवत होतें आणि तें पत्र भवितव्याचे सूचकच होते असे मन सांगू लागलें. प्रत्येक कोशकार कोश पुरा होतांक्षणींच मरावा असा दैवाचा नियम असतां आपण आपली काळजी घेऊन कोश आटपून देखील पचवीस तीस वर्षें काम करण्याचा आत्मविश्वास बाळगतो, हा आपला मूढपणा नव्हे काय असे वाटू लागलें, पण दैव म्हणून जर कोणी व्यक्ति असलीच तर ती माझ्या या आणखी तीस वर्षे काम करण्याच्या निश्चयाबद्दल आपल्या मनात हासत असेल आणि कोशकारा तू आपली कितीहि काळजी घेतलीस किंवा तुझ्या प्रकृतीकडे एकसारखे लक्ष ठेवलेस तरी मी दैव हा काहीं तरी एक निराळाच भवितव्य-नियामक अंश आहे त्या मला विसरून चालावयाचे नाही तर उगाच पसारा वाढवू नको, असे सांगत आहे असे वाटे.

ही किंकर्तव्यतेची वृत्ति १९ फेब्रुवारीपासून जूनपर्यंत होती. फेब्रुआरी गेला; मार्च गेला. एप्रिल उजाडला. ज्ञानकोशाचा एकविसावाहि भाग पुरा छापून झाला. हा जेव्हा छापून झाला तेव्हां मनाशी म्हटले एकदाचा हा तर पुरा झाला. आता आपण मेलो तर काय होईल? ज्ञानकोशासाठीं जे तीस हजारांचे कर्ज झाले आहे ते फेडण्याची असमर्थता उत्पन्न होईल आणि सावकार बुडतील, आणि माझ्या नावाने ओरडतील, कर्जाला जामीन मी असल्यामुळे माझ्यामागे घरदार विकावे लागेल. काहीं हरकत नाही, काय व्हावयाचे असेल ते होईल, पण ज्ञानकोश एकदाचा बाहेर पडला आहे. कौटुंबिक आपत्ति जरी उत्पन्न होईल तरी एक महत्त्वाचे कार्य हाता वेगळे झाले आहे. या सर्व गोष्टी मनांत आल्या आणि थोडासा बेफिकीरपणा देखील उत्पन्न झाला. आणि ४ एप्रिलनंतर कथालेखनास पुन्हा सुरवात झाली; कुत्र्याच्या विषाच्या " इनक्युबेशन " चे ४० दिवस आटपले. त्यानंतर मनाला बरीच स्वस्थता उत्पन्न झाली पण हे लेखन चालू असता चिंतेचे झटके मधून मधून येतच होते अर्थात आशावादाचे चित्र रंगवण्यास अत्यंत अनुकूल अशी स्थिति नव्हती.

अलीकडे म्हणजे काही पाऊस झाल्यानंतर मन स्वस्थ आणि आनंदित आहे. आणि जगाकडे पुन्हां आशावादी दृष्टीने पहात आहे.

श्री. व्यं. केतकर.

# आशावादी.

## प्रकरण १ लें.

### आगमन.

इटालियन स्टीमर ब्यालार्ड पीअर मोलवर आली तेवेळेस तीतून एक यूरोपियन पोषाख केलेला हिंदु प्रवासी उतरला; आणि त्याच्या जवळच्या सामानाची कस्टम खात्याकडून तपासणी झाल्यावर आणि अवजड सामान त्याने हुडेकरीच्या ताब्यांत दिल्यावर तो तडक मोटारीतून ताजमहाल हाटेलकडे वळला. हाटेलमधील नोंदणी कारकुनास त्याने आपले नाव "स्वामी ब्रह्मगिरि" असे दिले.

हा प्रवासी पहिल्या दिवशी जेवण करून कोणाशीहि न बोलता यूरोपियन पोषाखांतच गावभर हिंडत होता; निरनिराळ्या फराळांच्या दुकानात शिरत होता; मिळतील तीं वर्तमानपत्रे विकत घेऊन वाचीत होता, सर्व दिवसभर तो चोहोकडे हिंडला; त्यामुळे मुबईत झालेला फरक पाहून उत्पन्न झालेला अचंबा त्याच्या तोंडावर दिसत होता. तो अनेक देवळें हिंडला, मराठी ग्रथसंग्रहालये वगैरे सस्था पहात होता. पण कोणाशींहि बोलण्याचा आणि आपले नाव, पत्ता सांगण्याचा प्रसग टाळीत होता यावरून आपले नांव सागण्यासबधानें आणि आपण कोण हे दिसूं देण्यासंबंधानें त्यास कांहीं किंतु वाटत होता असें दिसतें. सध्याकाळच्या वेळेस निवांतपणे ब्याकबेच्या कांठी असलेल्या एका बांकावर बसला; यावेळी याच्या मनांत अनेक प्रकारच्या विचारांचें काहूर उठलें होते. व अनेक विचार मनात आल्यामुळे तो थोडासा गोंधळल्यासारखाहि दिसत होता, पण निश्चयी चेहेऱ्यावर ते गोंधळल्याचे केवळ पातळ सारवण आहे अशी छटा त्याच्या मुद्रेवर दिसत होती.

ब्याकबेवर तो ज्या बांकावर बसला होता त्या बांकाच्या शेजारच्या बांकावर एक ह्याट घातलेला हिंदु व एक बायको ही दोघेजण बसली होतीं व एक७१८ वर्षांची मुलगी तेथे जवळच खेळत होती. त्यांच्याकडे पाहून हा मनुष्य म्हणाला "हा आणखी एक फरक दिसत आहे. स्त्रिया पूर्वी फिरायला येत नसत. श्रीमत घराण्यांतल्या स्त्रिया देखील बाहेर पडत नसत. आतां नवरा बायकोमुलांसह फिरायला बाहेर पडू लागला. देशांत गृहसौख्य वाढू लागले आहे काय? वाढले असावे असें दिसते." याप्रमाणे तो आपल्याशीच बोलत होता. व त्याचे मधून मधून शेजारच्या तरुण जोडप्याकडे लक्षहि जात असे. ती स्त्री सामान्य आवाजांत जरी बोलत होती तरी तिच्या बोलण्यांत "आब्जेक्शन", "प्राक्टिकली" इत्यादि शब्द ऐकू येत होते. तेव्हां तो म्हणाला "देशांत स्त्रीशिक्षणाहि वाढलेले दिसते."

ब्याकबेच्या एका बांकावर तो बसला असतां तेथून इग्रजी पोषाख केलेले अनेक गृहस्थ चालले होते आणि त्यांच्याकडे पाहिलें असतां, जरी त्यांच्या पोषाखावरून त्यांची जात ओळखूं येत नसली तरी बरोबरच्या हिंदु स्त्रियांवरून ते हिंदूच आहेत हें स्पष्ट होत होते. त्यांच्याकडे पाहून तो म्हणाला कीं "इंग्रजी पोषाखाची अभिरुचि बरीच

वाढलेली दिसते. आणि स्त्रियादेखील हॅट घातलेल्या पुरुषाबरोबर फिरायला लाजत नाहींत, आणि त्यांनीं न लाजण्यासारखी परिस्थितीच उत्पन्न झाली असली पाहिजे. हॅट घालणाऱ्या पुरुषाच्या संगतींतील हिंदु स्त्री यूरोपियनाबरोबर किंवा खिस्त्याबरोबर जात आहे असे लोक समजतील या भितीचे अस्तित्वच उरले नसावे." एकत्र फिरायला आलेली अनेक स्त्रीपुरुपे त्याने पाहिलीं तेव्हां त्याला असे दिसून आले की पुरुषांचा पोषाख मात्र सारखा आहे—म्हणजे यूरोपियन आहे—आणि बरोबर आलेल्या स्त्रिया मात्र निरनिराळ्या पोषाखांत आहेत. कोणी खोजा आहेत, तर कोणी गुजराथी हिंदु आहेत, तर कोणी पारशी आहेत, तर कोणी दक्षिणी हिंदु आहेत. हें सर्व त्याने पाहिले आणि त्यावेळेस त्यानें दुसरा एक विचार मनात आल्यामुळे विकट हास्य केले. त्याच्या मनांत आलेला विचार असा होता की, "एखाद्या हिंदु स्त्रीच्या नवऱ्याने इग्रजी पोषाख न करतां मुसुलमानाचा पोषाख केला तर हिंदु स्त्री त्याच्याबरोबर फिरायला जाईल काय? आणि पारशीण—तिच्या नवऱ्याने महाराष्ट्रीय पगडी घातली तर त्याबरोबर जाण्यास लाजेल की नाहीं, आणि एखादा खोजा जर हिंदु पोषाख करून आणि आपल्या बायकोच्या हातांत हात घालून बाहेर पडला तर त्यांस पहाणारे मुसुलमान लोक मुसुलमान स्त्रीस बिघडविणारा हिंदु समजून मारावयास येणार नाहींत काय? पण कोणत्याहि जातीच्या स्त्रीबरोबर यूरोपियन पोषाखांत हिंडण्यास मुळींच हरकत नाही! यावरून काय बरे दिसतें? यूरोपियन पोषाखाविषयीं आत्मीय भावना सर्व जातीच्या स्त्रियांपर्यंत पसरली आहे. व एखाद्या मुलीला कोणा तरी अन्य जातीयाबरोबर पळून जावयाचें झाल्यास त्याने त्या मुलीच्या जातवाल्यांचा पोषाख करण्याची जरूरी नाहीं. त्यानें यूरोपीयन पोषाख केला कीं तो मनुष्य हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि जातीच्या स्त्रीला आत्मसदृश वाटेल. एवंच यूरोपीयन आचार प्रत्येकास त्याच्या शेजाऱ्याच्या रिवाजापेक्षां अधिक जवळचे झाले काय?" त्याच्या भारतीय भावनेला हा पहिला धक्का मिळाला. भारतीय संस्कृतींत जीव आहे, इत्यादि भावना त्याच्याठायी होत्या. "हिंदुस्थानची नवसंस्कृति स्थापन व्हावयाची ती कशी होणार? वर दडपण टाकणाऱ्या इग्रजी संस्कृतीच्या देशभर प्रसाराने जे ऐक्य उत्पन्न होत आहे त्यामुळे अखिल भारतीय सस्कृति तयार होणार कीं देशांतील अनेक समाजांच्या परस्परसन्निकर्षाने सर्व सामान्य भारतीय रीतिरिवाज तयार होऊन होणार? या प्रश्नाला देश्य सस्कृतीच्या अतर्गत विकासाने होणार असे जे मी स्वतःला उत्तर देत होतों ते उत्तर चुकीचे दिसते. इत्यादि वाक्ये तो आपल्याशी पुटपुटू लागला "छे! छे! माझे सर्व सिद्धात फुकट गेले"

या प्रवाशाचे या विचाराच्या अनुरोधानेच पुढे विचार चालू असत; पण शेजारच्या एका लहान मुलीच्या शब्दानी त्याच्या विचाराचा ओघ एकदम बदलला.

शेजारच्या बांकावर जे कुटुंब बसले होतें, त्यांतील मुलगी आईला म्हणाली.

"आई, चल घरी आतां काळोख पडला."

या वाक्याइतके साधे वाक्य ऐकून कोणाला त्यांत कांही कौतुक किंवा विचारास चेतना उत्पन्न होण्यासारखे ते काय आहे? अशी कोणी पृच्छा करील. परंतु ते वाक्य ऐकून प्रत्येक देखाव्याने मनावर परिणाम घडण्यास सोइस्कर असें ज्याचे मन अगोदरच झालें आहे अशा त्या प्रवाशाच्या मनांत तेवढ्या वाक्यानेच एक नवीन विचारक्रम सुरू झाला.

"सध्याकाळी फिरणें झाल्यानंतर घरीं जाऊन जेवावयाचें असा माझा नित्यक्रम बालपणापासून हिंदुस्थान सोडीपर्यंत होता. आणि आपण

आई, बाप, भाऊ, भावजय, बायको ही असता संध्याकाळ झाल्याबरोबर आतां लवकर परतलें पाहिजे, जेवणाची वेळ झाली, आणि आपण लवकर गेलो नाहीं तर ती वेळ टळेल, बायकांना जेवावयास उशीर होईल, असे विचार मनात येत. आतां आपणांस काय बरे वाटते? जेवायची ठराविक वेळ टळली तर टळली? हॉटेलामध्ये वेळेवर जाऊन परत काय करावयाचे आहे. आपल्याकरता कोणी वाट पहात बसणारे आहे काय? मुली, तूं भाग्यवान आहेस! "आई, चल घरी" हे शब्द मला कधी बोलतां येतील काय, किंवा बाबा, घरी चला हे शब्द मला तरी कोण म्हणणार आहे? आपल्याला गृह असे कोठे आहे? केवळ हिंदुस्थानच्या जमीनीस पाय लागले म्हणून मी स्वगृही आलो असे समजतो. आणि इंग्रज लोक इंग्लंडला "होम" म्हणतात म्हणून आम्ही आजचे स्वाभिमानी सुशिक्षित हिंदु इंग्लंडमध्ये लोकांशी बोलताना हिंदुस्थानला जावयाचे हे सांगण्यासाठीं स्वगृहीं जावयाचे अशी भाषा वापरतों. अनेक हिंदूंच्या दृष्टीने ही भाषा बरोबरहि आहे. त्यांचे माहेर हिंदुस्थान हा देश नसला तरी ते हिंदुस्थानांत आहे. पण मजसारख्या मनुष्याने हिंदुस्थान आपले मातृगृह म्हणून सांगण्यात काय अर्थ आहे. माझे घर म्हणजे आज काय शिलुक उरले आहे. बायको कधीच वारली, आणि भाऊ आणि त्याची बायको हीहि वारली. तर मग मी देशात आलो तरी कशाला? मी इकडे आकर्षिला कसा गेलो? देशातील सर्व लोकांविषयी माझ्या मनांत असलेले प्रेम. आपल्या लोकांनी उन्नतीला यावे ही इच्छा, आणि तसेच आपल्या जगभर प्रवासामुळे जो आपणास अनुभव उत्पन्न झाला आहे तो इतरांस प्राप्त करून द्यावा ही इच्छा, आणि हिंदुस्थानांत आपण जाऊन कांहीं तरी अधिक करूं हा आत्मविश्वास या गोष्टी मला हिंदुस्थानांत बोलावित्या झाल्या. पण इतक्या गोष्टी जर खऱ्या आहेत आणि मला वैयक्तिक गृह नाहीं तर हिंदुस्थान हें गृह आहे असे म्हणण्यास काय हरकत आहे? इतरास हिंदुस्थान हे आपले घर वाटत नसेल पण मला हा सबंध देश घरच वाटत आहे."

याप्रमाणे इकडे त्याच्या मनांत विचारमालिका चालू असताच त्या सध्यासमयाच्या प्रकाशांत शेजारचा मनुष्य आपल्याकडे रोखून पहात आहे असे त्यास दिसले. आणि त्याने त्याच्याकडे पाहिले तो समोरचा मनुष्य आपल्या ओळखीचा आहे ही भावना त्यासहि झाली. पण इतक्यात तो समोरचा गृहस्थ एकदम म्हणाला.

" मि. ब्रह्मगिरि, तुम्ही इकडे केव्हा आला? "

" आजच सकाळीं. "

" मुक्काम कोठे आहे, तुमचे कोणी आप्त येथे आहेत काय? "

" ताजमध्ये "

"अहो, ताजमध्ये तुम्ही किती दिवस रहाणार!"

" मी दोनचार दिवसांत मुंबई जर सोडली नाही तर सरदारगृहांत रहायला जाईन. "

इतके बोलणे झाल्यावर तो शेजारच्या बाकावरील गृहस्थ यांच्या बाकाजवळ आला आणि म्हणाला—

" आतां इकडे काय करणार? लंडनमध्ये तुमचे मधून मधून नोकरी करणे, मधून मधून व्याख्यानें देणे आणि मधून लेख लिहिणे आणि कांही दिवसचे दिवस सकाळपासून संध्याकाळपर्यंत ब्रिटिश म्युझियममध्ये दंडी मारून बसणे हें चाललेच होते. इकडे तुमचा कार्यक्रम काय होणार आहे? "

" काय होईल कोण जाणें! आतां मी हिंदुस्थानाला जरा नवीनच आहे. वीस वर्षांत मुंबईत किती तरी फरक पडला! मला जुनी मुंबई कांही एक राहिलेली दिसत नाहीं. "

" काय, तुम्हीं आज वीस वर्षें बाहेरदेशीं आहांत?"

"होय."

"तर मग तुम्हांस हिंदुस्थान अगदी नवें वाटत असलें पाहिजे."

"अगदींच नवें वाटते माझी वीस वर्षापूर्वीची मुंबई नाहींशी झाली."

ब्रह्मगिरींपासून कांहीं मोठे मौजेचे संभाषण उकरून काढतां येईल ही आशा या गृहस्थास उत्पन्न झाली; आणि तो म्हणाला.

"काय, आमच्याबरोबर घरीं येता का? आज आमच्याकडेसच जेवा."

"जेवायला हरकत नाहीं पण त्या आमंत्रणाचा फायदा पुन्हां केव्हां तरी घेईन, आज नको"

"कां बरें?"

"अहो, ताजमहालमध्ये रोजचा १२ रु. आकार करतात, तर तो आकार देऊन सवरून पुन्हां जेवण गमावणे हे कसेसेच वाटते. असे वाटते कीं १२ रुपये भरले ते पुरे वसूल केले पाहिजेत."

"मग येथे उतरलांत कशाला, सरदारगृहात कां नाहीं उतरलांत?"

"सरदारगृहांत उद्यां परवां जाईन, पण कदाचित मुंबई सोडून दुसऱ्या कोठे तरी जाईन."

"तुम्हाला कोठें जावयाचे आहे?"

"तेंच तर मला ठाऊक नाहीं."

"तर मग मी सांगतों कीं तुमचे संध्याकाळचे जेवण बुडालें तर बुडूं द्या, त्याने फार तर दीड दोन रुपयांचेच नुकसान होईल. त्या नुकसानीबद्दल भुर्दंड तुम्हास जेवण देऊन मलाच भरावा लागणार, आणि मी असे समजतों कीं तुमचे व माझें आज जे बोलणे होईल त्याची किंमत बुडालेल्या जेवणाच्या किंमतीपेक्षां जास्त आहे."

"त्यांत शंकाच नाहीं. तुमच्यासारखा जुन्या ओळखीचा मनुष्य आज मला गप्पा मारायला मिळाला तर त्याची किंमत जेवणापेक्षां कमी नाहीं हें मी केव्हांहि कबूल करीन. उलट हेहि सांगतो कीं तुमच्याकडे मिळणारें जेवण हें पहिलेंच हिंदु जेवण मला मिळणार, त्यामुळे जेवणहि जास्त जाईल. दुसऱ्याकडचे आमंत्रण आलें म्हणजे "परान्नं दुर्लभं लोके प्राणा: जन्मनि जन्मनि" असे मी समजणारा आहे बरें!"

हें बोलणे ऐकून जेवणास आमंत्रण करणाऱ्याच्या बायकोने थोडें हास्य केले.

तेव्हां स्वामी ब्रह्मगिरि त्या स्त्रीकडे पाहून म्हणाले की "आपणांस संस्कृतहि येत आहे काय? मी हिंदुस्थान सोडले तेव्हां कालेजांत जाणाऱ्या मुली संस्कृत शिकत नव्हत्या. त्या फ्रेंच शिकत असत. आणि फ्रेंच शिकलेल्या मुलींना सुसंस्कृत समजत."

बोलणाऱ्या मनुष्याने स्वामी ब्रह्मगिरीस आपल्या बरोबर घेतलें आणि आपल्या मोटारमध्ये बसविलें. ती मोटार मलबारहिलवर गेली. तेथील तीन बत्तीच्या पलीकडे त्याचा एक बंगला होता. तिकडे ती गेली. मोटारनें जातांना मधून मधून बोलणे चालूच होते. पण गप्पांपेक्षा बदललेल्या मुंबईकडेच ब्रह्मगिरींचे लक्ष होते असे दिसले.

बॅरिस्टर सुतारे यांचा एक वाळकेश्वराकडे लहानसा बंगला होता बंगला म्हणण्यापेक्षां ते एक साधारण जुनाट पद्धतीचे घर होतें व त्या घराला थोडी डागडुजी करून अर्वाचीन तऱ्हेच्या रहाणीला साइस्कर केले होते. ब्यारिस्टर सुताऱ्याचे वडील ज्योतिषी म्हणून मुंबईत ठाऊक होते आणि त्याचे कोणी आप्त वाळकेश्वराला पुजारी होते. त्यामुळे ब्यारिस्टर सुतारे याच्या वडलांनीं जे घर बांधून ठेवले होते, तें देखील वाळकेश्वराच्याच बाजूला होते. ब्यारिस्टर सुतारे यांचे वडील जेव्हां मध्यम वयाचे होते तेव्हां वाळकेश्वरची मंडळी आपण मुंबईत आहों असें समजत नसत.

ब्रह्मगिरि, बॅरिस्टर सुतारे आणि त्यांच्या पत्नी इंदिराबाई हीं तिघेजण जेवावयास बसलीं होतीं. जेवतांना त्यांच्या कांहीं इंग्लंडमधल्या जुन्या आठवणी निघाल्या. दोघांची भेट पांच वर्षांनीं झाली

होती तर पांच वर्षात लंडनमध्यें कोणकोणत्या नवीन व्यक्ती आल्या व गेल्या याचा हिशोब बॅरिस्टर सुतारे यांनीं घेतला. त्याप्रमाणें दर-सालच्या नवीन येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मनात असलेल्या कल्पनांमध्यें ब्रह्मगिरींस कांहीं फरक दिसत असे काय, आणि त्यावरून हिंदुस्थानचे वातावरण दरसाल कसें बदलत चाललें आहे याची त्यांस कल्पना येत होती काय, इत्यादि चौकशी होऊन हिंदुस्थानच्या स्थितीविषयीं व इतर गोष्टीविषयीं चर्चा सुरू झाली. त्यात राजकारणाचे प्रश्न होते, हिंदुमुसुलमानाचे सामाजिक प्रश्नहि येत होतेच, त्याप्रमाणे कांहीं वैयक्तिकाहि प्रश्न होते. वैयक्तिक प्रश्नामुळे ब्रह्मगिरींच्या घरची कांहीं माहिती निघाली. ब्रह्मगिरि हे त्यांचें आडनाव मुळीच नाही, त्यांचे मूळचे वैयक्तिक नांवहि नाही. त्यांचे नांव देवीदास होतें. त्यांनी संन्यास घेतल्यानतर ब्रह्मगिरि हे नाव घेतले. हे रहाणार मूळचे वऱ्हाडातले. त्याना आईबाप, भाऊ, बहिण, बायको यासारखे जवळचे आप्त हिंदुस्थानांत कोणी नाहीत. त्यांनीं आफ्रिका, यूरोप, अमेरिका या तीन खंडात प्रवास केला. संन्यासी असून बहुतेक प्रसगी सामान्य व्यक्तीचा पोषाख ब्रह्मगिरि ठेवीत याचे कारण संन्याशाच्या पोषाखामुळे लोकाचे त्यांच्याकडे जे नेहमी लक्ष जाई तें त्यांनां नको होते. शिवाय संन्यासधर्म हा खरा अतःकरणाचा आहे, पोषाखांत किंवा बाह्योपाधीत नाही असेहि त्यांचे मत होते. शिवाय केवळ सन्याशी म्हणून जगांत हिंडावे ही इच्छा नव्हती, तसे हिंडत असले म्हणजे खरे जग समजत नाहीं. आपण लोकांपासून अलिप्त राहतों आणि केवळ तत्त्वें बोलणारे बनतों असे त्यांस वाटे. शिवाय ज्या देशांत त्यांनीं संन्यासी म्हणून प्रवास केला त्या देशांत सन्यासधर्माची महति म्हणजे सन्याशाचा योगक्षेम दुसऱ्यांनीं चालवावा ही कल्पना परिचित नाहीं, आणि त्यामुळें स्वतःच्या प्रवासासाठीं किंवा योगक्षेमासाठीं पैसे मिळविण्याची जबाबदारी त्यांच्यावरच पडे; म्हणजे कोठे तरी काम करूनच पैसे मिळवावे लागत. कधीं कधी त्यांचें खरें स्वरूप लोकांनां कळून येई आणि अशा ठिकाणीं त्यांनां त्यांच्याबरोबर काम करणारी मंडळी देखील पैसे देत. त्यांनीं व्हिझिटिंग कार्ड "स्वामी ब्रह्मगिरि" या नावाच्याच छापलेल्या आहेत. त्यांचीं व्याख्यानें म्यांचेस्टरला अगदीं गरीब लोकांमध्येंहि झालीं आहेत. आणि लॅंकेशायरच्या मजूरवर्गातल्या स्त्रीपुरुषांनीं देखील त्यांना पैसे दिले आहेत. लॅंकेशायरचा नाश व्हावा असें त्यांनां मुळींच वाटत नाहीं व त्याच्यायोगानें हिंदुस्थानचें कल्याण होईल असेहि वाटत नाहीं. हिंदुस्थानांत कपडा महाग होईल. आणि येथले कांहीं मिलवाले गबर बनतील एवढेच. मॅन्चेस्टरच्या मजूरवर्गाविषयी देखील त्याना सहानुभूतीच वाटते. जसे हिंदुस्थानांतले गरीब तसेच तिकडले गरीब. त्यांनीं कां उपाशीं मरावे; असें त्यांस वाटते. उलट म्यान्चेस्टरचा कांहीं उत्पात होऊन नाश झाला म्हणजे तेथील कापडाच्या गिरण्यांचा धदा बुडेल एवढेंच नाही तर गिरण्यांनां यंत्रें किंवा यंत्रांचे भाग पुरविणाराचाहि धदा बुडेल आणि हिंदुस्थानांतील गिरण्याहि अडचणींतच पडतील. इग्लंडचें अकल्याण झाल्याने हिंदुस्थानचे कल्याण नाहीं. शिवाय हिंदुस्थानी मालाला इग्लडमध्ये मागणीहि कमी येईल, भाव कमीं येईल आणि शेतकरी नुकसान पावतील आणि हिंदुस्थानचे अनेक धदे बसतील. एका देशाचे अकल्याण ते दुसऱ्या देशाचे कल्याण ही स्थिति तात्पुरतीच असते, म्हणजे दोघांची लढाई चालू असली तर तेवढ्यापुरती असते. इंग्लंडच्या कल्याणानें हिंदुस्थानचें कल्याण वाढणार आणि उलटपक्षीं हिंदुस्थानच्या कल्याणाने इंग्लंडचे वाढणार असेंच त्यांचें मत झाले आहे, याप्रकारें ब्रह्मगिरींचा पूर्वेतिहास आणि

मते हीं सर्व बॅरिस्टर सुतारे यांनी जेवताना अनेक प्रश्न विचारून काढून घेतली. हिंदुस्थानांत आल्यानतर काय करावयाचे हे ब्रह्मगिरींचे ठरलें नाहीं पण कांहीं धार्मिक किंवा सामाजिक चळवळीमध्यें पडावें, हिंदु समाजास बलवान करण्यासाठी कांहीं खटपट करावी इत्यादि कल्पना ब्रह्मगिरींच्या डोक्यांत आहेत हेहि त्या प्रश्नोत्तरात बाहेर पडले. जेवण चालले असता त्या संभाषणात इंदिराबाईनीं भाग घेतला नाहीं तरी ते संभाषण त्या उत्सुकतेने आणि मधून मधून स्मितयुक्त मुद्रेने ऐकत होत्या असे दिसत होते, आणि त्यामुळे त्या भोजनप्रसगींच्या संभाषणातून त्या वगळल्या गेल्या नाहीत असे स्वरूप त्या भोजनप्रसगाला त्यानी आपल्या चातुर्याने दिले. आणि योग्य प्रसगी 'अस्स' आणि 'वा!' असे उद्गार काढून त्या दोघा पुरुषाची दाक्षिण्यहीनता व्यक्त होऊ दिली नाहीं.

भोजनोत्तर बॅरिस्टर सुतारे यानी ब्रह्मगिरीस सांगितले कीं, "तुम्हीं माझ्याकडेसच कांहीं दिवस रहा. तुम्हास आजच्या हिंदुस्थानाचा परिचय होण्यासाठीं जी माहिती लागेल ती मी देईन आणि तुम्हास जे काय करावयाचे असेल त्याला मी मदतहि करीन," आणि ब्रह्मगिरीनी रहाण्याचे कबूलहि केले. रात्रीं तेथेच रहावयाचे आणि दुसऱ्या दिवशी सामान आणण्यास तेवढें ब्रह्मगिरीनी जावे असे दोघाचे ठरले, व रा. सुतारे यांनीं लगेच टेलिफोन करून ताजच्या म्यानेजरला सांगितले कीं, मि. ब्रह्मगिरि हे येथेच रात्रीं रहाणार आहेत तर त्याची वाट पाहू नये; उद्यां सकाळी ते खोली रिकामी करून देतील.

भोजनोत्तर दोघेहि दुसऱ्या मजल्यावर लहानसा पडवीसारखा भाग होता तेथे जाऊन बसले. इंदिराबाईनीं काफी आणि फळे आणून ठेवलीं तीं घेऊन दोघाचे धूम्रपान चालू झाले आणि गप्पा तर चालूच राहिल्या.

गप्पा चालू असताना ब्यारिस्टर सुतारे यांनी आणखी थोडी फेरतपासणी केली. आणि ब्रह्मगिरींस आणखी काहीं प्रश्न विचारले, त्यांत त्याचे शिक्षण काय झाले होते, इत्यादि गोष्टी विचारल्या, आणि काढून घेतले कीं, ब्रह्मगिरीच्यानें म्याट्रिकचा उबरठा ओलांडवला नाही म्हणून ते व्हिक्टोरिया जुबिली टेक्निकल स्कूलमध्ये गेले. तेथे प्रथम स्पिनिंगच्या कोर्सकडे १ वर्ष घालविले. तेथे एक वर्षात कंटाळून मग ते मेक्यानिकल एन्जीनिअरिंगकडे गेले. त्या बाजूला त्यांनीं तीन वर्षाचा अभ्यासक्रम पुरा केला पण एन्जीनिअरची त्याची कोणतीच परिक्षा पास झाली नाही. त्यावेळेस परीक्षेला बसण्यासाठी पूर्वतयारी म्हणून कोठे तरी २०।२५ रुपयावर नोकरी करावी लागली असती, तशी करणे त्यांना नको होते, त्यांची परीक्षा झाली नाही तरी त्यांस चागल्या पगाराची नोकरी मात्र पाहिजे होती. आणि ती त्यास मिळविण्याचा मार्ग म्हणजे एकच होता, आणि तो म्हटला म्हणजे कांहीं तरी साहस करावे हा होता आणि म्हणून त्यांनी पुढे आफ्रिकेस जाणाऱ्या गलबतावर एन्जीनिअरच्या हाताखाली नोकरी धरली, आफ्रिकेला गेले; तेथे बोटीची नोकरी सोडली आणि कांही दिवस एका इंग्रजाच्या मळ्यावर नोकरी केली, तेथील नोकरी सोडून ते पुढे भटकू लागले. इग्लंडला गेले; इग्लडमध्ये काही दिवस छापखान्यात कपाझिटरचे काम केले, तर काहीं दिवस म्यान्चेस्टरला स्पिनिंगकडे, तर काही दिवस एन्जीनिअरच्या हाताखाली असे काम केले. पण जेव्हा वेळ सांपडेल तेव्हां लंडनमध्ये येऊन ब्रिटिश म्यूझिअममध्ये पुस्तके वाचावी. म्याचेस्टरलाहि पुस्तके वाचायला चागली मिळत. काही दिवस म्यान्चेस्टरच्या वर्तमानपत्रांत हिंदुस्थानवरील पुस्तकांवर अभिप्रायांच्या टिप्पणी लिहाव्यात आणि अभिप्रायासाठी आलेली पुस्तके

तावडतोब बुकसेलरनां विकून टाकावी; इत्यादि गोष्टीनीं भरलेल्या आयुष्यक्रमाचे सबध चित्र ब्रह्मगिरींनी बॅरिस्टरान्या प्रश्नाना दिलेल्या उत्त-रांत सांगून टाकले. या तऱ्हेचा आयुष्यक्रम ऐकल्यानतर ब्यारिस्टरानी असे उद्गार काढले कीं, तुमचा एकदर आयुर्वृतान्त मला मोठा मनोरजक वाटतो! आणि त्या प्रकारचा माझा वृत्तात असता तर मी आपणास मोठा भाग्यवान समजलो असतो.

ब्रह्मगिरि म्हणाले "खरोखर पाहिले असता माझे आयुष्य खरोखरच स्पृहणीय तऱ्हेने खर्च झाले असे मला वाटते; मी पुष्कळदा आपल्या मनाला विचारतो की माझ्या आयुष्यक्रमातील अमुक एक गोष्ट झाली नसती तर बरे झाले असते काय? असा प्रश्न विचारला असतां मनाकडून तावडतोब उत्तर येते की, नाही, ती झाली हेच बरें झाले. मला पूर्वी ज्या चुका वाटत होत्या त्या चुका होण्यातच माझा फायदा होता. त्या चुका झाल्या नसत्या तर त्या चुकांमुळे उत्पन्न झालेल्या अनुभवास मी मुकलो असतो. किंबहुना त्या चुका-मुळेच आयुष्यास निराळी दिशा लागली. चुका झाल्या नसत्या तर कायमच्या ठशाचे जे आयुष्य-क्रम दिसतात, त्यांपैकी कोणत्या तरी तऱ्हेचा माझा आयुष्यक्रम बनला असता. डॉक्टर, वकील सरकारी नोकर हे जे आयुष्यक्रमाचे ठराविक नमुने आहेत त्यांविषयी मला अरुचि आहे. अगदी निराळ्या प्रकारचा आयुष्यक्रम एकाएकी उत्पन्न होत नाही. आयुष्यास वैचित्र्य येण्यासाठी एका सीध्या रस्त्याने जाण्यासाठी प्राणी जो प्रयत्न करतो. किंवा त्याचे आईबाप प्रयत्न करतात त्यांत त्यांनां अपयश यावे लागते. तसे अपयश आले, म्हणजेच निराळ्या प्रकारच्या कार्यक्रमास उप-युक्त असा पुरुष उत्पन्न झाला."

"तुम्ही जगभर हिंडलां, अनेक ठिकाणी काम केले पण तुम्हीं आपल्या उत्कर्षास साधक अशी पदवी अगर असे कोणतेहि साक्षीपत्रक मिळविले नाहीं. विद्येच्या उत्कृष्टतेचीं साक्षीपत्रकें न मिळ-विणारा पुरुष असामान्य कार्ये करणारा कसा म्हणता? मी उलट असे म्हणतो की जे पदवी किंवा साक्षीपत्रके मिळविणारे लोक आहेत तेच वरचीं कामे करतील आणि शिक्षणक्रमात जेव्हां व्यक्तीस अपयश येते तेव्हां दुय्यम काम कर-णारा मनुष्य उत्पन्न होतो असे नव्हे काय?"

"असले कोणतेहि साक्षीपत्रक न मिळविणे ही गोष्ट तर माझ्या आयुष्यातील अत्यत स्पृहणीय भाग आहे असेच मला वाटते. कार्यकर्ता दुसरा कोणी असला म्हणजे त्याचा दुय्यम किंवा तिय्यम होण्यास आपण योग्य आहो अशी आपली योग्यता दुसऱ्यास पटविण्यासाठी केवळ मदतनीस होऊ इच्छिणाऱ्यास या पत्रकांचा उपयोग असतो. ज्या मनुष्याला स्वतःच कार्यकर्ता बनावयाचे आहे त्यास या प्रकारच्या शिफारसपत्रांचा उपयोग काय? माझा उत्कर्ष माझ्या कर्तृत्वावरच होणार, प्रमाणपत्रावर होणार नाहीं. व ज्याअर्थी मीच कार्यकर्ता आहे, त्याअर्थी मला प्रमाणपत्रांची जरूर काय?"

"एका दृष्टीने तुम्हीं म्हणता त्यांत अर्थ आहे; आतांपर्यंतचा माझा आयुष्यक्रम पाहिल्यास परीक्षा झालेल्या मंडळीच्या हाताखालीं काम कर-ण्यासाठीच मी तयार झालो असेच लोक म्हण-तील. जर माझ्या हातून यापुढें इतर धंद्यांतल्या लोकांपेक्षां अगदी स्वतंत्र कार्य झालें नाहीं, किंबहुना मी तसले कांही करायलाच लागलो नसतो तर परीक्षांत यश न आलेल्या मंडळींनां परीक्षा झालेल्या मडळीची दुय्यमता जशी स्वीका-रावी लागते तशी मलाहि आयुष्यभर स्वीकारावी लागेल असे म्हणण्यास हरकत नाही, आणि ही गोष्ट अगदी स्वाभाविक आहे. माझ्यासारखे जे स्वेच्छाचारी लोक आहेत त्यांचें भवितव्य भर्तृह-रीने पूर्वींच लिहून ठेवले आहे. तो म्हणतो कीं—

**कुसुमस्तबकस्येव द्वयी वृत्तिर्मनस्विनाम्।**
**मूर्ध्नि वा सर्वलोकस्य विशीर्येत वनेऽथवा॥**

मी अत्यंत उच्च दर्जाचें काम करण्यास उत्कंठित आहे, आणि त्या प्रकारचें कार्य करण्यांत मला अपयश जरी आले तरी त्याची मला पर्वा नाही. मी वनात विशीर्ण होण्यास तितकाच तयार आहे. पण माझ्या फायद्याची दुसरी एक गोष्ट म्हटली म्हणजे मी सन्याशी आहे ही होय. त्यामुळे मला दुसऱ्या लौकिक अपेक्षाच नाहींत. ज्यांनां वैवाहिक बधन असते त्यांस आपल्यासाठीं नव्हे तर आपल्या बायकांमुलांसाठी केवळ पोट भरणें किंवा द्रव्य मिळविणे या मार्गातच गुतून रहावे लागते, आणि पत्करलेला आयुष्यक्रम चुकलेला आहे असे जरी आढळून आले तरी तो बदलताहि येत नाही. पण माझ्या आयुष्यक्रमाचें स्वरूप पूर्वीच ठरले आहे. जेव्हा मी सन्यास घेतला तेव्हा कांही तरी सामाजिक किंवा धार्मिक कार्य करण्यासाठींच मी आपणांस वाहून घेतले; आणि ते कार्य मी आतांपर्यंत एकसारखे करीत नसलो तरी मधून मधून करीत आहे. पण आतांपर्यंत माझ्या कार्याची निश्चित दिशा मला समजली नव्हती पण ती नुकतीच समजली आहे, तीमुळे माझे पाय हिंदुस्थानांत वळले आहेत. इतके दिवस सार्वजनिक कार्य करावे असे वाटत होते पण कोणते करावें याची कल्पनाच नव्हती."

"तुमची आता कोणते कार्य करावे अशी इच्छा आहे? तुम्ही आपला कार्यक्रम कसा काय आंखला आहे?"

"कार्यक्रम अजून आंखावयाचा आहे. पण लोकांमध्ये कोणत्या तत्त्वांचा प्रचार करावयाचा त्याची दिशा ठरली आहे."

"तीं तत्त्वें धार्मिक आहेत काय!"

"धार्मिक, राजकीय, नैतिक आणि सामाजिक असा तीक्ष्ण भेद व्यवहारांत कधींच नसतो, आपल्या उन्नतीसाठीं आपण जो प्रयत्न करतो, त्यात सर्व प्रकारच्या क्रिया मोडतात. आधिभौतिक आणि आध्यात्मिक असाहि भेद खरा नाही. आधिभौतिक उन्नति होत असतां आध्यात्मिक उन्नतीदेखील होत असते. तर ज्याच्या योगाने राष्ट्र प्रगतीच्या मार्गावर येईल अशा तऱ्हेची भावना उत्पन्न करणे हे माझे कर्तव्य आहे असे मी समजतो; इतर लोकाचा आधिभौतिक उदय कसा झाला, त्या उदयाच्या पाठीमागे कोणकोणत्या उच्च भावना होत्या, त्याची आपणांस जाणीव पाहिजे एवढेच नव्हे तर त्या उत्पन्न करण्याचा प्रयत्न पाहिजे, याशिवाय आपले भवितव्य आपल्याच हाती आहे ही जाणीव पाहिजे आणि आपण प्रयत्न केल्यास ते फार उज्वल आहे ही देखील लोकांची खात्री करून दिली पाहिजे."

"तुम्ही फार आशावादी आहांत!"

"अर्थात आहे."

"तुम्ही हिंदुस्थानच्या भावी उन्नतीविषयीं मोठमोठया आशा बांधल्या आहेत. परदेशांतून तुम्ही अनेक कल्पना घेऊन नवीनच आला आहात त्याप्रमाणे मीहि घेऊन आलो, पण ज्याप्रमाणे माझी निराशा झाली त्याप्रमाणे तुमचीहि होईल असे वाटते. तुम्हांस असे वाटत असेल की, आपण अमुक करू व तमुक करू, पण प्रत्येक रस्त्यावर पसरलेले काटे तुमच्या दृष्टीस पडले म्हणजे तुम्हांस असे दिसून येईल कीं आपल्या सर्व कल्पना व्यर्थ आहेत."

"तुमचा काय अनुभव आहे?"

"माझा असा अनुभव आहे की, शहाण्या व प्रामाणिक मनुष्याने कोणत्याहि चांगल्या सार्वजनिक कामांत पडूं नये; लोकांनां कोणतेहि विधायक काम नको आहे, तुम्हीं विधायक काम करण्यास हातीं घेतले म्हणजे तुम्हांस लोकांपाशी पैसा मागत रहावा लागणार, तुम्ही तसले काम हाती घेतलें म्हणजे प्रतिष्ठित मडळींपैकीं पुष्कळांस असें वाटणार कीं "तुमचे काम बरे आहे," असें

आपण म्हटलें की त्यास मदत करण्यासाठीं खिशात हात घालावा लागणार; यासाठीं तुमच्या कामास बरेच कशासाठी म्हणा; व तो यासाठी तुम्ही लुच्चे आहांत असे म्हणू लागेल, नाही तर तुमचे कार्यच मोठेसे महत्वाचे नाही असे म्हणेल. बरे, तुम्ही ते काम जर आपला सगळा वेळ खर्च करून करावयाचे ठरविले तर तुम्हाला तुमच्या उपजीविकेसाठी पैसा त्या कार्यासाठी, तुम्ही जो पैसा जमवाल त्या पैशांतूनच घेतला पाहिजे, व तुम्ही तसा पैसा घेतला तर पैसे देणारा प्रत्येक मनुष्य तुमचा मालक झाला आणि तो तुम्हाला आपल्या कल्पना सांगत बसणार आणि तुम्ही त्याच्या कल्पनांप्रमाणे चालत नाही म्हणून तुमच्याविरुद्ध तो कागाळी करीत बसणार, आणि तुम्हाला पगार अगोदर फार कमी द्यावा म्हणून प्रत्येक मनुष्य सांगत रहाणार. माझ्या मताप्रमाणेच मला कमीत कमी सातआठशे रुपये पगार पाहिजे, त्याशिवाय मला येथील ज्या प्रकारच्या शिष्ट मंडळीत वागावे लागते, त्या तऱ्हेच्या शिष्ट मंडळीत रहाताच येणार नाही. पण कोणतेहि सार्वजनिक कार्य करावयास लागलो आणि स्वतः आठशे पगार घेतला तर तो बहुतेकांच्या डोळ्यात सलणार. ते म्हणणार आमचा हा पैसा घेतो आणि चैनीने रहातो आणि लोककल्याण आपण करतो म्हणून दाखवितो. आपले लोक मत्सरी आहेत, त्यानां उच्च काम व्हावे याची इच्छा नाही, काम न पहाता कोणता मनुष्य काय मिळवतो इकडे त्यांची दृष्टि आहे, आणि आपल्या पोटाला टांच लावून कोणी काम केले आणि तो मनुष्य त्या कामात मेला म्हणजे मात्र आपली मंडळी त्याच्या स्वार्थत्यागाबद्दल स्तुतिस्तोत्रें गात बसतील."

"तुम्हाला कोणकोणत्या कामाचा स्वतःचा अनुभव आहे?"

"स्वतःचा अनुभव मला एकाच संस्थेपुरता आहे. मला अनेक प्रकारच्या संस्था उत्पन्न करून माझे आयुष्य खराब करून घ्यावयाचें नव्हतें. माझी सार्वजनिक काम करण्याची हौस फिटली एवढे मात्र सांगतो."

"इतर देशात तुम्ही सांगितलेल्या वृत्तीचा अगदी अभाव आहे असे समजतां काय?"

"संपूर्ण अभाव नसला तरी प्राबल्य नसेल असे वाटते."

"आणि त्याचे कारण?"

"ते लोक अधिक मोठ्या मनाचे आणि कामाची चाड असणारे आणि मनुष्य स्वभाव अधिक जाणणारे आहेत."

"इतर लोकामध्ये ज्या मानसिक भावना आहेत त्या सार्वजनिक कार्याच्या बऱ्या वाईट अनुभवाशिवाय आल्या काय?"

"अनुभवानेच आल्या. त्या लोकांमध्येहि कांही काळपर्यंत आपल्या लोकांप्रमाणेंच क्षुद्र वृत्ति असली पाहिजे."

"इतके जर आपण कबूल करीत आहांत तर प्रश्न एवढाच उरला की, लोकामध्ये क्षुद्र वृत्ति असता देखील कार्य करीत रहाण्याची तयारी मनुष्याने ठेवावी किंवा नाही."

"तुम्हाला आपल्या लोकांची क्षुद्र वृत्ति किती दिवस राहील असे वाटते?" बॅ. सुतारे यानीं विचारलें.

"फार थोडे दिवस राहील." ब्रह्मगिरि म्हणाले.

"ही तुमची केवळ कल्पना आहे!"

"पूर्वी आपल्या लोकांच्या हातीं कांहीं सत्ता नव्हती त्यामुळें लोककल्याणाचे कांहींहि काम करता येण्याजोगें नव्हते. आतां आपल्या लोकांच्या हातीं कांही तरी अधिकार आला आहे, तर आतां लोकहितासाठी खटपट करण्याची संधि वाढली आहे, व त्यामुळे लोकमतास जबाबदार असा जो अधिकारी वर्ग आहे त्यास चांगले काम करणाऱ्या संस्थास उत्तेजन द्यावें लागेल."

"आपल्या हातीं सत्ता आली आहे असे मला मुळीच वाटत नाही. देशकल्याणाच्या कल्पना असलेला सुशिक्षित वर्ग आणि सत्ता यांची दृष्टादृष्ट होण्यास किती तरी वेळ लागतो. ज्याला

कल्पना असतील असा वर्ग तरुण असतो. त्या वर्गानें आपल्या कल्पनांप्रमाणें कांहीं घडवून आणावयाचें म्हटले तर त्याला कौन्सिलांत गेलें पाहिजे, कौन्सिलात जावयाचे आणि कांहीं काम करावयाचे म्हणजे पक्ष बनविला पाहिजे, पक्ष बनवावयाचा म्हणजे आपल्या हातीं माणसे राखण्यासाठीं त्याच्या तोंडावर काय टाकावे या तजविजीत राहिले पाहिजे. कौन्सिलांत शिरावयाचें म्हणजे त्या अहमहमिकेत पुष्कळ श्रीमंत माणसे पडणार. त्या श्रीमंत मंडळींनीं पुष्कळ खर्च करून मते मिळविणे सोपें आहे, त्याच्यापुढे ज्यांनां देशसुधारणेचे विचार असतील पण पैसा नसेल त्यांनीं काय करावयाचें? ''

''तुमचे असें म्हणणे आहे कीं, ज्यानां विचार असतील त्यांनां आपल्या विचारांचा देशाच्या राज्यव्यवस्थेवर परिणाम घडविण्याची संधि कांहीच नाहीं? ''

'' माझ्या मते काहीच नाहीं. ''

''पण तुमचे जे कांहीं विचार असतील ते विचार, जीं माणसे अधिकारावर आरूढ होतात त्यांच्या डोक्यांत शिरकावणें अशक्य आहे? ''

''सध्यां तर अशक्यच दिसते! ''

''कां बरें? ''

''सध्यातर सुशिक्षित माणसे कौन्सिलांत जातील असेंच मला वाटत नाहीं. देशातील मध्यमवर्ग इंग्रज लोकांच्या स्वार्थाला आळा घालूं पहाणार, तर या मध्यम वर्गासच दुर्बल करून टाकण्यासाठी मताचा हक्क संपादून विस्तारविला आहे. अधिक सुशिक्षित वर्ग तुमचे अकल्याण करीत आहे, तोच नोकऱ्या बळकावून बसला आहे अशी समजूत करून देऊन ब्राह्मणेतरांना ब्राह्मणांविरुद्ध उठविले आहे, म्हणजे ब्राह्मण वर्गास दुपारची भ्रांत उत्पन्न करून देऊन ब्राह्मण वर्गास चूप करणे हा प्रस्तुत सुधारणांचा उद्देश दिसतो. ''

''मला येथील परिस्थितीसंबंधानें ज्ञान नाहीं; त्यामुळे मला या वादांत चांगल्या तऱ्हेने पडतां येणार नाहीं. तथापि तुम्ही निराशेचे झटके दाखवून आपण माझ्या कार्याचे महत्त्वच दाखवून देत आहांत, आपल्या मनांत निराशा भरली आहे ती जर सुशिक्षित वर्गाच्या सामान्य मनोवृत्तीची द्योतक असली तर भावी उन्नतीची आशा आणि तीसाठीं प्रयत्न यास चेतना देणे हे माझे कार्य ठरतच आहे.''

त्या रात्री दुसरीं अनेक बोलणीं झालीं व नंतर दोघेहि एकमेकांचा निरोप घेऊन निजावयासगेले. निजते वेळेस बॅ. सुतारे आपल्या पत्नीस म्हणाले कीं, या स्वामीजींस आपल्या कल्पनांचा फोलपणा लवकरच दिसून येईल.

दुसऱ्या दिवशी स्वामी ब्रह्मगिरींचे सामान आलें. त्या सामानाच्या दोन ट्रंका होत्या. एका ट्रंकेत कपडे वगैरे होते व दुसरी ट्रंक पुस्तकांनीं भरली होती. कपड्यांमध्यें त्यांचे संन्यासी थाटाचे कपडे होते. तसेंच सामान्य यूरोपियन लोकाच्या आयुष्यक्रमात निरनिराळ्या ऋतूत लागणारे कपडे होते. ग्लांडस्टनबॅगमध्ये नेहमीचें प्रातर्विधीचे सामान म्हणजे ब्रश, साबण, स्पंज, दंतधावन, श्मश्रूसाहित्य, नखकर्तनी, इत्यादि सर्व प्रकारचे सामान होते. ट्रंकमध्ये अनेक प्रकारचीं पुस्तके होतीं व प्रत्येक पुस्तकावर खुणा सपाटून केलेल्या होत्या. कांहीं नोटबुकेंहि होतीं त्यांत सर्व प्रकारच्या टीपा होत्या. एका नोटबुकावर येशू ख्रिस्ताचे संप्रदायस्थापक कौशल्य असे नांव लिहिले होतें व त्यात त्याच्या चरित्राचे सूक्ष्म निरीक्षण होतें. बुद्धाच्या चरित्राच्या टिपणीची वही निराळी होती. पुस्तकांमध्ये मानसशास्त्रीय, अर्थशास्त्रीय, नीतिशास्त्रीय, पुस्तकें पुष्कळ होतीं. तसेच आपले अनेक धार्मिक ग्रंथहि होते. तीं पुस्तके पाहून ब्यारिस्टर म्हणाले कीं, ग्रंथसंभार तर बराच जमा केला आहे.

---

## प्रकरण २ रें.

## मिसेस् हंटर आणि मिस् हंटर.

मिसेस् हंटर या कांहीं तरी सामाजिक काम कशा करूं लागल्या याचें त्याच्या मैत्रिणींना आश्चर्यच वाटत होते. मिसेस् हंटर ही इंग्लंडमध्ये पूर्ववयांत असतांना, तेथील फ्याशनेबल समाजांत देखणी तरुणी म्हणून प्रसिद्ध होती; आणि पुढे एका श्रीमंत प्लँटरची उधळी बायको या नात्यानें तिचे नांव सर्वतोमुखीं झालें होते. ती आफ्रिकेंत गेली होती,आणि आफ्रिकेंत तिचा लौकिक चांगला नव्हता, आणि नवऱ्याशीं सहानुभूति न बाळगणारी स्त्री म्हणून तिची ख्याति झाली, आणि ती पुढे आफ्रिकेला कंटाळून परत आली. तिच्या नवऱ्याचे तिच्यावर फार प्रेम होते, आणि तिचे मात्र तिच्या नवऱ्यावर प्रेम नव्हते. आणि केवळ पैशाच्याच लोभासाठीं नवऱ्याशीं लग्न केले, आणि नवऱ्यास आपले सहवाससौख्य नाकारून नवऱ्याच्या नोकरींत असलेल्या तरुण एजीनिअरबरोबर फिरावयास जावे असा क्रम तिने आफ्रिकेंत ठेवला होता. नवऱ्याने कांहीं मंडळी बोलावली तर हिनें मुद्दाम गैरहजर रहावे असा देखील ती प्रसंग आणीत होती; आणि या देखण्या पुष्ट पोरीच्या अंत:करणांत नवऱ्याविषयी कांहीं आर्द्रतेचा भाव असेल किंवा नाहीं याविषयीं लोक पृच्छा करीत आणि लोकांची सहानुभूति तिच्या नवऱ्याकडे धांव घेत असे.

आडेलीन हंटरचे वर्तन पुढे असे होऊ लागलें कीं, त्याकडे कानाडोळा करणे तिच्या नवऱ्यालाहि जड जाऊं लागले. तिचा नवरा तिच्या वर्तनाकडे केवळ कठोर दृष्टीने पहात नव्हता. आडेलीनची घरच्या नोकरापाशीं किंवा मळ्यावरील मजूरांसबंधीं दयार्द्र दृष्टि त्यास मधून मधून दृष्टीस पडे, व कांहीं दिवस तर असे होत असे की, हा एकसारखा कामात गढलेला असल्यामुळे आडेलीन जर दुसऱ्या कोणाबरोबर हिंडताना दिसली तर त्यास तिचे करणे अगदीं स्वाभाविक वाटे. ती बिचारी घरीं एकटी बसून काय करील असें तो मनात म्हणत असे, आडेलीनचे जे कांही न्यायीपणाचे आणि दुर्बलाविषयीं व मुक्या जनावरांविषयी सहानुभूतीचे गुण दिसून आले त्यांबरोबर नवऱ्याशीं इमानदारी ही त्यानें गृहीत व धरली. जरी ती नवऱ्यास पुष्कळ वेळा तुसडेपणाने वागवी तरी त्यास असे वाटत होते कीं, आपल्यावर ही रागावली आहे आणि आपल्याबरोबर जे हिने लग्न केले ते आईबापाच्या इच्छेमुळे केले व हिला आपल्यावर अनुरक्त व्हावयास वेळ दिला पाहिजे, एकदम घाई करून उपयोग नाहीं. पुष्कळदां तो तर कामातच गढलेला असे, त्यामुळें बायको आपल्याशी लगट करीत नाहीं हें देखील त्याला बरेच वाटत असे. नवरा आपल्या दुष्ट आचरणाकडे लक्ष देऊन आपला त्याग कां करीत नाहीं याचे आडेलीनला गूढ पडे. तथापि जेव्हा आडेलीनच्या वर्तनाचा भ्रष्टा फारच होऊ लागला आणि आडेलीन ही दुसऱ्या एका गांवांत परकीय पुरुषाबरोबर हॉटेलमध्ये एका खोलींत राहिली तेव्हा मात्र नवऱ्यास तिला डायव्होर्स देऊन तिचा त्याग करणे अवश्य झाले.

आडेलीन कांहीं दिवस आफ्रिकेंतच राहिली, तथापि झालेला लग्नसंबंध द्वाडपणा करून मोडण्यापूर्वी सहा सात वर्षे निघून गेलीं होती. आडेलीन इंग्लंडला परत आली, पण आपल्या आईबापांकडे गेलीच नाहीं. दुर्वतनाचा प्रत्यक्ष पुरावा होऊन डायव्होर्स झालेल्या बाईचा तिरस्कार घरचीच मंडळी जास्त करतील हे तिला ठाऊक होते. तेव्हा ती कोठे तरी काम करावे या अपेक्षेने आली पण तिला एकाएकी कोठे कामहि मिळेना. प्रत्यक्ष उपजीविका मिळविण्यासाठीं जी स्त्रीकामकऱ्यांमध्ये स्पर्धा चाललेली असते, त्या स्पर्धेची तिला जाणीव होऊ लागली तिनें स्वत:ची उपजीविका करण्यासाठीं काय खटपटी केल्या

वगैरेचा वृत्तात येथे सविस्तर सांगण्याची जरूर नाही. तिच्या डायव्होर्सची चटकदार वर्णने इग्रजी पत्रातून भरली होती, त्यामुळे शाळा वगैरेची नोकरी तिला बंद होती. काहीं नाटककपन्यांनी मात्र तिचे स्वागत केले असते, व तिच्याकडे कित्येक नाटककंपन्याच्या म्यानेजराकडून सुस्वागताच्या सूचना फेकल्या गेल्या होत्या. पुष्कळ नाटककंपन्यांमध्ये अशी समजूत असे की, ज्या स्त्रिया प्रेमाच्या अनेक भानगडी करून अनेक लफडयात सापडल्या असतील त्या स्त्रियाच चागल्या नटी होतात. शिवाय जी स्त्री देखणी आहे व आपल्या वर्तनातील अघळपघळपणामुळे डायव्होर्स मिळालेली आहे अशा स्त्रिया आपल्या भोवतीं असणे हे नाटककपन्याच्या म्यानेजराना अरुचिकारक होत नाही. शिवाय ज्या स्त्रींची काहींतरी चमचमीत गोष्ट सांगता येईल अशा कारणाने वर्तमानपत्रातून प्रसिद्धि झाली आहे, तिला पहाण्यासाठीच लोक उत्सुक असतात, आणि यामुळे तिला रगभूमीवर आणलें तर नटी या नात्याने जरी तिची किमत फारशी नसली तरी लोक त्या खेळाला येतील व पैसे हे मिळतीलच. या अनेक गोष्टींमुळे तिला नाटककपन्याकडून मागणी होती व. तथापि आडेलीनने हा धदा स्वीकारला नाही. पण उपजीविकेसाठी वर्तमानपत्रातून व मासिकातून लेख लिहू लागली. ती सुप्रसिद्ध नसली तरी दुष्प्रसिद्ध होती; म्हणजे प्रसिद्धच होती व त्यामुळे तिच्या हातच्या लेखाकडे लोकांचे लक्ष जाईल ही वृत्ति मासिके व वर्तमानपत्रे यांच्या सपादकास होती. संपादकाचे नीतिशास्त्र काय? जो लेख अक खपविण्यास मदत करील त्या लेखाचा सत्कार करावयाचा व आडेलीन हटरचा लेख म्हणजे त्यांत कांही चमचमीत असेल अशी लोकांची भावना असल्यामुळे तिचा लेख आला असता, मासिक लोक उत्कंठेनें वाचतील आणि तो अंक खपेल असें संपादकास वाटे. पुष्कळ प्रसंगी कोणत्या विषयावर तिने लेख लिहावा त्याचे नावहि संपादकाकडून सुचविण्यांत येई. "गोऱ्या लोकांचा काळ्या आफ्रिकन बायकांशीं सबध", "आफ्रिकेतील मिश्र रक्ताच्या लोकाचे गुणधर्म", "आफ्रिकेतील स्त्रीपुरुषांची नीतिमत्ता", "अयशस्वी विवाह" इत्यादि विषयावर ती लाबलाब विस्तृत वर्णनांच लेख लिही, आणि ते वाचलेहि जात.

आडेलीनने काही कालानतर एक गोष्ट प्रसिद्ध केली ती बहुताशी आत्मचरित्रात्मक असावी. त्या गोष्टींतील नायिकेचे नाव तिने धैर्याने आडेलीन हेच ठेवले होते. त्या गोष्टीचे नाव "मत्सरस्थान झालेली अभागिनी" असे होते. त्या गोष्टींत असें दाखविले होते की, आडेलीन ही सामान्य सुस्थितीत असलेल्या कुटुंबातली मुलगी होती, ती सुदर होती आणि तिच्या सौंदर्यामुळे आणि पोषाख वगैरे करण्यांत दिसून येणाऱ्या रसिकतेमुळे आणि संभाषणात आणि उलट कोटी करण्यात दिसून येणाऱ्या चातुर्यामुळे तिची ख्याति लडनच्या सोसायटीत बरीच झाली. अनेक तरुण तिच्याभोवती जमा होऊ लागले, तिला प्रेमभावना अगदी अल्पवयातच, म्हणजे लडनच्या शिष्ट समाजांत तिचे "डिबट" म्हणजे विधियुक्त प्रथमदर्शन होण्यापूर्वीच जागृत झाली होती. तिचे अतःकरण एका शरीराने पंगु अशा रिचर्ड कार्नी नांवाच्या तरुणावर जडले, तो पगु तरुण सालचे दीडशेदोनशे पौंड उत्पन्न असलेला होता, आणि तिच्या एका मैत्रिणीचा भाऊ होता, त्या तरुणाच्या सहवासात असतां तिच्या मनांत तरुणाविषयीं अनुकपा तर येतच असे पण त्याशिवाय दुसरा उच्चभावनात्मक एक सस्कार तिच्या मनावर होई. जगांतील दुर्बल व सामर्थ्यहीन अशा लोकांना मदत करणे हे सुशिक्षित राष्ट्राचे व लोकांचे कर्तव्य आहे असें तिला वाटत होते. आणि त्या तरुणास आपल्या पगूपणामुळे हें कर्तव्य करण्यासाठी जी असमर्थता उत्पन्न झाली होती तीबद्दल

फार दु:ख होत असे. आणि त्याबरोबर तीसहि दु:ख होत असे.

रिचर्डचा जन्म हिंदुस्थानांत झाला होता. त्याचा बाप हिंदुस्थानांत अधिकारी होता. हिंदुस्थानांत त्याच्या आयुष्याची पहिलीं सात आठ वर्षे गेलीं होती आणि हिंदुस्थानांतील लोकांविषयी आपलेपणा त्याच्या मनांत चांगलाच उत्पन्न झाला होता. तथापि हिंदुस्थानांतील लोकांविषयीं अनुकंपा त्यास इंग्लंडमध्ये गेल्यावरच उत्पन्न झाली. का कीं, हिंदुस्थानी लोकांचें दैन्य त्यास इंग्लंड पाहिल्यावरच अधिक स्पष्टपणे समजू लागले. त्याचे शिक्षण इंग्लंडमध्ये चालू होते. पब्लिक स्कूलमधून बाहेर पडल्यानतर तो आक्सफर्डला गेला, व आक्सफर्डमध्यें असताच त्यास पक्षघात झाला, व तेव्हापासून तो एकसारखा रुग्णस्थितींत होता. त्याची बहीण इंग्लंडमध्येच शिकत होती व मास्तरीण झाली होती. त्यास पक्षघात होऊन काही दिवस झाल्यानंतर त्याचा बाप वारला. व बापाचे सर्व पैसे त्यास मिळाले. त्यावर तो आपले दिवस काढीत होता. त्याला घराच्या बाहेर फारसे जातां येत नसे. त्यामुळे घरच्याघरींच त्याचे वाचन होत होते व त्याने पुस्तकेंहि बरींच जमविली होती. त्याच्या मनात हिंदुस्थानांत परत जावयाचे होते. त्यास वारंवार असे वाटे की, आपण हिंदुस्थानांत जाऊन तेथील लोकांस अधिक सुखाचे दिवस यावेत म्हणून काम केले पाहिजे. हिंदुस्थान माझा देश आहे असे तो म्हणे. मला बापानें जे पैसे ठेवले ते हिंदुस्थानांत नोकरी करून मिळविलेले आहेत. व ज्या अर्थी मी अजून हिंदुस्थानचेच मीठ खात आहे त्याअर्थी माझे कर्तव्यस्थान हिंदुस्थानच होय. असे तो वारंवार बोलून दाखवी आणि बहिणीला म्हणे कीं चल, आपण दोघेहि हिंदुस्थानातच जाऊं. आपल्यास येथे राहून काय करावयाचे आहे?

आडेलीनच्या मनांत अशी इच्छा बळावत चालली होती कीं, रिचर्ड कार्नी ह्याच्या मनांत ज्या इच्छा आहेत त्या पूर्ण करण्यासाठीं सर्व प्रकारें मदत करावी. ती आपल्याशीं म्हणे कीं, "हा बिचारा पंगु आहे, पण आपल्या दु:खाचे रडगाणे गात रहाण्या ऐवजी हा जगांतील दु:खें दूर करण्याच्या विचारांत गढलेला आहे. रिचर्डचे तरी जगांत काळजी घेईल असे कोण आहे. त्याची बहीण लग्न झाल्यानंतर नवऱ्याकडे जाईल, आणि जी खाणावळीण बाई रिचर्डचे सर्व काम करावयाचें पत्करील, तिच्यावर रिचर्डचे भवितव्य अवलंबून आहे. रिचर्डचें पक्षघातानें कमरेखालचे अर्धे शरीर विकल झालें आहे, रिचर्डबरोबर लग्न तरी कोण बाई करणार! अर्थात् या जगांतील दुर्बल वर्गाविषयीं अत्यंत सहानुभूति बाळगणाऱ्या रिचर्डचे कसे हाल होतील बरे" या तऱ्हेचे विचार मनांत येऊन रिचर्डविषयीं तिच्या मनांत अत्यत सहानुभूति उत्पन्न झाली होती आणि त्याची आपण काळजी घ्यावी आणि त्याने आणि आपण मिळून कांहीं भूतदयेचें काम हातीं घ्यावे याची तिने आपल्या मनांत चित्रें रेखाटली होती. ती जेव्हां समाजांत मिसळूं लागली तेव्हां तिचे चित्त अगदीं स्थिर झालेले होते. आणि कितीहि देखण्या आणि श्रीमान् तरुणाने तिच्याकडे लक्ष दाखविलें तरी त्याच्या योगानें न गडबडणारे झाले होते, आणि, तरुणांची प्रशसावाक्ये आणि लक्षपरता ती स्वीकारीत असे, पण ती केवळ समाजांतील सौजन्याने वागण्याची एक रीत या दृष्टीने स्वीकारीत असे; आणि यामुळें आडेलीन तिच्या परिचितास अधिकच कौतुकास्पद झाली होती. आडेलीनच्या अंत:करणांत आत्मसमर्पणाची भावना जागृत झालेली होती. आणि भोंवतालच्या श्रीमंत सुशोभित समाजाकडे ती लक्ष्मीदेवतेने केवळ आत्मगौरवासाठीं सजविलेल्या अंत:करणहीन व्यक्ती या दृष्टीने पहात होती. ज्या व्यक्तीमध्ये आत्मसमर्पणभावना जागृत झाली तीच व्यक्ति मनुष्य होय इतर व्यक्ती म्हणजे केवळ

लहानमुकेसारख्या सामान्य भावना असलेल्या व्यक्ती होत आणि त्या पशूपेक्षां जास्त किंमतीच्या नाहींत असें तिचें मत होऊं लागलें होतें.

तिच्या मनांत हे विचार जरी चालू होते तरी तिच्या आप्तांच्या मनांत हे विचार नव्हते. सुंदर मुलगी आणि विविध कलांनीं युक्त अशी मुलगी म्हणजे आईबापाच्या महत्त्वाकांक्षेचे साधन आहे अशी भावना तिच्या आप्तांच्या मनात होती. ती जसजशी लोकांत अधिक प्रिय होऊं लागली. व जसजसे सरदार वर्गातील लोकहि तिच्या सौंदर्याची व गुणाची वाखाणणी करूं लागले तसतशी तिच्या आईबापाची महत्त्वाकांक्षा वाढूं लागली. व आपल्या मध्यम वर्गातील घराण्यास उच्च वर्गातील घराण्याशीं विवाहसंबंधाने संयुक्त होण्याचा काळ जवळ जवळ येत आहे अशा भावना त्यांच्या मनांत खेळूं लागल्या. रिचर्ड कार्नीकडे आपल्या मुलीचा ओढा बराच आहे ही गोष्ट आईबापांच्या लक्षांत आली नाही असे नाहीं. पण एखाद्या पंगूबरोबर लग्न करण्याइतका "मूर्खपणा" त्यांनीं तिच्या ठायीं मुळींच कल्पिला नाही. आपली मुलगी अमक्या लार्डला आवडली आहे, तमका सर तिच्या नृत्यकौशल्याविषयीं असे असे बोलला इत्यादि गोष्टीच नेहमीं ते तिच्यापाशीं काढीत असत.

आडेलीनची लंडन सोसायटींत ख्याति वाढत चालली आणि त्या ख्यातीमुळे तिला मनातून आनंद होत असे हे तर खरेंच पण आपण सर्व जनतेच्या अपेक्षा, आपण पंगूशी विवाह करून कशा फोल करूं इत्यादि कल्पना तिच्या मनात येऊन तिची स्मितयुक्तता एकसारखी वृद्धिंगत होत असे.

एखाद्या देखण्या समाजात चमकणाऱ्या, आणि जिच्या सौंदर्यावर अनेक आप्तांनी मोटमोठ्या आशा बांधल्या आहेत अशा एका मुलीनें जर एखाद्या पंगूबरोबर लग्न लावण्याचा, आणि आपलें सर्व आयुष्य त्याच्या प्रीत्यर्थ खर्च करण्याचा निश्चय केला तर तो कोण टिकूं देणार? तिच्या मनावर झालेले संस्कार तिच्या आईबापांनी ओळखले तेव्हां "प्रेम" आणि "कींव" या गोष्टी भिन्न आहेत; "कींव" आणि "प्रेम" या दोहोंतील फरक ओळखला पाहिजे, लहान मुलींना तो फरक ओळखता येत नाही इत्यादि गोष्टींविषयीं चर्चा तिच्या कानीं पडूं लागली. याच सुमारास एका प्रसंगी जार्ज टाऊनसेंडची आणि आडेलीनची ओळख झाली. जार्ज टाऊनसेंड हा आफ्रिकेंत प्लांटर होता, व तेथील नीग्रोंच्या उन्नतीबद्दल सहानुभूति बाळगणारा होता. त्याची आणि रिचर्ड कार्नीची ओळख व्हावी आणि आफ्रिकेंतील नीग्रोसंबंधानें त्यानें कांहीं गोष्टी रिचर्डला सांगाव्यात या हेतूनें आडेलीननें त्याला चार वाजतांच्या चहासाठीं आमंत्रण केलें, आणि तें पाहून आडेलीनच्या आईबापांस मोठा आनंद झाला. टाऊनसेंड हा एक आफ्रिकेंतला श्रीमंत प्लांटर आहे म्हणून चांगली पकड (क्याच) शोधणाऱ्या महत्त्वाकांक्षी तरुणींच्या वैवाहिक बाजारांत अगोदर बराच बोलबा झाला होता, आणि जेव्हा त्या प्लांटरला आफ्रिकेंतल्या नेटिव्हांविषयीं अत्यंत बारीक प्रश्न विचारून अर्धा पाऊण तास गप्पांत आडेलीननें गुंतविलें तेव्हा ती गोष्ट जरी आडेलीननें स्वाभाविक जिज्ञासेनें केली होती तरी ती इतर स्त्रियांस आडेलीनचा वैवाहिक बाजारांतील पुरुषपकडीचा केवळ एक डाव म्हणून वाटली.

येणेप्रमाणें जार्ज टाऊनसेंडचें आडेलीनच्या घरीं जाणें येणें सुरू झालें. टाऊनसेंडपाशीं पैसा पुष्कळ होता आणि आडेलीनचा बाप व्यापारांत भांडवलाच्या ममदुरीपेक्षां अधिक व्यापार वाढविणारा महत्त्वाकांक्षी गृहस्थ होता. त्यानें जे कांहीं व्यवहार केले त्या व्यवहारामुळे तो पैशाच्या अडचणींत आला आणि त्याने आपल्या अडचणी टाऊनसेंडला कळविल्या आणि टाऊनसेंडने त्याला कांहीं रकम कर्जाऊ दिली

टाऊनसेंड आडेलीनवर आसक्त झाला याचे मुख्य कारण त्याच्या आफ्रिकेंतील आयुष्यक्रमाविषयीं तिने स्नेहयुक्त जिज्ञासा दाखविली होती तशी त्याच्या परिचयाच्या कोणत्याहि स्त्रीने दाखविली नव्हती हे होय. आडेलीन ही एका पंगू तरुणावर आसक्त झाली होती तर तिला त्या आसक्तीपासून सोडविले पाहिजे म्हणून त्याचा प्रयत्न होता. यासंबंधीं टाऊनसेंडला आडेलीनच्या आईबापांनीं विश्वासात घेतले होते. टाऊनसेंडलाहि असे वाटूं लागलें कीं आडेलीनसारखी सुंदर तरुणी एका पंगूशीं लग्न करून फुकट जाऊ नये; आणि यासाठीं त्यानेंहि प्रयत्न केला, या प्रयत्नाचें स्वरूप देण्यात अर्थ नाही. येथे एवढेच पुरे कीं थोडक्याच दिवसांत आडेलीनचे टाऊनसेंडशीं लग्न झाले.

आडेलीनने श्रीमंत प्लाटरशीं जे लग्न लाविले ते आईबापांच्या आग्रहामुळे लावले. आईबापांस श्रीमंत जांवई पाहिजे होता, आणि श्रीमंत जावई असला म्हणजे आपणास पुष्कळ फायदा होईल असे वाटत होते. आडेलीनने त्या श्रीमंत मनुष्याबरोबर लग्न केले तरी त्यास आपले अंत:करण दिलें नाही. आपले शरीर अर्पण केले आहे, अंत:करण देण्याचे काय प्रयोजन! आडेलीनला ते लग्न म्हणजे आपला अधःपात झाला आहे असें वाटे. आईबापांनी आपली इस्टेट बचावण्यासाठीं लग्न करावयास लावले आणि आईबापानीं जे आपल्यावर वजन खर्च केले त्या वजनामुळे आपण आपल्या अंत:करणाची विवाहविषयक सूचना ऐकिली नाही. याबद्दल आडेलीनला पश्चात्ताप झाला. लग्न झाल्यापासून आडेलीनच्या मनांत आईबापांविषयी ते कन्याविक्रयास प्रवृत्त झाले म्हणून तिरस्कार उत्पन्न झाला. तसाच आपल्याशी नवऱ्याने आपणास गुलाम म्हणून खरेदी केलें आहे एवढेच नव्हे तर आपण भावी आयुष्यक्रमाविषयीं आणि आयुष्याचा सदुपयोग करण्याविषयीं ज्या आपण योजना केल्या त्या नवऱ्यानें या शरीराचा लोभ धरून खडकावर आपटल्या म्हणून नवऱ्याविषयीं संताप उत्पन्न झाला; "माझें अंत:करण मिळत नाहीं हे नवऱ्याला ठाऊक असून देखील त्यानें लग्नाचा आग्रह धरला तो माझ्या शरीरासाठींच नव्हे काय ? तर नवऱ्या, तुला माझे शरीर पाहिजे असेल तर घे. तुला माझें अंत:करण मिळत नाहीं." असे ती मनाशीं पुटपुटे. अर्थात् नवरा माझ्या अंत:करणाचा मालक नसून शरीराचा खरेदीदार आहे तर आपण त्याच्याशीं कसे वागले पाहिजे, तर व्यक्तीस गुलाम करणाऱ्याशी त्या गुलाम झालेल्या व्यक्तीनें जसे शत्रूसारखे वागले पाहिजे तसेंच वागणें माझे कर्तव्य आहे असे ती म्हणे.

आडेलीनला आपल्या नवऱ्याविषयीं जसा राग उत्पन्न झाला तसाच तिला स्वत:स्याविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला. ती स्वत:संबंधाने स्वत:शीं बोलू लागली की, मी स्वत:स उच्च समजून इतरांची उच्च भावनाच्या अभावाविषयीं कींव करीत होत्यें, पण आपल्या मनातील श्रेष्ठ विचारांची मी केली त्याप्रमाणे इतर स्त्रीपुरुषांनी राखरांगोळी खास केली नसली पाहिजे. मी लग्न केले म्हणजे काय केले ? तर ज्यावर आपण प्रेम करतों, ज्याला आपण आपले सर्वस्व समर्पण करावयास तयार आहो, त्यास सोडून दुसऱ्यासच आपलें शरीर समर्पण केले वेश्यावृत्ति म्हणजे मी जें केलें त्याहून दुसरे काय आहे ! स्त्रीच्या शरीरसमर्पणाचा जो योग्य अधिकारी आहे तो खेरीज करून इतरास शरीरसमर्पण यास वेश्यावृत्तीच म्हणावे लागेल आणि तेंच आपण केलें आहे तर आपण आणि इतर वेश्या यांत फरक तो काय ? आपण आपल्या देहाचा विक्रयच केला नाही काय ? आपल्या बापाला सांपत्तिक कचाटयांतून सोडविणें ही गोष्ट खरोखर महत्त्वाची होती काय ! खास नव्हती. आपला बाप उपाशी

मरत नव्हता की रस्त्यावर भीक मागत खालीने यत नव्हता. ज्या प्रकारच्या रहाणीची बापाला आणि आईला सवय झाली होती त्या प्रकारच्या रहाणीपेक्षां निराणी राहाणी श्रीमंत जावई मिळाला नसता तर आईबापास पत्करावी लागली असती एवढेच. सालव्हेशन आर्मीने मिळविलेले वेश्याचरित्रांचे साहित्य काय सागते? ते हेच सागते की नाही, की कित्येक स्त्रियाना आपल्या अर्भकाच्या सरक्षणासाठी द्रव्य मिळविण्यास वेश्यावृत्ति आचरावी लागली आहे, तर कित्येक स्त्रियानां आपल्या म्हाताऱ्या आईबापाच्या पोटासाठी पैसा पाहिजे व नोकरी मिळत नाही म्हणून ही वृत्ति आचरावी लागली आहे. त्या वेश्यावर अर्थात् मजपेक्षा अधिक सकट आले होते. माझ्यावर इतके मोठे सकट आले नसताना जर मी आपल्या देहाचा विक्रय केला आहे तर त्या वेश्या मजपेक्षां अधिक उच्च कोटीतील स्त्रिया नव्हत काय?

विवाहोत्तर आडेलीन काही दिवस अगदी मूढ झाल्यासारखी होती. आपण बोलतो काय, करतो काय याचीच तिला शुद्धि नव्हती. तिच्या नवऱ्याचेहि आचरण एखाद्या औत्सुक्याने भरलेल्या तरुणाचे नव्हते. तरुणाच्या प्रेमावेशाचा जो अनुभव प्रत्येक नववधूस यावयाचा तो तर तिला कधीच आला नाही आडेलीनचा नवरा ४० वर्षांचा होता. त्याचा अल्लडपणा गेलेला असून तो गभीर वृत्तीचा दिसे. तो प्रेमयाचना करणारा तरुण नव्हता. ज्याच्या आयुष्यक्रमाचे स्वरूप ठरलेले आहे आणि स्त्रीसहवासाचे ज्याला नाविन्य नाहींसे झाले आहे, ज्याच्या अगी गृहस्थाश्रम पुरा रुळला असून आपल्या ठराविक आयुष्यक्रमात व्यत्यय आलेला दूर करून तो आयुष्यक्रम पूर्ववत् करावा एवढीच ज्याची विवाहविषयक भावना झाली आहे, आणि ज्याला स्त्रीच्या सान्निध्याचे महत्त्व रोजच्या दैनिक व्यवहारांतील केवळ अमुक वेळ देण्याजोगी गोष्ट याच्यापलीकडे नाही अशा बिजवरासारखी त्याची विवाहोत्तर वागणूक होती.

प्रत्येक स्त्रीस हे हवे असते की, आपणाशी कोणी तरी प्रेमयाचना करीत आहे व आपणहि प्रेमाची भाषा बोलत आहो, आपण सुदर पोषाख करून त्या प्रेमवाक्यांचा स्वीकार करून उलट त्या व्यक्तीचे अधिकाधिक आकर्षण करीत आहो. पण ही आडेलीनची अपेक्षा पूर्ण झाली नाहीं.

टाउनसेडाविषयीं अप्रीति उत्पन्न झालेल्या आडेलीनचे पुढील चरित्र विशेष देण्याजोगे नाही. दुसऱ्या कोणत्यातरी तरुणावर थोडेबहुत आसक्त होणे, किंबहुना काही तरी द्वाडपणा करून उत्पन्न झालेला विवाहसबध तोडून टाकणे या गोष्टी सर्व तुटणाऱ्या विवाहसबधाच्या कथातील सामान्य भाग होय. मूळ गोष्टीतील तो भाग वगळू आडेलीन इग्लडला परत आली एवढेच येथे पुरे.

आडेलीन इग्लडमध्ये परत आल्यानतर तिला असे कळले की रिचर्ड कार्नी हा थोडक्या दिवसापूर्वीच मृत्यु पावला आणि त्याने मृत्युपत्र करून आपले सर्व पैसे तिच्या हवाली करण्यास आपल्या सालीसिटरना सागितले होते, आणि असेहि लिहून ठेवले होते की आडेलीनने हे पैसे तिला योग्य वाटेल त्याप्रमाणे खर्च करावेत. धर्मदाय करावयाचे तिने ठरविल्यास हिंदुस्थानांतील देशी लोकासाठी काम करणाऱ्या एखाद्या सस्थेला द्यावेत. विशेषत: जी सस्था दुर्बलानां सुधारणेच्या मार्गावर आणण्यासाठी इग्रज लोकांनी चालविली असेल अशा एखाद्या सस्थेला द्यावेत, पण त्या संस्थेचा खिस्ती सप्रदायाचा प्रसार हा उद्देश नसावा. आणि तशी सस्था जर सांपडलीच नाही तर आडेलीनने त्यांचा वाटेल तो उपयोग करावा. विशिष्ट संस्था या देणगीला लायक आहे किंवा नाहीं हे ठरविण्याचा आडेलीनला पूर्ण अधिकार आहे. या मृत्युपत्राप्रमाणे कार्नीच्या सालीसिटरांनी कार्नीने ठेवलले तीन हजार पौंड आडेलीनच्या

स्वाधीन केले. आणि तेव्हांपासून आडेलीन त्या पैशाचा उपयोग कसा करावा या विचारास लागली. तिचा एकदर अनुभव विशेषेकरून स्त्रीवर्गासंबंधाचा होता; आणि इंग्लंडमधील स्त्रियांचीं दुःखे तिला अधिकाधिक समजू लागली होती. चालू परिस्थितीत स्त्रीवर्गाची खरी दुःखे काय आहेत याचें स्वतंत्र सूक्ष्म निरीक्षण करता यावें, केवळ आपली दुःखे तीच स्त्रीवर्गाची दुःखे असा भ्रम होऊं नये म्हणून तिने एक युक्ति योजिली. लागतील त्या प्रकारचे वर्तमानपत्रातले माहितीचे तुकडे पुरविणारी एक कंपनी तिच्या माहितीची होती. अभागी स्त्रियांचे-विशेषेकरून आत्महत्या करणाऱ्या स्त्रियांचे—जीवनेतिहास सांगणारे तुकडे गोळा करण्याचें काम तिने त्या तुकडेपुरवू कंपनीस सांगितले. त्या मंडळींनी या प्रकारचे हजारो तुकडे तिला गोळा करून दिले; त्या तुकडयांवरून तिला असें दिसून आले की स्वभावतः चांगल्या प्रवृत्तीच्या पण परिस्थितीस बळी पडलेल्या स्त्रिया थोडया नाहीत.

धर्मादायाचा उपयोग म्हणजे समाजात जे व्यंग आहे ते दूर करणे हा आहे; समाजामध्ये नेहमी योग्य मनुष्याची भरभराट होत नाही, आणि दुर्दैवी मनुष्यास समाजाकडून न्याय मिळत नाहीं, आणि यासाठीच समाजांत दानसंस्था अवश्य आहेत, हे तत्त्व आडेलीनला पुरे समजले होते. "आपणांस दानसंस्था काढावयाची असेल तर ती कोणासाठी? तर त्याला उत्तर हे सरळ आहे की, जें समाजव्यंग किंवा दुःख आपल्या नजरेस येत असेल अशाच समाजव्यंगाच्या निवारणासाठी; लग्नाच्या बाजारात ज्यांनी गैरसोदा केला त्या स्त्रियांवर येणारी दुःखपरंपरा मला पूर्ण परिचित आहे. मजसारख्या स्त्रियांकडे जग कठोर दृष्टीने अवलोकीत आहे. तर कार्याची दिशा सहजच निश्चित झाली आहे." असे आडेलीननें मनाशीं म्हटले. आडेलीनने आपल्या स्वतःच्या आयुष्याचे निरीक्षण केलें, आणि "आपण खरोखरच दुर्दैवामुळे दुःखी आहो, आपल्या अपराधामुळे नाही" याच निर्णयास ती पोंचली. तिला असे वारवार वाटे कीं, "आपण खरोखर सद्वृत्तीची स्त्री असता केवळ आईबापाचा स्वार्थ ओळखण्याचे आणि त्याविरुद्ध लढण्याचे धैर्य अगीं नसल्यामुळे विवाहगर्तेंत पडलो, व विवाहबंधनापासून सुटका करून घेण्याच्या प्रयत्नामुळे लोकाकडून विनाकारण निंदिल्या गेलो आहोत. जग आपणाविरुद्ध जे मत करून बसले आहे ते अन्यायाचे आहे, आणि आपण जर या जगाच्या अडाणापणाच्या निंदेस डरलो नसलों तर ते मुख्यत आपल्या धैर्यामुळे आहे. आपली जी निंदा झाली, त्या निंदेमुळे कमी धैर्याची स्त्री खरोखर आत्महत्त्येस प्रवृत्त झाली असती. किंवा तोंड लपविण्यासाठी कोठे तरी निघून गेली असती. आपण प्रथमत निश्चयाचा आणि धैर्याचा अभाव दाखवून संकटपरंपरा आपणावर ओढून घेतली आणि त्यामुळे निश्चयी स्वभावाचे महत्त्व आपण शिकलो. आपणास जो अनुभव आला आहे, त्यांत भवितव्याचा काही तरी हेतु असला पाहिजे. दुर्बलासाठी संस्था काढण्याचे जे माझे कांही वर्षापूर्वीचे ध्येय त्या ध्येयासाठी मला तयार करण्याचा हा ईश्वरी संकेत तर नसेल ना. जर ईश्वरी संकेत नसता तर माझ्या अंतःकरणावर हा निश्चयी भावनेचा आवेग तरी कसा आला असता" इत्यादि विचार तिच्या मनात उत्पन्न झाले.

आडेलीनने जीं दुःखी स्त्रियांचीं चरित्रें जमा केली होती त्यांत असे आढळून आलें कीं, "पातिव्रत्यादि गोष्टीविषयी धोपट नियम करून त्या नियमाच्या अनुरोधाने विशिष्ट स्त्रीस दोषी अगर निर्दोषी ठरविणे ही गोष्ट चुकीची आहे. स्त्रियांनीं नवऱ्यास टाकून देणे ही गोष्ट अनेकदा क्षम्य आहे एवढेच नव्हे तर अवश्य आहे, तथापि

समाज आपले नीतिशास्त्र एकदम सुधारील असे नाहीं. ज्या स्त्रियांचा आयुष्यक्रम बिघडतो, त्या स्त्रियांसबंधानें लोकांमध्यें जी अनुदारवृत्ति असते तिची कारणें अनेक आहेत. स्वेच्छेप्रमाणे वागण्याचा पुरुषाइतकाच स्त्रीला अधिकार आहे हे तत्त्व स्वीकारावयास समाज अजून तयार नाहीं. स्त्रीची सौंदर्य ही सपत्ति प्रधान धरून तिच्या सौंदर्यावर आपलें महत्त्व स्थापन करण्याची आकांक्षा आईबापात असते, आणि तीमुळें त्याच्या ज्या योजना उत्पन्न होतात त्या योजनांत मुलीला बसविले पाहिजे असें त्यांस वाटू लागतें; आणि मुलींने त्यांच्या योजनास आपली समति दिली नाहीं म्हणजे मुलींवर, आईबापावर अविश्वासाचा आणि कृतघ्नतेचा आरोप करण्यात येतो, आणि कोवळ्या मनाच्या मुलींवर हा नैतिक व्यंगाचा आरोप करून तिला तिच्या "हितचिंतकाना" पकडीत धरण्याची सधि मिळते. आणि या प्रकारच्या युक्त्या प्रयुक्त्यांनी आईबापाच्या स्वार्थाच्या योज नात एकदा स्त्री बसली म्हणजे तिची पुढे सुटकाच नाहीं. तिने एक तर नवऱ्याशीं बेमानपणा करून मोकळें झालें पाहिजे, नाहींतर जन्मभर त्या संबधास चिकटून राहिले पाहिजे; एकदा केलेली चूक दुरुस्त करावयास जागाच नाहीं. आईबापाची आज्ञा पाळणे हें कर्तव्य म्हणून लहानपणापासून मुलींची समजूत करून दिली असता एकदम लग्न करण्याच्या वेळेस सर्व लोकांच्या मनाविरुद्ध करण्याचे धैर्य प्रत्येक स्त्रीला कोठून येणार? त्यावेळेस तिने धैर्याचा अभाव दाखविला म्हणजे तिच्या जन्माची माती झालीच म्हणून समजावें. तर आतां आपण जी संस्था काढावयाची ती बिघडलेल्या आयुष्यक्रमाच्या स्त्रियांना मदत करण्यासाठीं म्हणून काढावी."

येथपर्यंत कथासूत्र आणून मिसेस हटरने ज्या स्त्रियाचें आयुष्य लोकांच्या दृष्टीने बिघडलें असे दिसत आहे त्या स्त्रिया स्वभावानें दुष्ट बुद्धीच्या नसून अभागिनी असतात, पण त्याच विवाहसंस्थेमध्यें हळू हळू रूपांतर घडवून आणून त्या संस्थेच्या सुधारणेस कारण होतात इत्यादि मते प्रतिपादिलीं होतीं. शिवाय टाऊनसेंडच्या नैतिक अधःपाताचे कांहीं पुरावे तिच्या दृष्टीस कसे पडले हेहि दाखविले होते. आणि इतके असूनहि लोकांची सहानुभुति टाऊनसेंडकडे कां असावी, आणि आडेलीनकडे कां नसावी अशी पृच्छा केली होती. आणि त्याचे तिने उत्तरहि दिलें होते ते हे कीं, " जगांत पुरुष हा कार्यकर्ता आणि त्याच्या योजनांत स्त्रियांनी बसलें पाहिजे ही अजून जगाची वृत्ति आहे."

मि. जार्ज हटर यांनीं आडेलीनचे हें कथानक पाहून हे खरोखर तिचे आत्मचरित्र आणि आत्मनिवेदन आहे ही गोष्ट ओळखली. व टाऊनसेंड ही व्यक्ति दुसरी कोणी नसून आपणच आहों हेहि ओळखलें. त्यास ते वाचून काय वाटलें ते त्यांनी तिला पाठविलेल्या पत्रावरून आणि नंतरच्या त्यांच्या मृत्युपत्रावरून लक्षांत येईल तर त्यापैकी पहिलें पत्र अंशरूपानें येथे देतो.

"तुझा लेख वाचला, तुझ्या नायिकेचे चरित्र अत्यत मनोरम आहे. जार्ज टाऊनसेंडचा तुझ्या नायिकेला एवढाच निरोप आहे कीं, जार्जनें तिचा द्वेष मुळींच केला नाहीं. या पत्रासोबत जार्ज टाऊनसेंड मजमार्फत २००० पौंड पाठवीत आहे. ही रक्कम जर मिसेस टाऊनसेंडला कांहीं सत्कार्यासाठीं खर्च करावयाची असेल तर तिला दे. ज्या उदार भावना टाऊनसेंडनें चिरडून टाकल्या त्या पुन्हां प्रज्वलित होवोत. आडेलीनला असेंहि साग कीं, जार्ज टाऊनसेंडकडे परत जावें अशी जर तिची इच्छा असेल तर जार्ज तिचा मोठ्या आनंदाने पुन्हां सत्कार करावयास तयार आहे."

जार्ज टाऊनसेंडचें चरित्र आणि त्याचें स्पष्टीकरण दिसतें तितकें सोपें नाहीं. आडेलीननें जर

त्यास दोषी ठरविलें तरी तो तितका दोषी नव्हता. ध्येयासाठीं काम करावें इत्यादि कल्पना त्याच्याहि मनात होत्या पण त्याच्या आयुष्यास निराळेंच वळण लागावयाचें होते. ज्या व्यक्तीस आपले आयुष्य पूर्वी तयार केलेल्या आपल्या कल्पनाचित्रा-प्रमाणे नेतां आले अशा भाग्यवान व्यक्ती किती असतील बरे. व्यक्तीची इच्छा आणि समाजाची गरज या दोहोंच्या समीकरणाने व्यक्तींच्या आयुष्याचे स्वरूप ठरत असते. व्यक्तीस आपण काय करावें या संबधाने कल्पना असतात त्या कधीं कधीं त्यास कार्य करण्यास प्रवर्तक होत असतील, तथापि त्यांच्या तहानभुकेसारख्या किंवा विशिष्ट प्रकारची रहाणीची आवड यासारख्या गरजाच त्यास कार्यप्रवर्तक होतात आपण काय करावे या संबधाच्या त्यांच्या ज्या कल्पना असतात त्या त्यांच्या इच्छेचा परिणाम समाजावर घडविणाऱ्या असतात. तर त्यांच्या तहानभुकेसारख्या गरजा समाजाच्या गरजांचा परिणाम त्याच्यावर घडविणाऱ्या असतात, व त्यामुळें प्रत्येक व्यक्ति समाजाच्या गरजेची दास असते. टाऊनसेंडच्या आयुष्यास जी दिशा लागली ती त्याच्या ध्येयामुळें किंवा ध्येयाच्या अभावामुळे लागली नाही.त्याच्या भौतिक गरजांमुळे, समाजाच्या गरजांमुळें लागली. व जी दिशा लागली त्याबद्दल टाऊनसेंडला खेद वाटत नाही. जेव्हां तरुण मंडळी मी पुढे काय करणार याविषयीं आपल्या कल्पना प्रगट करीत असतात तेव्हां जगाच्या क्रमाविषयीं जगशी अधिक माहिती असलेल्या जार्जला आज करुणायुक्त स्मित उत्पन्न होतें. बहुतेक मंडळी आपली तरुणपणची व्यवहाराच्या ज्ञानाचा संस्कार न झालेलीं कल्पनाचित्रे जर आपल्या दृष्टीकडे पुन्हा आणतील तर त्यांस तारुण्यांतील इच्छा व भवितव्य यांतील महदंतर कळून आल्याशिवाय रहाणार नाही.ध्येयापेक्षां कृति कमी होते असें मात्र यात नसतें. कधीं कधी कृति ध्येयापेक्षाहि अधिक होते. ध्येये ज्या नवतारुण्यांत तयार होतात; त्या कालांत जे अत्यल्प अवलोकन झाले असतें त्यामुळे व्यक्तीचीं ध्येयें बनणार व ध्येयें बनल्यानंतरच्या कालांत म्हणजे प्रत्यक्ष जगाच्या खटाटोपींत कार्यकारी म्हणून प्रविष्ट झाल्यानंतरच्या कालांत जगाचे व्यापक स्वरूप त्यास समजत जाणार. त्यामुळे कृति पुष्कळदा ध्येयांपेक्षां अधिक होते; आणि आपली पूर्वीची ध्येये केवळ कूपमंडूकाचीच होतीं हे त्यास कळून येते. या प्रकारच्या आयुष्याच्या अनुभवांतून जार्ज टाऊनसेंड गेला होता, व त्यामुळे त्याच्या दृष्टीनें स्त्रियांच्या काय, किंवा पुरुषाच्या काय, ध्येयाचीच किंमत कमी झाली होती. आडेलीनला ध्येयें होती ही गोष्ट टाऊनसेंडला ठाऊक नव्हती असे नाही पण मोठेपणाला चढलेल्या अनेक लोकांची लहानपणाची कूपमंडूक ध्येयें त्यानें जगांतील चढाओढीच्या दगडावर आपटलेलीं पाहिली होतीं ,एवढेच नव्हे तर ती आपटली या बद्दल त्यास पुढच्या आयुष्यात दुःख झाले नाहीं हेहि त्यानें पाहिलें होते आपल्या आयुष्याचें ध्येय सांगणारा तरुण टाऊनसेंडला भेटला म्हणजे त्यास त्या तरुणाविषयी अनादर कधीच उत्पन्न झाला नाहीं. त्यास त्या तरुणास एवढेच म्हणावेसें वाटे कीं, बाबारे, तुला ध्येय ठरवावयाचा हक्कच काय आहे? ध्येय ठरवावयास तुझे जगाचे अवलोकन कितपत झाले आहे आणि आयुष्यावर परिणाम घडविणाऱ्या कारणाची तुला कितपत माहिती झाली आहे? आडेलीनने प्रथम हृदयीं धरलेल्या ध्येयावरून ही केवळ स्वार्थीपणात गुरफटलेली स्त्री नाही. हे पाहून जार्जला आनंदच झाला आणि त्याच्या प्लांटेशनवर राज्य करण्यास आडेलीन तिच्या ध्येयदृष्टीमुळे म्हणजे निकट स्वार्थ आणि सौख्य सोडून काम करावे असे वाटण्याइतकें तिचें थोर मन झाल्यामुळे अधिक लायक आहे असे त्यास वाटले, तिच्या ध्येयाची किंमत टाऊनसेंडला कांहीच नव्हती; तर तिच्या ध्येयपर

स्वभावाची त्यास किंमत होती. तरुण अननुभवी मुलीच्या विशिष्ट ध्येयाची त्यास किमत कशी असणार! मुलीला ध्येय प्रत्यक्ष अवलोकनाने येणार किंवा वाचनामुळे येणार, लहान मुलीचे अवलोकन बेताचेच असणार, आणि वाचनाने तिला सारें जग न समजतां जगाविषयी खोटया कल्पना तिच्यापुढे मांडल्या जाणार! लहान मुलगी शाळेत असता मास्तरवर प्रेम करू लागते किंवा मास्तरणीच्या कामाची चहा तिला उत्पन्न होते; मुलगी १२।१३ वर्षाची झाली म्हणजे तिनें अनेक कादबऱ्या वाचल्या असतात त्यांपैकीं बहुतेक कादंबऱ्यात लटके जग दाखविलेले असते, मनुष्य केवळ पोरवयाचा असून त्याच्या अंगीं अनेक अनुभव घेऊन बाहेर पडलेल्या व्यक्तीच्या ठायीं आढळून येणार धैर्यशौर्यादि गुण म्हणजे पूर्ण वाढ झालेल्या माणसाचे गुण दाखविण्यात येतात काहीं कथातील नायक दुसऱ्या कोणाच्या तरी संपत्तीचा वारस झाल्याचे दाखविण्यात येते आणि ती संपत्ति केवळ त्याच्या गुणाकडे पाहून मिळालेली दाखविण्यात येते, ह्या सर्व मूर्खपणाच्या गोष्टी वाचून मुली जी आपली भावी आयुष्याचीं चित्रें बनवितात त्यांची ध्येयचित्रें तरी विचारात का घ्यायची. कित्येक कथालेखक तर लेखक आणि चित्रकार यास नायक करतात. आणि कधीं तरुण लेखिकेशीं श्रीमताचें लग्न होतें किंवा तरुण लेखकावर श्रीमंत मुलगी प्रेम करते, आणि याला बापाची प्रथम विरुद्धता असते, आणि शेवटीं सर्व चागले होते असे दाखवितात लेखक, चित्रकार यासारखे जे वर्ग ते दारिद्र्यांत रहावयाचे ठरलेंच आहे तरी त्या वर्गाचें आयुष्य केवळ कल्पनाचित्रांनी रंगवून हे लेखक स्वतःची व इतराची फसवणूक करतात. या फसवणुकीपासून ज्या प्रकारच्या परिश्रमाने जगाचा विकास होतो त्या परिश्रमात गुंतलेला टाऊनसेंड कसा फसणार! ध्येये बाळगणे, तीं चुरडलेलीं पहाणे आणि उपयुक्त कार्यात गुंतल्यानंतर पुन्हां ध्येयपरता त्या कार्यास लावणे हा सृष्टीचा खेळ समजणारा टाऊनसेड आडेलीनचें लहानपणाचें ध्येय पुरें करावे म्हणून कसा झटेल.

आडेलीनच्या ध्येयपरतेमुळे टाऊनसेडला आडेलीन ही आपल्यायोग्य आहे असे वाटलें आणि कालांतराने आडेलीन आपली ध्येयपरता जें कार्य उपस्थित होईल त्याकडे लावील, अशी टाऊनसेडची अपेक्षा होती अर्थात आडेलीनचा स्वभाव आणि तिच्या विशिष्ट ध्येयाची तीव्रता टाऊनसेडनें ओळखली नाही, हें उघड आहे.

जार्ज टाऊनसेड हा एक काफीर मुलगी रखेली ठेऊन होता, आणि ती रखेली म्हणून ठेवण्यापूर्वी त्यानें दररोज नवीन पोरगी आपल्या बंगल्यात रात्री आणावी आणि सकाळी सोडून द्यावी असा त्याचा परिपाठ होता, ही गोष्ट आडेलीनच्या कानीं आली होती. या गोष्टीची आडेलीनने चर्चा टाऊनसेडपाशीं केली असती तर अधिक बरें झालें असते. टाऊनसेडला या सर्व गोष्टी नाकारता मुळीच येणार नाहींत, तथापि प्रत्येक गोष्ट होते ती कोणत्या परिस्थितीत होते याची जाणीव आडेलीनला करून देण्याची संधि त्यास मिळाली असती. आणि तो पूर्वी झालेल्या गोष्टींसाठी आडेलीनने जें प्रायश्चित्त सांगितले असते ते पत्करण्यास तो तयार झाला असता. पण ही संधि आडेलीनने टाऊनसेंडला दिली नाहीं याबद्दल जार्ज टाऊनसेड आडेलीनला कठोर समजतो, किंवा आडेलीनला कठोर म्हणण्यापेक्षा आडेलीनने चूक केली असे समजतो. त्याचे या बाबतींतील वर्तन समजण्यास टाऊनसेडचे पूर्ववृत्त समजले पाहिजे. ते येणेंप्रमाणें होतें.

टाऊनसेड हा देखील शिक्षण पुरे झाल्यानतर पाद्री होण्याच्या विचारांत होता. त्यानें तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला होता. आणि ॲरिस्टाटल, टामस अक्वायनस, स्पिनोझा याच्या गोष्टी बोलायला शिकला होता आणि सैतान मोह उत्पन्न

करतो, ख्रिस्तावर विश्वास ठेवा म्हणजे ख्रिस्त तुम्हांस मोहापासून सोडवील अशा अर्थाचीं त्याने व्याख्यानेहि दिली होती. जगाच्या अनेक व्यवहारांशीं अस्पृष्ट राहून जगांत कसें वागावें, नीतीनें कसे वागावे याविषयीं बोध करणारे जे पाद्री त्याच्या वर्गात जाऊन मिळावे, काळा कपडा घालावा आणि तत्त्वज्ञानाच्या गोष्टी करणाऱ्या व भोवतालच्या शेतावर काबाडकष्ट करणाऱ्या मजूरवर्गाच्या "कलचर"च्या अभावाबद्दल त्याची कींव करणाऱ्या वर्गात जाऊ इच्छिणाऱ्यापैकीं होता. पण त्यास चर्चमध्ये नोकरी मिळाली नाही. नोकरीसाठी वाट पहाण्याची त्यास सोय नव्हती. म्हणून त्यास जिकडे नोकरी मिळेल तिकडे जाणे प्राप्त होतें, त्यास नोकरी आफ्रिकेत मिळाली म्हणून तो तिकडे गेला. त्याचे एका तरुणीवर एक तऱ्हेचे प्रेम जडले होते. आणि तिचेंहि त्याच्यावर प्रेम जडले होते असे ती दाखवीत असे. व आपल्या मनाची तशी समजूत करून घेत असे, पण त्या स्त्रीस इंग्लंड सोडून जावयास नको होते, टाऊनसेंडची पाठ वळल्याबरोबर तिनें दुसऱ्या एका तरुणाबरोबर लग्न केले. स्त्रीच्या पातिव्रत्यासंबंधाने आणि निर्व्याज प्रेमासंबंधाने टाऊनसेंडच्या ज्या कल्पना झाल्या होत्या त्या एकदम खडकावर आपटल्या.

निग्रो स्त्रियांविषयीं टाऊनसेंडचा एक अनुभव येथे सांगितला पाहिजे की, टाऊनसेंड अनेक स्त्रियांच्या पाठीमागे लागला असें वरवर लोकांना दिसले तरी त्याने या गोष्टी आपल्या तरुण वयात निरुपाय म्हणून केल्या. सर्व दिवसभर काम करावें आणि आयुष्यात सौख्य म्हणून नाहीं; अशी त्याची स्थिति झाली होती अशा प्रसंगीच तो स्त्रियांकडे वळला. तो स्त्रियांकडे वळला नसता तर बाटलीकडे वळला असता. ज्याचे आयुष्य सर्व सुरळीत आणि सुखाने जात आहे अशा लोकांस नीतिमत्तेवर व्याख्यानें देणें सोपें आहे पण ज्या मनुष्यांनां आपण अरण्यांत एकटे आहों, असें वाटत असतें अशा व्यक्तींना सुखाचा नाहीं तरी कालविनोदनाचा कांही तरी मार्ग शोधून काढावा लागतो. संकटांशीं झगडण्यासाठीं आणि जी भूमि मनुष्योपयोगी झाली नसेल ती भूमि मनुष्योपयोगी करण्यासाठी जे साहस करून जातात आणि ज्यांचीं संकटे स्वीकारण्यास त्यांच्या जातीच्या स्त्रिया तितक्या तयार नसतात अशा लोकांच्या आयुष्यक्रमाचें संस्कृति जेथें प्रस्थापित झाली आहे अशा ठिकाणच्या नीतिनियमांनीं परीक्षण करीत बसणें हा अन्याय आहे. शिवाय हे सांगितले पाहिजे कीं टाऊनसेंड ज्यावेळेस आजारी होऊन पडला होता तेव्हां त्याच्या शेतावरील एका निग्रो स्त्रीनेंच त्याची शुश्रुषा केली. टाऊनसेंड बरा झाल्या नंतर त्यानें त्या मजूर स्त्रीला घरांत कायमचे स्थान दिलें; आणि जर त्या स्त्रीला मुले झालीं असती तर टाऊनसेंड दुसऱ्या—लग्नाच्या निदान गोऱ्या स्त्रीशीं लग्नाच्या—भानगडींतच पडला नसता. सामाजिक कार्याचें महत्त्व आणि पैसे मिळविण्याचें महत्त्व या दोन्हीं गोष्टींवर टाऊनसेंडला व्यवहारांत पडल्यानंतर निराळी दृष्टि आली. जीं माणसें लोककल्याणाचें काम करीत आहेत त्यांच्या आयुष्यक्रमाची जे लोक व्यवहारांत पडून पैशाच्या मागें लागले आहेत त्यांच्या आयुष्यक्रमाशीं तो तुलना करूं लागला. आणि तो ज्या एका निर्णयास पोंचला तो हा कीं पैशाच्या मागे लागून शेतकी किंवा कारखाना किंवा व्यापार याच्या मागें जो लागतो तोच लोकांचा अधिक कल्याणकर्ता आहे. व्यवहारांत पडलेला मनुष्य शेंकडों लोकांनां कामाला लावतो, आणि त्यांच्या योगक्षेमाची काळजी वहातो. आफ्रिकेतल्या नेटीवानां सुधारण्यासाठीं मिशने आहेत, पण नेटिव्हांना जो पगार देऊन कामाला लावतो तोच नेटिवाचा खरा मित्र आहे. तो त्यांस उद्योगास लावून उपयुक्त नागरिक

करीत आहे. शिक्षणसंस्था अनिश्चित उद्योगास तयार करतात, पण उद्योग काढणारा मनुष्य अशिक्षितांकडून काम काढून घ्यावे म्हणून त्यास निश्चित शिक्षण देतो. गरीबानां उद्योग देण्यासाठीं ज्या संस्था असतात त्यांपैकीं बऱ्याच गैरफायदेशीर धंदा करणारे उद्योगच असतात. लोकांच्यापाशीं वर्गण्या मागून कांहीं विधवा पोसल्या म्हणजे तें सामाजिक कार्य झालें, आणि धंदा उत्पन्न केला आणि त्या स्त्रियाना कामाला लावलें म्हणजे तो स्तुति न करण्याजोगा केवळ स्वार्थाचा धंदा झाला अशी लोकांची समजूत आहे. टाऊनसेंड या समजुतीच्या विरुद्ध आहे. धंदा करणे हें अधिक स्तुतीस पात्र असे कार्य आहे. धंदा करणे म्हणजे लोकास कामाला लावण्याचें कार्य एकसारखें लक्ष देऊन करणें, ते चिरस्थायी करून पहाणें, त्यासाठीं हवा तसा पैसा खर्च करणे आणि तें कार्य समाजाला अवश्य आहे किंवा नाहीं हे पाहून करणे आहे. आफ्रिकेंतील नेटिव्हांची सुधारणा म्हणज काय? तर त्यास अर्वाचीन तऱ्हेचा कोणता तरी उद्योग शिकविणे, त्यांच्याकडे एकसारखें लक्ष ठेवून ते दररोज काम करीत आहेत किंवा नाहीं हें पहाणें, आणि त्यांच्या कपडे वापरणें, चांगले खाणें यांसारख्या गरजा वाढण्यास उत्तेजन देणे, याच गोष्टी नाहींत काय? या गोष्टी कोण बरे करीत आहे. अधिक पैशाच्या लोभाने काम करणारे प्लांटर कीं मिशनरी धंदा करणारा मनुष्य? पुढच्या किफायतीच्या आशेने, धंदा विशिष्ट कालीं किफायतवर होत नसला तरी देखील धंदेवाला मनुष्य चालू ठेवतो, आणि अनेक लोकानां पोसण्याची जबाबदारी चुकवीत नाहीं. सामाजिक कार्य करणारे काय करतात तर धंदा करणारापासूनच पैसे घेऊन मजूरवर्गासंबंधानें जें सामाजिक काम करण्यास धंद्याच्या मालकांस सवड नाहीं त्या गोष्टी ते करतात, दुसरे काहीं नाहीं. या दृष्टीने चांगले सामाजिक कार्य करणारे लोक धंदा करणाऱ्या लोकांचे दुय्यम मदतनीस आहेत दुसरें कांहीं नाहीं. या सर्व गोष्टी ज्या टाऊनसेंडने पाहिल्या त्याला मागासलेल्या जातींना सुधारण्याचें काम डोक्यांत घेतलेल्या एखाद्या तरुण मुलीविषयीं काय वाटणार? त्यास हेंच वाटणार कीं जर मागासलेल्या जातीविषयीं या मुलीच्या मनांत सहानुभूति असेल तर ती मुलगी माझ्या मळ्यावरील स्त्रीपुरुषांच्या आरोग्याकडे व रहाणीकडे अधिक लक्ष देऊन माझ्या मळ्यावरील लोकाचा आयुष्यक्रम सुखाचा करील. पण ती अपेक्षा पुरी झाली काय? टाऊनसेंडच्या दृष्टीने त्याने आडेलीनला आपलें ध्येय पार पाडण्यासाठी उलट संधि दिली पण ती आडेलीनने गमावली. असो, झाली गोष्ट ती झाली, ती आता भरून येत नाहीं.

टाऊनसेंडला आडेलीनच्या मनात योजिलेल्या आयुष्यक्रमास मदत करण्याची इच्छा आहे, व त्याबरोबर टाऊनसेंड आडेलीनला हेहि मागत आहे कीं एकदां स्त्रीने चूक केली तर तिला आयुष्य सुधारण्याची संधि द्यावी हें तत्त्व इतकें मान्य आहे कीं टाऊनसेंडकडे परत जावें असें आडेलीनला वाटत असेल तर तो तिला परत घ्यावयास तयारहि आहे; तिला यावयाचे नसेल आणि आपल्या सामाजिक कार्याचे क्षेत्र निराळे करावयाचें असेल तरी देखील तो तिला मदत करावयास तयार आहे आणि माझ्यामार्फतच पत्रारंभी सांगितल्याप्रमाणे दोन हजार पौंड पाठवीत आहे.

या तऱ्हेचे पत्र पाहून मिसेस हटरला काय वाटलें असेल बरे? आपण आपल्या नवऱ्याचा विनाकारण छळ केला असें वाटल्याशिवाय राहिले नसेल; त्या पत्राला उत्तर तरी काय द्यावे या विचारांत ती पडली; तिला एकदां वाटे कीं, आपण परत जावें; आणि "क्षमस्व" असें नवऱ्यास म्हणावें; पण तसे करण्याचे धैर्य तिला झालें

नाहीं. तिनें पैसे पोचल्याचें आणि त्याच्या क्षमाशीलतेबद्दल आपल्यास आनंद झाल्याचे पत्र पाठविलेच. आणि माझे मन आपले पत्र वाचून काय करावे या प्रकारच्या घोटाळ्यात पडले आहे असेहि लिहिले. ते पत्र मि. हंटर यास मिळाले तरी देखील मि. आणि मिसेस हंटर यांचे पुनर्मीलन होण्याचा योगायोग नव्हता. मिसेस हंटरचे पत्र आल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं मि. हंटर मृत्यु पावले; आणि त्यांनीं आपली सर्व इस्टेट मिसेस हंटरलाच ठेवली होती. मिसेस हंटरनीं ती इस्टेट स्वीकारली. तथापि मिसेस हंटरचा दुर्लौकिक आफ्रिकेत पूर्वीच झाला होता, आणि तिचे वर्तन वाईट असूनहि इस्टेट डायव्होर्सपूर्वीच्या नवऱ्याने तिलाच ठेवली यांच्याबद्दल तिच्याविषयी मत्सरयुक्त द्वेषहि आफ्रिकेतील गोऱ्या लोकांत-विशेषेंकरून स्त्रियात—तीव्रत्वाने होता.

मिसेस हंटर हिंदुस्थानांत १९०५ च्या सुमारास आल्या. त्यांनी प्रथमत मिशने व इतर समाजकल्याणेच्छु मंडळी यांच्याबरोबर ओळखी केल्या व आपला निराळ्या प्रकारची संस्था काढण्याचा उद्देश जाहीर केला, व थोड्याच दिवसानीं आपली संस्था नोंदविली. मिसेस् हंटर यानीं स्त्रियासाठी जी संस्था काढली होती तिला त्यानीं केवळ "विमेन्स इंडस्ट्रिअल होम" (इंग्रजी) आणि "स्त्रियांचे उद्योगमंदिर" (मराठी) अशीं नांवें दिलीं होतीं. मिसेस हंटर यानीं प्रथम नांव काय द्यावे याविषयी कांहीं हिंदू मंडळीचा त्यांतल्यात्यांत काहीं समाजसुधारक म्हणविणाऱ्या मंडळींचा सल्ला घेतला, तेव्हां त्यांनीं "विमेन्स रिक्लेमेशन सोसायटी" वगैरे नांवे सुचविलीं होतींच पण ती नांवे मिसेस हंटर यांनां पसत पडलीं नाहींत. अर्थात् मिसेस हंटरनीं स्त्रियास सुधारण्यासाठीं संस्था हे किंवा याच तऱ्हेचीं दुसरी दुष्टपणाचीं नावें दिलीं नाहींत. मुलांनां चांगल्या मार्गाला लावण्यासाठी संस्था काढावयाची तिला रेफर्मेटरी म्हणून म्हणायचें, या तऱ्हेची वृत्ति संस्था चालविणाऱ्याच्या अहंकाराची आणि ज्यांच्यासाठीं संस्था काढावयाची त्यांच्याविषयी तुच्छतेची द्योतक आहे. जोपर्यंत कोणती तरी सत्ता मुले उचलून त्या संस्थेमध्ये कोंबील तोपर्यंतच ही दुष्ट अहंकारमय वृत्ति ठेवून चालेल, पण तेथील मुले त्या संस्थेस मित्र म्हणणार नाहीत. "डिप्रेस्ड क्लास" व "अस्पृश्य" म्हणून अगोदर अभागी वर्गास शिवी द्यावयाची व त्यांच्या उद्धारासाठीं आम्ही पवित्रतेचे गड्डे अवतीर्ण झालो म्हणून सांगावयाचे, हेहि तिला पसत नव्हते. "पतितवनितोद्धार गृह" या प्रकारचे नांव संस्थेला दिले तर त्या संस्थेच्या मंडळामध्ये सदस्य होण्यासाठीं रुपया दीड रुपया भरून हितचिंतक म्हणून नांव दाखल करण्यास मंडळी तयार होतील, का की असे करण्यात गौरव हितचिंतकांचा होतो. पण त्या संस्थेत स्त्रिया मात्र प्रविष्ट होणार नाहींत ही गोष्ट ती स्त्रियांचें मन जाणणारी असल्यामुळे तिला पक्की ठाऊक होती. व यासाठी तिने आपल्या संस्थेस "उद्योगमंदिर" हे नांव दिले.

उद्योगमंदिरासाठीं मुंबईजवळ एका उपनगरात एक मोठा बंगला व आसपास बरीच मोकळी जागाहि संस्थेने भाड्याने घेतली होती. संस्था चालविणे म्हणजे एखादी इमारत बांधणे अशी मिसेस हंटरची समजूत नव्हती. तर संस्था म्हणजे अनेक व्यक्तींचा काही विशिष्ट नियमाप्रमाणें व विशिष्ट ध्येयासाठी रहाणारा समुदाय, ही संस्थेची व्याख्या तिच्या मनांत बिंबली होती. तिच्या मनांत ही पाहिलीं भावना होती कीं, जेव्हां आपण कांहीं पवित्र काम करतो, तेव्हां वाईट गोष्टींनां जसें भ्यालें पाहिजे तसेंच फाजील सभ्यपणाच्या कल्पनास देखील भ्याले पाहिजे. स्त्रियांची संस्था आपण अगदी सोवळी करण्याचा प्रयत्न केला तर दुर्बलांस आणि अडचणींत पडलेल्या स्त्रियांस ती अनुपयुक्त होऊं लागेल. प्रत्येक स्त्री वाईट मार्गास

लागते ती दुर्दैवामुळें आणि अनुद्योगामुळें लागते असा तिचा दृढ विश्वास होता. जर आपण संस्थेचे पाठबळ आणि संरक्षण स्त्रीस देऊं लागलो तर तिला दुर्मार्गापासून अलिप्त राखण्याचे अर्धे काम केले; का कीं, अनीतीचे मुख्य कारण दौर्बल्य होय. आणि जर तिला आपण नेहमी कामात गुतवून ठेवले तर आपण नैतिक अधोगर्तापासून संरक्षण करण्याचे जवळ जवळ पुरे काम केले असा तिचा विश्वास होता. काम करणाऱ्या स्त्रीस आपण काम करून पैसा जमवून कांही ध्येय साधीत आहो, अशी भावना उत्पन्न करून दिली तर ती स्त्री इतर चैनीत रहाणाऱ्या आणि नीतिमत्तेच्या गप्पा मारणाऱ्या अनेक स्त्रियांपेक्षा अधिक उच्च आहे असे तिचे मत होतें.

उद्योगमंदिरांतील कार्यक्रम सामान्यत येणेप्रमाणें होता. प्रत्येक व्यक्तीने दिवसांतून आठ तास काम केलेच पाहिजे असा नियम असे. आणि प्रत्येक व्यक्तीने काम कोणते करावे आणि प्रत्येक व्यक्तीस आठ तासापुरते काम भरपूर आहे किंवा नाही हे मिसेस हटर स्वत ठरवी, व प्रत्येक व्यक्तीचे काम दररोज काय झाले याचा काळजीपूर्वक अहवाल ठेवीत असे. दिवसातून जेवणाच्या वेळा तीन असत सकाळी ७ वाजता उपाहार, दुपारी १२ वाजता एक जेवण आणि सध्याकाळीं सात वाजतां दुसरें जेवण. जेवणाचे वेळीं जमलेल्या बायकांच्या गप्पा बऱ्याच होत आणि पुन: कामाची वेळ सुरू झाली म्हणजे पुन. सर्व बायका कामाला जात सध्याकाळचा वेळ वाचनांत व गप्पा मारण्यांत जाई, तसाच रविवारचा वेळहि कांहीं तरी खटपटींत जाई. स्त्रियांचे सदन म्हणजे तेथें केवळ धार्मिक गोष्टींस प्राधान्य असेल असे कित्येकास वाटण्याचा संभव आहे. पण तशी गोष्ट नव्हती. स्त्रियांची संस्था चालवितांना मिसेस हंटरने आणखी एक ध्येय ठेवले होतें तें हे कीं, प्रत्येक स्त्रीच्या स्वाभाविक मनोवृत्तीस क्षेत्र दिलें पाहिजे. " निष्काम कर्म " इत्यादि शब्दांचे अवडबर माजवूं नये. ज्याप्रमाणे विपर्या भावनाचे उद्दीपन टाळले पाहिजे त्याचप्रमाणे सन्यासधर्माचे आणि कठोर आयुष्यक्रमाचे अवडबरहि टाकले पाहिजे सस्थेचा हेतु सन्यासधर्म वाढविण्याचा नसून आयुष्य अधिक सुखकर करण्याचा आहे. असे ती टीकाकारास सागत असे. धार्मिक प्रार्थना वगैरेची कोणावरहि सक्ती नसावी; पण कोणास आपापल्या समजुतीप्रमाणे ईश्वराची आराधन-करण्यास प्रतिबधहि नसावा. सस्थेचा हेतु जर आनद वाढविण्याचा, आहे तर आनंदाच्या आयुष्यक्रमाचे अस्तित्व सस्थेमध्ये पाहिजे, आणि यासाठीं तिने ब्याडमिंटन व टेनिस यासारखे बाहेरचे आणि पत्ते व सोंगट्या यासारखे बैठे खेळ यास आपल्या सस्थेत उत्तेजनहि दिले. आणि सगीत व वादन ही देखील सस्थेत चालूच असत. आणि कधीं कधीं नाटकाचे प्रयोगहि होत असत. स्त्रियांनीं पोषाख अगदीं साधा केला पाहिजे असा निर्बंध नव्हता; तर प्रत्येक स्त्रीला आपल्या इच्छेप्रमाणे शरीरमडनाकडे लक्ष देण्यास मोकळीक ठेवली होती.

सस्थेमध्ये मिसेस हटर आपल्या विचाराचा प्रसार करीत असे. त्यामध्ये उद्योगहीनता ही दु:खाचे मूळ आहे यासाठीं उद्योग करीत रहाणे हें प्रत्येक व्यक्तीचे कर्तव्य आहे या तत्वाचा उपदेश असे तसेच स्त्रियामध्ये एकदर स्त्रीवर्गाचे सौख्य वाढविण्याच्या हेतूबद्दल जागृति पाहिजे, यासाठीं प्रत्येक स्त्रीने काही तरी उपयुक्त काम शिकले पाहिजे, याची जाणीव स्त्रियांत वाढविली पाहिजे, असे ती सांगत असे. जी स्त्री आपली उपजीविका करण्यास समर्थ आहे ती स्त्री विधवा असेल तर लग्नाला देखील पुरुष अधिक पसत करतील. जगांतील खऱ्या स्थितीविषयी अज्ञान असणें हें स्त्रीत्वास शोभादायक आहे असा समज असेल

तर तो चुकीचा आहे. जी स्त्री आपली उपजीविका करावयास अधिक समर्थ असेल तीच स्त्री मातृत्वासहि अधिक लायख आहे. अकाली मरण आले तर स्त्रियांवर पुरुषांपेक्षांहि अधिक जबाबदारी पडते, याप्रकारचा तिचा नेहमी उपदेश असे. मधून मधून जराशा निराळ्या प्रकारच्या उपदेशाचे प्रसग येत. एकदोनदा तिनें गभीर असलेल्या विधवास आपल्या सस्थेत घेतले. त्या वेळेस आतल्या स्त्रियाना निराळा उपदेश करण्याचा प्रसग आला. त्यावेळेस मिसेस हटरनीं असे सागितले की स्त्रिया व पुरुष यांच्या वैवाहिक नीतीसबधाने जग निरनिराळया दृष्टीनी पहाते. या दृष्टिभिन्नतेमुळे स्त्रियास आपल्या आयुष्यक्रमास अधिक अडचण उत्पन्न होते, यासाठीं स्त्रियांनीं अभागिनी स्त्रियांचा जास्त अभिमान धरला पाहिजे असे ती म्हणे; व या भिन्न दृष्टीचे स्त्रियाची आर्थिक दृष्टया असमर्थता हेच बऱ्याच अशी कारण आहे असे ती म्हणे. वैवाहिक नीतिबधनांपासून पुरुष च्युत झाले तर त्यांचा एकदर आयुष्यक्रम बिघडत नाही तथापि एखाद्या स्त्रीचें जर वांकडें पाऊल पडले तर सर्व जग तिच्यावर तुटून पडते, तर यासाठी अशा अडचणीत सांपडलेल्या स्त्रियाना देखील उज्वल भावितव्याची आशा पाहिजे, आणि ती देण्याचा स्त्रियानी निश्चय केला तर तसे उज्वल भवितव्य त्यास प्राप्त होऊ देणे अशक्य नाहीं. स्त्री आळशी नसेल व आपली जबाबदारी म्हणजे आपले पोट भरण्यास आपण मेहेनत केली पाहिजे हें तत्त्व ओळखणारी असेल तर त्या स्त्रीचा या सस्थेने प्रेमाने स्वीकार करण्यास आणि या सस्थेचा जोर तिला प्राप्त होऊ देण्यास कोणतीच हरकत नाहीं. मिसेस हटर हेंहि सागत असे की ज्यास भूतदयेचे अभिमानी व्हावयाचें आहे त्यास सभावितपणाच्या खोटया कल्पना गुडाळून ठेवल्या पाहिजेत. ज्यांस भूतदया दाखवावयाची नसते ते लोक सभावितपणाच्या कल्पनाच्या आडोशामागे लपतात, ज्यास सत्कार्य करावयाचे आहे त्यांनीं संभावितपणाची खोटी वृत्ति टाकली पाहिजे. सत्कार्य करणाराची निंदा करणारा वर्ग असावयाचाच आणि अशा निंदकापैकी काही लोक सभावितपणाचे सोग कर्तव्य चुकविण्यासाठीच करीत असतात.

ती सस्था आपल्या खर्चासाठीं स्वावलबी होण्यासाठी जे काम करावयाचे ते आपण करावे असें मिसेस हटरने ठरविले. तिच्यापाशीं पैसे होते, पण कार्यारभास लागणाऱ्या खर्चाखेरीज त्या पैशाला होताहोईतों हात लावावयाचा नाहीं असाच तिनें निश्चय केला होता. मेहनत करणारी व्यक्ति आपल्या पोटापुरते मिळवतेच आहे एवढेच नव्हे तर अडचणीच्या दिवसात उपयोगी पडण्यासाठीं पैसेहि शिल्लक टाकीत आहे, असे जर आहे तर वर्गण्या गोळा करण्याचे विशेष कारण ते काय? ज्या स्त्रिया जमतील त्यांचा आयुष्यक्रम उपयुक्त म्हणजे किफायतवार करण्याचे कार्य आपण करावे म्हणजेच स्त्रियाच्या आयुष्यक्रमाचा प्रश्न आपण सोडविला असे होईल. धदा व सामाजिक कार्य यांवर आपल्या नवऱ्याने व्यक्त केलेले विचार तिच्या मनांत नेहमीं जागृत होते.

मिसेस हटरने जे उद्योगमदिर काढले होते त्याची पहिली जाहिरात स्वतः लिहिली होती, तिचा आशय येणेप्रमाणें होता. "हे स्त्रियांचें उद्योगमदिर हे स्त्रियाच्या उद्योगासबधाचें जें मिशन आहे त्याचे आहे. ज्या स्त्रियांना भोवताल्च्या परिस्थितीचा कटाळा आला आहे आणि आपण स्वत उद्योग करून आपलें पोट भरावें अशी ज्याची इच्छा आहे त्यांनीं या सस्थेस मिळावे. प्रत्येक स्त्रीची खाण्यापिण्याची आणि कपडयालत्त्याची योग्य सोय होईल. या सस्थेचा हेतु कोणत्याहि स्त्रीस धर्मांतराला प्रवृत्त करण्याचा नाही. तथापि आत येणाऱ्या प्रत्येक स्त्रीने दुसऱ्या इतर सर्व स्त्रियाना भगिनीप्रमाणें मानले पाहिजे,

आणि तिने आत किंवा धर्म याविषयींच्या भावना भगिनीप्रेमास आड येऊ नयेत याविषयी मी प्रयत्न करीन अशी शपथ वाहिली पाहिजे, आणि आपण जो प्रयत्न करूं त्यापासून जी किफायत होईल ती सर्व स्त्रियांच्या उन्नतीसाठीं वापरायाची अशीहि कबुली दिली पाहिजे आमच्याकडे येण्यासाठीं कोणतेहि दाखले नकोत वाटेल. त्या स्त्रीनें वाटेल तेव्हा आमच्याकडे यावें आणि वाटेल तितके दिवस रहावें, आणि तिची आमच्या संघांत कायम मिळावें अशी इच्छा असल्यास तसे करावें, नाहीं तर लागेल तेव्हां सोडून जावें; मात्र जोंपर्यंत स्त्री आमच्याकडे आहे तोंपर्यंत तिने आपल्या शक्तीप्रमाणे काम हे केलेंच पाहिजे. छापखाना, खाण्याचे पदार्थ करणे, कशीदाचें काम, बागेत काम करणें, विणकाम करणे इत्यादि शाखा या उद्योगमंदिरात आहेत. झाडलोटीपासून कोणतेहि काम प्रत्येक स्त्रीने करण्यास तयार राहिले पाहिजे ''

याप्रकारें मिसेस हटरने प्रथम वर्तमान पत्रांतून जाहिरात दिली. छापण्याचीं काम मिळवून आणणे इत्यादि गोष्टी मिसेस हटर स्वत:च करीत असे. आणि त्यामुळे छापखान्याच्या शाखेत पुष्कळच स्त्रिया होत्या. काहीं बुरडी काम करीत होत्या. उद्योगमंदिरास लागणाऱ्या अनेक गरजा त्या मंदिरांतल्या स्त्रियाच पुरवीत होत्या. याशिवाय काहीं स्त्रिया बाहेर जाऊन नर्सचे, व मास्तरणीचे काम करणाऱ्या होत्या, पण त्या उद्योगमंदिरामध्येंच रहात होत्या.

या संस्थेमध्ये अनेक प्रकारच्या स्त्रिया आल्या. काही विधवांना त्यांच्या आप्तांनीच आणून सोडले; तर कांहीं विधवा आपल्या आप्तांच्या जाचामुळे आल्या. कांहीं नवऱ्याने टाकून दिलेल्या स्त्रिया येथे आल्या होत्या; तर कांहीं अविवाहित पण आईबाप नसलेल्या पण आपल्या इतर आप्तांच्या जाचाला कंटाळलेल्या स्त्रिया येथे आल्या होत्या. याशिवाय कांहीं अगदीं निराळ्या प्रकारच्या स्त्रिया यांत होत्या. ज्या स्त्रियांना स्वातंत्र्य होतें व मास्तरीण किंवा नर्स या प्रकारचा धंदाहि होता, त्या स्त्रियांपैकी काहींना येथे रहाणे अधिक सुखाचे वाटले म्हणून केवळ जेवणखाण व रहाण्यास जागा देणारी ही बरी खाणावळ आहे असे समजून त्या प्रथम फक्त रहावयास आल्या. पण याच स्त्रिया कांहीं काळानंतर या संस्थेच्या मोठ्या अभिमानी सदस्या बनल्या.

मिसेस् हटरची मुलगी मिस् एल्मा हटर ही त्या संस्थेमध्ये मोठ्या प्रामुख्यानें काम करीत होती. एल्मा हटर ही मिसेस् हटरची केवळ मानलेलीच मुलगी होती. ती बहुतकरून ब्राह्मण जातीची असावी, असा लोकांचा समज होता ही या उद्योगमंदिरामध्ये अगदीं प्रारंभीच आलेल्यांपैकीं एक होती आणि हिने तिचे जे कांहीं दागिने होते तेहि आल्याबरोबरच उद्योगमंदिरास दिले होते. ही आली त्यावेळेस विवाहित स्त्री किंवा विधवा असावी, असा लोकांचा समज होता कां कीं तिच्या दागिन्यांपैकीं इतर सर्व दागिने उद्योगमंदिराने विकले पण तिने मंगळसूत्र विकू दिले नाहीं. तिने आल्यानंतर थोड्याच दिवसात बाप्तिस्मा घेतला व आपली जातहि बदलली, बाप्तिस्म्याच्या वेळेस मिसेस् हटर ही तिची गॉड मदर झाली होती, व यामुळे ती आपणास पुढे मिस् हटर असेच म्हणून घेऊ लागली मिस् हटर आली त्यावेळेस १९।११ वर्षांची होती, तथापि बाल्याऐवजी जगाचा बराच अनुभव घेतलेल्या स्त्रीची चर्या व गभीर वृत्ति तिच्या तोंडावर दिसे. तिच्या तोंडावरील ते गभीरतेचे आवरण निघून जावें आणि अल्लड पोरीचे हास्य यावें, असे मिसेस् हटरच्या मनातून होते व त्यासाठी तिने पुष्कळ प्रयत्नहि केला. उद्योगमंदिराच्या भोवतीं जें मोठे विस्तीर्ण क्षेत्र होतें त्यांत अनेक मुलींबरोबर तिनें धांवपळ करावी, खाण्यापिण्याकडे तिने लक्ष द्यावें, यासाठीं मिसेस् हटरनें

प्रयत्नहि पुष्कळ केला. आणि त्यामुळे एल्माच्या चेहेऱ्यावर आनंदाची छटा पुष्कळच आली होती. मिसेस् हटरचे पुष्कळ बोलणे, विनोदी तऱ्हेचे असे व आश्रमातील अनेक स्त्रियांमध्ये आनंदवृत्ति नेहमीं असावी यासाठीं बाहेरच्या जगावर मिसेस् हटर टीकाहि करी, ती टीका देखील मनोरंजक असे. त्या प्रकारच्या खटपटीमुळे मिस् हटरच्या चेहेऱ्यावर हास्य व उल्हास हीं दिसत असत, तथापि तें उल्हसित मुख रंगभूमीवर गांभीर्याचा एक प्रवेश आटपल्यानंतर जसा हास्यरसप्रधान प्रवेश यावा त्याप्रमाणे दिसे. ज्याप्रमाणे एखादे नाटक हास्यरसमय असूनहि त्याचे अधिष्ठान गंभीर राहू शकते, त्याप्रमाणे एल्माच्या तोंडावर जरी नेहमी हास्य दिसे तरी ती आपल्या एकंदर आयुष्याकडे गंभीर वृत्तीने पहात असावी व कांहीं तरी दुःख साठवून ठेवीत असावी असे अधिक परिचितांस वाटत असे. तिची आश्रमांत येण्यापूर्वीची हकीगत तिनें आपल्या आईस कळविली असलीच पाहिजे. तथापि इतर लोकांस मी मिसेस हटरची मुलगी आहे. एवढेच मला ठाऊक आहे मला जास्त कांहीं ठाऊक नाहीं असे ती म्हणे, आणि असें ती म्हणाली असतां मिसेस हटरला आनंदच होई.

---

## प्रकरण ३ रें

## रिप व्हान विंकल.

बॅ. सुतार यांच्या घरीं स्वामी ब्रह्मगिरी बरेच दिवस पाहुणे होते. त्यांचा नित्यक्रम रोजचीं वर्तमानपत्रे वाचणे आणि गांवभर हिंडून कांहीं नवीन नवीन गोष्टी पहाणे व अनेक मंडळींस भेटणे हा होता. त्यांनी अनेक स्थानिक चळवळींची व त्यांशी संलग्न असलेल्या व्यक्तींची माहिती करून घेतली. त्यांच्या हिंदुस्थानच्या कल्पना कांहीं दिवस अगदींच जुन्या होत्या. ब्रह्मगिरीच्या बऱ्याचशा आठवणी जुन्याच होत्या, व जुने देखावे व जुनी वस्तुस्थिति आजहि आहे असें समजून ते बोलतात असें रा. सुतार म्हणत असत, आणि त्यांनी त्यास रिप व्हान विंकल हें नांव दिलें होतें. "रिप व्हान विंकल" हें पात्र वाशिंग्टन आयरविंगच्या एका गोष्टींतले आहे. हा निजला तो वीस वर्षांनीं जागा झाला आणि वीस वर्षांपूर्वीच्याच गोष्टी बोलू लागला असे त्या कथेंत दाखविलें आहे. कांहीं अशी ब्रह्मगिरीची स्थिति अशीच होती खरी. हिंदुस्थान अजून रहाण्यास सवंग देश असल्याची ब्रह्मगिरींची कल्पना होती पण बाजारांत कांहीं वस्तूंची खरेदी केल्यानंतर ती पार मावळली. अनेक मंडळीं त्यांस जेव्हां "रिप व्हान विंकल" हें नांव देऊं लागली तेव्हां आपणांस हिंदुस्थानचें जर कांहीं तरी कार्य करावयाचें आहे, तर आपण आजच्या हिंदुस्थानाशी चांगला परिचय करून घेतला पाहिजे, याची जाणीव चांगल्या तऱ्हेने झाली. ते आपल्या जुन्या माहितीतल्या कांहीं मंडळींची जेव्हां चौकशी करीत, तेव्हां त्यांची जिज्ञासा नेहमीं पुरी होत असे, असे नाहीं. कां कीं. मुंबईत असतांना त्यांच्या ज्या मंडळींशी ओळखी झाल्या होत्या ती मंडळी कोठें तरी दुसरीकडे निघून गेली होती. आणि बरींचशी मृत झाली असून ज्या मंडळींस त्या व्यक्तींची माहिती होती, अशा व्यक्तीहि दिसेनाशा झाल्या होत्या. मुंबईस कायमचा रहाणारा वर्ग किती थोडा असतो आणि अनेक व्यक्ती आपापल्या नोकरीपुरत्या किंवा कामापुरत्या मुंबईस निवास करून नंतर पुढें आपल्या गांवीं जाऊन कशा रहातात, व मुंबई अगदीं नव्या व्यक्तींनी कशी भरते, याची त्यास कल्पना आली. सात आठ दिवसपर्यंत ते चालू वर्तमानपत्रें वाचणें आणि जुन्या वर्तमानपत्रांच्या फायली चाळणें, यांतच गढून गेले होते. त्यांची जुनी माहिती आणि त्यास दिसून येणारी अर्वाचीन स्थिति यांचे ते धागे लावीत होते. पण वर्तमानपत्रें वाचतांना

त्यांच्या पूर्वीच्या आठवणी जागृत होत व त्याच्या मननात ते गढून जात. त्यांनी हिंदुस्थान सोडले ते निराशामय अंत:करणाने सोडले आणि आता ते आशावादी होऊन परत आले, तर सदृश फरक हिंदुस्थानांतहि झाला आहे की नाही हे त्यास पहावयाचे होते. जरी त्यास हिंदुस्थानची गेल्या वीस वर्षाची स्थूल माहिती होती, तरी त्यास लोकामध्ये चर्चेचे विषय कसे बदलत चालले आहेत, आणि लोकान्च्या मानसिक भावनात फरक कसे काय होत आहेत याची त्यास चांगली माहिती नव्हती. त्यानी हिंदुस्थान सोडले त्यावेळेस इंग्लंडचे बोअर लोकाबरोबर युद्ध संपून गेले होते. ते युद्ध चालू असता बोअर लोकानीं इंग्रज लोकाना जो हात दाखविला त्याप्रमाणें आपणाहि दाखवू अशा गोष्टी तरुण विद्यार्थी बोलत होते. बोअर लोकानीं "गॉरिला वारफेअर" ने इंग्रजास जेरीस आणले; आणि गॉरिला वारफेअर म्हणजे गनीमी काव्याची लढाई होय, आणि "गनीमी काव्याची लढाई" तर आपल्या घरचीच आहे, अशा गप्पा तरुण मंडळींत सुरू होत्या, आणि त्यावेळेस गनीमी काव्याच्या लढाईवर केसरींत जो एक मोठासर अग्रलेख लिहिला गेला, तो अग्रलेख या प्रकारच्या कल्पनासहि चेतना देता झाला. त्यानंतर रूसो-जपानी युद्ध सुरू होऊन तेंहि संपत आले होते. व यूरोपीयन लोकावर विजय मिळवू शकणारे जपानचे राष्ट्र एशिआटिक असल्यामुळे हिंदुस्थानचे पाग फेडील अशी काही लोकास अधुक आशा वाटत होती. तथापि त्या युद्धात जे अर्वाचीन युद्धाचे व्यापक स्वरूप दिसून आले त्यामुळे बंड करणे सोपे आहे असे समजणाऱ्या पुष्कळान्च्या मनाला धक्का बसला, आणि एक तऱ्हेचे निराशेचे साम्राज्य तरुणांच्या मनांत उत्पन्न झाले, आणि त्यामुळे अनार्किस्ट, निहिलिस्ट इत्यादि यूरोपियन राष्ट्रांमध्ये राजकीय मते निर्माण झाली होतीं त्यांच्याकडे तरुणाचे लक्ष ओढले गेले.

तथापि जसजसा रशियाचा रणांगणावर पराभव होत चालला तसतसे रशियन ड्यूमालाहि महत्त्व येत चाललें ही गोष्टहि कांहीं लोकांच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाही. निराशेच्या कालात देखील ज्या प्रकृतींनां आशेचे देखावे दिसू लागतात अशा प्रकृतीच्या तरुणाना असें वाटत होते की, "जेव्हा ब्रिटिश साम्राज्य एका भल्या मजबूत यूरोपिअन राष्ट्राबरोबर लढाई करण्यात गुंतेल तेव्हा देशातील लोकाच्या मनालाहि किंमत येऊ लागेल किंबहुना रशियाच्या आरमाराचे खोके ज्याप्रमाणे जपानने फोडले त्याप्रमाणे इंग्लंडचे आरमार एखाद्या बलाढ्य यूरोपियन राष्ट्राने फोडून टाकले, तर देशास स्वातंत्र्यहि प्रस्थापित करता येईल, तर आपण युद्धाविषयक नवीन सुधारणाच्या प्राबल्यामुळे आणि प्रखरतेमुळे निराश होण्याचे मुळींच कारण नाही. आपण आपल्या स्वातंत्र्यासाठी तयारी करण्यास आतापासून लागले पाहिजे, येत्या वीस पचवीस वर्षात इंग्लंड कोणत्या तरी प्रबल राष्ट्राबरोबर युद्धात पडेलच आणि तेव्हा आपणास जो उठाव करावयाचा तो करून घेऊ." त्यातल्या त्यात इंग्लंडविरुद्ध बंड करावे असें म्हणणारा जो वर्ग होता त्याच्या मनास आणखी हुरूप येण्यास आणखी एक कारण झाले. हिंदुस्थानात पूर्व आफ्रिकेतील म्याड मुल्लाच्या पराक्रमाच्या हकीकती येत होत्या आणि त्यामुळे त्यास असें वाटू लागले की, गनीमी काव्याच्या लढाईचे दिवस अजून गेले नाहीत. एवढेंच नव्हे तर अर्वाचीन सुधारणा नसलेलें राष्ट्रहि या पद्धतीने सुधारलेल्या राष्ट्राला दोन हात दाखवू शकेल. सरहद्दीवर शांतता ठेवण्यासाठीं आज अनेक वर्षे आपल्या अर्वाचीन शस्त्रास्त्रांसह इंग्रज लढत आहे. तरी आफ्रीदी वगैरे लोक आपला पराक्रम दाखवीत आहेत व अर्वाचीन शस्त्रास्त्रे त्यांचे दमन करू शकत नाहीत. तर आपणांस अजूनहि युद्धास क्षेत्र आहे असे समजून काय करावयाचे ते करावे. स्वामी

ब्रह्मगिरी वर्तमान पत्रे १९०३ सालापासून पहात होते, हिंदुस्थान सोडण्यापूर्वी एकदोन वर्षे अगोदर पासून वृत्तात लक्षात घेत होते आणि मधून मधून जुन्या गोष्टी आठवीत होते. स्वामी ब्रह्मगिरी भायखळ्यावरील व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिटयूटमध्ये होते, त्या वेळेची मडळी त्यास आठवत. गावांतल्या चळवळी आठवल्या. या निरनिराळ्या विचारान्या वावटळी ज्याप्रमाणे इतर कॉलेजात शिरल्या होत्या त्याप्रमाणेच टेक्निकल इन्टिटयूटमध्येंहि शिरल्या होत्या. कांहीं लोकांनी एनजिनिअरिंगचे शिक्षण घेण्यास जी सुरवात केली होती तिचें कारणहि राजकीय होतें, हायस्कूलमध्ये असतानांच लाठी गदगाफरी शिकून जी मडळी स्वराज्य मिळविण्यास तयार झाली होती त्यांपैकी कांहीं मडळी म्याट्रिक नापास झाल्यामुळे म्हणजे म्याट्रिकनापासाना टेक्निकल इन्स्टिटयूट-शिवाय दुसरा कोणताहि पुढील शिक्षणाचा क्रम मोकळा नसल्यामुळे त्या संस्थेत आली होतीं, तर काहीं मुद्दाम म्हणजे म्याट्रिक पास झाली असूनहि आली होती. ही मडळी एनर्जानिअरिंगचे शिक्षण म्हणजे अर्वाचीन शस्त्रास्त्रांचे साहित्य तयार करण्याची पूर्वतयारी असे समजत असत. ते सर्व दिवस आणि यावेळचे सर्व विचार स्वामी ब्रह्मगिरीस आठवले. आणि काहीं इन्स्टिटयूटच्या बाहेरचे वातावरणहि आठवलें. आपण मे महिन्यान्या दिवसात घरी न जाता एका गिरणींत ओतकाम करण्यान्या खात्यात काम केले ते दिवस त्याला आठवले. त्यावेळेस गिरणीतल्या लोकस्थितीची त्याना आठवण झाली आणि ती स्थिति अजून असेल काय, असा विचार त्याज्या मनांत आला. पूर्वीच्या दिवसाची आठवण होऊन आणि एका आठवणीवरून दुसऱ्या आठवणी त्यांच्या मनांत येत. त्या आठवणी समाजस्थितिदर्शक होत्या. "चिंचपोकळीन्या एका गिरणींत आपण कामाला असता आपल्या खात्यांतील फोरमनच्या आग्रहावरून एका तमाशाला कसे गेलो तेथे फोरमनने खूण केल्यावरून लावण्या म्हणणारी बाई आपल्या मांडीवर कशी बसली आणि आपण कसे बिचकलो आणि आपला झालेला घोटाळा पाहून इतर मंडळीमध्ये हशा कसा पिकला" याचीहि त्यास आठवण झाली. त्याप्रमाणेच त्याला "डोळे तुमचे जादुगिरी, आम्हांकडे पाहूं नका" हे गाणे आठवले आणि हे गाणे म्हणणारी भेदिक सामन्याबद्दल असलेली चद्रीहि आठवली. त्याप्रमाणेच दुसरींहि गाणी आठवलीं. त्यातले एक गाणे तर त्याला पाठ झाले होते ते त्यानीं पुन्हां आठवण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्याला कांहींतरी कडवीं आठवलींच.

(तो.—) तुला पाहुनी मन माझे झाले गारगार.
(ती.—) हां, खबरदार
(तो.—) सखे घे कलदार.
(ती.—) मी भरवीन बाजार.
(तो.—) रुपये मोजीन हजार.
तुला पाहुनि मन माझे झाले गारगार.

ही किती सोपी भाषा, आणि प्रेमाचीं गाणीं हवीं याबद्दल सामान्य लोकात किती तरी आवड; पण चांगल्या प्रेमाचीं सोपीं गाणी करणारे कवी नसल्यामुळे या लोकाना विकृत प्रेमाचीं गाणी गाऊनच सतुष्ट व्हावे लागत होते. शुद्ध प्रेमाचीं द्योतक अशीं सोपीं गाणी तमाशेवाल्यात प्रसृत करून यांची शृंगारतृष्णेस नीतीची आणि सदभिरुचीची जोड उत्पन्न करून देणे शक्य नाहीं काय? लोकात शृंगारतृष्णा ही रहाणारच. ती भागवावयाची नाही, प्रेमावरच चाबूक उगारावयाचा, आणि तसे करून आपण सभावित म्हणून आपली प्रसिद्धि करवून घ्यावयाची अशी सभावित सोदेगिरी करणारी पिढी महाराष्ट्रांत अजून असेल काय? इत्यादि गोष्टी स्वामी ब्रह्मगिरींच्या मनात आल्या. त्याला त्यावेळच्या गिरण्यातले पालिटिक्सहि आठवले. गिरणीचा शेट

पगार वेळच्या वेळेवर देत नसे आणि म्यानेजर त्याच्या सांगण्यावरून रोज धापाधापी करीत असे, आणि गिरणीच्या मंडळीकडून कसे तरी काम करून घेई. इकडे ते लोक फार वियरले आहेत. पगार वेळच्या वेळेवर येत नाहीं म्हणून फार रागावले आहेत. मी कसा तरी थोपवून धरतों, आणि लोकांना कामाला लावतो म्हणून सांगत असे. गिरणीतल्या मालकाची दृष्टी अगदीं निराळी होती. पधराशे माणसे गिरणींत कामाला होतीं, प्रत्येक मनुष्य गिरणींत रोजचें आठबारा आण्याचें काम करी म्हणजे महिन्याचे २०।२२ हजार रुपयाचे काम घेऊन त्याचा पगार लांबणीवर टाकला म्हणजे हे २०।२२ हजार रुपये वापरायला आपण मिळविले असे तो मालक समजत असे. त्याच्या पालिसीमुळें गरीब लोक नाडले जात, तसेच गिरणींतले जाबर प्रत्येक मजुरापासून त्याना कामाला लावण्याबद्दलच पैसे घेऊन बराच दरमहा उत्पन्न करीत असत. बायकांच्या कामावर देखरेख करणारी गिरणींतली नायकीण दखील बायकांकडून तसेच पैसे मिळवी. ती बहुतकरून स्पिनिंग मास्टर किंवा वीव्हिंग मास्टर किंवा फोरमन आणि काही प्रसंगी म्यानेजर यांच्या उपपत्नीसारखी असे, ती स्वतः संशयास्पद नीतीची होती एवढेच नाही तर हाताखालच्या देखण्या, तरुण स्त्रियाना आपल्या वरच्या पुरुषानां खूष करण्यासाठीं त्यांच्याकडे पाठवीत असे. या नायकिणी तरुण असतां स्वतःच पुरुषानां खुष करणाऱ्या असत आणि त्या जसजशा पस्तिशीच्या पुढे जात, तेव्हा वरचे अधिकारी पुरुष ताब्यात ठेवण्यासाठी हाताखालच्या स्त्रियाना त्यांच्याकडे पाठवीत, या सर्व गोष्टी त्यास दिसून आल्या होत्या; आणि मोठमोठे सुधारणेच्या गोष्टी करणारे लोक इकडे लक्ष का पुरवीत नाहींत. आणि लग्नमुंजीच्या प्रसंगी एखाद्याने गोवेकरणीला गाण्याला बोलावले तर त्यावरच का घसरतात याचे त्यास त्यावेळेस कोडे पडत असे. लोकांचे पगाराचे पैसे फार उशीरा मिळत, त्यामुळे त्या कामकरी लोकाना काय अडचणी पडतात हे त्यास लागलें दिसून आले होते. मारवाडी, पठाण यांच्या तावडींत मजूरवर्ग नेहमीं असे आणि त्याचा परिणाम स्त्रियांच्या नीतीवर फारच अनिष्ट होई. कित्येक हिंदु स्त्रिया यामुळे पठाणाच्या रखेल्या होऊन मुसुलमान होतात हेहि त्यास दिसून आले होते, व या सर्व परिस्थितीकडे पाहून त्यास या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करणाऱ्या सरकारचा राग तर येत असेच, पण आपल्या लोकांचा विशेष राग येई. "गिरणींतल्या मजूराचा एक महिन्याचा पगार मालकाकडे अनामत रहावयाचा दुसऱ्या महिन्याचा मिळावयाचा पण तो तिसऱ्या महिन्याच्या पधरा तारखेनंतर मिळावयाचा, व ती पधरा तारीख वीस तारखेपर्यंत ढकलली जावयाची या परिस्थितीविरुद्ध आपण १९०४ साली जेव्हा खटपट करू लागलों व तव्हा याबद्दल ठराव काँग्रेस किंवा सामाजिक परिषदेपुढे मांडण्याचा प्रयत्नहि आपल्या ओळखीच्या पुढाऱ्यामार्फत आपण कसा केला; पण तो ठराव राजकीय नाहीं म्हणून काँग्रेसने वगळला व तो सामाजिक नसून आर्थिक आहे म्हणून सामाजिक परिषदेने वगळला एवंच तो ठराव पुढे कसा येऊ शकला नाही तेहि त्यास आठवले काँग्रेस ही सिव्हिलसर्व्हिसच्या परीक्षा हिंदुस्थानात व्हाव्यात म्हणून गोष्टी बोलत होती तर सामाजिक परिषद ब्राह्मण किंवा तत्सम जातींच्या विधवांच्या दुःखापुरताच विचार करणारी होती, आजकालचा ब्राह्मणेतर पक्ष काँग्रेस सामाजिक परिषद या सर्वांस केवळ ब्राह्मणी संस्था म्हणतो तर त्यास दोष कसा देता येईल. हेहि विचार त्याच्या मनांत आल्याशिवाय राहिले नाहीत.

त्यावेळेच धार्मिक पुरुषहि त्यास आठवले. स्वामी हंसस्वरूप यांची व्याख्याने तर त्यांनी

मग टाकून पुण्यास ऐकली होती, किंबहुना ही व्याख्यानें ऐकण्यासाठीं ते मुद्दाम पुण्यास गेले होते, आणि सर्व सोडावें आणि स्वामींच्या बरोबर जावें असें त्यांस वाटले होतें, पण स्वामींनीं केवळ त्यांची परीक्षा पहाण्यासाठीं त्यांच्यापाशी दोनशे रुपये मागितले ते देण्यासाठीं त्यांच्यापाशीं नव्हते म्हणून त्यास दुःखहि झाले पण पुढें कांहीं दिवसांनीं या स्वामीजींचे नांवहि ऐकू येई-नासें झालें हेंहि त्यांस आठवले. हसस्वरूपाची व्याख्यानें ऐकल्यानंतर त्यांनीं नित्यानंद आणि निवेदिता यांची व्याख्यानें ऐकलीं आणि सर्व कांहीं प्राचीन ग्रंथांत आहे याबद्दल त्यांची खात्री झाली पण त्यास असा प्रश्न उत्पन्न होई कीं, आपला धर्म जर सर्वश्रेष्ठ आहे तर आपण त्याचे अनुयायीच इंग्रज लोकांपेक्षा कसे दुर्बल मनाचे कां ? या प्रश्नाचें तर त्यांस कोडेंच सुटत नसे. व धार्मिक बाबतींत त्यांस किंकर्तव्यताबुद्धि उत्पन्न झाली होती पण धार्मिक पीठाविषयीं त्यास आदर आणि अभिमान होता पण तो देखील मुंबईस असताना कसा नाहींसा होऊं लागला हेंहि त्यास आठवले.

द्वारकामठाचे शंकराचार्य मुंबईस येऊन बसले असतां, आणि आपण दर्शनाला भाविकपणानें गेलो असता आपल्या भाविकपणाला कसा धक्का बसला, त्याचें चित्र त्याच्या डोळ्यासमोर एकदम उभें राहिलें. त्यावेळेस ते शंकराचार्य कोणत्या खटपटींत होते, तर पूर्वी महाराष्ट्राची वृत्ति द्वारकापीठाकडे होती. पण मराठे राजांनीं आपला दक्षिणी शंकराचार्य निराळा उत्पन्न केला आणि त्यामुळे द्वारकामठाचें नुकसान केलें तर आतां न्यायी इंग्रजसरकारनें जुने ग्रंथ पाहून आम्हास न्याय द्यावा, यासाठीं ते प्रयत्न करीत होते आपण गेलो तेव्हा द्वारकामठाच्या शंकराचार्यांचे मुंबईतील हितचिंतक त्यांच्या समक्ष चर्चा करीत होते, ती चालू असता आपण तेथें गेलों तरी वादावेशांत आपणाकडे कोणीच लक्ष न दिल्यामुळे आपणास तेथले भाषण कसें ऐकावयास सापडलें, आणि त्यावेळेस शंकराचार्यांसारख्यानीं वृत्ति मिळ-विण्यासाठीं इंग्रजाकडे जाऊं नये असें आपण आपला प्रेक्षकपणा विसरून कसें बोलतो आणि तें बोलल्यामुळे आपणांस तेथून धक्के मारून कसें घालवून देण्यांत आलें, याहि गोष्टींची त्यांनां आठ-वण झाली. त्यानंतर थोडक्याच दिवसांनीं मुंब-ईच्या एका धर्मसुधारक म्हणविणाऱ्या मराठी पत्रानें महाराष्ट्र खरोखर द्वारकेच्याच मठाच्या कक्षेंत आहे म्हणून एक अग्रलेख लिहिला तोहि आठवला. त्यावेळेस त्या संपादकानें तो केवळ द्वारकेच्या शंकराचार्यांकडून पैसे घेऊन लिहिला असला पाहिजे अशी मुंबईत गोरेगावकरांच्या चाळींत चर्चा झाली हेहि त्यांस आठवलें.

ब्रह्मगिरि मुंबईस विद्यार्थी असतांना एकदोनदां पुण्यालाहि गेले; आणि पुण्यास गेले असल्यामुळें स्वदेशाभिमानाचें आदिपीठ जें पुणें शहर त्याची थोडी बहुत माहिती झाली होती. पुण्याचे मेळे त्यांस मनोरंजक वाटले, आणि त्याची मनोरंज-कता विशेषेकरून भोंवतालच्या परिस्थितीवर टीका करणारी जी पदें होतीं त्या पदांमुळें त्यांस भासली. त्यांतली कांहीं पदें तर त्यास फारच आवडलीं, एका पदांत—

**परिस धाडीते अंबाडा, वरि खोंवोनी केवडा**
**बाबे मार्गीं ती दुडदुडा, धारदा पहाया**

अशा ओळी होत्या. ओळी तर त्यांस आवडल्या. पण त्या ज्यामुळें आवडल्या त्यामुळें कवीच्या मनां-तला उद्देश साध्य झाला असेलच असें सांगतां येत नाहीं. चालू परिस्थितीचें हें चित्र अनिष्ट नसून इष्ट चित्र आहे असेंच त्यास वाटलें.

ब्रह्मगिरि ठेंगशांच्या वाड्यांत उतरत असत, त्यावेळच्या त्या वाड्यातील परिस्थितीचें चित्र त्यांस अजून चांगलेंच आठवत होतें. त्यावेळेस ठेंगशांच्या

वाड्यांत पुण्यामध्ये देशाभिमानी, रसिक, धर्माभिमानी आणि राजकारण समजणारी मंडळी रहात असत अशी प्रसिद्धि होती, व आपण टेंगशांच्या वाड्यात उतरलो व त्यामुळे आपली या सर्वांशीं ओळख झाली म्हणून आपणांस किती तरी अभिमान वाटला. पण त्या मंडळीशी प्रत्यक्ष संबंध आल्यानंतर त्यांच्याविषयींचा आदर किती मर्यादित झाला वगैरे गोष्टी त्यास आठवल्या. श्रीमती हा जणुं काय एक मोठा दुर्गुण आहे असे दाखविण्याची प्रवृत्ति सदाशिवपेठेतील विशिष्ट मंडळींत होती. ती या वाड्यातल्या मंडळीत दिसून येत असे. मोठी माणसे कोणती तर जीं स्वार्थत्याग करणारीं. याच एका गुणामुळे मनुष्याची किंमत ठरवावयाची असे त्यावेळचे तत्त्ववेत्ते किंवा लेखक भासवीत असत. घाणेरड्या वस्तींत कसें बसें जीवन चालवावे, पैसे मिळविणाऱ्या मंडळींची निंदा करावी, दुसऱ्या मंडळींनीं पैसे मिळविण्यासाठी काय काय ढंग केले, कोणी कंत्राट मिळविण्यासाठी कोणत्या साहेबाच्या मडमेला मोत्याचा कंठा दिला, इत्यादि गोष्टी नित्य चर्चेच्या असत. आफिसातून यावे, चौकामधील एका पडवीत एक सतरंजी घालावी, आणि मंडळींनीं पत्ते खेळावेत आणि पत्ते खेळताना चहा प्यावा आणि चिवडा खावा असा अनेक वाड्यातील आयुष्यक्रम असे, त्याप्रमाणे टेंगशांच्या वाड्यांतील आयुष्यक्रम होता. या वाड्यांत अनेक बिऱ्हाडें होतीं. एक स्वार्थत्यागी शाळामास्तर, एक एका वर्तमानपत्रांतील दुय्यम लेखक, एक कलेक्टर कचेरीतील कारकून, आणि एक शास्त्रीबुवा पुराणिक. त्यावेळेस पुण्यांतील भाडी स्वस्ती होतीं. प्रत्येक जण दोनतीन रुपयाच्या आंतलेंच भाडें भरणारा, आणि मोठमोठ्या मंडळींवर व धर्म, शिक्षणपद्धति व राजकारण इत्यादि सर्व तऱ्हेच्या विषयांवर टीका करणारा. तो पुराणिक धार्मिक गोष्टींतील अधिकारी वक्ता म्हणून मिरवे. कलेक्टरकचेरीतील कारकून आपणांस सरकारचीं सर्व रहस्यें ठाऊक असल्याचा बाणा बाळगी, तो कारकून असा तसा नव्हता, तो ग्रॅज्यूएट होता. तो स्वार्थत्यागी शाळा मास्तर भावी पिढीस उच्च वळण लावण्यासाठी आपण अवतरलो आहों असा बाणा बाळगी; तर वर्तमानपत्रातील दुय्यम लेखक महाराष्ट्र आपल्या तावडीत आहे अशा भावनेनें वागत असे. सर्व मंडळी एकाच मताची होती असे नाही, कोणी पुनर्विवाह असावा असें म्हणे तर कोणी नसावा असें म्हणे, तर कोणी लहानपणींच विधवा झाल्या असतील असल्या स्त्रियांच्या बाबतींत पुनर्विवाह क्षम्य आहे असें सांगून आपण मोठ्या समतोल वृत्तीचे आहोत असे दाखवी, आणि त्याबद्दल प्रशंसा मिळवी. या वाड्यातील मंडळींचीं भिन्न मते तरी कशावर असायचीं, पुनर्विवाहावरच असायची, कां कीं विचाराला निरनिराळे विषय असतील तर ना! स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, हे त्यावेळच्या, जगातले दोनच विषय. यावर एका बाजूनें बोललें म्हणजे सुधारक म्हणत, दुसऱ्या बाजूने बोललें म्हणजे उद्धारक म्हणत. मनुष्यमात्राचे वर्गीकरण एवढ्याच गोष्टीकडे पाहून करावयाचे असा त्यावेळच्या लोकांमध्ये संप्रदाय पडला होता तो टेंगशांच्या वाड्यात पूर्ण प्रतिबिंबित झाला होता, त्या मंडळींनां विचाराला विषयच थोडे होते. पण मंडळी मात्र असे समजत कीं हा टेंगशांचा वाडा सर्व महाराष्ट्रीय उन्नतीचें केंद्र आहे.

त्या मंडळीच्या विचारांचें दुर्भिक्ष्य पाहून ही सर्व मंडळी अशिक्षित होती असे कोणी म्हणेल. पण ती चूक होईल. शाळामास्तर बी. ए. झाला होता तर तो अशिक्षित कसा? वर्तमानपत्रांतील दुय्यम लेखक तर कायद्याचेंहि शिक्षण मिळालेला होता. आणि तो आपल्याला मोठा सुशिक्षित विनोद करणारा समजत असे; तर त्याला अशिक्षित कसें म्हणावें! जो कलेक्टर कचेरींत होता तोहि बी. ए.

झालेला होता. त्याचप्रमाणें जो शाळीबजा पुराणिक होता, तो देखील इतर मंडळींमध्यें बसला असतां कोटया करण्यात प्रवीण होता. त्यावेळेस त्याची स्त्रीशिक्षणावरहि चर्चा चालत असे, आणि स्त्रिया फार शिकल्या असता कांहीं अनर्थ ओढवतील म्हणून या वाडयातील सुशिक्षितांमध्ये म्हणजे त्या चौघामध्यें अगदीं एकमत होतें. अनर्थाची जी जाणीव त्यांस थोडीबहुत होती ती देखील काल्पनिक नसून सकारण होती. त्यास वाटत असलेल्या भीतीच्या कारणातील एक कारण होतें तें असे: ही मंडळी गप्पा मारीत बसली असतां जीं विनोदाचीं भाषणें करीत तीं भाषणे करताना मंडळी बहुधा अश्लीलतेच्या काठावर जात, पण त्याप्रकारची चर्चा करताना संस्कृत शब्द वापरीत. जर बायका शिकल्या व त्यांना संस्कृत येऊ लागले तर आपल्याला या प्रकारचे बोलणे बोलता येणार नाही, आणि आपल्या बोलण्यावर विनाकारण नियंत्रण उपस्थित होईल, ही त्या मंडळींस मोठीच अडचण वाटत असे.

फाजीलपणाचे बोलणे बोलूच नये तर आयुष्यांत मजा रहात नाहीं. अशोकनवमंजरीचे अभिसारकाचे कौमुदीमहोत्सवाचे दिवस कधींच निघून गेले. आतांचे नीरस आयुष्य आनंदानें कसें घालवावें हा प्रश्न आहे. हा राष्ट्राचा वृद्धापकाळ आहे, वृद्धापकाळीं तारुण्यांतील विलास फक्त आठवून आनंदित व्हावयाचें त्याप्रमाणेच आज देशाची स्थिति आहे, आपली "रसिकता" कृतींत आणण्याची आज स्थिति नाहीं, तर ती आठवणींतच व संभाषणांतच व्यक्त करावयाचे हे दिवस आहेत ही गोष्ट देखील सर्वमान्य होती. फाजीलपणा व रसिकता यांतील मुख्य भेद त्या चौकडीच्या मताने असा होता कीं, चावटपणाचे बोलणें बोलतांना संस्कृत शब्द वापरले म्हणजे तो चावटपणा मुळींच नसून रसिकपणा होय. रसिकपणाचें हें स्पष्टीकरण त्या चौघांस अगदीं मान्य होतें. गिरणींतल्या लोकांबरोबर आयुष्य काढणाऱ्या, आणि त्या कामकरी वर्गावर प्रेम उत्पन्न झालेल्या ब्रह्मगिरीस टेंगशे वाडयांतील मंडळींनीं चावटपणा आणि रसिकता यांतील पत्ता लावलेला भेद म्हणजे केवळ भिकारी पण स्वतःस अधिक शिष्ट समजणाऱ्या वर्गाचा कामकरी वर्गाविषयीं व त्याच्या करमणुकीविषयीं असलेला तिरस्कार आहे, दुसरे कांहीं नाही असेच वाटे.



ही मंडळी कालेजात शिकली होती व ती आता स्वतंत्र झाली होती, व आपापल्या बायकांनां घेऊन स्वतंत्रपणे राहूं लागली होती. ते कालेजांत असताना त्यांच्या मनांत वागत असलेलें सुखी आयुष्यक्रमाचे चित्र स्वतंत्रपणे समोर करणें एवढेच होतें. तथापि पाश्चात्याची कुटुंबपद्धति वाईट, आपली एकत्र कुटुंबपद्धति चांगली असेच म्हणण्याचा त्यांचा परिपाठ असे. टेंगशांच्या वाडयातल्या या तरुण मंडळीस आपल्या ध्येयाप्रमाणे आपणास आयुष्यक्रम आखता आला आहे एवढ्याबद्दलच कृतकृत्यता वाटत असे. त्याच्या दृष्टीने सुखी अशा आयुष्यक्रमाचे चित्र त्यावेळच्या एका कादंबरीकाराने रंगवले होते. त्या कादंबरीकारास ते हऱ्या आपटे म्हणत हेहि ब्रह्मगिरीस आठवले. टेंगशाच्या वाडयातली ही मंडळी जरी स्वतः न अनुभविलेल्या जुन्या प्रकारच्या आयुष्यपद्धतीची स्तुति करीत असे तरी ही मंडळी जुनें ते चांगले अशी भावना असलेली मुळींच नव्हती, त्यांस उलट आपल्या सुशिक्षिततेचा अभिमान असून ते जुन्या मंडळींस तुच्छच मानीत असत; तथापि एका पिढीच्या पूर्वीच्या कालांतल्या जुन्याची ही मंडळी अभिमानी असत. म्हणजे जुन्याचा अभिमान बाळगावयाचा पण आपल्या निकट पूर्वीच्या पिढीला लाथा मारावयाच्या अशी त्यांची विद्या होती. यालाच ही मंडळी मुत्सदीपणा समजत. या गोष्टी देखील ब्रह्मगिरीस चांगल्या आठवत होत्या.

पुण्यांतल्या या तरुण पिढींत आणि पूर्वीच्या तरुण पिढींत पुष्कळच अंतर होते. या पिढीच्या मंडळींनीं संस्कृत काव्ये वाचली होतीं. इंग्रजी काव्ये वाचली होतीं, आणि इंग्रजी कादंबऱ्याहि वाचल्या होत्या. त्यामुळे या मंडळीच्या मनात अद्भुतरसाची थोडी जागृति झाली होती, रोमान्सच्या गोष्टींची आवड होती आणि त्या त्यास परिचित असलेल्या वास्तविक जगात नाहींत म्हणून दुःख वाटत असे. लहान मुलींची लग्ने त्यांनां समजूं लागण्यापूर्वी होऊन जातात त्यामुळे प्रेमकथा आपल्या सभोवतालच्या जगात दिसत नाहींत, तर आपण वस्तुस्थितिदर्शक पण सुरस अशीं काव्यें किंवा कादंबऱ्या तरी कशा लिहाव्यात अशीहि अडचण त्यांनां भासून येई. तरी देखील प्रौढविवाहाचे ओझें समाजाने पत्करावें असे म्हणण्यास ही मंडळी तयार नव्हती. सभ्य मंडळींनी स्त्रीविषयक गोष्टी मुळीच काढू नयेत इत्यादि ज्या सभ्यपणाच्या कल्पना लोकांच्या उरावर लादल्या जात होत्या त्यांच्याविरुद्ध त्यांच्या अंतःकरणाची प्रवृत्ति होती पण आजच त्या सभ्यपणाच्या कल्पनांस पालिसीसाठीं विरोध करूं नये असे रानडे मास्तर व भाऊसाहेब भडभडे म्हणत. कलेक्टर कचेरींत कारकुनी करणाऱ्या भडभडयांनां भडभडे म्हणण्यापेक्षा भाऊसाहेब भडभडे म्हणणेंच योग्य होतें. कां कीं, ते बी. ए. होते व ते पुढे मामलेदार होणार म्हणजे रावसाहेब होणार होते; तर पहिल्यापासून त्यांना भाऊसाहेब म्हणावें हेंच रास्त होय असे त्या वाडयातील मंडळी समजत असत. हें दोघाचे म्हणणें त एल्‌एल्. बी. उपसंपादक, आणि शास्त्रीबुवा या दोघांसहि मान्य होते. येणेंप्रमाणे स्त्रियांसबंधाच्या अनेक गोष्टींविषयीं साधकबाधक चर्चा होऊन या चौघांमध्ये म्हणजे पुण्यांत म्हणजे महाराष्ट्रांत एकमत उत्पन्न झाले होतें.

त्यावेळच्या सुशिक्षित मंडळीचे नेहमीचे चर्चेचे विषय कांहीं ठरलेले होते. सरकारी कारकून होते ते निरनिराळ्या साहेबांच्या गोष्टी सांगत; त्यांत साहेबाचा शहाणपणा दाखविणाऱ्या गोष्टी सांगणारे कांही असत, तर कांही त्याचा गाढवपणा दाखविणाऱ्या गोष्टी सांगणारे असत. कांहीं साहेबाची, तो हिंदूच्या तर्फेचा आहे कीं मुसुलमानाच्या तर्फेचा आहे असे वर्गीकरण गांवातले लोक करीत; तर तो ब्राह्मणांना पसंत करतो कीं प्रभूनां पसत करतो या तऱ्हेच्या गप्पा अधिक सुशिक्षित वर्ग मारी नोकरीसाठी जे वर्ग धडपड करीत असत ते आपल्या जातीखेरीज दुसऱ्या जातीवर टीका करीत. वशीले लावण्याची खटपट करणारे लोक मोठे मुत्सद्दी समजले जात. खालच्या स्थितीतले लोक युनिव्हर्सिटीकडे वशीले लावून परीक्षेची सुपरवायझरशिप मिळवीत. तर वरच्या दर्जाची मंडळी युनिव्हर्सिटीचे एक्झामिनर होण्यासाठी धडपड करीत. या सर्व गोष्टी वर्तमानपत्राच्या फायली पुढे घेऊन बसणाऱ्या स्वामी ब्रह्मगिरीच्या डोळ्यासमोर आल्या.

आपल्या मनात त्यावेळेस निराशेचे साम्राज्य कसे माजले होते त्याची देखील त्यास आठवण झाली. टेक्निकल इन्स्टिट्यूटमध्ये आपण कोर्स पुरा केला तरी आपणास भवितव्य काय आहे? हा प्रश्न आपल्या मनात उद्भवला तेव्हां कांहीं दिवस आपण कर्तव्यशून्य वृत्तीने मुंबईत कसे भटकत होतो व आपल्याप्रमाणेच भवितव्याविषयीं साशंक झालेले तरुण किती तरी होते हे त्यास आठवले. सूतकाम व विणकाम या खात्याचा कोर्स घेऊन बाहेर पडलेली मंडळी त्यास भटकतांनाच दिसली होती. गिरण्याकडे पहावे तर गिरण्या पारशाच्या किंवा मुसुलमानाच्या किंवा गुजराथ्यांच्या. पण त्या सर्व ठिकाणीं महाराष्ट्रीय मंडळीचा प्रवेश होईना म्हणून त्यांची वृत्ति विषण्ण झाली होती. बी. ए. कडचे शिक्षण घेऊन जी मंडळी बाहेर पडली होती त्यांस बाहेर क्षेत्र नाहीं, सरकार

ब्राह्मणांना जागा देण्याविषयीं प्रतिकूलता दाखवीत आहे. आणि गिरण्यांमधले लोक महाराष्ट्रीय मंडळींचा गिरण्यांत दखील शिरकाव होऊं देत नाहींत. स्वदेशी चळवळ महाराष्ट्रीयांनी जोशी काकांच्या कालापासून प्रेमाने चालविली, तिचा जो इष्ट परिणाम झाला त्याचा फायदा पारशी व गुजराथी गिरणीवाल्यांनां मिळत आहे आणि ते गिरणीवाले आपल्या चळवळीबद्दल मुळींच कृतज्ञ नाहींत, तर स्वदेशीवाल्याचा सूड घेण्यासाठींच कीं काय ते दर वाढवून बसले आहेत. व स्वदेशी कपडा सपाटून मुनाफा खाऊन विकीत आहेत, व स्वदेशी चळवळ आम्ही करतो म्हणून दक्षिणी लोकांस एक्स्ट्रीमिस्ट ठरवून पारशी खटपटे महाराष्ट्रीय ब्राह्मणांचें नाव सरकारपाशीं बद्द करीत आहेत; सरकारचा रोष महाराष्ट्रीय ब्राह्मणास सहन करावा लागत आहे. महाराष्ट्रीय ब्राह्मणांनी चळवळ करावी, स्वार्थत्याग करून महाग कपडे घ्यावेत आणि हे दक्षिणी वेडसरपणे मूर्खासारखे स्वदेशी कापड जास्त पैसे देऊन घेतात तर स्वदेशी म्हणून वाटेल तो घाणेरडा माल त्यांच्या गळयात बांधावयास हरकत नाही, म्हणून गुजराथी व पारशी लोकानी हसावे, दक्षिणीच्या गळयात घाणेरडा माल घालावा, आणि त्याचा प्रवेश मात्र गिरण्यात होऊ देऊ नये या परिस्थितींत महाराष्ट्रीय ब्राह्मणांनी करावे तरी काय? देशाभिमानी आणि उदार भावना अर्जीबात दाबून टाकून द्याव्यात काय? अशी साशक मनोवृत्ति टेक्निकल इन्स्टिटयूटमध्ये पसरली होती.

याच सुमारास एका इंग्रज पत्राने हिंदी पदवीधरांना "नवीन कार्यक्षेत्र" म्हणून एक सूचना केली होती तीं ही कीं, या पदवीधरानीं वनस्पति शास्त्र शिकून यूरोपीअन लोकांच्या बंगल्यावर माळी बनावे! तो लेख पाहून ब्रह्मगिरींस दुःखावर डागण्या दिल्यासारखे झाले. तरुणांस पुढें उज्ज्वल भवितव्य नाहीं, देशांतील धार्मिक चळवळी करणारे पुढारी किंवा धार्मिक पीठावरील अधिपती क्षुल्लक स्वार्थाच्या गोष्टींकडे गुंतले आहेत. समाजसुधारक गिरणींतील गरीब लोकांच्या स्थितीकडे लक्ष देत नाहींत आणि केवळ पांढरपेशाच्या विधवाचीं लग्नें या ठराविक मुद्दयावर वाद करण्यांतच चूर आहेत. या परिस्थितींत देशांत राहून आणि सभोवतालच्या आपल्या लोकांचें दैन्य पाहून आणि तें दैन्य पहात असतां देखील आपण ते दूर करण्यास असमर्थ आहोत याबद्दल अत्यंत उद्वेग वाटून आपलींच मनगटे चावण्यांत काय अर्थ आहे, असे जे त्यावेळच्या तेजस्वी तरुणांस वाटले ते स्वाभाविक नव्हते काय? या विचाराच्या प्राधान्यामुळे आपल्याप्रमाणेच अनेक तरुणाची हिंदुस्थानला कायमचा रामराम ठोकावा अशी वृत्ति बनली, पण प्रत्यक्ष देश सोडून थोडेच गेले. आपण त्यावेळेस कर्तव्य चुकवून पळालो काय? असा आपल्या मनाला प्रश्न करून त्यानीं 'नाहीं' असेच त्या प्रश्नास उत्तर दिले. पण पुन्हा त्यांच्या मनास वाटले की, आपण स्वतःलाच प्रामाणिक उत्तर देत नाहीं. आपण जे निघून गेलो ते परिस्थितीचे भीषण स्वरूप पाहून, कर्तव्यमूढ झालेले नव्हतो काय? होतो हे उघड आहे, तरी देखील आपण जे केले ते योग्य केले असे होत नाहीं. विचार करणाऱ्या मनुष्याने जिकडे स्वार्थ साधेल तिकडे जाण्याऐवजीं देशातच रहावे या तऱ्हेचा आग्रह जर करावयाचा असेल तर तो का? त्याचें कारण एवढेच कीं, आपण देशातल्या स्वजनांच्या उपयोगी पडू म्हणून. पण आपण जर स्वजनास उपयोगी पडण्यास असमर्थच असलो तर येथें रहाण्याचे प्रयोजन तरी काय? तर आपण स्वदेश त्यवेळेस सोडला हेंच बरे केलें. तो सोडला नसता तर आपल्या मनात आज जो आत्मविश्वास उत्पन्न झाला आहे तो उत्पन्नच झाला नसता.

हिंदुस्थान सोडल्यानतरच्या काळातील वृत्तांताकडे ब्रह्मगिरि नजर फेकीत असतां त्यांच्या

दृष्टीसमोर अनेक देखावे दृष्टीस पडले. सुरतेची कांग्रेस आणि नरम व गरम पक्षांचें द्वैत, बाँब गोळ्याची पहिली फेंक, लोकमान्य टिळकांवरील खटला, त्यांना शिक्षा, कर्झन वायलीचा खून, त्यानंतर हिंदुस्थानांतील जाक्सनचा खून व त्यानंतर झालेली धरपकड, सावरकरांची पकड, सावरकराची मार्सेले बंदरांत आपल्या स्वतंत्रतेसाठीं खटपट, सावरकराचा खटला इत्यादि सर्व गोष्टींची अधिकाधिक माहिती त्यास वाचावयास मिळाली. त्याचप्रमाणें एडवर्ड बादशहांचा मृत्यु, त्यानंतर झालेला १९११ मधला राज्याभिषेक, हिंदुस्थानांत १९१२ सालीं झालेलें जार्ज बादशहाचें आगमन व त्या प्रसंगीं श्री. गायकवाडांच्या राजनिष्ठेविषयीं संशय उत्पन्न करण्याचा ब्यूराक्रसीनें केलेला प्रयत्न या गोष्टी त्यांच्या दृष्टीसमोर आल्या. हिंदुस्थानांत पोलीसने प्रत्येकास राजद्रोही ठरविण्याचा प्रयत्न केल्यामुळें समाजात कशी अस्वस्थता उत्पन्न झाली असेल याचीहि त्यास कल्पना आली. त्यानंतर लढाई सुरू झाल्यावर इंग्लंड केवळ लहान राष्ट्रांच्या संरक्षणाकरतां युद्धांत पडलें या तऱ्हेची खोटी बतावणी हिंदुस्थान सरकार कसें करीत होतें एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानातल्या लोकांस त्याचाच पुनरुच्चार कसा करावयास लावीत होतें याचीहि त्यांस आठवण झाली. युद्धास मदत करण्यासाठीं झालेल्या एका परिषदेंत महात्मा गांधींनांच मिसेस बिझांटने राजद्रोही ठरविण्याचा केलेला प्रयत्नहि त्यास पुन्हां आठवला, व एक पुढारी आपल्या मार्गांतील दुसरे पुढारी फांसांत अडकवण्याचा प्रयत्न कसा करतो हेहि दिसून आलें यानंतर नवी कान्स्टिटयूशन हिंदुस्थानाला मिळाल्यानें कांहीं लोकांत बराच आशावाद कसा पसरला, त्यांतल्यात्यांत लोकांच्या राजकीय महत्त्वाकांक्षा वाढविण्यास महात्मा गांधींनीं काय खुबी केली, आणि एका वर्षांत स्वराज्य मिळवून देण्याची आशा दाखवून हिंदुस्थान कसें भारून टाकलें याचीहि माहिती त्यास मिळाली. पुढें या जादुगिरीवर अविश्वास कसा उत्पन्न झाला त्या संबंधाचें आणि कौन्सिलांत जाऊन विरोध करून स्वराज्य मिळविण्याच्या गोष्टी लोकप्रिय होऊं पहाणारे प्रतिनिधि बोलू लागले, त्यावेळचेंहि वाङ्मय ब्रह्मगिरीस वाचावयास मिळालें व येणेंप्रमाणें निरनिराळ्या वेळची लोकांची मनःस्थिति कशी बदलत गेली हें त्यांस कळू लागलें.

ब्रह्मगिरीचें हें वाचन सात-आठ दिवस चाललें होतें, संध्याकाळीं ते घरीं परत येत तेव्हां बॅरिस्टर सुतारे विचारीत कीं, "तुम्ही अजून आशावादी आहात काय?"

ब्रह्मगिरि उत्तर देत कीं, "अजून तर आहे." पण वाचन संपल्यानंतर ते म्हणाले, "आशावादी मी तर आहेच पण मला आतां माझें कार्यहि दिसू लागलें आहे."

---

प्रकरण ४ थें.

## सॉलिसिटर खरे यांच्या ऑफीसांत.

मेडोज स्ट्रीटवर हरिलाल खरे आणि फरनांडिस यांचें सॉलिसिटरचें ऑफीस म्हणजे राजकारणाच्या खेळांत जे निरनिराळे रंग उत्पन्न होतात त्यांचें दर्शक होतें. त्यांच्या ऑफीसांत चहा घेण्याची वेळ दोन ते तीन ही होती. त्या वेळेस इलेक्ट्रिसिटी चहाधर्मांच्या सेवेला लावून तिच्या उष्णतेच्या साहाय्यानें चहा तयार होत असे, आणि त्यांचा तो चहा तयार होत असतां राजकारणाच्या प्रश्नांस सुरवात होऊन ती चर्चा चहा पिणें आटपतांच संपत असे. चहा पिण्याच्या अगोदर मंडळी निराशावादी असत आणि चहाचा पहिला घोट तोंडांत जाऊन बिस्कुटचावीस सुरवात झाली म्हणजे मंडळीमध्यें बराच आशावाद प्रसृत होई. त्यांनीं चहाला "हिंदुस्थानचें राष्ट्रीय पेय" हें नांव दिलें होतें.

त्या ऑफिसच्या पक्षकार असलेल्या एका चहाच्या व्यापाऱ्यानें ते शब्द आपल्या जाहिरातींत वापरले, तथापि या शब्दसमुदायाचें उत्पादकत्व आमच्या ऑफिसाकडेसच आहे असें भाष्य त्या ऑफीसांतले कित्येक कारकून करतात.

खऱ्यांच्या ऑफीसांत आज दुपारीं चहाला ब्यारिस्टर सुतारे आले होते आणि ते आपल्या पक्षाच्या भवितव्यासंबंधानें चर्चा करणार होते. इ. स. १९२६ च्या मार्च महिन्यांत स्वराजस्ट पक्षाच्या मंडळींनीं कौन्सिलांतून बाहेर जाव केली तेव्हां राजकारणाविषयीं चहाच्या वेळेस विचार करणाऱ्या स्वराज्यपक्षीयांनां आपल्या पक्षानें केलें तें बरें केलें कीं वाईट केलें, आणि पक्षानें केलेली गोष्ट चांगली केली असें आपणास जरी वाटलें नाहीं तरी वेळ मारून नेण्यासाठी पंडितजींनीं केलें तेंच बरें केलें असें लोकांत कसें सांगावें याविषयीं विचार करणे अवश्य झालें होतें.

सॉलिसिटर खरे सुताऱ्यांस म्हणाले कीं, "आमच्या मंडळींचें समर्थन करण्यास जड जात आहे हें खरेंच; पण जयकर—केळकरांनीं जो स्वराज्यपक्षाचा राजीनामा दिला त्याच्यायोगानें त्यांच्या नव्या पक्षाला कितपत जोर मिळेल याची मला जबरदस्त शंका वाटत आहे."

"कांहीं जरी असलें तरी जयकर—केळकरानीं बरें केलें असेंच मला वाटायला लागलें आहे. स्वराजिस्टाचा कौन्सिलत्याग हा मी प्रतिसहकारपक्षाचाच विजय समजतो." बॅ. सुतारे म्हणाले.

हरिलाल म्हणाले कीं "आपण तर बोवा हें सांगतों कीं जसा लोकांचा नूर बदलेल तसेच आम्ही बदलणार. आम्हाला बरोबर कोण आणि चुकलें कोण याचा विचार करायला वेळच नाहीं!"

"बरें, तुमच्या घरीं पाहुणे आलेले ब्रह्मगिरि बडे आशावादी आहेत असें तुम्हीं म्हणतां; तर त्यांचा तुम्हीं राजकारणांत कांहीं उपयोग करून घ्याल कीं नाहीं!" खरे विचारतात.

"स्वामीनीं राजकारणांत कशाला पडावें?" म्हणून मध्येंच फरनांडिसनीं प्रश्न केला.

इतक्यांत हरिलालने त्याला उत्तर दिलें कीं, "दक्षिणी लोक जरी स्वामी झाले तरी त्यांचें राजकारण त्यांच्या डोक्यांतून जात नाहीं, बाकी माझें म्हणणें असें कीं संन्यास घेतलेल्या मनुष्यास राजकारणाच्या उचापती कशाला! राजकारण म्हणजे पैसा आणि मान मिळविण्याची केवळ दुसरी शाखा आहे. यांत स्वामीनीं नसावें."

"वा! वा!" खरे रागावले आणि म्हणाले "तुम्हां गुजराथी लोकांनां प्रत्येक गोष्टींत पैशाचा डाव दिसतो; कौन्सिलांत जायचें कशाला तर आपला आणि आपल्या मित्रांचा फायदा करून देण्यासाठीं! कोणाला नोकरी मिळवून देऊन तर कोणाला कंत्राट मिळवून देऊन फायदा करून देण्यासाठींच का कौन्सिलांत जावें अशीच तुमची का कल्पना आहे?"

"मग तुमची राजकारणाची काय कल्पना आहे?" हरिलाल विचारतात.

"आम्हीं राजकारण करतों ते तत्त्वासाठीं करतो, देशाला स्वतंत्रता मिळाली पाहिजे, हिंदुस्थानला डामीनियम स्टेटसचे अधिकार पाहिजेत इत्यादि गोष्टींसाठीं करतो."

"आणि या गोष्टी कशाकरता?"

"कशाकरतां म्हणजे, हिंदुस्थानची इभ्रत रहाण्यासाठीं, शिवाजीच्या शौर्याचें नाव रहाण्यासाठीं!"

"तुम्ही सर्व घेलसप्प आहात!"

"तर तुम्ही राजकारण कशासाठीं करतां?"

"पैसे मिळविण्यासाठीं; डामीनियम स्टेटस पाहिजे; हो पाहिजेच आहे. मग सरकारी नोकऱ्या आपण आपल्या लोकांसच देऊं, कंत्राटें आपल्या लोकांनांच मिळतील म्हणून आम्हांस स्वराज्य पाहिजे. आम्ही प्रोटेक्शनच्या गोष्टी बोलतों ते प्रोटेक्शन मिळालें म्हणजे आम्हा लोकांचे गिरण्यांत

जे शेअर आहेत त्यांना डिव्हिडंड चांगले मिळेल. तुम्ही लोक सेंटिमेंटनें जातां, तुम्हाला प्रॅक्टिकल बाजू कळावयाचीच नाहीं."

"मग सध्याच्या राजकारणाबद्दल तुम्हाला काय वाटतें?"

"काय वाटायचें! तमाशा आहे! राजकारणातले लोक तमाशा खेळणारे आणि आम्ही लोक वर्गणी देऊन तमाशा पहाणारे!"

ब्यारिस्टर सुतार म्हणाले की "मग नवीन कल्पना किंवा नवीन विचार यांचा राजकारणात प्रवेश करविण्यासाठीं खटपट नको काय? सगळाच उद्योग केवळ लोकाना फसवून केवळ स्वत पुढें येण्याचा आहे काय?"

"स्वत: पुढे येण्याचा प्रयत्न करणें ही तरी वाईट गोष्ट कोण म्हणतो? तमाशातल्या लोकांचा तरी उद्योग वाईट कोणीं म्हटला आपण पैसे देऊन तमाशा पहायला जातोना? कोणी तरी तमाशा खेळवला पाहिजे व कोणी तरी पाहिला पाहिजे!"

"तर मग महात्मा गांधी केवळ तमाशे खेळणारे गृहस्थ आहेत काय?"

"त्याना जे पैसे देतात त्याच्या दृष्टीनें ते त्याना जो खेळ पाहिजे आहे तोच ते करणार आहेत. ज्या मनुष्याला जी गोष्ट पाहिजे असते त्या गोष्टीला तो जोर देतो. अनेक लोकाना ज्या गोष्टी पाहिजे आहेत ती शोधून काढणारा पुढारी बनतो. त्यानें ती गोष्ट शोधून वडवून आणली म्हणजे लोक त्याला मान देतात. हा सर्व जगातल्या व्यवहाराचा कायदा आहे."

इतक्यात सॉलिसिटर खरे हे सुताऱ्याकडे वळून म्हणाले की "आमचे हरिलाल एक नंबरचे "सिनिक" आहेत. त्याच्या बोलण्याकडे तुम्हीं लक्ष देऊ नका, त्याचा सिनिकपणा आम्हाला खटल्यांत प्रतिपक्षाचे हेतू ओळखताना फार उपयोगी पडतो एवढे मात्र खरें. बरे, तुमच्या पाहुण्याची माहिती तुम्हीं तुमच्या नागपुरी मित्रांना आतांपर्यंत करून दिली की नाहीं?"

"अर्थात करून दिली, आणि त्यास नागपूरकराकडून व्याख्यानास आमंत्रणहि येणार आहे. आणि ते लवकरच तिकडे जातील अशी खटपट मी करणार आहे. बापूराव भोगळवारानीं मोठ्या अगत्यानें त्यास आमंत्रण करावयाचे ठरविलें आहे."

"भोगळवार काय लिहितात?"

"तुम्हाला तें पत्र दाखवावयाला हरकत नाही; पण स्वामीजींस मात्र दाखवितां कामा नये."

बापूराव भोगळवार याचे पत्र येणेप्रमाणे होते -

"वि. वि. स्वराज्यपक्षाच्या मंडळीपैकीं बरीचशी मंडळी प्रतिसहकारपक्षाला मिळतील तथापि बरीच मंडळी फुटूनहि निघतील. ब्राह्मणेतर पक्ष पुण्याकडे प्रतिसहकारपक्षाच्या विरुद्ध आहे. त्याचा ध्वनि नागपुरासहि उमटत आहे. लोकाना आशा पाहिजे एवढेच नव्हे तर ज्याप्रमाणे फलज्योतिष्यानें पुढचे भवितव्य चांगले आहे असे सांगितले म्हणजे व्यक्तीस आशा उत्पन्न होऊन जोर येतो त्याप्रमाणेच राजकारणातहि आहे हे जाणून आमचे भवितव्य उज्वल आहे असे सांगणारा आम्हांस भविष्यवादी हवा आहे. स्वामी ब्रह्मगिरि मोठे आशावादी आहेत हे ऐकून फार आनंद झाला. आमच्या पक्षाच्या राजकारणात त्याचा चांगला उपयोग होईल. इंग्रजी शिकलेला वर्ग प्रतिसहकारी वर्गास सामान्यत अनुकूल आहे पण गावांतला इतर सामान्य वर्ग या पक्षास अनुकूल नाही गावातले मिठाईवाले, परदेशी दुकानदार, कोष्टी ही सर्व मंडळी गांधाळलेली आहेत. त्यास राजकारण काही समजत नाहीं. आणि समजावून देता येणे शक्य नाही. त्याना धोपट धर्म पाहिजे. स्वराज्य मिळविणें सोपे आहे ते एका वर्षात मिळवून देतों, म्हणून थाप देऊन गांधींनीं एकदम फलज्योतिषावर ज्याचा विश्वास पटेल असा वर्ग आपलासा

करून घेतला तर तीच विद्या आपण गांधींच्या विरुद्ध वापरली पाहिजे असे तुम्ही ज्यांना फुसकुलीबहादर म्हणता ते नारायणराव अलकार म्हणतात. सामान्य वर्गावर सन्याशाच्या छाटीचे वजन फार पडते तर आपणास या छाटीवाल्याचा उपयोग करून घेतलाच पाहिजे तुम्ही स्वामी ब्रह्मगिरीस असे सांगा कीं, लोकांत आशा उत्पन्न करण्याचे ध्येय प्रतिसहकारवाद्याचे आहे आणि जरी पुण्यामुंबईत ते ध्येय स्पष्टपणे कळून चुकले नसले तरी नागपुरातील राजकारणी मंडळीचे ते ध्येय आहे; यासाठीं आमच्या चारपाच पुढाऱ्यांच्या सहीचे एक पत्र आम्ही त्यास पाठवीत आहो. त्यांनी प्रथमत: लोकमान्यांच्या गीतारहस्यावर व्याख्याने सुरू करावीत. सन्यासधर्मापेक्षा कर्ममार्गच श्रेयस्कर असे सन्याशाने सांगितले म्हणजे त्या म्हणण्याचे लोकांवर वजन पडेल. त्यांनी सन्यासमार्ग फार थोड्याकरतां आहे असे फार तर सांगावे. आणि कर्ममार्गाचे महत्त्व लोकांस पटवून द्यावे. त्यांच्या व्याख्यानानंतर कर्ममार्ग आणि प्रतियोगीसहकारमार्ग हे एकच कसे आहेत याचे लोकांपुढे स्पष्टीकरण करू. त्यांची व्याख्याने अनेक पेठांतून करवू. आमची खात्री आहे की, खादीचा मार्ग म्हणजे १। रुपायांत सत्यनारायण करून इहलोकी आणि परलोकी कल्याण होईल हे सांगण्याचा मार्ग आहे; दुसरे काही नाही. तुम्ही फारच थोडकी गोष्ट करा म्हणजे फल सपाटून प्राप्त होईल असे सांगण्याची गांधींची विद्या होती. आम्हांस तीच विद्या वापरावयाची आहे. आज लोकांस त्यांचे धार्मिक कर्तव्य म्हणून एवढेच सांगावयाचें आहे की, प्रतिसहकारपक्षाशी सहकारिता करणे, ती करणे म्हणजे स्वराज्याचें कवाड उघडणे आहे. स्वामी ब्रह्मगिरि जरी हे स्पष्टपणे सांगावयास स्वत: तयार नसले तरी हरकत नाही. किंबहुना त्यांनी राजकारणावर कांहीं बोलूहि नये. त्यांनीं नुसती कर्ममार्गाची प्रसंशा करणारीं तत्त्वे सांगावीत. भगवतापासून कर्ममार्ग कसा उत्पन्न झाला, तो लोकमान्यांनीं अधिक स्पष्ट कसा केला, आणि त्याचे आजचें स्वरूप प्रतिसहकारवाद हेच कर्म आहे हें आम्ही स्पष्ट करून सांगू स्वामीची रवानगी लवकर करा.''

सध्याकाळीं बॅरिस्टर सुतारे घरीं आल्यावर त्यांचे आणि ब्रह्मगिरींचे संभाषण झाले. आणि तुम्हास आपले कार्य दिसूं लागले आहे काय, व तुम्हांला आता लवकरच कामास लागलें पाहिजे इत्यादि गोष्टी निघाल्या, त्या संभाषणात बॅरिस्टरांचा मुख्य उद्देश असा होता कीं, आपण जे काम योजिले आहे ते काम करण्यास ब्रह्मगिरींस योजावे.

''हिंदुस्थानच्या सुधारणेसाठीं सर्वात मोठी गरज कोणती आहेसे तुम्हास वाटते?'' सुतार यानीं विचारले.

''मला असे वाटते, कीं हिंदुस्थानाची सर्वात मोठी गरज अध्यात्मिक आहे.''

''तुम्ही आपल्या धार्मिक भावना आमच्यावर दडपायला लागणार असे दिसते! तुम्हाला राजकीय अडचणी दिसतच नाहीत काय? इंग्रजांना दोषमुक्त करून देशी लोकांवरच आग पाखडण्याची क्रिया तुम्हीं हिंदुस्थान सोडले तेव्हा शिष्ट म्हणविणाऱ्या मंडळींत चालू होती, व राजकीय गोष्टींकडे लक्ष देऊन राजद्रोह पसरविण्याच्या पापापासून आम्ही मुक्त आहो, आमचें लक्ष अध्यात्मिक गोष्टींकडेसच आहे असे सांगण्याचा काही प्रार्थनासमाजिस्टांचा आणि लफंग्या व स्वार्थी मंडळींचा परिपाठ होता. तर तुम्ही त्याच कोटींतले आहात काय? तुमच्यामध्ये देशाभिमान तीव्र आहे असे मला वाटत होते!''

''माझ्या अंगी देशाभिमान आहे असें समजत असाल तर आपण चुकत आहांत, माझें हिंदुस्थानवर प्रेम आहे. हिंदुस्थानाविषयीं मला अभिमान वाटत नाहीं. हिंदुस्थानचा अभिमान

बाळगावयाचा म्हणजे काय? येथील सर्व गोष्टी चागल्या आहेत म्हणून सांगत बसावयाचें? येथील अस्वच्छ रहाणीचा, अशुद्ध पाण्याचा आणि मृत्यूच्या अधिक प्रमाणाचा अभिमान बाळगायचा काय? मला तर आपल्या लोकांचे दोषच दिसत आहेत आणि ते मला दाखवीत रहावे लागणार. आपल्या लोकाची स्थिति अभिमानास्पद नसून अनुकंपनीय आहे असे मला वाटतें."

"अभिमान म्हणजे अधता अशी आपण अभिमानाची कल्पना इतकी हलकी करूं नका. तुम्हीं हे सांगा की, तुम्हांला हिंदुस्थानविषयी आपलेपणा वाटतो कीं नाही?"

"आपलेपणा वाटतोच!"

"तर मी त्यालाच अभिमान म्हणतो!"

"तर आपलपणा वाटणे आणि राजकीय गोष्टींपेक्षां अध्यात्मिक गोष्टींना अधिक महत्त्व देणे यात विरुद्धता तुम्हीं कां कल्पिता. मी अध्यात्मिक म्हणजे मानासिक गोष्टींनां महत्त्व देतो म्हणून तुम्हीं हिंदुस्थानाविषयी अभिमानाचा म्हणजे तुमच्या अर्थानें आपलेपणाचा अभाव माझ्याठायी कां कल्पिता."

"राजकीय सुधारणापेक्षा सामाजिक किंवा धार्मिक सुधारणानां महत्त्व दणे म्हणजे स्वराज्याची मागणी दूर ढकलणे आहे."

"कोणती गोष्ट अगोदर करावी याविषयीं सर्व लोकाच्या पौर्वापर्याच्या कल्पना निरनिराळ्या असणार. मला राष्ट्राच्या मानासिक भावनेतच फेरफार घडवून आणावयाचे आहेत, त्यालाच मी अध्यात्मिक कार्य म्हणतो."

"तुम्हाला या कार्याचे महत्त्व का वाटतें?"

"मला महत्त्व वाटतें त्याचे मुख्य कारण एवढेच की, या कार्यात लोक फारसे नाहींत म्हणून. या कार्यात जर दुसरे लोक पडले असते तर मी या कार्याला महत्त्व दिले नसतें."

"तर तुम्ही कार्य कोणते करूं इच्छितां."

"मी लोकांस भावी स्थितीविषयीं आशायुक्त करूं इच्छितो!"

"आपणास याचेच महत्त्व कां वाटतें, आणि आपण या क्रियेस अध्यात्मिक सुधारणा हे नांव का देता?"

'मला असे वाटतें कीं, व्यक्तीस कार्यप्रवृत्त करण्यासाठीं दोन गोष्टी अवश्य आहेत· एक तर जी स्थिति आहे तीविषयीं व्यक्तीच्या मनांत असंतुष्टता उत्पन्न झाली पाहिजे, आणि ही असंतुष्टता उत्पन्न झाल्यानतर कार्यास प्रेरक होणारी आशा उत्पन्न झाली पाहिजे. सर्व प्रकारच्या सुधारणाच्या आधीं ही भावना उत्पन्न होणें अवश्य आहे. अस्तित्वात असलेल्या स्थितीविषयीं असंतुष्टता, आणि ती स्थिति आपण आपल्याच प्रयत्नानें दूर करूं ही आशा मनुष्याच्या मनांत जेव्हां जागृत होईल तेव्हा तो सामाजिक किंवा राजकीय सुधारणेच्या प्रयत्नास लागेल. राजकीय सुधारणा म्हणजे मी केवळ सामाजिक सुधारणाच साध्य करण्याचें यत्र समजतों, आणि या गोष्टी करणारे जे लोक समाजात उत्पन्न होतील ते समाजातले खरे मोठे पुरुष समजतो."

"तुम्हांस आशावाद जो उत्पन्न करावयाचा आहे तो केवळ आशावाद धरा म्हणून सांगून उत्पन्न करावयाचा आहे की काय!" सुतारे विचारतात.

"तसे करणें अगदींच अपुरे होईल. सामाजिक, राजकीय आणि आर्थिक या सर्व प्रकारच्या गोष्टी घेऊन त्यांत भवितव्य आशादायक कसें आहे हें दाखवावयाचे आहे. देशात सुशिक्षित आशावाद प्रसृत करणें हीच गोष्ट मला अत्यंत महत्त्वाची वाटू लागली आहे" अर्थात या त्यांच्या मतास ब्यारिस्टरानीं चांगलाच पाठिंबा दिला. पण "सुशिक्षित आशावाद" म्हणजे काय हें स्वामीजींस विचारलें तेव्हा स्वामीजी म्हणाले कीं "कांहीं तरी क्षुल्लक गोष्ट करून मोठें फल

अपेक्षिण्याची लोकांनां संवय लागली आहे ती संवय मोडली पाहिजे. म्हणजे सुताने स्वराज्य मिळेल किंवा प्रार्थनेने स्वराज्य मिळेल किंवा सरकारविरुद्ध सपाटुन ओरडण्याने स्वराज्य मिळेल अशी आशा दाखवून पैसा गोळा करणाऱ्या लबाड लोकांवरचा विश्वास नाहीसा होत चालला आहे ही गोष्ट मला आशावादी करिते. मेहनत करून आपली उन्नति साधली पाहिजे, हा परिश्रमाचा मार्ग लोकांपुढे मांडण्यास अनुकूल काल उत्पन्न झाला आहे. लोकाना हे कळले पाहिजे की, आपल्या उन्नतीसाठी आपणच विचार केला पाहिजे, नतर तो विचार अमलात आणण्यासाठी प्रयत्न आपणच केला पाहिजे, तो अमलात आणण्यासाठी शासनसस्थाची जी मदत मिळेल ती घेतली पाहिजे किंबहुना त्या उन्नतीची खटपट करण्याकडेसच सरकारच्या शक्तीचा उपयोग करून घेतला पाहिजे. लोकोपकारी कृत्ये करण्यात ज्या मानाने आपण प्रवीणता दाखवू त्या मानाने सरकारला आपल्याच तत्राने वागावे लागेल, नाही तर सरकार अप्रिय होत जाईल, आणि सरकारला अप्रियता नको आहे केवळ दडुकेशाहीने कोणतेच सरकार चालावयाचे नाही. लोकोपयोगी प्रत्येक गोष्टीचा सरकार फायदाच घेत जाईल. या तऱ्हेची भावना लोकात उत्पन्न केली पाहिजे.''

"तर तुमच्या कार्यास नागपूर हेच क्षेत्र सर्वात चागले आहे. नागपूरची मडळी तुम्हास बोलावीतच आहेत. त्यांचे विचार तुमच्या विचारासारखेच आहेत. यासच ते लोकमान्याचा कर्मयोग म्हणतात. त्याना एवढीच शका पडली होती की, तुम्ही पडला सन्यासी, तर तुम्ही कर्मयोगाचे महत्त्व कसे कबूल कराल!"

"मी असे म्हणतो की, सन्यास ही खरोखर आपलें कर्तव्य करण्यास साहाय्यक अशी स्थिति आहे दुसरे काही नाही." ब्रह्मगिरी म्हणाले.



"तर मग तुम्ही कर्मयोगी आहांत, गीतेचा अर्थ कर्मयोगपर आहे हे टिळकाचेहि म्हणणें आहे, तर मग तुम्ही गीतेवर व्याख्यान देण्यास म्हणून सुरवात करून आशेच्या भावनेने आपल्या श्रोत्यास भारून टाका. ते कार्य खरोखरच मोठें आहे. आपणास नागपूरकर मडळी त्याच कार्यासाठी बोलावीत आहेत."

दोन चार दिवसातच स्वामी ब्रह्मगिरींची नागपुरास रवानगी झाली.

---

## प्रकरण ५ वें.

## उद्योगमंदिराच्या आवारांत.

मिसेस हटर मदिराच्या विस्तीर्ण आवारांतच सध्याकाळची सहल करीत असत. ती सहल करण्याच्या निमित्ताने सर्व आवाराची सध्याकाळीं पहाणी होत असे. आज रोजी सध्याकाळीं त्या आपल्या कृतक कन्येबरोबर फिरत होत्या, आणि अनेक गोष्टीची चर्चा करीत होत्या. मिसेस हटर या हिंदुस्थानात आल्याला वीस वर्षे होऊन गेलीं असून सस्थेच्या स्थापनेलाहि २० वर्षे होत आली होती. त्यांच्या मनात आपल्या सस्थेच्या वीस वर्षाच्या पूर्णतेचा एक समारभ लवकरच करावयाचा होता आणि त्यासाठी त्या आपल्या अनुभवाचा आढावा घेत होत्या; आणि मुलीने जवळ जवळ आपल्या इतकीच वर्षे आपल्या सस्थेत घालविली असल्यामुळे तिच्या अनुभवाशी आणि तिच्या मनांत येणाऱ्या विचारांशी आपले विचार ताडून पहात होत्या. त्याच्या मनात आपली सस्था वाढीच्या दृष्टीने, बाहेरच्या जनतेवर या सस्थेच्या अस्तित्वाचा इष्टानिष्ट परिणाम जो काय झाला असेल त्या परिणामाच्या दृष्टीने, व त्याचप्रमाणें सस्थेतील स्त्रियांच्या मनावरच काय परिणाम झाला या दृष्टीने काय यश पावती झाली याचा आढावा घ्यावयाचा होता. आणि त्यांचे आपल्या मुलीशीं

जे संभाषण झाले त्यामुळे त्याच्या मनात काही अशी यशःप्राप्तीचा आनद उत्पन्न होत होता, तर नवीन उत्पन्न होणाऱ्या प्रश्नामुळे पुढची पायरी काय याविषयी विचार चालू होऊ लागले. काहीं अशी आपला प्रयत्न फलद्रूप झाला नाही असेहि त्यांस वाटत होते. त्याचे मुलीशीं जे सभाषण झाले त्याचे स्वरूप येणेप्रमाणे होते–

" आपल्या सस्थेचे काम कोणत्या दृष्टीने उपयुक्त झाले असे तुला वाटते? "

" काही बाबतीत बाहेरच्या स्त्रीपुरुषाचा आयुष्यक्रम सुखावह होण्यास आपली सस्था उपयोगी पडली असली पाहिजे. "

"बाहेरच्या जगाच्या आयुष्यक्रमावर काय फरक झालासे तुला वाटते?"

"स्त्री जाईल कोणीकडे, आपल्या बायकोला जसे वागवू तसे तिने निमूटपणे वागवून घेतले पाहिजे, आपण तिला घरातून घालवून दिले तर तिला दुसरीकडे कोठे थारा मिळणार नाही या कल्पनेने जे नवरे बायकोला वाईट रीतीने वागवीत असतील त्याच्या वागणुकीस आपल्या सस्थेच्या योगाने नियत्रण उत्पन्न झाले, ही गोष्ट तर आपण पाहिलीच आहे. तथापि नवऱ्याविरुद्ध स्त्रियाना जे सरक्षण मिळते त्यापेक्षा इतर आप्ता विरुद्ध विधवा स्त्रियाना जे सरक्षण मिळते ते अधिक महत्त्वाचे आहे."

"ते कसे काय?"

" नवरा वारला आणि त्याच्या बायकोपाशी स्वतत्रपणे रहाण्यास पैसे नसले म्हणजे ती बायको नवऱ्याच्या भावाची किंवा आपल्या भावाची फुकट काम करणारी मोलकरीण होते. किंबहुना तिला मोलकरीण न म्हणता गुलाम म्हटलेले अधिक शोभेल. जे लोक आपल्या विधवा भावजयीस छळतात, तेच लोक पगारी स्वैपाकिणीला आपल्या मर्जीप्रमाणे वागू देऊन वेळ निभवून घेतात. सुखवस्तु मध्यम वर्गातल्या विधवांनां दुसऱ्याकडे जाऊन स्वैपाकिणीची नोकरी करतां येत नाही. त्यानां लोकांच्या टीकेच्या भयाने स्वतत्रपणे राहता येत नाहीं, त्याना आप्ताच्या कडेच रहावे लागते. आणि तेथे त्याची स्थिति चोरटयासारखी असते. तर आपली सस्था ही त्या स्थितींतल्या स्त्रियानां मोठीच उपयोगी झाली आहे यांत शका नाहीं. "

"तर मग ही सस्था सर्व प्रकारे उपयुक्त झाली आहे असे तुला वाटते काय? मला तर आपलें ध्येय चागले साध्य झाले नाही म्हणून माझ्या मनात पुष्कळदा खिन्नता उत्पन्न होत आहे."

"स्त्रियाच्या सस्था घराची उणीव भरून कधींच काढू शकणार नाहींत. स्त्रियाना सस्थेत जन्मभर आयुष्य काढणे ही गोष्ट फार प्रिय होईल असे नाहीं जेव्हा स्त्रियास स्वतःचे घर नसेल आणि जेव्हा दुसऱ्याच्या घरीं दिवस काढावयाचे असतील तेव्हा त्या स्थितीपेक्षा आपल्या सस्थेसारख्या संस्थेत आयुष्य काढणे ही गोष्ट बरी वाटते पण घराची भूक सस्थेत रहाण्याने तृप्त कधींच होणार नाहीं."

" तू म्हणतेस हे बरोबर आहे, आणि यासाठीच आपल्या सस्थेस घराचे स्वरूप यावें म्हणून मी प्रयत्न देखील केला आहे. "

" तरी देखील स्त्रियांमध्ये सतुष्टता मला दिसून येत नाही, हिंदूच्या धर्मशास्त्रात चतुर्थाश्रम सांगितला आहे. तो स्वाभाविक आयुष्यक्रमाची ज्याची भूक शांत झाली आहे अशासाठीं सांगितला आहे. सस्थेतील आयुष्यक्रम मी कांहीं अशी त्याचप्रकारचा समजते, ज्या स्त्रियांची ससाराची भूक शात झाली आहे अशा स्त्रियानां हे सस्थेतील आयुष्य उपयोगी होईल. स्त्रियांचा एकत्र काम करणारा आणि एकत्र रहाणारा आणि इतर स्त्रियाची दुःखे दूर करण्यासाठीं उद्युक्त झालेला कायमचा संघ या तऱ्हेचे स्वरूप सस्थेला कधींच येणार नाहीं असे मला वाटते. "

"पण कांहीं अशीं येथें घराचे स्वरूप आहेच. येथील कांहीं स्त्रियांना मुले देखील आहेत."

"पण त्यामुळेच काहीं अनिष्ट परिणाम होत आहेत असे मला आढळून आले आहे. यासाठीं रस्ता चुकलेल्या स्त्रियाची आणि त्यातल्या त्यांत रस्ता चुकल्यामुळे मुले झालेल्या स्त्रियाची सस्था निराळी असावी आणि तरुण विधवाची सस्था निराळी असावी असें मला वाटतें. तरुण विधवांना जर पुढे लग्न करावेसे वाटले तर त्यास ते शक्य झालें पाहिजे."

"आपण त्यास आडकाठी कोठेच करीत नाहीं."

"पण त्यास आपण उत्तेजनहि देत नाहीं."

"कां बरे? तुलाच मी पुष्कळदां सांगितले की नाहीं की तुला तुझ्या नवऱ्याने टाकून दिले, व आप्तांनीं टाकून दिले. तू आपले नाव आणि धर्म बदलून ख्रिस्ती झालीस, आता तुला दुसरे लग्न करण्यास कोणतीच हरकत नाही. तू कुमारीच आहेस हेहि तुला समजावून देण्याचा मी प्रयत्न केला नाही काय? हिंदूतल्या किती विधवा इग्रजींत आपली सही "मिस्" अशी करून आपले माहेरचेच आडनाव लावून असतात."

"आई, तू माझी गोष्ट अगदीच सोडून दे, मी तुझ्याकडे येण्यापूर्वीचे आयुष्य मला एकदा स्वप्न वाटते तर एकदा सत्य वाटते, वाटेल त्या पुरुषावर प्रेम करण्यास माझे अंतःकरण मोकळे आहे असे मला वाटत नाही."

"तर मग या विधवासाठी काम केले पाहिजे असे तुला वाटते!"

"प्रथम मघाशी सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या स्त्रियांची ताटातूट केली पाहिजे असे मला वाटते."

"ते कां बरे; आणि तुला ताटातूट करून काय करावेसें वाटतें?"

"ही सस्था केवळ ज्या स्त्रियास अधर्मसंतति झाली असेल अशाच स्त्रियांची करावी. आणि दुसरे कोठे काम नाही म्हणून येथें काम करून रहाणाऱ्या स्त्रियांसाठीं किंवा रहाण्यास सोईस्कर दुसरी जागा नाही म्हणून ज्या स्त्रिया या सस्थेचा आश्रय करतात त्या स्त्रियांच्या करता दुसरीच सस्था करावी असे आता माझे मत होऊ लागले आहे."

"ते का? तस करण्याने एकदा मार्ग चुकलेल्या स्त्रियाना बहिष्कृतासारखे वागावे लागू नये हे तत्त्व बाजूला रहाते!"

"दोन्ही प्रकारच्या स्त्रियाच्या एकत्र रहाण्य ने दोहोवर बराच अनिष्ट परिणाम होतो असे मला वाटते."

"तो कोणता बरे? माझ्या लक्षांत तो आला नाही, पुरुषांनी फसविलेल्या विधवा अनीतिमार्गाचा "प्रोपागाडा" करतांना कोठे दिसत नाहींत; किंवा इतर स्त्रियाची अनीतीकडे प्रवृत्ति करण्याचा प्रयत्न करीत नाहीत."

"अधर्मसंततीच्या माता जरी दुर्विचाराचा प्रत्यक्ष प्रसार करीत नाहीत तरी देखील त्यांच्या सान्निध्याचे वाईट परिणाम होतातच सस्थेमध्ये काही काम करणाऱ्या स्त्रिया प्रथम सस्था सोडून गेल्या, त्या पुढे काही दिवस बाहेर कोणापाशीं राहिल्या, आणि नतर त्याना एक मूल झाल्यानतर आणि पुरुषांनी टाकून दिल्यानतर त्या आश्रमात परत आल्या अशा विधवाची एकदोन उदाहरणे गेल्याच साली झाली आहेत. त्याचाहि परिणाम इष्ट होण्याऐवजी अनिष्ट झाला, पुरुषानी फसविलेल्या आणि नतर टाकून दिलेल्या स्त्रियाना आश्रमात येऊ द्यावे म्हणून इतर स्त्रियाची मने वळविण्याचा प्रयत्न मीच केला नाही काय? पण आता मीच याच्या म्हणजे दोन्ही प्रकारच्या स्त्रियास एकत्र ठेवण्याच्या विरुद्ध झाले आहे. ज्या स्त्रिया वाईट मार्गात मुळीच गेलेल्या नाहीत त्याना जर एकदा फसलेल्या स्त्रियाबद्दल मत्सर उत्पन्न झाला, किंवा त्या फसलेल्या

स्त्रियांचीच स्थिति आपल्यापेक्षा चांगली आहे असें वाटावयास लागले तर मानवी समाजाच्या नैतिक दुर्गतीचे पहिले लक्षण उत्पन्न झाले असे मी समजतें.''

"एकदां फसलेल्या स्त्रिया चांगल्या तऱ्हेने वागणाऱ्या स्त्रियांचे मत्सरस्थान कशा होतील?''

"आज झाल्या आहेत हे खरे व आज स्थिति अशी झाली आहे की, लग्नाविरहित संतति झालेल्या स्त्रिया त्यांना मुले असल्यामुळे आश्रमातील इतर स्त्रियांचे करुणास्थान राहिल्या नसून मत्सरस्थान झाल्या आहेत.''

"मी काही स्त्रियांमध्ये एकमेकींविषयी मत्सर असलेला पाहिला, आणि त्यांपैकी एकीला मूल होते आणि एकीला नव्हते हेंहि पाहिले.''

"चांगल्या तऱ्हेने ज्या विधवांनी आयुष्य काढले आहे, त्या स्त्रियांना असे दिसते की, आपल्या संस्थेमध्ये तरी अधर्मसंतति असलेल्या स्त्रीस वाईट वागविले जात नाही तिच्या मुलाची आपण काळजी घेतोच त्यांना शिक्षण देतो, तर त्यांचे वाईट मार्गात गेल्याने नुकसान काय झाले आहे? या स्थितीचा परिणाम चांगल्या स्त्रियांवर अनिष्ट होतोच पण अधर्मसंतति असलेल्या स्त्रिया या प्रकारच्या स्थितीमुळे व दुसऱ्या एका कारणामुळे काही विशेष सनद मिळाल्यासारख्या वागू लागतात. बहुतेक चांगल्या आचरणाच्या विधवांना मुले नाहीत, आणि वाईट आचरण घडलेल्या बायकांना आहेत. व त्यामुळे ज्यांनां मुले आहेत त्यांनां आपल्या आयुष्याला काही तरी भवितव्य आहे असे वाटते, तसे इतर स्त्रियांस वाटत नाहीं मुले असलेल्या स्त्रियांच्या सान्निध्याने मुले नसलेल्या स्त्रिया खरोखरच दु:खी होतात, लेकुरवाळ्या बायकांची मुले जर दुसऱ्या स्त्रियांनी नुसती कुरवाळायला घेतलीं तर मुलांच्या आयांना फारसा आनंद होईनासा झाला आहे. त्यांना अशी भीति वाटते की, आपल्या मुलांना दुसऱ्या स्त्रियांचा लळा लागेल. ज्या चांगल्या तऱ्हेने आयुष्य क्रमणाऱ्या विधवा आहेत त्यांनां असे वाटते की जर आपल्यालाच मूल असते, तर आपण या बाईच्या मुलाकडे मुळींच लक्ष दिले नसतं आणि आपले वाकडे पाऊल पडून जरी आपणाला मूल झाले असते तरी या संस्थेत आपली स्थिति आज आहे त्यापेक्षा अधिक चांगली असती. या तऱ्हेचे विचार मनात येऊन चांगल्या स्त्रिया जर बिघडल्या तर त्यांत काही नवल नाही ''

"हे चांगल्या आचरणाऱ्या विधवांच्या मनाचे जे तू आविष्कारण करतेस ते खरे कशावरून? काही विधवांनी तसे स्पष्ट तुला बोलून दाखविले आहे काय, की तू त्यांचे मन केवळ आपल्या कल्पनेनेच सांगतेस?''

'यासंबंधाचा वादविवाद मोकळेपणाने दोघीचौघी जणींनीं केलेला मी पाहिला आहे, पण त्याबरोबर मी हेंहि कबूल करते की या तऱ्हेचे विचार माझ्या मनात त्यांनी बोलून दाखविण्यापूर्वीच उत्पन्न झाले होते ''

''तुझ्यासारख्या सुशील मुलींच्याहि मनांत जर हे विचार उत्पन्न झाले असतील तर मला त्याबद्दल अधिक गंभीरपणाने विचार केला पाहिजे. बरे, पण तुला आणखी विचारते की या संस्थेतील स्त्रियांना या संस्थेमुळे जे फायदे झाले त्यांविषयी सर्व स्त्रिया कृतज्ञ नाहीत काय?''

"त्या कृतज्ञ असतील व बाहेरच्या विधवांपेक्षा आपण चांगल्या स्थितीत आहोत ही त्यास जाणीवहि असेल, आणि त्या जाणीवेमुळे त्या आपल्या संस्थेस चिकटूनहि असतील, पण मी कृतज्ञतेविषयी विचारच करीत नाही. त्यांची कृतज्ञता मिळविणे ही गोष्ट महत्त्वाची नसून त्यांनां सुख प्राप्त होत आहे की नाही हे पहाणे आपले कर्तव्य आहे हेच तू मला सांगितले नाहीस काय? आपण काम करून उदरपोषण करतो, चांगल्या जागेत रहातो, चांगले कपडे वापरतो, याबद्दल

ज्या स्त्रिया संस्थेत शिरतात त्यास प्रथम जरी आनंद होतो, आणि ही स्थिति फार चांगली आहे असे जरी वाटते तरी तो आनंद फार दिवस टिकत नाही. जी रहाणी त्यास येथे मिळते ती अंगवळणी पडली म्हणजे तीत काही विशेष नाही असेच वाटू लागते. आपण स्त्रियाना टेनिस वगैरे खेळावयाची संधि दिली आहे, आणि गाणे, नाटके करण्यासहि उत्तेजन दिले आहे. गाणी म्हणावयाचीं तीं ईश्वरविषयकच म्हणावयाचीं हीहि सक्ति ठेवली नाही. तरी देखील त्यास आपले आयुष्य दुःखी आणि अपूर्ण वाटते. प्रेमविषयक गाणी आणि नाटके या गोष्टीमुळे जे प्रेमसुख येथील स्त्रियाना मिळाले नाही त्याचीच आकर्षकता त्यांच्यापुढे मांडली जात आहे."

"स्त्रियानी एकत्र काम करून सुखाने स्वतंत्र पणे रहावे आणि स्वतःची सांपत्तिक स्थिति सुधारून घ्यावी ही दृष्टि येथील स्त्रियामध्ये उत्पन्न होत नाही हे मला देखील दिसत आहे. ही संस्था वीस वर्षे आता चालू आहे पण या संस्थेत कायम राहणाऱ्या अगदी थोडया आहेत, जास्त कालपर्यंत रहाण्याचा मुशाफरखाना म्हणून काय तो या संस्थेचा स्त्रिया उपयोग करीत आहेत. माझ्या मनातील भावना इतर स्त्रियामध्ये उत्पन्न होत नाहीत, तर ज्याची जितपत सोय या संस्थेमुळे होते तितपत या संस्थेत स्त्रिया चिकटून राहतात. या वीस वर्षामध्ये तुझ्याशिवाय या संस्थेच्या खऱ्या आधारभूत सदस्या मला कोठे मिळाल्या ? हिंदुस्थान ही भूमि व्यक्तीच्या मनातील ध्येये चिरडून टाकील अशा प्रकारची आहे काय !" मिसेस हटर जराशा उद्वेगाने बोलल्या.

" मी या सर्व गोष्टीवर मत द्यावयास समर्थ नाही. आपण ही संस्था इंग्लंडमध्ये स्थापन केली असती तर तिला कायमच्या सदस्या कितपत मिळाल्या असत्या हा प्रश्नच आहे. हिंदुस्थानात तर असे दिसते की, आपल्या तऱ्हेची संस्था कायमच्या सदस्याची कधीच बनणार नाहीं. आणि तशी न बनविण्यातच समाजाचा फायदा आहे स्त्रियांचा जो आयुष्यक्रम आहे त्याऐवजी संस्थेत जन्म घालविण्याचा आयुष्यक्रम कोणी स्त्रिया पत्करणार नाहीत आणि तसे करण्यांत समाजाचा फायदाहि नाही तर स्वाभाविक आयुष्यक्रम जेव्हा दुःखकारक होतो तेव्हा तात्पुरती दुसऱ्या कोठे जाण्याची सोय असावी या दृष्टीनेच या संस्थेचा विकास झाला पाहिजे "

" मला एक प्रश्न उत्पन्न होतो तो हा की, ज्याप्रमाणे मला हे कार्य करण्यास प्रेरणा झाली तशी इतरास का होऊ नये? "

" मला असे वाटते कीं याचे सहज स्पष्टीकरण करता येईल. तुझ्या बाबतींत ही संस्था म्हणजेच संसार असे झाले आहे. इतराच्या बाबतात ती वृत्ति उत्पन्न होणे शक्य नाही. "

" का बरे? "

"एक तर जगांतील दुःख कमी करणे, अनीतीच कारण दुःख आहे ही जाणीव असणे, व दुःख व अनीति ही दोन्ही दूर करण्यास आपण समर्थ आहो असा विश्वास उत्पन्न होणे इतकी शिक्षणाने किंवा अनुभवाने दुसऱ्या कोणाच्या मनाची तयारी आहे? शिवाय ही संस्था तुला जितकी कुटुंबाप्रमाणे आहे, तितकी इतरास नाही. आम्ही सर्व मुली तुझ्यापेक्षा वयाने लहान आहोत आणि तू देखील आम्हास आपल्या मुलीप्रमाणेच समजतेस त्यामुळे आम्हा सर्वांचे पोषण करणे आम्हा सर्वांस आनंदी ठेवण्याचा प्रयत्न करणे, या सर्व प्रयत्नातच तुझी मातृत्वाची भूक शांत होत आहे तू जरी सर्व स्त्रियांचीं मुले खेळवावयाला नेतेस तरी त्याबद्दल त्या मुलांच्या आयाना दुःख होत नाहीं. त्या तुलाच आईसारखे समजतात आणि तू मुलांना घेतलेस म्हणजे मुलाना आजीबाईनेच घेतले असे वाटते."

" तुझे एकंदर विचार माझ्या लक्षात आले. आपण एकीच्या दोन संस्था करण्यासबंधाने पुन्हा केव्हा तरी विचार करू. "

———

प्रकरण ६ वें

## नागपूरच्या गाडींत

ब्रह्मगिरि नागपुरास जाण्यासाठी नागपूर मेल-मध्ये दुसऱ्या वर्गाने प्रवास करीत होते. कल्याणच्या स्टेशनावर त्यांच्या डब्यांत एक गृहस्थ नवीन येऊन बसले. आलेल्या गृहस्थाचे त्याच्या डब्यात बसलेल्या दुसऱ्या एका गृहस्थाकडे लक्ष गेले व त्यांनी "हॅलो! कोण, मोरे, तुम्हीहि परत चालला काय? मला वाटले की, तुम्हाला आणखी काहीं दिवस मुंबईस रहावयाचे असेल." असे शब्द उच्चारले.

"मुंबईस काहीं दिवस रहाण्याच्या तयारीने आलो होतो पण मुंबईला जास्त दिवस रहाण्याची आवश्यकता दिसली नाहीं, तेव्हा परत चाललो." मोऱ्यांनी उत्तर दिले.

कल्याणच्या स्टेशनावर डब्यात शिरलेल्या उतारूकडे स्वामी ब्रह्मगिरीचे लक्ष गेले. तेव्हा ते एकदम त्याच्याकडे वळून म्हणाले 'कोण, पर्वते!"

पर्वते ब्रह्मगिरीकडे निरखून पाहू लागले आणि म्हणाले, "चेहेरा ओळखीचा दिसतो; तुम्ही मि. ब्रह्मगिरी नाही काय? पण आता तुम्ही सन्याशाच्या पोषाखात आहात! काय, सन्यास घेतला आहे की लोकानी आपणास ओळखू नये म्हणून ही तजवीज आहे! बाकी तुम्ही खरोखर सन्यास घेतलेला असून साध्या पोषाखात हिंडता म्हणून मी लंडनला ऐकलेच होते."

"तुम्ही ऐकले होते ते बरोबर होते."

"आतां कोणीकडे चाललां?"

"नागपुरास."

"मलाहि तिकडेच जावयाचे आहे, हे आमचे स्नेही ब्यारिस्टर मोरे हे तेथील ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी आहेत.ते देखील तिकडेच जाणार आहेत."

मोरे स्वामीजीकडे वळून म्हणाले की, "ब्राह्मण पक्ष, किंवा ब्राह्मणेतर पक्ष या तऱ्हेच्या सर्व भावना व्यर्थ आहेत; आणि असले भेद करून भांडत बसणे हा सर्व मूर्खपणाच आहे असेच आपणास वाटते नाही?"

"आपल्यासारख्या सुशिक्षितास जर एखाद्या विशिष्ट पक्षास चिकटून काम करावेसे वाटते तर ती गोष्ट मूर्खपणाची खास नाही. जग हें नाटक आहे आणि या नाटकात काम करू इच्छिणारानें ज्या पात्राचे काम आपल्या वाट्यास येईल तें निमूटपणे केलेच पाहिजे. जर जगात रहावयाचे आहे, तर प्रत्येक मनुष्यास ज्या उपाधी असतात त्या नाकारून काय उपयोग!"

"तर मग मी विशिष्ट वर्गाचे हित वाढविण्यासाठी प्रयत्न करतो याबद्दल आपण मला वाईट म्हणत नाही?"

"अर्थात नाही."

"तर मग तुम्ही माझे हेतू आणि माझ्या भावना समजू शकाल, माझे मित्र हे विश्वामित्र पर्वते यांच्याशी माझा वारवार वाद होतो; ते म्हणतात की विशिष्ट जातीचे हितसंबध पहात बसण्याची ही वेळ नाही, सर्व जनतेचे हितसंबध अनेक बाबतींत एकच आहेत, ते सर्वसामान्य हितसंबध साधण्यासाठी सर्व सुशिक्षितांनी एकत्र झाले पाहिजे."

"पण हे तत्त्व तुम्हास अमान्य आहे काय?" ब्रह्मगिरि म्हणाले.

"अमान्य आहेहि, आणि नाहीहि. सामान्यत: पाहिले असता रा. पर्वते आणि मी अशा दोघाचे विचार अनेक प्रसगी म्हणजे शिक्षण वाढविण्यासाठी किंवा व्यापार वाढविण्यासाठी काय करावे या विषयावर एकसारखेच आहेत असे दिसेल; तथापि मला ब्राह्मणेतर वर्गाची वकीली केली पाहिजे अशी माझी खात्री झाली आहे. मी रा पर्वते यानां म्हणतो कीं, तुम्ही पुढारलेल्या वर्गाचे पुढारी बना. देशाच्या स्थितीविषयी

अनेक बाजूंनी पहाणारा त्यांच्यासारखा मनुष्य पुढारलेल्या वर्गाचा पुढारी बनला तर तो आम्हास हवाच आहे. पण ब्राह्मणसदृश वर्गाचा पक्ष निराळा असणे आणि ब्राह्मणेतराचा निराळा असणे या गोष्टीच त्यांना पसंत नाहीत."

"त्यांना काय पाहिजे आहे?" ब्रह्मगिरि विचारते झाले.

"त्यांना ब्राह्मण–ब्राह्मणेतरवाद किंवा त्यावर रचलेले पक्ष नकोच आहेत."

"आणि तुम्हाला?"

"पक्ष जातीच्या तत्त्वावर उभारलेले असण्यास कोणतीच हरकत दिसत नाही, यूरोपात जातीच्या तत्त्वावर पक्ष असणे ही गोष्ट चागली धरीत नाहीत, तेथे तसे पक्ष तरी देखील असतात हे मात्र खरे; माझे असे म्हणणे आहे की, अनेक व्यक्ती एकत्र जमा होतात त्या काही सामान्य हितसबधामुळे जमा होतात. पक्षाशिवाय अर्वाचीन प्रकारची राज्यव्यवस्था चालावयाची नाही हे मत विश्वमित्रास मान्य आहे, पण त्याचे मत असे आहे की हे पक्ष राजकारणाच्या किंवा अर्थशास्त्राच्या तत्त्वावर रचलेले असावेत; जातीवर रचलेले नसावेत."

"आणि तुम्हांला तसे वाटत नाही?"

"मी म्हणतो की जातीच्या तत्त्वावर पक्ष नसून दुसऱ्याच कसल्या तरी तत्त्वावर पक्ष आहेत असे सांगून जातीची भावना कायम ठेवणे यापेक्षां खरोखर जातीच्या तत्त्वावर पक्ष आहेत असे सरळ सागणे हे अधिक प्रामाणिक आहे."

"पण मी म्हणतो की सामाजिक किंवा राजकीय तत्त्वावर पक्ष रचून आंत जातीच्या तत्त्वावर कारवाई करणे ही क्रिया चांगली नाहीच, पण जातीच्या तत्त्वावर पक्ष असणे हेहि चागले नाही" विश्वमित्र म्हणाले.

"लोक स्वाभाविकपणे कोणत्या भावनेने जमा होतात हे पहाणे हें पक्षरचनेचे पहिलें तत्त्व होय; पक्ष म्हणजे सामुच्चयिक हिताकरतां जुळविलेली फौज ही लवकर कशी जुळेल हेच राजकारणात कारवाई करणाराने पाहिले पाहिजे. पक्षरचनेचें तत्त्व आपण लोकावर लादावयाचे की लोकाची स्वाभाविकपणे सघटना कशी होते, लोकांनां आपले कोणते हितसबध अगोदर दिसतात हे पाहून घटना करावयाची? मला वाटते कीं ज्या तत्त्वावर लोकसमूह आपल्याकडे जास्त येईल त्या तत्त्वावर सघटना केली पाहिजे."

"पक्ष कोणत्या तत्त्वावर तयार करावा याविषयी काही नैतिक विचार नाहीच काय?" विश्वमित्रानी विचारले.

"तुम्ही ज्यास नैतिक विचार म्हणतां तो केवळ भाषेचा फरक आहे असे मी समजतो. आपले हित साधणे हे पक्षांतल्या व्यक्तींचे कार्य असते, पुढारलेल्या जातींना ते कार्य साध्य होण्यासाठी अधिक तात्त्विक भाषा वापरता येते." मोरे म्हणाले

"पण तुम्हांला राजकारणात केवळ जातिस्वार्थ साधण्यापलीकडे कर्तव्य दिसत नाही काय?"

"ब्राह्मणेतर पक्षाचे धोरण सध्याच्या पुढाऱ्यांना व्यक्त करता येत असो अगर नसो, ते व्यक्त करण्यासाठीं लागणारी दरबारी भाषा आमची मडळी शिकली नाहीत. आमच्यापैकी कांहीं दरबारी भाषा वापरू शकतीलः; पण ती भाषा आमच्या पक्षातील सामान्य लोकास समजणार नाहीं. म्हणून आम्ही आपल्या इच्छा तुमच्यासारख्या दरबारी भाषेत बोलू इच्छीत नाही. पण आमच्या लोकानां काय पाहिजे ते समजत नाही असे नाही. अगदी सामान्य लोक आपल्या आकांक्षा अगदीं स्पष्टपणे जाणतात."

"पुढारलेल्या जातीच्या लोकानां तुमच्या गरजा समजत नाहीत असे तुमचे म्हणणे आहे काय?" पर्वते म्हणाले.

"पुढारलेल्या जातींनां मागसलेल्यांच्या गरजा पूर्णपणे कशा समजतील?" ब्रह्मगिरि म्हणाले

"पुढारलेला वर्ग आमच्याविषयी फारसा विचारच करीत नाही, राष्ट्र म्हणजे खरोखर आम्ही बहुसंख्याक लोक, म्हणजे कुणबा आणि महार, पण पुढारलेल्या जाती "राष्ट्र" म्हणजे ब्राह्मण अथवा "मध्यम वर्ग" समजतात." मोरे म्हणाले.

"आम्ही राष्ट्रीय हित कोणत्या गोष्टीत दुर्लक्षित होतो ते सांगा!" पर्वते म्हणाले

"तुम्हाला आमची आठवणच नव्हती. पुढारलेले वर्ग सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा हिंदुस्थानात व्हावी म्हणून मागत होते. ही आमची मागणी खरोखरच नव्हती. ही केवळ पुढारलेल्या लोकांची वर्गविशिष्ट मागणी होती ही खरोखर ब्राह्मणजातीची तरी मागणी कितपत होती याबद्दल शंका आहे. ही खेडयातल्या लोकांची मागणी नव्हतीच. गावांतल्या लोकांचीहि मागणी नव्हती. सिटी आणि क्याप यांच्यामध्ये असलेल्या वस्तीची ही मागणी होती."

"आम्ही तुमच्याकरता काहीच केले नाही काय? आम्ही ज्या सुधारणा व्हाव्यात म्हणून खटपट केली ती तुमच्याहि हिताची नव्हती काय?"

"कौन्सिले उत्पन्न व्हावी म्हणून पुढारलेल्या वर्गांनी खटपट केली. आम्ही त्याबद्दल आभारी आहो, पण आमच्यासारख्या मागसलेल्या लोकानां त्यांच्या गरजा पुढे मांडतां याव्यात म्हणून आम्हांस काही निश्चित प्रतिनिधी मिळावे अशी जी आमची खटपट होती तिला पुढारलेल्यांनी विरोधच केला." मोरे म्हणाले.

"पण जातिविशिष्ट प्रतिनिधी असावे हे तत्त्वच आम्हांस मान्य नसेल तर?" बॅ. पर्वते म्हणाले.

"आम्ही त्यास स्वार्थ लपविण्याची दरबारी भाषाच समजतो; आणि तुम्ही जर मोकळ्या मनाने विचार कराल तर वस्तुस्थिति तशीच आहे असे आढळून येईल. आपण आपल्या धंद्यात केस जिंकण्यासाठीं कायद्याच्या तत्त्वाच्या गोष्टी बोलत नाही काय? आम्हीं हे ओळखतो की, बहुजनसमाजापासून विवाहाने वियुक्त असलेले किंवा बहुजनसमाजाशी संघटन नसलेले लोक त्यांचे प्रतिनिधी होऊ शकत नाहीत."

"पण ब्राह्मणादि सुशिक्षित वर्गामध्ये सामाजिक बाबतींत उदार धोरण असलेला आम्हा लिबरल्सचा वर्ग बहुजनसमाजाच्या सामाजिक आकांक्षास अनुकूल आहे."

"पण त्या वर्गाचाहि मला विश्वास वाटत नाही. त्या वर्गाला आमच्या जनतेच्या अडचणी कळावयाच्याच नाहीत. गेल्या पिढीत सामाजिक सुधारणेचे स्तोम मोठे माजले होते, पण त्या काळच्या सुधारकांच्या मजलसीत सामान्य जनतेचे प्रश्न फारच थोडे पुढे आले. पुनर्विवाहाचे ठराव झाले, पण त्यावरून काय ठरते? त्यावरून एवढेच ठरते की, पुढारलेल्या जातींच्याच बायकांचा प्रश्न त्यांनी विचारासाठी घेतला. त्यावेळची हिंदुस्थानांत सिव्हिलसर्व्हिसची परीक्षा मागणारी कांग्रेस, आणि केवळ ब्राह्मण विधवांच्या पुनर्विवाहाविषयी चर्चा करणाऱ्या सुधारकांच्या मजलसी ह्या दोन्ही ब्राह्मणांच्या किंवा पुढारलेल्यांच्याच संस्था होत्या. हे वर्ग केवळ कारकुनीवजा धंदे करणारे होत; आणि या वर्गाचे एकदर जनतेत प्रमाण शेकडा पाचदहा असेल. हा वर्ग आपल्या वर्गाच्या गरजा किंवा आकांक्षा बोलणार आणि त्या राष्ट्रीय आहेत म्हणून सांगणार. हा चावटपणा बंद होण्यासाठी ब्राह्मणेतर पक्षाचा अवतार होणे आवश्यक होते. थोडक्यात सांगावयाचें म्हटल्यास आम्ही पुढारलेल्या कोणत्याच वर्गावर पूर्ण विश्वास ठेवावयास तयार नाही."

"आपण असे समजू की, पुढारलेले वर्गच कौन्सिलांत असते तर त्यांमार्फत तुमची उन्नति साध्य झाली नसती काय?"

"आमच्या वर्गाविषयी विचार करून त्या विचारांचे महत्त्व पुढारलेल्या वर्गास पटवून देऊन त्यांच्यामार्फत आपली उन्नति साध्य करून घेण्याचा प्रयत्न करणे हा द्राविडी प्राणायाम होय. पुढारलेल्या वर्गामार्फत आम्ही गोष्टी साध्य करून घ्याव्यात त्यापेक्षा प्रत्यक्ष इंग्रज अधिकाऱ्यास अर्ज करून कां साध्य करून घेऊ नयेत? केवळ मध्यस्थाची भिक्षुकी कायम राखावयाची एवढयासाठींच कां आम्ही आणि सरकार यांच्यामध्ये पुढारलेला वर्ग ठेवावयाचा? आमच्या हिताच्या गोष्टी साध्य करून घेण्याचा अधिकार आम्ही मिळविला पाहिजे आणि नंतर तो सर्व राष्ट्राच्या हितासाठी वापरला पाहिजे."

"ब्राह्मणेतराच्या उन्नतीस ब्राह्मणाची जरूर नाही काय?"

"कोणताहि मागासलेला वर्ग पुढारलेल्या वर्गाशी सहकारिता असल्याशिवाय, व त्याबरोबर स्पर्धाहि असल्याशिवाय सुधारणार नाही, पण आम्हास आमचे भवितव्य केवळ ब्राह्मणावर सोपवून चालावयाचेंहि नाही."

"तर मग तुम्ही ब्राह्मणाची सहकारिता कशा तऱ्हेची अपेक्षिता?"

"सामान्य जनतेचे सुख वाढावे यासाठी जो प्रयत्न लागतो तो प्रयत्न करण्यास ब्राह्मण वर्ग उपयोगी होणार नाही असे मी म्हणत नाही; उलट मी असेहि म्हणतो की, ब्राह्मणादि वर्गाने हें काम मनापासून अंगावर घेतल्यास ते चांगल्या तऱ्हेने पार पाडू शकतील, पण त्या वर्गाला ते काम करण्याची आवश्यकता वाटण्यास ते वर्ग सामान्य जनतेस म्हणजे ब्राह्मणेतर वर्गास जबाबदार झाले पाहिजेत. ब्राह्मणांमध्ये शिक्षणाचा प्रसार अधिक आहे, आणि त्याची रहाणीदेखील ब्राह्मणेतरांपेक्षा अधिक उच्च दर्जाची आहे आणि यामुळे त्यानीं हे काम मनापासून अंगावर घेतल्यास ब्राह्मणेतरांची रहाणी आणि शिक्षण ही दोन्ही अधिक उच्च दर्जास ते आणूं शकतील. पण त्याबरोबर हेंहि सांगतो कीं आमच्या लोकांचे कल्याण व्हावे, आपले शिक्षण वाढावे आणि आपली रहाणी अधिक आरोग्यकारक व्हावी यासाठी इंग्रज जर खटपटी करू लागले तर ते जास्त उपयुक्त होईल. मनुष्यास कोणत्या गोष्टी सुखाने रहाण्यास आवश्यक आहेत याविषयी इंग्रजाच्या अपेक्षा अधिक उच्च आहेत, व यासाठी इंग्रज घालवूनहि उपयोगी नाही, असेच माझे मत आहे. आणि यासाठी इंग्रज नोकरशाहीचे उच्चाटण करण्याविषयीं जो पुढारलेल्या जातीचा प्रयत्न आहे त्याविषयीं आम्ही—निदान मी तरी—अतःकरणपूर्वक उदासीन आहे."

बॅ. विश्वमित्र आणि बॅ. मोरे या दोघांमध्ये चालू असलेले संभाषण स्वामी ब्रह्मगिरी यांस बरेच मौजेचे वाटले; पण त्यांना ज्या प्रकारचे संभाषण पाहिजे होते त्या प्रकारचे संभाषण उत्पन्न होईल असा रंग दिसेना. बॅ. मोरे यांच्या संभाषणावरून केवळ अशिक्षित आणि शिवराळ अशा ब्राह्मणेतर चळवळयाहून सुशिक्षित ब्राह्मणेतर पुढारी कसा भिन्न असतो याची ब्रह्मगिरींस कल्पना आली, आणि आपण ज्या प्रकारचे संभाषण हा करू इच्छितो त्या प्रकारचे संभाषण हा करू शकेल असेहि वाटले.

ब्रह्मगिरींनी बॅ. मोरे यांच्याकडे वळून प्रश्नोत्तरांस सुरवात केली. ते म्हणाले की, "ब्राह्मणेतरांच्या जागृतीवर माझा विश्वास आहे, व त्यांची जागृति झाल्यापासून समाजाला कांही निश्चित फायदे होतील असे माझे मत आहे. उदाहरणार्थ जेव्हा ब्राह्मणेतर मंडळी धार्मिक गोष्टींविषयी चर्चा करू लागली तेव्हां त्यांनी स्वतंत्र विचार उत्पन्न केला. कर्ममार्ग बाजूला ठेवून ज्ञानमार्गाचे प्राधान्य उत्पन्न करण्याचे श्रेय जनकासारख्या ब्राह्मणेतरासच आहे. त्या वेळच्या ब्राह्मणाचे विचार यज्ञविषयकच होते, म्हणजे एकाच नळकांड्यांतून

वहात होते. आज जर ब्राह्मणेतर वर्ग सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय विषयावर विचार करू लागेल तर तो वर्ग नवीन विचार प्रसृत करील यात शंका नाही. तुमचे सामाजिक भवितव्याविषयी विचार काय आहेत? अशी कल्पना करा की, महाराष्ट्र हे एक राज्य आहे, त्याचे मुख्य दिवाण तुम्ही आहात, आणि तुम्हास बऱ्याच सुशिक्षित मराठयाना आपल्या कामाबद्दल जाब द्यावा लागणार आहे तर अशा प्रसंगी तुम्ही कोणकोणत्या गोष्टी कराल? "

" हा प्रश्न तुम्ही माझ्यापुढे एकदम टाकला आणि माझ्यावर नियंत्रण करणारी एक शक्ति तुम्ही जागृत आहे असे धरून मी काय करीन असे मला विचारता, त्या ऐवजीं मी जर अगदी स्वतंत्र असलो तर काय करीन हा प्रश्न मला विचारला तर मला उत्तर देणे सोपे होईल. "

" ते का बरे ? "

"कारण की, माझ्या मनातील विचार आजच सर्व मराठ्यास पटतील असे वाटत नाही."

" तर मग तुम्ही अगदी डिक्टेटर असला तर काय कराल ते सांगा? "

" पुष्कळच गोष्टी करीन, शिक्षणाकडे मी सगळ्यापेक्षा जास्त लक्ष देईन, पण शिक्षण याचा अर्थ मी व्यापक करतो, जे अनुभव सहज येत नाहीत ते मुद्दाम आणणे, ज्या गरजा नाहींत त्या उत्पन्न होणे यासारख्या गोष्टी देखील मी महत्वाच्या समजतो, आणि त्याचा लोकशिक्षणात अंतर्भाव करतों. "

" अशा तात्विक विचारापेक्षा तुम्ही काहीं गोष्टी निश्चयात्मक सांगाल तर बरे. "

" मी महाराष्ट्राचा आयुष्यक्रम अधिक उच्च तऱ्हेचा होईल, आणि लोकांस उच्च तऱ्हेच्या आयुष्यक्रमाची अभिरुचि उत्पन्न होईल असे प्रयत्न मी करीन. "

" ही भाषा देखील जरा गूढच होऊ लागली आहे. ही ब्राह्मणेतर भाषा नव्हे. "

"बरे आहे तर, मी अगदी सोप्या भाषेत सांगतो, आजची रहाणी अगदी पालटून जाईल असे केले पाहिजे. शेकडा नव्वद लोक घाणेरडया स्थितीतच रहातात. तर त्याची रहाणी स्वच्छ, सुंदर आणि गोडस केली पाहिजे."

" शेकडा नव्वद लोक अस्वच्छ! "

" हा, शेकडा नव्वद लोक घाणेरडया स्थितींत आहेत कदाचित शेकडा पंचाण्णवहि असतील. तुम्ही ब्राह्मण लोक शेकडा पाच आहात त्यातले देखील शेकडा २५।३० लोकाना स्वच्छतेने रहाणे म्हणजे काय हे समजत नाही असे तुम्ही कबूल करालसे वाटते. ब्राह्मणाप्रमाणे रहाणाऱ्या ब्राह्मणेतर लोकांची संख्या ब्राह्मणाच्या एकंदर संख्येइतकी देखील नाही—"

"बरे, शेकडा नव्वद-पंचाण्णव लोक अस्वच्छ तऱ्हेने रहातात, तर तुम्ही काय करणार? "

"गेली पिढी आम्हाला सुधारणे अशक्य आहे. पण नव्या पिढीची रहाणी सुधारणार, ही सुधारणा होण्यासाठी फारच मोठा खटाटोप करावा लागणार आहे."

"तो काय करणार? "

"मी सरकारवर मोठी जबाबदारी टाकीन. सरकारने स्वच्छ रहाणी तरुण पिढींत वाढविण्यासाठी सक्तीच्या शिक्षणाबरोबरच स्वच्छ रहाणी शिकविण्यासाठीं परिश्रम केले पाहिजेत. सर्व महाराष्ट्र म्हणजे एक कुटुंब आहे ही भावना लोकात वाढवीन; या मोठया कुटुंबाची इस्टेट वाढली पाहिजे म्हणजे प्रत्येक तालुक्याला एक इस्पितळ, धंदेशिक्षणाची शाळा इत्यादि गोष्टी पाहिजेत, रस्ते चांगले पाहिजेत, पार्क पाहिजेत, शहरे स्वच्छ झाली पाहिजेत, धुळीच्या योगाने ट्राकोमासारख्या रोगाची वाढ होते तर धूळ बंद केली पाहिजे, इलेक्ट्रिसिटीचा प्रचार वाढविला पाहिजे, लोकांना

रहाण्यास मुबलक जागा पाहिजे इत्यादि समाजाच्या गरजा लक्षात घेईन."

"पण या सर्व गोष्टी कशा करविणार?"

"मी सपाटून कर्ज काढवीन आणि उच्च रहाणी वाढविण्यासाठी घरे वाढविण्यास सुरवात करीन, आपल्याकडे बहुतेक लोकांची घरेच वाईट असतात. मांगाच्या झोपडया पाहिल्या तर कशी तरी रचलेली भिताडे आणि त्यावर घासलेटच्या टिनांचे पत्रे! महाराची स्थिति त्याहून बरी आहे, मराठे व ब्राह्मण यांची स्थिति या दोहोंहून बरी आहे पण एकंदरीत सर्वच लोकांस रहाण्यास जागा अपुरी असते आणि त्यामुळे स्वच्छतेची रहाणी ठेवण्यास व्यत्यय येतो, तर महाराष्ट्रामध्ये एक-दोन लाख घरे वाढविण्याची खटपट करीन."

"आणि ती करण्याला लागणारा पैसा कोठून आणणार?"

"पैसे म्हणजे परिश्रम, दुसरे काही नाही आज आठवडयांतून दोन–तीन दिवस मजूरवर्ग काम करतो त्याऐवजी त्याला सहा दिवस काम करावे लागेल एवढेच. आपल्याकडे लोक काम करीत असता त्यांच्या पोटास लागेल इतके धान्य आहे, दगड, माती, चुना, लाकूड इत्यादि वस्तू आपल्या देशांतच उत्पन्न होतात, तर राष्ट्राची स्थावर इस्टेट वाढविणे म्हणजे राष्ट्राला काम करण्यास–म्हणजे जमीनीपासून प्राप्त होणाऱ्या मालावर क्रिया करण्यास उत्तेजन देणे आहे, दुसरे काही नाही."

"बरे, मी मध्या शक्याशक्यतेच्या वादविवादात पडू इच्छीत नाही. जो मनुष्य एखादी सुधारणा करावयाची योजतो तो ती सुधारणा शक्य होण्याची खटपट करीलच इच्छेला व्यवहाराचे स्वरूप काय द्यावे एवढाच प्रश्न तो आहे आणि माझ्या दृष्टीने तो सोपा प्रश्न आहे. राष्ट्राची आत्मोन्नतीची इच्छाच जागृत कशी करावी हा मोठा प्रश्न आहे; मी तुम्हाला विचारतो की, तुम्ही दुसऱ्या कोणत्या गोष्टी करूं इच्छितां?"

"लिहिणे, वाचणे सार्वत्रिक करीन हे सांगायलाच नको. ते करण्यास साधने नाहीत ही सर्व ओरड लबाड दिवाणांची, लबाड नोकरशाहीची आणि लबाड जनतेची आहे. खरी गोष्ट अशी आहे की, शिक्षणप्रसाराची लोकांत इच्छाच नाही. मला सत्ता असती तर सार्वजनिक सक्तीचे मोफत शिक्षण देण्याचे काम मी करूनच दाखविले असते. अहो, देशावर परचक्र आलें म्हणजे कोटयवधि रुपये कर्ज काढता तर शिक्षणासाठीं कर्ज काढायला झाले काय?"

"आपण तेहि कबूल करू की, सध्याच्या लोकांना, त्यांच्या प्रतिनिधींना आणि सरकारी अधिकाऱ्यांना आस्था नाही. शिक्षणासाठी तुम्ही कर्ज देखील काढाल हेहि कबूल करू; दुसरें काय कराल?"

"मी यापेक्षाहि दुसऱ्या गोष्टी सांगू शकेन. पण त्या डीटेल्सच्या आहेत. उदाहरणार्थ, मी असा प्रयत्न करीन की शिक्षकांत यूरोपिअन स्त्रीशिक्षकांचा वर्ग वाढवावा, म्हणजे आपली रहाणी उच्च तऱ्हेची करावी या कार्याची जोपासना त्या अधिक करू शकतील. तसेच बायस्काउटिंग सर्वत्र देशांतलें सरकारी खाते म्हणून करवीन. करायला कोणत्या गोष्टी हव्यात याविषयी अधिकार हाती आल्यानंतरच मनुष्य विशेष विचार करू लागतो!"

"पण तुमच्या हाती अधिकार देण्यात समाजाचा अधिक फायदा आहे हे समाजास पटावे लागते."

"मध्या एवढेच सांगता येईल की महाराष्ट्र हें मोठे कुटुंब धरून त्याचे सुख कसे वाढवितां येईल हे मी पहात जाईन. कुटुंबातल्या मंडळींचें सौख्य पहावयाचे म्हणजे त्यांना जितक्या गोष्टी जास्त मिळतील तितके पहावयाचे ते तर मी

पाहीनच, पण महाराष्ट्र हा अनेक धंदे करणारा एक मोठा कारखाना आहे अशी कल्पना करून या कारखान्यातून जास्त माल कसा निघेल हेहि पाहीन."

"ही देखील तात्त्विक भाषाच झाली, तत्त्वाच्या ऐवजी उपमा आली एवढेच!"

"तर मग मी हे सांगतो की, विशिष्ट कल्पनांचा उत्पादक मी नाही, जी कल्पना निघेल ती हितकर कितपत आहे या दृष्टीने प्रत्येक कल्पनेचा मी स्वीकार किंवा नाकार करीन. आणि मला जरी कल्पना फार नसल्या तरी दुसऱ्या लोकांपाशी तरी कल्पना असतीलच, त्या माझ्याच आहेत. मी कोणत्या वृत्तीने राष्ट्राच्या सुखाकडे पाहीन हेच आपणास सांगितले."

"तुमच्यापाशी जर देशाच्या फायद्याच्या विशिष्ट कल्पना नाहीत तर मग लोकांनी अधिकारदानास तुम्हालाच पसंत कां करावे?"

"ब्राह्मणांपेक्षा सामाजिक सुधारणेच्या नेतृत्वास माझ्यासारखा ब्राह्मणेतरच अधिक लायक आहे असे मी समजतो, माझे कित्येक जवळचे आप्त शेतावर काम करणारे मजूर आहेत तर कित्येक गवंड्याच्या हाताखाली दगड—माती आणून देणारे मजूर आहेत त्यांच्याविषयी मला जो आपलेपणा वाटतो तो ब्राह्मणास आज तरी वाटणे शक्य नाही, त्या मजूरांचे कल्याण ते माझे कल्याण ही भावना मला वाटते. त्या मजूरापेक्षा महार मजुराचा आयुष्यक्रम अधिक वाईट आहे असे मला वाटत नाही, किंबहुना ते लोक निराळे आहेत असेच वाटत नाही. विटाळाच्या कल्पना माझ्या मनातून इंग्लंडला गेल्यामुळे नाहीशाच झाल्या आहेत. "आपले लोक" असे शब्द म्हटले म्हणजे ब्राह्मणाच्या मनात गरीब कारकून येतात. आपल्या लोकांची सुधारणा म्हणजे मी मजुरांची सुधारणा समजतो, आणि यावरून मला असे वाटते की राजकीय कार्यक्षेत्रात ब्राह्मणाचे महत्त्व नाहीसे होऊन ब्राह्मणेतरांचे महत्त्व वाढावे."

"तुमच्या सर्व समाजासंबंधाच्या महत्त्वाकांक्षा बऱ्याच व्यापक आहेत हे पाहून मात्र आनंद झाला, आणि या विचारास कृतीमध्ये स्थान देण्यासाठी जर सर्व राज्यतंत्र ब्राह्मणेतरांच्या हाती गेले तर मला त्यात आनंद वाटेल. तुमच्या विचारास ब्राह्मणेतरांची कितपत सहानुभूति आहे?"

"अहो, अडचण तर तेथेच आहे; या तऱ्हेचा कार्यक्रम आज ब्राह्मणेतरास बिलकुल पटत नाही. ते मला मनोराज्य करणारा समजतात; ब्राह्मणेतरांची आज दृष्टि एवढीच आहे की कर वाढू नयेत, जो कर उत्पन्न होणार आहे त्याचा मिळतो त्यापेक्षा अधिक फायदा ब्राह्मणेतरास मिळावा. सध्याचा ब्राह्मणेतर पक्ष सर्व जनतेचा प्रतिनिधि नाही. तर ब्राह्मणेतरांपैकी जे चार अक्षरे शिकलेले लोक आहेत त्यांचाच प्रतिनिधि आहे. आणि तेवढ्या लोकांच्याच आकांक्षा तो बोलतो."

"तुम्ही कोणाचे प्रतिनिधि आहात?"

"मी कोणाचाच प्रतिनिधि नाही सामान्य कुणब्यास माझ्या मनातल्या गोष्टीच मला समजावून सांगता येत नाहीत. मला असे वाटते की माझ्या हाती सत्ता यावी, आणि मी ती सर्व जनतेच्या हितासाठी चालवावी, त्यांच्या मताने चालवावी असे नव्हे."

इतक्यात विश्वामित्र म्हणाले की "तुमच्या आमच्या या बाबतीत कल्पना किती तरी जुळतात. तर आपण दोघेहि मनोराज्य करणारे आहोत. मी, जातिविशिष्ट गोष्टीवर पक्ष रचलेले नसावेत, सुधारणांसाठी पक्ष असावेत हें म्हणतो त्याचे बीज तरी हेच आहे."

"असो, तुमच्या दोघांच्या मनातले विचार मला कळले नागपूरला आपण गेल्यानंतर पुन्हां भेटू आणि पुन्हा चर्चा करू" असे म्हणून भगवद्गीतेचे पुस्तक उघडून स्वामी ब्रह्मगिरींनीं गादीवर आपली पाठ टेकली.

---

## प्रकरण ७ वें.
## विश्वमित्र आणि विहंगमा.

ब्यारिस्टर विश्वमित्र याचे वडील सर दामोदरराव यांचा लोकांच्या दृष्टीने आयुष्यक्रम मोठा यशस्वी दिसत असे. प्रथमत. वकीलीत पैसे मिळविले, सार्वजनिक पुढारी म्हणून त्यांनी मान्यता मिळविली, पुढे हिंदुस्थानातील मनुष्यास शक्य इतकी मोठा सरकारी अधिकाराचा जागा मिळविली इतके जरी झाले तरी त्याच आयुष्य अपूर्ण राहिले असे त्यासच वाटत होते. का की, आयुष्याची पूर्णता आपल्या मुलाना नीट मार्गाला लावून दिल्याने होते, त्या शिवाय होत नाही असे त्यास वाटे. व विश्वमित्रास उत्कर्षाच्या रस्त्यावर आपण अजून आणले नाही असे त्यास वाटे. सुशिक्षितांनी नेहमी "सरकारी नोकरी मिळविण्यासाठी धडपड करण्यात अर्थ नाही, महाराष्ट्रीयानी व्यापारात शिरले पाहिजे" इत्यादि व्याख्याने त्यानी दिली होती, पण त्याना आपल्या मुलाला शिक्षण देण्याची जेव्हा संधि आली तेव्हा त्याला आपल्या धद्यात घालावे. नाही तर सरकारी नोकरीत घालण्याची आपण खटपट केली पाहिजे असेच वाटले. व त्याचा मुलगा विश्वमित्र जसजसा मोठा होऊ लागला तसतसे त्याचे मन व बोलणे बदलू लागले. त्यानी वकीलीत मिळविला तितका पैसा व्यापारांतहि मिळणार नाही असे त्यास वाटे, किंवा व्यापारात मुलाला जाण्यासाठी त्याला मार्ग दाखविण्याची आपल्यालाच अक्कल नाही, तर आपण केवळ परोपदेश करण्यात पांडित्य दाखवीत होतो म्हणजे आपण जे पूर्वी बोलत होतो ते वेड्यासारखे बोलत होतो इत्यादि गोष्टी मनांत येऊन आपण आपले आयुष्य आपल्या तत्त्वाप्रमाणे चालविण्यास आपण असमर्थ ठरलो इत्यादि गोष्टीची जाणीव त्यास होत असावी, का की, त्यानी पुढे पुढे तरुण मंडळींनी काय करावे या विषयावर व्याख्याने देण्याचे अजीबात सोडून दिले होते.

सरकारी नोकरीत जर मुलगा जावयाचा असेल तर तो आय्. सी. एस्. झाला पाहिजे; नाही तर सरकारी नोकरीतहि अर्थ नाही हे मात्र त्यास पक्के वाटे. यामुळे मुलाने आय्. सी. एस्. व्हावे ही इच्छा मात्र त्याच्या मनात प्रबळ होती.

इंग्रज मंडळीचे महत्त्व त्यांच्या इंग्रजपणामुळे असावयाचेच, तरी हिंदूतील जी मंडळी आय्. सी. एस्. होत त्याचे देखील महत्त्व दामोदररावाना आपल्या वकीलीच्या काळात एकसारखे भासत होते. आय्. सी. एस् वाल्यांच्या श्रेष्ठतम जातीत आपल्या मुलाचा शिरकाव व्हावा ही इच्छा त्याचा मुलगा मोठा होऊ लागला तेव्हा त्यांच्या मनात तीव्र होऊ लागली. आय्. सी. एस् झालेल्या मंडळींना लग्नाच्या बाजारात किती किंमत असते याची जाणीव सर दामोदररावाना फार चांगली होती. आणि जोपर्यंत महाराष्ट्रीय ब्राह्मणामध्ये एखाद-दुसराच आय्. सी. एस्. होता तोपर्यंत त्याचे महत्त्व नोकरीपेशाच्या महाराष्ट्रीय ब्राह्मणसमाजात किती होते याची कल्पना असलेली मंडळी आज बरीचशी हयात आहेत. ती मंडळी सर दामोदररावाच्या फिकीरीची यथार्थता सहज ओळखू शकतील. दामोदररावाचे एक स्नेही—जे पुढे त्यांचे व्याही झाले, ते—सरकारी नोकरीमध्ये खालच्या जागेपासून वाढलेले होते आणि स्मॉलकॉज कोर्टाचे जज्ज आणि रावबहादुर झाले होते. त्यांच्या थोरल्या मुलीचे एका आय्. सी. एस्. बरोबर लग्न झाले लग्नाच्या दुसऱ्या दिवशी वधूवराचा फोटो काढून घेण्यात आला तेव्हा सासऱ्याने अशी स्वाभाविक इच्छा दर्शविली की जावयाने आपला फोटो सासूसासऱ्याबरोबरहि काढून घ्यावा. पण जांवयाने तसे करण्याचे साफ नाकारले. जांवई म्हणाला की "अनकॉव्हेनांटेड सर्व्हिस" च्या मंडळीबरोबर मी फोटो काढून घेऊ इच्छीत नाही. माझा फोटो जर अनकॉव्हेनांटेड सर्व्हिसमधल्या

मंडळीबरोबर दिसला तर माझ्याबरोबरचे दुसरे यूरोपीयन अधिकारी काय म्हणतील? ते तर इंग्रज जातीच्या पण हिंदुस्थानात वाढलेल्या मुलीबरोबर लग्न देखील लावावयाचे नाकारतात! मला खालच्या वर्गातल्या मुलीबरोबर लग्न लावावे लागले; ही गोष्ट नाइलाजास्तव पत्करणे भागच आहे. पण तेवढ्यासाठी मुलीचे सर्व गणगोत माझ्या दर्जाचे आहे हे मी कसे कबूल करू? मी मुलीशी लग्न लावले आहे, तिच्या कुटुंबाबरोबर लग्न लावले नाहीं. हे त्या आय्. सी. एस्. चे गोतविसरू व जातविसरू बोलणे ऐकून काही मंडळींना राग आला, पण काही मंडळींना ते अगदी रास्त वाटले, का की, नोकरीवाल्या मंडळींपैकी अशी अनेक मंडळी होती की, ती सरकारने दिलेल्या दर्जा-प्रमाणे मनुष्याने आपले इतर संबंध ठेवून आपल्या म्हणजे सरकारने दिलेल्या दर्जाचे महत्त्व राखले पाहिजे असे समजणारी होती. या मंडळीमुळे जे वातावरण समाजात उत्पन्न झाले होते, त्या वातावरणाचा परिणाम सर दामोदररावांच्या मना-वर झाला असल्यास नवल ते काय? रावबहादु-राचा त्याच्या जावयाने केलेला अपमान पाहून काही लोकांना तर आनंदहि झाला. का की, त्या मुलीच्या लग्नाच्या मागे थोडासा इतिहास होता. या रावबहादुरांनी आपली मुलगी एका तरुण वकीलास देऊ केली होती, व ती मुलगा पत्क-रण्याबद्दल १५०० रुपये हुंडाहि कबूल केला होता. पण पुढे त्याच्या ओळखीचा दुसरा एक तरुण एकदम ई ए सी झाला तेव्हा त्यांनी कांही तरी खुसपट काढून ते लग्न मोडले आणि त्या तरुण ई. ए. सी पाशी आपल्या मुलीचे लग्न जुळविले. तथापि लग्न जुळल्यानंतर आणि लग्नाची तारीख ठरल्यानंतर एक तरुण आय्. सी एस् होऊन परत आला तो त्यांच्या एका स्नेह्याचा आप्त होता, आणि त्या आय् सी. एस् ला जितकी मोठी मुलगी मिळेल तेवढी पाहिजे आहे, हुंडा फारसा पडणार नाही, असे कळतांच त्यांनी आय्. सी. एस्. बरोबर आपल्या उपवर कन्येचे लग्न जुळ-विले. व ई ए सी (एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर, मुंबई इलाख्यातील डेप्युटी कलेक्टरच्या दर्जाचा मनुष्य) बरोबर ठरविलेले लग्न जणू काय आप-णांस ठाऊकच नाही असे दाखविले. या सर्व गोष्टी त्यावेळेस नागपुरात घरोघर चर्चेचा विषय झाला होता आणि त्यामुळे जेव्हा रावबहादुराचा, त्याच्या जावयाने हलक्या पदवीचे इसम म्हणून अपमान केला, तेव्हा ते ऐकून राग येण्यापेक्षां इतर लोकास आनंदच झाला. दामोदरपंतांना त्या आय्. सी. एस्. चा राग आला व जेव्हा विश्वमित्राचे लग्न त्या रावबहादुराच्या धाकट्या मुलीशी म्हणजे विहंगमेशी झाले तेव्हा त्यास असे वाटले की, आपल्या मुलाने आय्. सी. एस्. तर व्हावेच पण उलट आपल्या मंडळीत अत्यंत सम-तेच्या भावाने मिसळून व आपले सौजन्य पदोपदीं दाखवून आपल्या थोरल्या साडूस लाजवावे. परंतु व्याह्याच्या पहिल्या जावयास आपल्या मुलाच्या चांगुलपणाचे वर्तन दाखवून टोमणे देण्याचे सौख्य सर दामोदररावाच्या नशीबीं नव्हते. मुलगा इंग्लंड-मध्ये शिकावयास गेला पण आय् सी. एस्. च्या अभ्यासक्रमाकडे लक्ष देण्याचे त्याने नाकारले. अर्थात मुलाने आय् सी. एस्. च्या परीक्षेस बसण्याचे नाव टाकल्याने सर दामोदररावाची मोठी निराशा झाली असेल यात नवल ते काय? मुलगा इंग्लंडला गेला, ब्यारिस्टर झाला, केंब्रिजमध्ये आपल्या आवडत्या विषयाचा त्याने चांगला अभ्यास केला तरी सर दामोदररावाची इच्छा पूर्ण झाली नाही. आपल्या मुलाला वशील्याने मोठी नोकरी लावून द्यावी हे मात्र त्यांच्या मनात आले नाही; आणि तसे न येण्यास कारणेहि होतीं. राजकार-णांत एक तऱ्हेचे सातत्य असते. तसे कौटुंबिक आयुष्यक्रमातहि राखले पाहिजे ही भावना दामोदर-रावांत होती. देशामध्ये ज्या अनिष्ट गोष्टी असतात

त्यांच्याशी लढतां लढतां एका पिढीचे लोक म्हातारे झाले आणि त्यानी शासनसस्था लोकमतास अधिकाधिक जबाबदार करून ठवल्या. आता पुढच्या पिढीतील तरुणानी आपल्या आयुष्याची माडणी करावयाची किंवा उदयाम यावयाचे ते आपल्या लायकीवर व कर्तृत्वावरच आले पाहिजे असे दामोदरराव म्हणत त्याना असे वाटे की, आपण वशीले लावून नोकरी मिळविणे इत्यादि गोष्टीविरुद्ध लढलो, त्या मार्गाने आपल्या मुलास महत्त्वाच्या जागी पोचवावयाचे नाहीच.पण आपण आणि आपल्या पदवीचे इतर गृहस्थ यानी आपले कौटुबिक महत्त्व कसे राखावयाचे? आपण व्यापारी नाही की,आपण आपला व्यापार आपल्या मुलाच्या स्वाधीन करू. मुलाला बापाचे पक्षकार मिळतीलच असे कोठे आहे? वकीली, डॉक्टरकी यांसारख्या सुशिक्षित धद्यात पडलेल्या मडळीच्या घराण्याचे महत्त्व रहावे तरी कसे? आपण समाजांत एक अत्यत शिष्ट गृहस्थ म्हणून वावरू शकलो पण आपल्या मुलाला महत्त्वाच्या जागेवर कसें जातां येईल? तो सिव्हिलसर्व्हिसच्या परीक्षेस बसलाच नाही. आपण आपल्या वशील्याने जर त्याला कोठे चिकटवावा तर तेहि शक्य नाहीं मुलगा हिंदुस्थानात आय्. सी. एस्. झाल्याशिवाय आला तर येथे आता त्यास "सर्व्हिस"चे तोड पहाणेहि योग्य होणार नाही. येथे मिळाली तर प्राव्हिन्शिअल मिळणार. प्राव्हिन्शिअलसर्व्हिस पत्करली तर सामाजिक दुय्यमता आलीच. कोठे सस्थानांत चिकटवावा तर तेहि फारसे हितावह नाही. का की, सस्थानातल्या नोकरीस एकदर महत्त्व कमी. हजार रुपयांवरच्या जागा क्वचितच, आणि त्या पटकवावयाच्या म्हणजे अनेक हलकट गोष्टी करावयास तयार असले पाहिजे. मुलाने ब्यारिस्टरी सुरू कली आहे पण त्याचे धद्याकडे असावे तितके लक्ष नाही. त्या धद्याचा तर त्याला फारच कटाळा दिसतो. राजकरणांत तो शिरू इच्छितो पण त्यात शिरणाऱ्याने कोट बाजूला काढून ठेवून आणि अस्तन्या मारून घाणीत हात भरवावयाच्या तयारीने शिरले पाहिजे. पण ती देखील त्याच्या मनाची तयारी दिसत नाही. तर आपल्या मुलाचे भवितव्य काय असावे इत्यादि विचार सर दामोदररावाच्या मनात घोळत असत

प्राव्हिन्शिअल सर्व्हिसमध्ये दुय्यमता किती तीव्र स्वरूपाची येते याची दामोदरपंतांस चागलीच माहिती होती. प्राव्हिन्शिअल सर्व्हिसला "पराया सर्व्हिस" हे शब्द लावण्यांत येत असत. पण त्याचे उत्पादकत्व हिदुस्थानी सिव्हिलसर्व्हटाकडे नव्हते. हे शब्द दुसऱ्या लोकांकडूनच लावण्यात आले होते, ते लावण्यामध्ये कॉंग्रेसवाल्या मडळीनी पूर्वीच्या काळात पुढाकार घेतला होता, पण इडियन सिव्हिलसर्व्हिसमधल्या हिदु मडळीनी ते शब्द उचलले होते एवढेच.त्यावेळेस ते फक्त आपापसांत बोलत असतां ते शब्द वापरीत, पण प्राव्हिन्शिअलच्या मडळीच्या नजरेस ते शब्द येऊ न देण्याची खबरदारी घेत. प्राव्हिन्शिअल सर्व्हिसची किंवा सबार्डिनेट सर्व्हिसची मडळी भेटली असता मनुष्यधर्माप्रमाणे हिदु सिव्हिलियन लोकांनां सभ्यतेनें वागावेच लागे. पण आपसात बोलतांना त्यांच्या पदवीसबधाने तुच्छतेचे शब्द नेहमी वापरले जात "अस्सल" मराठा ज्याप्रमाणे कडूंसंबधाने बोलतो किंवा बोलत नसला तरी मनांत भावना ठेवतो, किंवा हिदुस्थानांत नवीन आलेली इग्रज मडळी "सी. बी." म्हणजे "कट्री बॉर्न" म्हणजे हिदुस्थानातच जन्मलेल्या इग्रज लोकांसबधाने जशी तुच्छतेची भावना मनांत बाळगतात, त्याप्रमाणे वरच्या श्रेणीतल्या या नोकरांना खालच्या श्रेणीतल्या नोकरांविषयी तिटकारा वाटे, आणि तीच आत्मगौरवाची भावना ते आपल्या बायकांच्या मनांत भरवून देत. आपल्या बायकांनी इतर

स्त्रियाशी उद्धट व्हावे असेच केवळ पुरुष मडळींना वाटत नसे, तथापि आपला मोठेपणा आपल्या बायकोच्या मनात ठसावा आणि आपण आणि गावातील शिष्ट मडळी म्हणजे डेप्युटी कलेक्टर, रावबहादूर असलेले वकील इत्यादि मडळी या दोहोतील महदतर म्हणजे आपले महत्त्व आपल्या बायकोच्या लक्षात यावे किंवा मनात ठसावे अशी त्या बड्या नोकरीवाल्या लोकांची देखील इच्छा असे. ही स्थिति लढाई सुरू व्हायच्या काळापर्यंत होती, तथापि आपली आय्. सी. एस्. झालेली मडळी वाढू लागली तसतशी जराशी कमी झाली; आणि पुढे जेव्हां आय्. सी. एस्. वाले ज्या लोकाचा तिरस्कार करीत त्यातलीच मडळी कौन्सिलमेंबर व मिनिस्टर किंवा एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर होऊ लागली तेव्हा बरीचशी कमी झाली, पण सुधारणा अमलात येण्याच्या अव्वल काळात बरीचशी होतीच.

विश्वमित्र हिंदुस्थानात आल्याला दोन-अडीच वर्षे झाली होती. सर दामोदररावानी काही दिवस त्याला स्वस्थपणे बसूं दिले आणि नतर विश्वमित्र प्रॅक्टिसहि करू लागला. तरी देखील त्याच्या मनात आपल्या मुलाचे भवितव्य काय याविषयी काळजी नेहमी घोळत असे.

मुलगा आता प्रॅक्टिस करू लागला, बऱ्या प्रकारे बोलणारा आहे, पण त्याला आयुष्यदिशा पाहिजे. ती दिशा लावण्याच्या बाबतीत आपल्या मुलाला आज आपणास काय मदत करता येईल याविषयी सर दामोदर पर्वते याच्या मनात अनेक कल्पना येत असत, आणि त्यासबधाचे कोडे त्यांस सुटत नसे. आपण सामान्य शिक्षण मिळवून वकील झालो, पुढे सार्वजनिक कार्यात पडणारे म्हणून लोकापुढे येऊ लागलो आणि शेवटी सरकारने आपणास उचलून धरून आज मोठ्या पदवीला आणले आहे, आपण एक सामान्य मास्तरचे चिरंजीव असून जर या स्थितीपर्यंत येऊ शकलो तर आपल्या चिरंजीवांनी या स्थितीत प्रारंभ करून कोणत्या तरी अधिक उच्च स्थली पोचावयास नको काय? निदान त्याने आपल्या इतकी तरी उच उडी मारावयास नको काय? त्याला राजकारणाची गोडी आहे तीहि वाईट नाही. त्याला राजकारणात पडून कौन्सिलात शिरून आपल्याप्रमाणेच मिनिस्टर किंवा एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलरपर्यंत जाऊन भिडता येईल. आणि यासाठी आपणास त्याला कोणत्या रीतीने मदत करता येईल असा विचार ते करीत. आपल्या मुलाने आपल्यापेक्षा मोठे कसे व्हावे हाहि प्रश्न त्याच्या मनांत येई पण हा प्रश्न सोडविण्याचा कठीणपणा केवळ मुलाच्या लायकीमुळे उत्पन्न होत नसून त्याच्या कल्पनेच्या मर्यादेमुळे उत्पन्न होत होता. आपण चढलो त्यापेक्षां आपल्या मुलास उच्च पदवी खरोखर कोणती शक्य आहे? आपण अर्धा-पाऊण लाख रुपये दरसाल पगार मिळवितो; इग्लडमधल्या मत्र्यांना देखील याच्यापेक्षा जास्त पगार कोठे असतो, आपण सर झालो, इग्लडमधल्या प्रसिद्धीस आलेल्या लोकापैकी बहुतेक लोक 'सर'च होतात, ब्यारोनेट देखील होणारे लोक थोडे; तर आता आपल्याला मिळवावयाचे तरी राहिले आहे काय? अशा प्रकारच्या कल्पनाहि अधुकपणाने सर दामोदररावांच्या मनात येत असत. त्याच्या मनात केव्हा कोणत्या कल्पना येतील याचा नेम नसे. त्याना एकदा आपण कृतकृत्य झालो असे वाटे तर एकदा आपले आयुष्य फुकट गेले असे वाटे. आपल्याच आयुष्याविषयी ही विचारभिन्नता त्याच्या मानसिक स्थितीवर अवलबून असे. देशास स्वतत्र करण्याच्या चळवळीशी काही वर्षांपूर्वी आपली किती तीव्र सहानुभूति होती याची सर दामोदररावाना आठवण नव्हती असे नाही. पण त्यास पुढे असेहि वाटू लागले की, स्वातंत्र्यस्थापनेसाठी झालेला सर्व प्रयत्न वेडेपणाचा होता. लोकांनी काही जरी चळवळ केली तरी ब्रिटिश

सत्ता झुगारून देणे शक्य होणार नाही, तर मग आपण विनाकारण तसल्या भानगडींत पडा कशाला! त्यांतल्या त्यांत त्यांना असेहि दिसून आले की जे लोक आपणास कट्टे देशभक्त आणि इंग्रजी राज्याचे शत्रू म्हणून म्हणवीत ते लोक बहुतेक अजाण किंवा लुच्चे आहेत, व त्यांपैकी बरेच जरा तोंडावर तुकडा टाकताच वाटेल तसे बदलणारे आहेत; आणि त्याच्या हातून कोणतीहि गोष्ट नेटाने पार पडणार नाही, तर अशा लोकांशी संगति उगाच कशाला करा? असे अनेक विचार मनांत येऊन त्याच्या आयुष्याला निराळे वळण लागले. सर दामोदररावाच्या उत्कर्षामुळे ज्यांना दुःख वाटत होते, ती मंडळी सर दामोदररावास सरकारचा तोडपुजा म्हणून वगैरे दूषणे देत, पण सर दामोदररावांविषयी न्यायबुद्धि धरून हें सांगितले पाहिजे की,त्यांनीं आपले काम प्रामाणिकपणाने केले. जेव्हा त्याची योजना सरकारने म्हणजे प्राताधिकाऱ्याने रद्द केली असेल तेव्हा त्यानी नोकरी सोडली नाही असा कित्येक मंडळी त्यास दोष देत असत; आणि प्रत्येक स्वतंत्र देशांतल्या मंत्रिमंडळांत प्रत्येक मंत्र्यास आपले मत बाजूला ठेवून मुख्य मंत्र्याच्या इच्छेपुढे कसे नमावें लागते याची जणू काय आपणास जाणीवच नाही असे ते टीकाकार दाखवीत. जे लोक सर दामोदररावांवर कठोर टीका करणारे होते तेच त्यांच्या भाग्यशाली आयुष्यक्रमाबद्दल मत्सर बाळगणारे होते. कित्येक अशी टीका करीत की आम्हीं सरकारवर अधिक जोराने टीका केली आणि अधिक चळवळ केली पण तीपासून होणारा फायदा मात्र आम्हांस न मिळतां या "चोरा"ला मिळाला आहे. दामोदररावांशी समकालीन असलेले ज्वलज्जहाल सर दामोदररावांनां आयतोबा समजत व दुसऱ्याच्या राजकीय परिश्रमामुळे ज्याची खरी किफायत झाली अशी व्यक्ति समजत. आणि आतां सर दामोदरराव आपल्या मुलाची वर्णी सरकारांत कशी लावून घेतात हे इतर मंडळी डोळ्यांत तेल घालून पहात होती. येणेप्रमाणे विश्वमित्राच्या भवितव्याविषयी विचार केवळ त्याचा बापच करीत होता असे नाही, तर गावातले इतर लोकहि करीत होते. आणि सर दामोदररावाच्या विरुद्ध असलेल्या नागपूर वऱ्हाडच्याच लोकानी आपल्या कल्पनेत त्याचे भवितव्य इतके स्पष्ट आखून ठेवले होते की, विश्वमित्रास जणू काय यासंबंधाचा विचार करण्याचे कारणच नाही. मुलाला देशविषयक किंवा आपल्या भावी कार्यक्रमासंबंधाने विचार नव्हते असे नाही. उलट इंग्लंडमध्ये राहिल्यामुळे देशाच्या उणीवा इतक्या दिसून येत होत्या की तितक्या त्याच्या बापाला दिसून येणे शक्य नव्हते. बाप इंग्लंडमध्ये एकदां जाऊन आला होता एवढेच. अर्वाचीन जगावर कोणत्या शक्ती कार्य करीत आहेत, त्या शक्तीपुढे सरकारहि केवळ कसे दुर्बल आहे, या गोष्टी त्यास त्यांच्या विदेशगमनाने कधीच कळल्या नाहीत. ते इंग्लंडमध्ये गेले तेव्हा जे लोक इंग्लंडमध्ये जाऊन आले असतील त्यांच्याकडे लोकांनी हे निराळ्या कोटीतले मनुष्य या दृष्टीने पहावे असा तो काळ होता. मुलाला मात्र जगच निराळे दिसत होते. त्याला हे ठाऊक होते की सरकार हे प्रचारक कधीच होऊं शकत नाही, जेव्हां एखाद्या गोष्टीचें महत्त्व लोकानां पटते आणि लोकांकडून त्या गोष्टीची मागणी होते तेव्हाच सरकार नवीन कार्यक्रमाचा स्वीकार करते तर ज्याच्या मनांत सरकारवर कांही परिणाम घडवावयाचा असेल त्या मनुष्याने नोकर कधीच बनता कामा नये. त्याने स्वतंत्र राहिलें पाहिजे, आणि सरकारच्या चांगुलपणाच्या कृत्याबद्दल सरकारास शाबासकी देण्यास, वाईट कृत्याबद्दल सरकारला दोष देण्यास, नवीन सूचना सुचाविण्यास तयार बनले पाहिजे सरकारच्या एकदर हेतूबद्दलच सर दामोदरराव आणि त्यांचे

चिरंजीव याच्यामध्ये दृष्टिभिन्नता होती. सर दामोदररावाच्या मनांत सरकारविषयीं प्रारंभापासून चांगले मत नव्हते. लहानपणी त्यांना असे वाटे की सरकारचे हेतूच दुष्ट आहेत; लोकांस अधिकाधिक नि:सत्व करावे एवढेच सरकारचे धोरण आहे. हे त्यांचे विचार आयुष्याच्या उत्तरकालापर्यंत गेले नाहीत.

सर दामोदरराव यास पूर्ववयात सरकारच्या सर्वच गोष्टी वाईट दिसत होत्या असे नाही. चांगल्या गोष्टीहि दिसत, पण त्यात सरकारचा लोककल्याणपर हेतु मात्र त्यास दिसत नसे. रेलवे वगैरे गोष्टीस सरकारने उत्तेजन दिले, पोस्टपद्धति उत्तम केली, यासारख्या गोष्टी खरोखर सरकारने आपल्या फायद्याकरता केल्या; आणि लोकांना जो फायदा झाला असेल तो केवळ गाड्याबरोबर नळ्याला यात्रा या दृष्टीने होय. सरकारने देशातील दंगेधोपे बंद केले याचे कारण सरकारचा वसूल बिघडतो म्हणून होय. सरकारची निव्वळ लोककल्याणाची अशी खाती तरी कोणती आहेत म्हणून ते पृच्छा करीत. पोलीस खाते म्हणजे निव्वळ सरकारचा दंडुका लोकांस दाखवून त्यास चूप ठेवणारे खाते, आणि कस्टम्स, एक्साईज हीं तर केवळ पैसेकाढू खातीं. पोस्ट खाते आणि टेलिग्राफ हे तर पैसे मिळविण्याचे सरकारी धंदे आहेत. ते धंदे सरकारने बरे केले तर त्यात लोककल्याणाची इच्छा कारणीभूत झाली असे कसें म्हणता येईल? कोर्ट व वकीलपद्धति हीं ठीक आहेत, आमच्या मध्यम वर्गास पोट भरण्यास ही साधने आहेत, पण यात सरकारचा हेतु काय ? तर स्वत:स परिचित असलेली न्यायपद्धति इकडे आणणे आणि मध्यमवर्गास खूष करणे हाच, दुसरा काहीं नाहीं. मेडिकल खाते असल्याशिवाय इतक्या सिव्हिल सर्जनांचे पोट कसे भरेल? आणि प्रत्येक इंग्रज नोकरास उत्तम प्रकारचा इंग्रज डॉक्टर हिंदुस्थानच्या खर्चाने मिळविण्याची ही युक्ति नाही काय ? जी काहीं लोककल्याणाची गोष्ट सरकारकडून होई तीत सर दामोदररावांना सरकारचा हेतु असा दिसे की, असल्या गोष्टी केल्याने लोकांनी खूष व्हावे; त्यांना ब्रिटिश राज्य आवडू लागावे व त्यांची स्वातंत्र्याची इच्छा नष्ट व्हावी. याप्रमाणे त्यांच्या मनात सरकारविषयी पूर्णपणे अविश्वास असे. असे असून देखील ते सरकारशी सहकारिता करीत. ही गोष्ट कशी होई याचेहि दामोदररावास ओळखणाऱ्या पुष्कळांना कोडे पडे. पण त्यात कोडे काही एक नव्हते. तत्त्वे काही असली तरी रोजचा कार्यक्रम रोजच्या गरजांनी व रोजच्या स्पर्धांनी चालत असतो. आपण सरकारशी सहकारिता केली नाही तर दुसरे लोक करतील आणि ते पुढे येतील; ही दृष्टि उपेक्षिण्याजोगी नव्हती. आपण कोकणस्थ ब्राह्मण आहो आणि इंग्रजांनी राज्य घेतलें तें कोकणस्थ ब्राह्मणापासून हिसकावून घेतले हे सर दामोदरराव कधीच विसरले नाहीत. इंग्रज आपला शत्रु आहे हीच भावना लहानपणापासून त्यांच्या मनात जागृत होती पण ती पुढे नाहीशी झाली. आणि तिचे कारण एवढेच कीं त्यास युद्ध करून देशाला स्वतंत्र करण्याची आशाच दिसेना. देशाला स्वातंत्र्य म्हणजे इंग्लंडपासून वियुक्तता मिळविण्याची त्यास शक्यताच दिसेना, त्या अर्थी आहे ते राज्य लोकोपयुक्त करण्यास काय हरकत आहे असे त्यास वाटे. जेव्हा ते एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर झाले आणि जेव्हा कौन्सिलमध्ये त्यांची इंग्रज अधिकाऱ्याबरोबर अनेक गोष्टींवर चर्चा होऊ लागली तेव्हा मात्र त्यास असे वाटू लागले कीं नित्यक्रमाच्या अनेक गोष्टीत सरकारचे वाईट हेतू नसतात. हिंदुस्थानाची चोरी करून इंग्रज जातीचे खिसे भरण्यास सरकार कधी कधी उत्तेजन देत असेल पण ते वैयक्तिक अधिकाऱ्यामुळे असले पाहिजे. ते सरकारचे धोरण म्हणून नाही.

विश्वामित्र हा हिंदुस्थानांतले इटरमिजिएटपर्यंतचे शिक्षण आटोपून पुढे इंग्लंडला जाऊन आक्स्फर्ड येथील अभ्यासक्रम आटपून हिंदुस्थानांत परत आला होता. त्याने सिव्हिलसर्व्हिसमध्ये शिरावे म्हणून सर दामोदररावाची इच्छा होती. पण ती पूर्ण झाली नाही. मुलानेच सिव्हिलसर्व्हिसमध्ये जाण्याचे नाकारलं, मुलाला दुसऱ्या अनेक गोष्टींची गोडी लागली आहे, त्याचे अधिकाराच्या जागेवर कसे जाऊन बसावे इकडे लक्ष नाही, विश्वमित्र हिंदुस्थानात आल्यावर देखील त्याची ही मनोवृत्ति दामोदररावास आवडली नाही. इंग्लंडमध्ये विश्वमित्राचे आयुष्य मोठ्या सुखाने गेले, चागले जेवण, चागली राहण्याची जागा, चागली नाटके, अनेक खेळ, अनेक सुशिक्षित मंडळीशी सहवास या सर्व गोष्टींची त्याला इतकी आवड उत्पन्न झाली की, अगोदर इंग्लंड सोडून हिंदुस्थानास जावेसे त्यास वाटेना. आणि हिंदुस्थानांत जावयाचे झाले तर आपण अनेक लगामानी जखडलेल्या तट्टू बनण्यापेक्षा आपण वाटेल तिकडे जाणारा आणि वाटेल ते करणारा मनुष्य राहिले पाहिजे असे त्यास वाटत होते प्रवासामुळे त्याची महत्त्वाकाक्षा केवळ महाराष्ट्रीय राहली नाही. विश्वमित्र हा सर दामोदररावाचा मुलगा होता, आक्फर्ड येथे अभ्यास केलेला आणि तेथे अनेक मित्र जोडलेला होता. बापाच्या मोठेपणामुळे अनेक किताबवाल्या मडळीमध्ये त्याच्या ओळखी झाल्या होत्या. त्याचे उच्च व मध्यम वर्गातले काही इंग्लिश मित्र निरनिराळ्या सरकारी कामात तर कित्येक देशसुधारक सामाजिक कार्यात, तर कित्येक वर्तमानपत्राचे उपसंपादक म्हणून संपादकीय धंद्यात गुतलेले होते. आपण सिव्हिलसर्व्हंट म्हणून हिंदुस्थानात नोकरीत गुतलो तर केवळ सरकारसाठी चमर्ली करण्यामध्ये आपण गुतू, आणि ते काम तर आपल्या मनाजोगे नाही असे त्यास वाटल्यामुळे त्याने सिव्हिलसर्व्हिसला बसण्याचेच साफ नाकारले, आणि त्यामुळे बापाची बरीच निराशा झाली. बाप स्वत जरी वकीलीच्या धंद्यांत पुढे आला आणि सिव्हिलसर्व्हिसच्या मडळीपैकी फारच थोडयांना ज्या पदवीला चढतां येतें त्या पदवीला जाऊन बसला तरी मुलाने जेव्हा आय्. सी. एस्. ला बसावयाचे नाही असे ठरविले त्या वेळेपर्यंतहि ते एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर झालेले नव्हते व त्यामुळे सिव्हिलसर्व्हिसच्या मडळीचे नेहमी महत्त्व त्याच्या डोळयापुढे चकाकत होते. एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर होईपर्यंत सर दामोदरराव वकील होते आणि तोपर्यंत साधारण मुन्सिफापुढे त्यास " युअर आनर " म्हणून बोलत जावें लागे, आणि मुन्सिफ सबजज्ज व आडिशनल डिस्ट्रिक्ट जज्ज ही त्यांची नेहमीची भेटण्याची मडळी, आणि ती तर सिव्हिलसर्व्हिसच्या मडळीला देव समजत, आणि त्यामुळे आपल्या मुलाला सिव्हिलसर्व्हिसचे महत्त्व वाटत नाही असे न वाटता असे वाटे की, मुलाला पास होण्यासाठी जो नेटाने अभ्यास करावा लागतो तितक्या नेटाने अभ्यास करण्याची हिंमतच नाही. आणि त्यामुळे मुलाच्या भवितव्याविषयी त्याचे मन मोठे साशक झाले होते, व आपल्या मुलाचे पुढे कसे होईल अशी विवंचना उत्पन्न झाली होती. ती मुलगा देऊन बॅरिस्टरी करू लागला तरी गेली नाही. ब्यारिस्टर म्हणून मुलाने नांवलौकिकास यावें व पुढे कौन्सिलात जावे हा कार्यक्रम कांही वाईट नाही. पण ते तरी कोठे होत आहे. ब्यारिस्टरीकडे देखील आपल्या मुलाचे फारसे लक्ष नाही. तो अनेक मासिकांतून लेख लिहिण्याकडेच लक्ष देत आहे हे पाहून सर दामोदररावांस वाईटच वाटत होते का की, लेखक या नात्याने प्राप्ति तरी काय होणार! अनेक मासिककार आणि पत्रकार विश्वमित्राच्या लेखासाठी आतुरतेने मागणी करीत, पण ते लेख विश्वमित्राने फुकट लिहावेत अशी त्यांची मागणी असे, आणि जरी मासिककारानें

पैसे दिले तरी तो किती देणार. मासिकेंच लेखकांचे लेख फुकट घेऊन उत्पन्न व खर्च यांची कशी-बशी तोडमिळवणी करीत. त्याना त्यातल्या त्यात आनंदाची एक गोष्ट वाटत होती कीं, विश्वमित्र कवि नाही. तो कवि झाला तर जगांतील वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करील व कल्पनासृष्टीत विहार करू लागेल आणि त्यामुळे भिकेला लागेल लेखक या नात्याने पुढे येण्याची विश्वमित्राची तयारी होती अशांतला भाग नाही. लेखक या नात्याने उपजीविका करणे विश्वमित्रास शक्य वाटत होते, तथापि तो जीवनक्रम त्यास नको होता. लेख लिहिण्यावर उपजीविका अजीबाद होत नाही असे नाहीं. अनेक इंग्रजी दैनिके लेखासाठी पैसे देतात, पण त्याना कसले लेख हवे असणार—केवळ बातमीचे. टेनिस टूर्नमेंट झाली तर ती चांगली वर्णन केली पाहिजे, क्रिकेटचा सामना युद्धाची रूपके लावून वर्णन करता आला पाहिजे. कोर्टातले खटले वर्तमानपत्रकाराकडे पाठविले पाहिजेत, कोठें बक्षीससमारंभ झाला, कोठें व्याख्यान झाले, कोठे संस्थानात दरबार झाला तर त्याचे अहवाल पाठवावयाचे. हीच या धंद्यातली मुख्य कामें होत. सामान्य क्षुल्लक अशा गोष्टींवर लेख लिहून कालम भरल्यास पैसे मिळतील, का कीं, वाचकास तेच हवें असते. वाचक किंवा श्रोता काय म्हणतो, माझी करमणूक करीत असाल तर मी ऐकण्यासाठीं उभा रहावयास तयार आहे पण मला जर उपदेश करणार असाल तर मी पळ काढतो. लेखक या नात्याने पैसे मिळावयाचेच झाले तर ते इंग्रजपत्रकारच देतील; देशी पत्रे देणार नाहीत. विश्वमित्र जर त्या इंग्रजी पत्राच्या संपादकास म्हणेल की, मी राजकीय विषयांवर लेख लिहितो आणि ते तुम्ही घ्या, तर ते घेऊन विश्वमित्राची जाहिरात करून त्याबद्दल विश्वमित्रासच पैसे द्यावयास तयार असा मूर्ख पत्रकार कोणता आहे? वर्तमानपत्राच्या आफीसात दुय्यम संपादकाच्या जागेवर काम करावयाचे म्हणजे विश्वमित्रासारख्या तरुण मनुष्यास आपले विचार पसरवावयाची संधि मुळींच मिळणार नाहीं हें विश्वमित्र जाणून होता. लेखकाच्या धंद्यांत पडल्यास त्याचा सर्व वेळ कोठे फुटबॉलचें वर्णन करण्यांत जाणार, किंवा प्रांताधिकारी दौऱ्यावर निघाला म्हणजे त्याच्या पाठोपाठ आपण आपल्या मोटरसायकलवर हिंडून प्रांताधिकाऱ्याच्या दौऱ्याचीं वर्णने लिहीत बसावे लागणार. याप्रकारचें लेखकाच्या धंद्याचे आजचे स्वरूप आहे. सर दामोदररावासहि या गोष्टीची जाणीव होती. ते एकदा पुण्यास असता तेथील एक तरुण इंग्रज याप्रकारें बऱ्या प्रकारची उपजीविका करीत होता हे त्यानी पाहिले होते. व या पद्धतीने जरी उपजीविका बऱ्या प्रकारची होईल तरी त्या प्रकारची उपजीविका आपल्या मुलाची नसावी असे त्यास वाटल्यास त्यात नवल नाही. अर्थात लेखक या धंद्याकडे जरी आपल्या मुलाचे लक्ष आहे तरी या धंद्यात फारसा द्रव्यांश नाही आणि या धंद्याचें खरे पहाता महत्त्वहि नाहीं असे सर दामोदररावांस वाटत होते. यामुळे या धंद्यांत मुलाने पडू नये म्हणून त्याचे मन वळविण्याचा प्रयत्नहि केला. या संबंधाचे बापलेकाचे जेव्हा बोलणे झालें तेव्हां मुलाने बापास सांगितले की, मी जे कांही लिहितों ते लेखकाचा धंदा पत्करावा म्हणून नाही, तर माझ्या मनात जे विचार आहेत ते लिहून काढावेत म्हणून मी लिहितो आणि मला लिहिण्याला प्रवृत्ति व्हावी म्हणून मी ते लेख छापायला पाठवितो. ते लेख छापले गेले म्हणजे मला आणखी लेख लिहिण्याला प्रवृत्ति होते. लेखकाचा धंदा मी करूच इच्छीत नाहीं.

विश्वमित्राची इंडियन व सिव्हिल इंडियन मेडिकल सार्व्हिसेस मधल्या नोकरांविषयी जी वृत्ति होती ती पुष्कळ लोकांस समजण्यासारखी नव्हती. तो त्या लोकांना सामान्य नागरिकांपेक्षां पदवीनें किंवा देशासाठीं कार्य करण्याच्या शक्तीच्या दृष्टीनें कमी योग्यतेचे समजे. त्यांनां शिक्षण चांगलें

असलें तर त्यांचें शिक्षणामुळें महत्त्व. पण सिव्हिल सर्व्हिसची मंडळी वस्तुत. काय आहेत? ते केवळ, वसुली कारकून आहेत; आणि जमीनदार आपला वसूल चागला होण्यासाठीं काही दादागिरी करणारी मडळी वसुली कारकुनाच्या हाती ठेवतो त्याप्रमाणेच या वसुलीकारकुनास म्याजिस्ट्रेटीचे अधिकार दिले आहेत. यापलीकडे त्याची किमत काय आहे, अशी तो पृच्छा करी. राज्यकारभाराचे मुख्य भाग दोन; धोरण ठरविणे आणि ठरल्या नियमाप्रमाणे कारभार करणे. यात धोरण ठरविणाऱ्या लोकाचे महत्त्व जास्त आहे. आणि ही धोरण ठरविणारी मडळी सामान्य जनतेतूनच निघायची. वसुली कारकुनाची दृष्टि एवढीच कीं कुळाने अमुक नियम मोडला, तमुक नियम मोडला, तर कुळाला सटकावा. तो नियम चागला आहे की वाईट आहे याची पंचाईत वसूली कारकुनाला कोठून असणार? कलेक्टरची किंवा डेप्युटी कमिशनरची किंमत वसुली कारकुनापेक्षा खरोखरच अधिक नाही! विश्वामित्राची ही कलेक्टरच्या पदवीची मीमासा त्याने एकदा जेवताना केली, तेव्हां त्याच्या बापाने त्याला सागितले कीं तू म्हणतोस हे खरें आहे, पण वरच्या मडळीला आपले धोरण ठरवितांना प्रत्येक योजनेस व्यवहारात कसे स्वरूप येईल, आणि आपण एखादा नियम करावयाचे ठरविले तर त्या नियमाची अमलबजावणी करतांना नियम करण्याचे हेतू बाजूला राहून इष्ट कार्य कसे फसेल इत्यादि गोष्टीवर सल्ला देण्यास हे कलेक्टर किंवा त्या अनुभवांतून बाहेर पडलेले लोक चागलेच उपयोगी पडतात. ही गोष्ट सर दामोदररावांनी आपल्या अनुभवातील एक–दोन उदाहरणें देऊन समजावून सांगितली. या सभाषणाचा विश्वामित्राची बायको विहगमा हिच्याहि मनावर मात्र परिणाम झाला, आणि झाला तो चांगलाच झाला. विहगमेने या सभाषणांतून जें काय उचलले ते हेच की, कलेक्टर म्हणजे चार पठाण बाळगणारा वसूली कारकून. तिला एवढाच भाग उचलावासा वाटला. याचे कारणहि होतें; तिची थोरली बहीण अलकनदा ही तिची फार कीव करीत होती आणि ती का, तर विहंगमेचा नवरा सिव्हिलसर्व्हिसमध्ये नाहीं म्हणून! जर आपली बहीण आपला नवरा मोठ्या नोकरीवर नाही म्हणून फार कींव करू लागली तर उलट टोमणा मारण्यासाठी म्हणून या मीमासेचा तिला बराच उपयोग होणार होता.

आपल्या थोरल्या बहिणीचा म्हणजे अलकनदा देशमूख हिचा आयुष्यक्रम विहगमेच्या नजरेस पडून तिला नेहेमी आपला आयुष्यक्रम बहिणीच्यासारखा केव्हा होईल असे वाटत होते. बहिणीचा नवरा मद्रास इलाख्यांत कलेक्टर होता, तो कलेक्टर असता त्याचे गांवांत महत्त्व कसे होते आणि त्याबरोबर आपल्या बहिणीचे महत्त्व कसे होतें ते तिने पाहिले होते. गावांतल्या सर्व स्त्रियामध्ये आपल्या बहिणीला नेहेमी अग्रस्थान मिळे, आणि सर्व स्त्रिया तिची ओळख करून घेण्यास खटपटत असत हेहि तिला ठाऊक असे. ती गावातून मोटारमधून जेव्हां जाई तेव्हां प्रत्येक ठिकाणचा पोलीस तिला सलाम करी. ती ज्यांच्या घरी जाई त्या मडळीना मोठी धन्यता वाटे. तिला कोणापाशी बोलावयाचे झाल्यास तिने नुसती खूण करावी, म्हणजे तो मनुष्य तिच्या मोटारपाशी ताबडतोब येई, हे विहगमा पहात होती. जिल्ह्यातले यूरोपियन आफीसर व त्याच्या बायका यासहि अलकनदा कधी कधी आमत्रण करी; आणि त्यावेळेस घरातली सर्वात उत्कृष्ट चिनी मातीची भाडीं व कटग्लास टेबलावर येत, आणि मुद्दाम पॅरिसहून मागविलेला टी सेट टेबलावर येई आणि या तऱ्हेचा सुंदर सभार भोवताली असता टेबलाच्या शिरोभागी राहून अकलनदा शिष्टपणाने चहा ओतून देत असे, त्यावेळेस मोटार ड्राईव्हच्या आणि पिकनिकपार्टीच्या गोष्टी

करीत असे, जेवतांना आपल्या ओळखीच्या मंडळी-संबंधाने गप्पा मारतांना अलकनंदा, सिव्हिलसर्व्हिसमधली मंडळी, त्यांच्या बायका, इंडियनमेडिकल सर्व्हिसमधली मंडळी, किंवा त्यांच्या बायका, त्या जिल्ह्यांमध्ये महाराज पदवी असलेले जमीनदार वगैरे मंडळींचाच उल्लेख करी, व याखेरीज कोणी मंडळी जगांत असतील यांची आपणास माहितीच नाही असे दाखवी. ती गावांतल्या मुलींच्या शाळांच्या बक्षीससमारंभाच्या दिवशी अध्यक्ष-स्थान स्वीकारून बक्षिसे वाटीत असे, या सर्व गोष्टी पाहून आपल्या थोरल्या बहिणीच्या आयुष्य-क्रमासारखा आपला आयुष्यक्रम केव्हा होईल असे तिला झाले होते. तिचा बाप रावबहादुर होता, तरी त्याच युरोपियन लोकांबरोबर जाणे येणे क्वचितच असे, बाप रहात असे मोर्दी आळींत, आणि त्याच्याकडे जाये करणारी मंडळी "प्राव्हिन्शिअलसर्व्हिस"ची म्हणजे "पराया सर्व्हिस"ची किंवा त्याहून हलकी जी सबार्डिनेट सर्व्हिस त्या सर्व्हिसची होती.

आपली थोरली बहीण अलकनंदा हिचा मोठेपणा विहंगमेच्या मनावर चांगलाच ठसला होता, आणि तो मोठेपणा ठसण्यास अलकनंदेचे वैभव म्हणजे मोटारकार, उंची लुगडी, चांदीची टी सर्व्हिस इत्यादि गोष्टी कारण झाल्या होत्याच, पण त्यापेक्षा देखील जी अनेक दुसरीं उपांगे तिला दिसत होती ती कारण झाली. अलकनंदेच्या घरात स्वैपाकाला ब्राह्मण अगर बाई नसून मुसुलमान खानसमा होता, व एक मद्रासी आया होती. तो खानसमा व आया ही अलकनंदेस मेमसाब म्हणत, त्या 'मेमसाब' पदवीमुळे विहंगमेच्या मनावर अलकनंदेचा मोठेपणा ठसला तिला मेमसाब कां म्हणतात म्हणून अलकनंदेला विहंगमेने विचारले असता अलकनंदेने स्पष्टीकरण केले ते येणेप्रमाणे: प्राव्हिन्शिअल सर्व्हि-सच्या लोकांच्या बायकांना बाईसाहेब म्हणतात. मामलेदार किंवा डेप्युटी कलेक्टर यांची बायको जर बाईसाहेब, तर कलेक्टरच्या बायकोला देखील बाईसाहेब कसे म्हणावयाचे? मी एकदा कांही दिवस पुण्याहून एक स्वैपाकीण बाई आणली होती. ती मला बाईसाहेब म्हणायला लागली, तेव्हा मी तिला ताबडतोब काढून टाकले, कां की, ती जर मला बाईसाहेब म्हणायला लागली तर इतर नोकर देखील मला "मेमसाब" न म्हणता बाईसाहेब म्हणू लागतील. आणि गांवातल्या इतर बायका देखील तसेच म्हणू लागतील! अलकनंदेला घरातले नोकर "मेमसाब" म्हणत, व जेव्हा अलकनंदा महाराष्ट्रात येई तेव्हा देखील मराठी नोकरानी तिला मेमसाब म्हणावे असेच वाटे. पण ते महाराष्ट्रातील नोकराकडून होत नसे, ते चुकून बाईसाहेब किंवा तिचे घरातले जुने नांव "माई" असल्यामुळे माईसाहेब म्हणत, तेव्हा तर तिला महाराष्ट्रातील मूर्ख नोकरलोकांचा अतिशय राग येत असे. आपण बाईसाहेब वर्गापासून निराळे कसे आहोत हे दाखविण्यास तिने कसूर मुळीच केली नाही. हा सर्व अपराध नोकरांच्याच द्वाड सवयीचा होता. ती नोकराशी देखील हिंदुस्थानीत बोले ती जर मराठीत बोलली तर नोकरलोकांना आपण केवळ त्यांच्याच योग्यतेच्या किंवा फार तर गावातल्या रावबहादुरांच्या बायकांच्या योग्यतेच्या वाटू असे भय अलकनंदेस वारंवार वाटे. कलेक्टरच्या कृपेने प्रत्येक जिल्ह्यात पाच दहा रावबहादुर असतात. कलेक्टरच्या शिरस्तेदाराला देखील रावबहादुर ही पदवी मिळते. तर आपण आणि रावबहादुरांच्या बायका यातले महदंतर विसरून कसे चालणार!

सर दामोदररावानी अधिकारी असता विहंगमेची डफरिन हास्पिटलच्या व्हिझिटिंग बोर्डावर नेमणूक केली होती. ज्याप्रमाणे यूरोपिअन लोकांतल्या सुखवस्तु किंवा श्रीमंत बायका आपली तात्पुरती करमणूक करण्यासाठी "फिल्याथर्पी"

करतात त्याप्रमाणे आपल्याहि बायकांनी का करूं नये, असे त्यांस वाटे. शिवाय विश्वामित्र इंग्लंडमध्ये गेला असतां त्याच्या बायकोला वेळ घालविण्यासाठी काही तरी पाहिजे असेहि त्यांस वाटत होते. शिवाय आपण मोठे अधिकारी आहोत तर आपल्या अधिकाराचा अंश आपल्या घरातील इतर व्यक्तीनांहि काही मिळावा, आणि त्यास आपल्या मोठेपणाची जाणीव व्हावी असे वाटत होते, शिवाय आपल्या घरातील मुली-सुनांनी लोकांच्या नजरेस यावे अशीहि इच्छा होती. त्यांना आपल्या स्वतःच्या हुशारीबद्दल जसा अभिमान होता, तसाच आपल्या कुटुंबातील स्त्रियांच्या देखणेपणाबद्दलहि अभिमान होता आणि त्यांनी सून निवडतांना मुलींच्या देखणेपणाकडे विशेष लक्ष द्यावे असे ठरवून विहंगमेस पसंत केले होते किंवा मुलाच्या पसंतीसाठी निवडले होते. मुलगी कमी शिकलेली असेल तर तिला आपण शिक्षण देऊ शकू, पण मुलगी देखणी नसेल तर मात्र तिचा देखणेपणा आपण वाढवू शकत नाही, यासाठीच लग्न जुळवितांना त्यांनी मुलींच्या रूपाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे असे त्यास वाटे.

सर दामोदरराव स्त्रीशिक्षणाचे मोठे चहाते होते. एवढेच नव्हे तर उत्कट अभिमानी होते. असे असतां त्यांनी विहंगमेच्या सौंदर्याकडेसच लक्ष देऊन तिला पसंत केली आणि दुसऱ्या अनेक सुशिक्षित पण कमी सुंदर मुलींकडे दुर्लक्ष केले याबद्दल काही लोकांनी त्यांच्यावर टीकाहि केली होती. पण दामोदररावांची दृष्टि दामोदररावांच्याच अनुभवाने उत्पन्न झाला ती इतरास समजणार कशी? त्यांना असे वाटे की आपण आपल्याकडे जेव्हां "अॅट होम" करूं त्यावेळेस आपली सून समाजात चमकली पाहिजे. त्याचप्रमाणे ती सून इतर लोकांत जितकी जास्त मिसळेल तितके तिचे सौंदर्य लोकांच्या नजरेस अधिक येईल आणि आपल्या घराण्याचे आकर्षकत्व ती वाढवील. आपल्या घराण्याचे आकर्षकत्व वाढविणे ही गोष्ट दिवसानुदिवस जास्त महत्त्वाची होत जाणार. आपल्याकडील आमंत्रणामुळे आमंत्रितांस आपला मोठा आदर झाला असे ज्याप्रमामाणे आपल्या अधिकारामुळे वाटेल तसेच आपल्या घरातील स्त्रियांच्या सौजन्यामुळे आणि सौंदर्ययुक्त सौजन्याने वाटेल हे खास विशिष्ट घराण्यातील पुरुषाच्या मोठेपणामुळे त्या घराण्याशीं ओळख किंवा घरोबा असण्याचे महत्त्व जसे वाटते, तसेच त्या घराण्यांतील स्त्रियांच्या सौंदर्यामुळेहि वाटते, ही गोष्ट दामोदररावांस माहीत होती. ते जेव्हा तरुण होते, तेव्हां त्यांचा कलकत्त्याच्या काही प्रगमनशील कुटुंबाशी परिचय झाला होता. त्या घराण्यात काही सुशिक्षित व सुंदर अशा स्त्रिया होत्या, त्या स्त्रियांशी बोलण्याची जेव्हा त्यास संधि मिळाली तेव्हा त्यास आपण मोठे भाग्यवान आहो असे वाटले. आणि त्यावेळेस त्यांनी आपल्या मनाचें पृथक्करण केले तेव्हां तो आनंद त्या स्त्रियांच्या शिक्षणापेक्षा सौंदर्यामुळेच उत्पन्न झाला होता असें त्यांचे मत झाले. दामोदरपंत जसजसे प्रसिद्धीस येऊं लागले तेव्हापासून सर दामोदररावांना असे वाटू लागले की, आपण जर लोकांना आपल्या घरीं 'अॅट होम' दिला तर आपल्या घरी येण्याची संधि मिळाली हा त्यांना मोठा सत्कार वाटला पाहिजे, आणि तो मोठा सत्कार वाटावा यासाठीं देखण्या स्त्रियांच्या स्मितचंद्रिकेचा लाभ झाला असे आमंत्रितांस वाटले पाहिजे, आणि यासाठी जेव्हा सर दामोदरराव "अॅट होम" देत किंवा हुरडापार्टी करीत असत तेव्हा आपल्या बरोबरीच्या घराण्यांतील स्त्रियांना जसे आमंत्रण करीत, त्याचप्रमाणें ज्या स्त्रिया सुंदर म्हणून त्यांस ठाऊक असत त्यांसहि मदतीला येण्यास बोलावीत. सौंदर्याच्या महत्त्वाविषयी आपली दृष्टि आपल्या मुलामध्यें उतरली आहे काय? आणि नसल्यास त्यामुळे कोणत्या गैरसोई उत्पन्न होतील याविषयीं त्यांनी अजूनपर्यंत विचार केलेला नव्हता.

---

## प्रकरण ८ वें.

## डॉ. नंदिका.

"नंदिके, आज मी चार महिने पहात आहे कीं, तुझी वृत्ति पूर्वीप्रमाणे राहिली नाही."

"माझ्या वृत्तींत काय बरे फरक पडला?"

"तू अलीकडे मजबरोबर फिरावयास येण्यात आनंद मानीत नाहीस, माझ्या ऐवजी डॉ. परमानंद बरोबर असले म्हणजे तुला अधिक आनंद होतो."

"तुम्ही माझ्यासंबंधाने गैरसमज करून घेत आहां. मला तुमच्यापेक्षां डॉ. परमानंद हे अधिक प्रिय खास नाहींत. मी जे हे शिक्षण मिळविले ते तुमचा गौरव व्हावा, व माझ्या यशाने तुम्हास आनंद व्हावा यासाठीच मिळविले नाही काय?"

"पण तू आज डॉ. परमानंद यांच्या मोटारीत फिरावयास का गेलीस? आपण दोघेजण पार्कमध्ये फिरावयास जावे असे ठरले होते त्याचा तुला विसर पडला? आपल्यापाशी मोटार नाही हे खरे, पण मोटारमध्ये फिरावयाला तुला हवे असल्यास हळू हळू आपणहि मोटार घेऊ. तुझी प्राक्टिस सुरू झाली म्हणजे तू कांही पैसा मिळविशील; मीहि तुला कांहीं पैसे देईन, मग आपण स्वतःचीच मोटार घेऊ."

"वा! ते फारच चांगले होईल! संध्याकाळी मोटारमधून फिरावयास जावेसे वाटते, आणि त्यामुळे डॉ. परमानंद मोटार घेऊन आले म्हणजे त्यांचे आमंत्रण स्वीकारण्याचा मोह पडतो."

हे उत्तर ऐकून नंदिकेचा नवरा लालनाथ यास आनंद झाला. नंदिकेस डॉ परमानंद याची संगति अधिक प्रिय आहे अशांतला भाग नाही, तर केवळ मोटारमध्ये बसून फिरावयास जावे एवढीच इच्छा तिला असल्यामुळे ती त्याच्याबरोबर गेली तर ही गोष्ट खरोखरच दु:खकारक नाही असे त्यास वाटले.

वस्तुस्थिति कशी होती तिची कल्पना लालनाथास, कदाचित डॉ. नंदिका हिला देखील नसेल. नंदिका लालनाथावर प्रेम करीत नव्हती असे नाही. पण ते प्रेम निराळ्याच प्रकारचे होते, किंबहुना प्रेमापेक्षा कृतज्ञता हीच तिच्या मनात प्रामुख्याने होती. लालनाथाने बराच स्वार्थत्याग करून आपल्या बायकोच्या हुशारीचे चीज केले होते. पण तरी देखील तिच्या मनांत लालनाथाविषयी जी वृत्ति वागत होती ती डॉ. परमानंद याच्याविषयी वागत असलेल्या वृत्तीपेक्षा निराळीच होती. डॉ. परमानंद हे एडिंबरोस असतां तिची व त्याची ओळख झाली होती, व त्या दोघानी तेथे असताच बरोबर कामहि केले होते, आणि त्या वेळेस तेथल्या अनेक खेळांत भागहि घेतला होता. टेनिसमध्ये हे दोघेहि पुष्कळदां पार्टनर असत आणि त्यामुळे पुष्कळ ठिकाणीं ही दोघेजण एकत्र खेळावयास गेली होती. डॉ. परमानंद यास ती आपल्या बरोबरचा सवंगडी समजे, त्याचप्रमाणे वैद्यकीच्या उभयपक्षास परिचित अशा विषयांवर त्यांची दोघांची चर्चा होई. त्या विषयावर चर्चा तिला आपल्या नवऱ्याबरोबर करता येत नसे एवढेच केवळ नव्हे तर नवऱ्याबरोबर तिला खेळताहि येत नसे. का की, नवऱ्याला कालेजचे शिक्षण मिळाले नव्हते व त्यामुळे बिलियर्डस, टेनिस, ब्याडमिंटन, पिंगपांग यांपैकी कोणत्याच तऱ्हेच्या खेळाचे त्यास ज्ञान नव्हते. ती कधी कधी घरीं पिंगपांग नवऱ्याबरोबर खेळे पण ते खेळतानां चांगला खेळाडू नवशिक्याबरोबर त्याच्या समजुतीकरता म्हणून ज्याप्रमाणे खेळतो त्याप्रमाणे खेळे. ते खेळ खेळतांना आपले संपूर्ण कौशल्य ज्यात प्रगट होईल, व ज्यांत आपले प्रावीण्य दुसऱ्या पक्षाकडून चांगले ओळखले जाईल असा खेळ खेळण्याची भावना नसे. नंदिकेस आपले पति लालनाथ हे आपले सवंगडी वाटत नव्हते व जरी स्कॉटलंडमध्यें असतां

तिला आपले पति म्हणजे सदाचार व साधुत्व यांचे ठेवे असे वाटे, तरी परत आल्यानंतर तिला त्यांच्यात काहीं तरी कमीपणा आहे व आपल्या मोठेपणास शोभतील असे हे नाहीत असे तिच्या मनात वारवार येई. त्यात कर्मधर्मसंयोग असा झाला कीं, डॉ. परमानद यांची नेमणूक काहीं दिवसांनी कामठी येथे झाली, आणि त्यामुळे त्याचे जाणेयेणे नंदिकेच्या घरी अधिकाधिक होऊ लागले. डॉ. परमानद हे नंदिकेपेक्षा वयाने थोडे लहानच होते त्यामुळे हे तिला आपल्या धाकट्या भावासारखे वाटत होते आणि त्याचे वर्तन देखील अत्यंत सभ्यपणाचे असून ते लालनाथाचा चांगला मान राखीत आणि त्यामुळे डॉ. परमानंद याच्या येण्याजाण्यास प्रथम लालनाथानी उत्तेजनच दिले. लालनाथाच्या मनात प्रथम मत्सराचा लवलेशहि नव्हता, आणि त्यास आपल्या बायकोच्या सद्वर्तनाविषयी आणि तिला आपल्याविषयी जी कृतज्ञता व आदरभाव वाटे तीविषयी त्याची खात्री होती. पण ती वृत्ति हळू हळू डळमळू लागली. कामठीहून मोटारने नागपुरास येणे हे वारवार किंबहुना दररोज होऊ लागले आणि जरी प्रथमतः लालनाथ, नंदिनी आणि परमानद ही तिघेजण बरोबरच फिरावयास जात असत तरी काही प्रसगी डॉ. नंदिका व डॉ. परमानद हीं दोघेजण बरोबरच फिरावयास गेली व एकदां असेहि झाले की, नंदिकेचे नवऱ्याबरोबर फिरावयास जावयाचे ठरले असताहि नवऱ्याच्या घरी येण्याची वाट न पहाता नंदिका परमानदबरोबर फिरावयास गेली. त्या संध्याकाळी जे भाषण झाले ते वर दिले आहे.

नंदिकेचे वर दिलेले उत्तर ऐकून थोडयाशा वेळाने लालनाथ म्हणाले. "आज आपण फिरायला एकत्र गेलो नाही त्यामुळे एक लाभ झाला; एका चांगल्या मनुष्याची ओळख झाली."

"कोणाची?" नंदिकेने उत्सुकतेने विचारले.

"स्वामी ब्रह्मगिरि म्हणून एक संन्यासी बऱ्याच दिवसानीं म्हणजे वीस वर्षांनी हिंदुस्थानांत परत आले आहेत. दादासाहेब डेंगणे वकील यांच्याकडे ते उतरले आहेत."

"स्वामी ब्रह्मगिरी!"

"होय, आश्चर्यचकित झाल्यासारखी कां दिसतेस?"

"स्वामी ब्रह्मगिरि माझ्या चांगल्याच ओळखीचे आहेत, ते मला इंग्लंडमध्ये भेटले होते, स्वामी होण्याच्यापूर्वीपासून मी त्यांना ओळखतें. ते बाबांच्याकडे येत असत; धार्मिक गोष्टींत ते प्रार्थनासमाज, ब्रह्मसमाज इत्यादि समाजांस अनुकूल नव्हते. पण अत्यंत उत्साही तरुण म्हणून बाबाना ठाऊक होते. ते टेक्निकल इन्स्टिट्यूटमध्ये विद्यार्थी होते. एकदा तर माझे लग्न त्याच्याशी करून टाकावे म्हणून माझ्या आईशी बाबाचे बोलणेहि झाले होते. पण चौकशी करतां असे दिसून आले कीं, त्यांचे लग्न झालेलेंच होतें."

"वा! बराच इतिहास आहे. मला याची कांहींच माहिती नाही, आणि तुझी व त्याची ओळख आहे असे त्यानींहि दाखविलें नाहीं. मी त्यांना उद्यां रात्री जेवायला बोलावले आहे."

"फारच चांगले; पण उद्या दुपारचें चहाचें आमत्रण मी अगोदरच स्वीकारले आहे. सर दामोदररावाचे चिरंजीव बॅरिस्टर विश्वमित्र यांनीं मला चहाला बोलावलें आहे."

"किती वाजतां?"

"साडेचार वाजतां? तुम्हांला येतां येईल तर तुम्हीहि आले पाहिजे म्हणून सांगितले आहे. मी त्याच्या बायकोला पाहिलेच नाहीं. पण ती डफरिन इस्पितळाच्या व्हिझिटर्समध्ये आहे."

"तर मग उद्या तुला पुरा कार्यक्रम आहे. साडेचार ते साडेसहापर्यंत वेळ विश्वमित्रांकडे जाईल

आणि संध्याकाळीं आपल्या घरीं पाहुणे येणार म्हणून त्याच्या सरबराईत जाईल."

" पण तुम्ही येणार की नाही? "

" मला यायला होणार नाहीं. "

"तुम्हाला येता आले असते तर बरे झाले असते, असो. जर स्वामी ब्रह्मगिरि मी यायच्या अगोदर आले तर माझी व त्याची जुनी ओळख आहे हे तुम्ही त्यास सांगू नका; त्याना मी अचानक दिसले म्हणजे त्यांस कसें आश्चर्य उत्पन्न होते तें मला पहावयाचे आहे. "

---

## प्रकरण ९ वें

## नंदिकेची पूर्वपीठिका.

नंदिका पुनर्विवाहाचे अपत्य असल्यामुळे तिच्या मातापितरांस तिच्यासबंधाने बरीच काळजी पडली होती. त्यातल्यात्यात आईबापे श्रीमत नव्हती. जी गोष्ट धर्माविरुद्ध आहे अशी लोकांची समजूत असे ती गोष्ट जर कोणी करणे योग्य असेल तर श्रीमंतांनीच करणे योग्य आहे अशी नंदिकेच्या वडिलांनी जेव्हा लग्न केले त्यावेळच्या गरीब मंडळींची समजूत असे, आणि त्या प्रकारचे विचार नंदिकेच्या बापाच्या मनातहि वारवार येत, पण ते व्यक्त केल्यानें आपल्या बायकोस दुःख वाटेल म्हणून तो ते व्यक्त करीत नसे. सुधारणेची कर्तव्यसूत्रे श्रीमंतींसाठीच आहेत असें श्रीमंत मंडळीचे मत होते असे मात्र नाही, त्याचे मत उलट व होते. श्रीमंत मंडळी असे म्हणत कीं, सुधारणा खरोखर "लोकां"साठी म्हणजे सामान्य जनतेसाठी आहेत, समाजातील सुखवस्तूंनी त्यास पाठिंबा द्यावयाचा हेच कायते महत्त्वाचे आहे, आणि आपण सुधारणेच्या कल्पनांस शाब्दिक पाठिंबा दिला म्हणजे आपले कर्तव्य आटपले. येणेंप्रमाणे त्यावेळेस सुधारणा प्रचारांत आणण्याचें काम कोणाचें याविषयीं निरनिराळ्या मंडळींच्या मतात फरक असे. नंदिकेचे आईबाप गरीब होते. अनिरुद्ध नगरकर हा एक यजुर्वेदी ब्राह्मण होता आणि तो बेताचे इंग्रजी शिकलेला, आणि कोणाच्या तरी वशिल्याने म्युनिसिपालिटीमध्ये शाळामास्तर झालेला मनुष्य होता. पुनर्विवाहाच्या तत्त्वाचा विजय करण्यासाठी कांहीं पुनर्विवाह घडवून आणावे लागतात. म्हणून काही शिष्ट मंडळी काहीं बाळवटांनां पकडून त्याचे पुनर्विवाह देखील लावून देत. अनिरुद्धाचा पुनर्विवाह अशापैकी नव्हता. त्याने आपली बायको स्वतःच पसंत केली होती. अनिरुद्धाने तत्त्वासाठीं पुनर्विवाह मुळींच लावला नाही; तर त्याच्या मनात आपण कांही तरी धडपड करून पुढे यावें असें होते म्हणून त्याने पुनर्विवाह लावला, किंवा त्यास उपवर बायको पाहिजे होती, व त्याच्या लग्नाला अडचणी उत्पन्न होत होत्या म्हणून त्याने पुनर्विवाह लावला असा त्यावर त्यावेळच्या दुय्यम सुधारकाचा आक्षेप असे. त्यानें पुनर्विवाह केला त्याचा पूर्वेतिहास एवढाच कीं, त्याला बायको पाहिजे होती, त्याचे वय २८।२९ वर्षांच झाले तोपर्यंत त्याचे लग्नच झाले नव्हते व लवकर आपले लग्न होईल असा संभव दिसत नव्हता. अशा स्थितीत त्याचे लग्न जुळले तें जुळले. त्याची बायको ठकूबाई ही एका विधवा शाळामास्तरणीची धाकटी बहीण होती. ती मास्तरीण पुनर्विवाहास अनुकूल मताची होती पण तिचे वय पसतिशीच्यावर होऊन गेलेले होतें म्हणून तिने स्वतःच्या पुनर्विवाहाची खटपट केली नाही, शिवाय कारणहि झाला तरी त्याला स्वतःच्या लग्नासबधाने खटपट करावयास अडचण पडते; त्य प्रमाणे तिलाहि अडचण वाटली असावी. आता आपले लग्नाचे वय निघून गेले, पण आपल्या धाकट्या बहिणीला वैधव्यात आयुष्यक्रम कठावा लागू नये अशी तिची इच्छा होती.

येणेंप्रमाणें थोरल्या वहिणीच्या खटपटीनें ठकूबाईचा व नगरकरांचा पुनर्विवाह झाला. ठकूबाई व तिची थोरली बहीण चपूबाई या दोघी जेथे रहात होत्या त्या जागेच्या जवळच्या एका शाळेंत चपूबाई शिकवीत होती. मुलींची शाळा व मुलांची शाळा ही एकाच इमारतीत असल्यामुळे आणि मुलांच्या शाळेंत नगरकर मास्तर शिकवीत असे त्यामुळें पुष्कळदां चपूबाई व नगरकर या दोघांच्या जिन्यांत गाठीं पडत. नगरकर हा साधारणपणें बरा पोषाख करणारा तरुण मास्तर म्हणून चपूबाईच्या नजरेस आला, व त्याच्याविषयीं तिचे मतहि बरें झालें. त्यानंतर तिनें त्याचें नाव वर्तमानपत्रांतून एकदोनदा वाचलें, त्यावरून हा बराच उत्साही, खटपट्या आहे असें तिला वाटलें आणि एखादी वडील स्त्री ज्याप्रमाणे एखाद्या तरुण मुलाचें कौतुक करते त्याप्रमाणे ती नगरकराचें कौतुक करी. नगरकराचें चपूताईकडे जाणें येणें होऊं लागलें आणि पुढें चपूताईच्या खटपटीमुळें ठकूबाईचें आणि नगरकराचें लग्नहि झालें. त्याच्या पुनर्विवाहाच्या पूर्वीच तो सुधारकवर्गांत मिसळत असे हें मात्र सांगितलें पाहिजे. समाजांत जी मंडळी कांहीं तरी कारणानें शिष्टता पावतील त्यांच्याशीं सान्निध्य उत्पन्न व्हावें या इच्छेचा समाजांत जो वर्ग असतो त्यापैकींच अनिरुद्ध नगरकर हा होता. त्याला एक गोष्ट ठाऊक झाली होती कीं, जो विचारसंप्रदाय लोकसंमत झाला नाहीं पण ज्यांत मोठमोठे लोक आहेत अशा संप्रदायांत आपण असावें, म्हणजे आज ना उद्यां आपण शिष्टांत गणले जाऊं. या हेतूनेंच त्यानें प्रार्थनासमाज, पुनर्विवाहोत्तेजक संस्था इत्यादि गोष्टींची बढती ज्या व्यक्ती करीत होत्या त्यांच्याकडे जाणेंयेणें ठेवलें. त्यांनांहि एक तरुण ब्राह्मण मुलगा प्रगमनशील विचाराचा आहे हें पाहून फार आनंद झाला. त्यांतल्यात्यांत हा गाणारा असे आणि प्रार्थनासमाजांत भक्तिपर पदें मोठ्या सुस्वर तऱ्हेनें हा म्हणून दाखवून प्रार्थनासमाजाचे रविवार बरेच आकर्षक करी. याचा पुनर्विवाह झाल्यानंतर यास असें वाटलें कीं आपल्या जीवनक्रमांत देखील या विवाहानें आतां आपल्याला थोडीबहुत मदत होईल. पण ती त्यास झाली नाहीं. त्याला पुनर्विवाहापासून त्रास व्हायचा तो झालाच. ब्राह्मण चाळींत रहावयास जागा मिळाली नाहीं, आणि बंगलेवाली मंडळी यास अल्प भाड्यानें जागा देत ना. बरें, यास त्यावेळेच्या बड्या बड्या शिष्टांनीं असें जर सरळ सांगितलें असतें कीं आमच्यापासून तुम्हाला फायदा कांहीं एक होणार नाहीं तर गोष्ट निराळी! पण तसेंहि झालें नाहीं. त्यामुळें अनिरुद्ध नगरकराच्या मनांत जन्मभर प्रार्थनासमाजी व त्यावेळचे शिष्ट सुधारक यांच्याविषयीं राग होता. हा राग त्यानें मात्र एकाएकीं दाखविला नाहीं. तो दाखविण्यापूर्वी आपण या मंडळीचे कट्टे पुरस्कर्ते म्हणून आपली ख्याति झाली पाहिजे आणि त्यांनीं आपणांस आपला पक्का अभिमानी म्हणून मानलें पाहिजे आणि पुढें आपली ख्याति बरीच झाल्यानंतर शिष्ट म्हणविणाऱ्या मंडळींचे व्यंग कांहीं तरी शोधून काढून त्यांना प्रार्थनासमाजांतून घालवून दिलें पाहिजे अशी आपण व उलट ओरड करावी, नाहीं तर इतर मंडळी त्या शिष्ट लुच्चांनां घालवून देत नाहींत म्हणून सात्त्विक राग आणून प्रार्थनासमाज सोडला पाहिजे, अशा तऱ्हेनें त्यानें मनांत योजना केल्या आणि सुधारकांच्या अनेक संस्थांशीं आपला संबंध अत्यंत निकट केला.

अनिरुद्धराव नगरकर यांनी पुनर्विवाह केल्यानंतर शाळामास्तरची नोकरी काय ती तीनचार वर्षें केली. तो ज्या मंडळींत मिसळत असे त्या मंडळींमध्यें मराठी शाळेच्या मास्तरला अगदीं कमी शिकलेला म्हणून कसें कमी लेखीत असत याची कल्पना त्यास होतीच. त्याला असें वाटलें कीं, आपण कांहीं धंदा करीत असलो

म्हणजे आपलें शिक्षण किती आहे याची कांहीं चौकशी कोणी करणार नाहीं! मराठी शाळेंत मास्तर म्हणजे इंग्रजी न शिकलेला आणि इंग्रजी न शिकलेला म्हणजे अशिक्षित असा लोकांचा पूर्वग्रह असल्यामुळें ही मास्तरकी आपण लौकरच सोडून दिली पाहिजे असे त्यास वाटू लागले. त्यांतल्यात्यांत त्याला शिष्टमंडळीचा राग येण्यास दुसरें एक कारण झालें. त्याच्या इतपतच शिकलेल्या दुसऱ्या एका तरुणास युनिव्हर्सिटीच्या किंवा दुसऱ्या कसल्या एका आफीसांत कारकुनाची नोकरी मिळाली तो तरुण देखील मराठी शाळांच्या मास्तरांविषयीं फारच तुच्छतेने बोलू लागला. त्याचा तर त्याला फार राग आला. पुढे एकदां असें झालें कीं, अनिरुद्ध ज्या भागात शिकवीत असे, त्या भागातला एक मनुष्य म्युनिसिपालिटीच्या इलेक्शनसाठीं उभा राहिला आणि त्यावेळेस त्यानें अनिरुद्ध नगरकराची मदत मागितली. अनिरुद्ध नगरकराने त्यास मदत केली नाही एवढेच नव्हे तर त्याच्या प्रतिपक्षाला मदत केली, आणि याचे कारण हे कीं,त्याचा प्रतिपक्षी अनिरुद्धाचा मित्र होता. ता मदतीसाठी अनिरुद्धाकडे अगोदर आला होता. तथापि अनिरुद्धाचा उमेदवार निवडून न येता त्यानें ज्यास मदत करावयाची नाकारली तो उमेदवार निवडून आला आणि तेव्हांपासून तो अनिरुद्धाची शाळा तपासण्यास येऊन वाईट शेरे लिहावयास लागला व हा मास्तर आपले काम सोडून इलेक्शनच्या चळवळीत पडतो अशी अनिरुद्धाविरुद्ध कागाळी करू लागला, आणि जरी प्रथमतः म्युनिसिपालिटीच्या शिक्षणाधिकाऱ्यानी त्या कागाळ्याकडे दुर्लक्ष केले तरी अनिरुद्धाचा शत्रु स्कूल कमेटीवर असल्यामुळे जेव्हां त्या शिक्षणाधिकाऱ्याची तीन वर्षाची मुदत सपून पुन्हा नेमणूक होण्याचा काल आला तेव्हां त्याला स्कूलकमेटीवर असलेला अनिरुद्धाचा शत्रु आपल्याविरुद्ध जाऊं नये म्हणून अनिरुद्ध नगरकराविरुद्ध कांहीं तरी केलें पाहिजे याची अधिकाऱ्यास आवश्यकता भासू लागली. तथापि त्याने अनिरुद्धास काढून न टाकतां राजीनामा देण्याची सूचना केली व अनिरुद्धाने ती सूचना अमलात आणून अन्य तऱ्हेने उपजीविका करण्याचें योजिले अनिरुद्धास चाळींत राहणे कठीण होत गेल्यामुळे एका लहान बगलीवजा घरांत पूर्वींच जावे लागले होते त्या घराचा मालक एक बेने इस्रायल होता, व तो गृहस्थ मोठा उद्योगी होता. त्याला म्युनिसिपालिटीची काही कत्राटे मिळत असत. त्याचा एक छापखाना होता. त्या छापखान्यात प्रूफरीडरचे काम अनिरुद्ध नगरकर करीत असे. अनिरुद्धाचे थोडेसे इंग्रजी शिक्षण झाले होते. त्यास मुंबईत राहिल्यामुळे गुजराथीहि येऊ लागले होते. त्यामुळे सर्व प्रकारची प्रूफे वाचण्याचे काम त्यास येऊ लागले होते. जेव्हा अनिरुद्धाची नोकरी गेली तेव्हा त्यास आपण आता पुढे काय करावे. याविषयी फिकीर वाटली नाही त्याच्या घराचा मालक त्यास आपल्या छापखान्यांत कायमचा कामाला ये म्हणून म्हणत होता; पण त्यास त्याच्याकडे जाणे बरे वाटले नाही. त्यास वाटल की आपण याच्या योगाने त्याचे पूर्ण आश्रित बनू. जोपर्यंत आपण दुसरीकडे कामाला आहो आणि खर्चाला मदत म्हणून या घरमालकाकडे कामाला आहो तोपर्यंत आपला बोज आहे; दुसरीकडची नोकरी न बघतां आपण याच्याकडे कामाला राहिलो तर आपला बोज रहाणार नाही इत्यादि विचार त्या इस्रायलाची नोकरी नाकारण्यास कारण झाले.

अनिरुद्धरावाच्या मनात काय विचार येत आहेत हे इस्रायलाने ओळखले. तथापि त्यामुळे त्याचा नगरकरांविषयी आदर कमी न होतां उलट वाढला. आणि पुढे दुसऱ्या एका कंत्राटदाराकडे त्याने अनिरुद्धराव नगरकर यास नोकरी मिळवून दिली.

नगरकर जेव्हां कंत्राटदाराकडे नोकर झाले तेव्हापासून त्याच्या उदयाला प्रारंभ झाला व नंतर ते लहानसहान कंत्राटें स्वतः घेऊं लागले. मनुष्य खालच्या स्थितींतून वरच्या पदवीला येऊं लागला म्हणजे त्याची निंदा करणारा वर्ग बराचसा असतोच. निंदा करणारे त्याला अपस्टार्ट म्हणतात. अनिरुद्ध नगरकराला लोक "अपस्टार्ट" म्हणतच असत. पण त्याच्यामध्ये खरोखर दोष काय आहे म्हणून विचारले तर पुष्कळांना सांगतां येत नसे. "अपस्टार्ट" हा शब्द वापरताना आपल्या मनांत कोणता अर्थ आहे हे पुष्कळदा हा शब्द वापरणारानाच ठाऊक नसते. जर माणसें गरीबीतून वर आलीं तर तीं माणसें स्तुतीस पात्र आहेत, निंदेस पात्र नाहींत ही गोष्ट जरी खरी असली तरी पुष्कळ मंडळीस "अपस्टार्टपणा" दोषावह वाटतें, पण अपस्टार्ट म्हणजे काय हे सांगतां येत नाहीं. अनिरुद्ध नगरकरानें पुनर्विवाह केला; त्यावेळच्या मंडळींतून शाबासकी मिळविली; त्यावेळच्या सुधारक वर्तमानपत्राकडून स्तुति करवून घेतली; पुनर्विवाहोत्तेजक मंडळी, समताप्रचारक मंडळी वगैरेंचा तो सेक्रेटरी झाला, बऱ्याच लोकांना तो ठाऊक झाला, व्याख्यानें देऊं लागला आणि मुंबईंत तो बराच प्रख्यातीस आला, व तो सुधारक मंडळींतल्या पहिल्या प्रतीच्या लोकांशी दुय्यम प्रतीचे लोक ज्याप्रमाणें दबून दबून वागत असत त्याप्रमाणें न वागतां, आपणा स्वतःला कांहीं किंमत आहे अशी जाणीव असलेला मनुष्य ज्याप्रमाणें वागतो त्याप्रमाणें वागूं लागला. आणि त्यामुळें सुधारकांतल्या कांहींशा वरच्या व त्याप्रमाणेंच कांहींशा खालच्या थरांत अप्रिय झाला. या सर्व गोष्टींमुळें सुधारकांतल्या दुय्यम मंडळींमध्यें तो "अपस्टार्ट" ही पदवी पावला. या दुय्यम मंडळींपैकीं जे नगरकराला अपस्टार्ट म्हणत त्यांनां नगरकरांच्या एका स्नेह्यानें "अपस्टार्ट" म्हणजे काय म्हणून विचारलें. तेव्हां नगरकराच्या निंदकांनीं असें स्पष्टीकरण केलें कीं ज्या मनुष्यास वरची पदवी मिळण्यास त्याचें शिक्षण किंवा खरी लायकी कारण झाली नसते तर दुसरींच कांहीं तरी कारणें झालीं असतात, असा मनुष्य. नगरकर जर बी. ए. वगैरे झाला असता, व शिक्षणामुळें वरची सामाजिक पदवी त्याला मिळून पुढें सुधारकाच्या चळवळींत पडला असता व अनेक संस्थांचे सेक्रेटरीपण करता तर त्यास आम्हीं कधींच अपस्टार्ट म्हटलें नसतें. आज हा खरोखर स्वतः सुशिक्षित नसता सुधारकाच्या चळवळींत पुढाकार घेत आहे आणि स्वतःस कर्ता सुधारक म्हणवीत आहे. याच्यापाशीं दुसरें भांडवलच काय आहे. या दृष्टीनें अनिरुद्ध नगरकर हा खरोखरच अपस्टार्ट होता. आणि हा अपस्टार्टपणाचा आरोप त्याच्यावर त्याच्या मृत्यूपर्यंत कायम राहिला.

याच सुमारास अनिरुद्धरावाच्या एकंदर वृत्तीमध्यें दुसऱ्याच एका कारणामुळें बदल झाला. प्रार्थनासमाजाचा आणि ब्रह्मसमाजाचा संबंध अधिक दृढ व्हावा म्हणून खटपट सुरू झाली आणि त्यावेळेस खऱ्या ब्रह्मोनें जानव्यास रजा दिली पाहिजे या प्रकारचे सिद्धांत बंगालमधून मुंबईपुण्यास आले. केशवचंद्र सेन हा जातीचा वैद्य. त्याच्या जातींत जानवें घालण्याची किंवा मिळविण्याची चळवळ चालूच होती पण केशवचंद्र सेनानें समतेच्या गोष्टींनीं जानवें टाकून दिलें पाहिजे अशीं मतें प्रतिपादण्यास सुरवात केली होती व बंगालच्या कांहीं ब्राह्मणब्रह्मोंनी जानवें टाकूनहि दिलें. त्या चळवळीचा महाराष्ट्रांत जेव्हां प्रतिध्वनि उमटला तेव्हां जानवें टाकून देऊन इतर जातींशी समता कबूल करण्यास सदाशिवराव आणि वामनराव केळकर हे दोघे कोंकणस्थ तयार होऊन त्यांनी जानवें टाकून दिलें. तेव्हां अनिरुद्धरावानींहि जानवें टाकून दिलें. त्यावेळेस रानडे, भांडारकर इत्यादि मंडळींनीं जानवें टाकून दिलें नाहीं तेव्हां रानडे व भांडारकर हे दोघे

लुच्चे आहेत, यांनीं प्रार्थनासमाजामधून आपलें नांव काढून टाकावें अशी गडबड करण्यास अनिरुद्धरावानें कमी केलें नाहीं. अनिरुद्धराव हा एवंच सुधारकांतला पण सुधारकांस पसंत नसलेला, प्रार्थनासमाजी पण प्रार्थनासमाजवाल्यांना पसंत नसलेला असा एक गृहस्थ होता. त्याला जें पहिलें अपत्य झालें तेंच आपणांस परिचित असलेली डॉ. नंदिका होय. ही मुलगी जेव्हा त्यास झाली तेव्हा त्यानें ठरविलें कीं, हिला चांगलें शिक्षण दिलें पाहिजे आणि आपल्या पायावर उभी राहील असें केलें पाहिजे. नंदिकेची आई मात्र आपल्या मुलीचें लग्न कसें होईल याच विवंचनेत नेहेमीं असे. अनिरुद्धराव तिला हें नेहेमीं सांगत असे कीं कोणी गरीब नवरा पाहून त्यास आपली मुलगी देणें हें केव्हाहि योग्य नाहीं. सुधारकपणा गरीबासाठीं खास नाहीं जर आपण हिचें लग्न एखाद्या गरीब नडलेल्या अशा तरुणाशीं करून दिलें तर त्याला पदोपदीं अडचणी फार येतील आणि या सर्व अडचणी आपल्या बायकोमुळें येतात असें त्यास वाटेल आणि ही घोरपड आपल्या गळ्यात काहीं तरी आमिष दाखवून बांधली असें त्यास वाटूं लागेल. आणि यासाठीं नंदिकेस त्यानी सोळा-सतरा वर्षांची होईपर्यंत लग्न न करता ठेवली आणि तिचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण पुरें केलें. नंदिका मॅट्रिकच्या वर्गात असतांच तिची आई फार आजारी पडली आणि त्या आजारपणात आईची शुश्रुषा नंदिकेवरच पडली. यामुळें मॅट्रिकला बसून पास होण्याची संधि गेलीच, आईला आपण या दुखण्यातून वांचत नाहीं असें जेव्हा वाटूं लागलें तेव्हां ती नवऱ्याच्या पाठीशीं तगादा लावूं लागली कीं नंदिकेचें लग्न हें लवकर झालेंच पाहिजे. माझ्या देखत तिचें लग्न झालें म्हणजे मी सुखानें मरेन. याप्रमाणें जेव्हा बायकोनें धरणें घेतलें तेव्हा अनिरुद्धरावानें जाहिरात देऊन खटपट करून नंदिकेचें एका नागपूरच्या सारस्वत ब्राह्मण कारकुनाशीं लग्न लावून दिलें. तो कारकून मॅट्रिक झालेला, सरकारी नोकरींत असलेला पण ज्याचें काहीं तरी शिक्षण झालेली बायको मिळावी या हेतूनें लग्न लावणेंवर पडलें आहे असा होता. त्यावेळेस सुशिक्षित मुली इतक्या थोड्या होत्या कीं जिला इंग्रजी रटफ करतां येत असे, तिची सुशिक्षित मुलगी म्हणून वाहवा होत असे, व तिला लग्न देखील बऱ्याच संपन्न स्थितींतल्या मनुष्याबरोबर करता येई. अशा काळात साधारण मॅट्रिक झालेल्या कारकुनाबरोबर कोणत्या सुशिक्षित मुलीचा बाप लग्न करून देईल ? या परिस्थितीमुळें आनंदरावानें जेव्हा अनिरुद्धरावाची एका पुनर्विवाहिताच्या सुशिक्षित मुलीस वर पाहिजे म्हणून जाहिरात पाहिली तेव्हा तावडतोब पत्र पाठविलें व पुढें आईच्या हयातीत नंदिकेचें लग्नहि झालें.

---

## प्रकरण १० वें

## नंदिकेचे वैवाहिक विचार.

डॉ. नंदिकाबाई आज ब्यारिस्टर विश्वमित्राकडे चहाला येणार होत्या, आणि विहंगमा त्यांच्या आगमनाची मोठ्या आतुरतेनें वाट पहात होती विहंगमेला नंदिकाबाई ह्या डाक्टरीणबाई आहेत व त्यांत विलायतेला जाऊन आलेल्या आहेत तर त्या कशा दिसत असतील याविषयीं मोठें कौतुक होतें, असें नाहीं. का कीं, ती डफरिन इस्पितळाच्या कमेटीवरच असल्यामुळें तिनें पुष्कळ डॉक्टरणी पाहिल्या होत्या, आणि डॉ. नंदिकाबाई यांच्याविषयी त्या चष्मा लावणाऱ्या स्वरूपानें तिसऱ्या प्रतीच्या व कदाचित बसक्या गालांच्या असतील, अशी कल्पनाहि केली होती. तथापि त्या तशा नाहीत अशी मागाहून माहिती कळली त्यामुळें तिची नंदिकेस पहाण्याची इच्छा वाढली

होती. डॉ. विश्वामित्र यांनीं तिला सांगितलें होतें कीं डॉ. नंदिकाबाई बोलण्यात मोठ्या चतुर आहेत, रसिक आहेत, व सुंदर पोशाख करणे हें सुशिक्षिततेशीं मुळींच विसंगत नाहीं असे समजणाऱ्या आहेत तेव्हा मात्र तिला अधिक कौतुक वाटले. त्यातल्या त्यांत असे झाले की विहंगमा ही मोटारींतून जात असतां समोरून एक मोटार आली, आणि त्यांत एक देखणी व शालू नेसलेली बाई होती. त्या बाईला विहंगमेनें अगदी ओझरतें पाहिलें होतें, आणि त्यावेळेस सर दामोदररावाचा म्हणजे विहंगमेचा शोफर ह्या डॉक्टरीणबाई असे म्हणाला, तेव्हा या बाईला निरखून पाहण्यास सापडले नाहीं म्हणून विहंगमेचा थोडा विरस झाल्यासारखेंहि वाटत होते. डॉ. नंदिकाबाई ही सुंदर पोषाख करणारी आहे हे ऐकून तिच्या येण्याने विहंगमेला थोडीशी धास्तीहि वाटत होती. तिला धास्ती वाटण्याला कारणहि होते. तिने आपल्या सासऱ्या आणि माहेरच्या घरात काही आख्याने ऐकली होती. आपल्या बायकोची प्रकृति पहाव्यास बोलावण्याच्या निमित्ताने प्रथम एखाद्या तरुण देखण्या मिडवाईफला बोलवून ओळख करावी, आणि नंतर ती ओळख पुढे बरीच निकट करावी. या तऱ्हेचे आपल्या बापावर आणि सासऱ्यावर दोषारोप तिने आपल्या खुद्द आईकडून व सासूकडून ऐकले होते. डॉ. नंदिका वयानें तीसांच्या वर आहे, म्हणजे आपल्या नवऱ्यापेक्षा मोठी आहे, हे जरी तिला ठाऊक होतें, तरी त्यामुळे तिची धास्ती कमी झाली नव्हती. ज्यास्त वयाची स्त्री आपल्यापेक्षा कमीवयाच्या तरुणावर आसक्त होऊं शकते व त्या तरुणाच्या अधिक तरुण पत्नीसहि पराभूत करू शकते असे तिला काही कथा ऐकून ठाऊक झालेलें होतें. तथापि प्रस्तुत प्रसंगी तिला काय करावें हें सुचेना. डॉ. नंदिका याच्याशी जास्त लगटपणा करण्यासाठीं नवरा तिला आपल्या घरी आमंत्रण देत नाहींना? असा तिने स्वतःस प्रश्न करून उत्तर दिले की, आपल्या नवऱ्याची डॉ. नंदिका याशीं तर ओळख अगोदरचीच आहे. नवऱ्याची दुसऱ्या एखाद्या बाईशीं ओळख होण्यास आपण कारणीभूत होत नाहीं. या आजच्या चहामुळे आपली उलट डॉ. नंदिकाबाईशी ओळख होईल आणि उलट जर आपण नंदिकाबाईस वाटेल तेव्हा जाऊन भेटण्याचा प्रघात ठेवला तर आपला नवरा आणि डॉ. नंदिका यांचे संघटन गैरवाजवी मर्यादेपर्यंत जाण्यास आपणास अडचण उत्पन्न करतां येईल. या प्रकारच विचार मनात येऊन विहंगमेच्या मनातून नंदिकेची धास्ती थोडाबहुत दूर झाली आणि विहंगमा ही देखणी व सुंदर पोषाख करणारी डॉक्टरीण कशी काय दिसते ते पाहण्यास उलट उत्सुक झाली.

या चहाच्या प्रसंगी ज्या अनेक गोष्टीवर चर्चा झाली त्यास सुरवात डॉक्टरीणबाई कोणत्या वर्षी स्कॉटलंडमध्य होत्या या विषयावरून झाली. या प्रसंगी इंग्लंडपेक्षा स्कॉटलंड मला अधिक का आवडते, तेथे स्वस्ताई कशी आहे इत्यादि गोष्टी डॉ. नंदिकाबाईंनी सांगतल्या त्या बोलण्यात अनेक गोष्टींच्या किंमती विचारून विहंगमेनें भाग घेतला. त्यानंतर डॉक्टरीणबाईंनी इंग्लंडातला कोणता भाग पाहिला ते सांगितलं. पुढें काही पुस्तकावर चर्चा झाली. इंग्रज कवि ब्राऊनिंगवरहि काही बोलणे झाले; रवींद्र टागोरवरहि बोलणं झाले. मिस्टिसिझम म्हणजे काय यावर बोलणे होऊन बराच वादविवाद झाला "मिस्टिसिझम" म्हणजे काय याविषयी विश्वामित्राची कल्पना फारच अस्पष्ट होती. तो म्हणाला, इंग्रज लोक ज्या मनुष्यास मिस्टिक समजतात त्याच्या कवितेविषयी माझी एवढीच कल्पना झाली आहे कीं, जी कविता वरवर सामान्य वस्तूविषयीं दिसते तथापि त्या

कवितेंत त्या प्रत्यक्ष वर्णन केलेल्या वस्तूचें वर्णन नसून कांही तरी आयुष्यविषयक गूढ गोष्टीचे वर्णन असते ती कविता मिस्टिसिझमने भरली आहे असे समजतात. उदाहरणार्थ कविता असेल नदीच्या प्रवाहावर; पण कवी त्यात आपल्या आयुष्यक्रमाचे वर्णन करीत असेल, आणि आयुष्यक्रमाविषयी एक शब्दहि नसेल. अशी कविता म्हणजे दुसरें कांही नाही ते केवळ व्यंग्यमूकत्व होय. व्यंग्यार्थाला प्राधान्य असेल ते ध्वनिकाव्य आणि तेच उत्तम ही ज्या वेळेस संस्कृत साहित्यकाराची कल्पना झाली त्यावेळच्या मनोवृत्ता-प्रमाणे मनोवृत्तीची वावटळ आज यूरोपात पसरली आहे, आणि तसले काव्य करणाराला फाजील महत्त्व आले आहे, खरोखर मिस्टिक कविता कविताच नाही ती केवळ काव्याभास होय. डॉ नदिका म्हणाली "मी काव्याचा अभ्यास केला नाही, पण ज्या कवितेस मिस्टिसिझमने भरलेली कविता म्हणतात ती मला बराच आवडते. मनुष्य आपल्या अंत:करणाचे अनेक हेलकावे तपासू लागतो, तो त्या हेलकाव्यांना उत्तेजन देतो आणि त्या प्रसंगी जणू काय अंतःकरणस्फूर्तीने जगाची तशीच मनाचीं सत्ये समजतो. अंत:करणात अत्यंत खोल ठिकाणी असलेले विचार असला कवि पाणबुड्याप्रमाणे बाहेर काढतो आणि त्यामुळे जे लोक मनोराज्यात अवगाहन करणारे असतील किंवा अंत:करणांतील अनेक प्रकारची कालवाकालव ज्यानीं अनुभविलेली असेल त्यांसच त्या प्रकारची कविता आवडेल इतरास आवडणार नाही. या तऱ्हेची कविता आवडण्यास अंत:करण अनेक प्रकारच्या आशानिराशांच्या कलहाने, त्याचप्रमाणे भवितव्यविषयक अनेक कल्पना करण्याच्या सवयीने, किंवा जे इंद्रियगोचर नाही, केवळ मनोगोचर आहे आणि सर्व जगाचे आदितत्त्व आहे त्या तत्त्वाची कल्पना करण्याच्या संवयीने सुशिक्षित व्हावें, लागते."

या तऱ्हेचें संभाषण चाललें असतां संभाषण फार खोलांत चालले, या संभाषणामुळे आपल्या विहगमेला वादविवादात शिरता येणार नाहीं इत्यादि कल्पना मनात येऊन विश्वामित्राने चर्चेचा विषय बदलला. त्याने प्रचलित कादंबऱ्यावर बोलण्यास सुरुवात केली. त्यावेळेस नदिकाबाईनी सांगितले की, "मी मराठी कादंबऱ्या वाचण्याचेच सोडून दिले आहे. आपल्या कादंबरीकारांना प्रेम वर्णने लिहावीशी वाटतात ती त्यांनी अनुभवलेली नसतात. त्यामुळ त्यांच्या कादंबऱ्या अगदीं काल्पनिक वर्णनामुळे फिक्या पडतात. आपल्याकडे खरें प्रेमसाधन समाजात दिसू लागल्याशिवाय आणि कादंबरीकाराने ते स्वत: अनुभविल्याशिवाय कादंबऱ्या चांगल्या व्हावयाच्याच नाहीत." त्याच्यानंतर प्रेमसाधन समाजांत प्रचलित व्हावें किंवा होऊ नये असा प्रश्न निघाला आणि डॉ. नदिकाबाईनीं विवाह प्रेममूलकच व्हावेत असे आपले मत दिले. त्यावेळेस बोलण्याला विशेष रंग येऊ लागला.

" नदिकाबाई, तुम्ही प्रेमास जे महत्त्व देता त्याचे महत्त्व कमी नाही. तथापि प्रेम हीच गोष्ट प्रधान ठेवून इतर सर्व गोष्टी त्यावर अवलंबून ठेवाव्यात हेंहि मला योग्य दिसत नाही. " विश्वामित्र म्हणाला.

" का बरें, प्रेमावर विवाह अवलंबून ठेवू नयेत तर कशावर ठेवावेत ? "

" विवाह जुळून येण्यापूर्वी जर प्रेमसंबंध उत्पन्न झाले असतील तर विवाह प्रेमानुसारी व्हावा. हे कोणीहि कबूल करील, पण नंतर प्रेमास वाटेल तितके संचार करण्याचे स्वातंत्र्य नाही. समजा, लग्न झाल्यानंतर पुन्हा वाटेल त्या व्यक्तीवर प्रेम करण्याचे स्वातंत्र्य व्यक्तीस राहिले म्हणजे विवाहसंबंधास स्थिरता म्हणून मुळीच रहाणार नाही. "

" विवाहसंबंधाच्या स्थिरतेवर आपण इतकी भर कां देतां. प्रेम नसेल तरी विवाहसंबंध कायम ठेवणे म्हणजे दोघांचेहि आयुष्य खराब करणे होय. ज्या स्त्रीचे नवऱ्यावर प्रेम नसेल त्या स्त्रीस आपण नवऱ्याशीं नवरेपणाचे नाते ठेवताना शरीरविक्रय करीत आहो आणि आपण केवळ संस्काराच्या दडपणामुळे गुलाम झालेल्या व्यक्ति आहोत असे वाटते असे अनेक पाश्चात्य स्त्रीलेखक म्हणत नाहीत काय ?"

" आपण वैवाहिक स्थिरतेस महत्त्व देत नाहीं काय ? "

" मी महत्त्व देत नाही असे नाहीं. उलट प्रेमामुळे विवाहाच्या स्थिरतेस मदत होते आणि ज्याअर्थी मी प्रेमाला महत्त्व देते त्याअर्थी मी प्रेमाचा परिणाम जो विवाहाचे स्थैर्य त्याला महत्त्व देतेच. "

"पण प्रेम ही मनुष्याच्या मनांतील द्वेषमत्सरादि अनेक भावनांपैकीं एक भावना आहे. अनेक भावना उत्पन्न होतात त्यापैकीं प्रेम हे आहे, जर तेच अनित्य आणि अस्थिर आहे तर तेवढयाच पायावर स्थिर आयुष्यक्रमाचा डोलारा कसा उभा करता येईल? मनुष्याचे मन चंचल असते, एका स्त्रीवरून दुसऱ्या स्त्रीवरहि पुरुषाचे प्रेम जाते, स्त्रियांच्या मनाची इतकी चंचलता असते की नाही हे मला सांगता येत नाही "

वरील संवाद डॉ. नंदिका आणि विश्वमित्र यांच्यामध्येच चालला होता, आणि तो चालू असतां त्या संभाषणामध्ये आपल्याला भाग घ्यायला सापडता का नाही, की आपण बाजूला पडलेल्या व्यक्ती आहोत असे विहंगमेस वाटत होते, आणि योग्य संधि पाहून तिने आपले तोंड उघडले.

"बरें झाले; डॉक्टरीणबाई, पुरुषमंडळीकडूनच हा कबूलीजबाब येत आहे. लग्न झाले असूनहि दुसऱ्या स्त्रीवर पुरुषाचे लक्ष जाते हे पुरुषानीच कबूल केलें म्हणजे स्त्रियांनां उगाच संशयी, मत्सरी अशीं विशेषणे वापरता जड जाईल " विहंगमा म्हणाली.

"स्त्रिया पुरुषापेक्षां खास अधिक संशयी किंवा मत्सरी नाहींत ' डॉक्टरीणबाई म्हणाल्या.

"आपण माझ्या प्रश्नापासून दूर पळू नका. मी मोकळया मनाने सांगितले की, पुरुषाचे मन चंचल आहे. आणि तुम्हाला विचारले की स्त्रियाचे मन चंचल नाही काय? स्त्रियाचे मन एका पुरुषावरून दुसऱ्या पुरुषावर जात नाही काय? तुम्हीहि तितक्याच मोकळया मनाने उत्तर द्या. "

"हा प्रश्न तुम्ही मलाच का विचारता? स्त्रियाचे मन कसे असते याविषयी सत्य माझ्या एकटीच्या म्हणण्यावरून कसे समजल? जर तुम्हांस शितावरून भाताची परीक्षा या न्यायाने करावयाची असेल तर तुमच्या प्रश्नाची उत्तरे देऊन तुम्हास विचारास साहित्य पुरवावयास विहंगमाबाई देखील समर्थ आहेत; आणि एका अवलोकनावरून सिद्धांत काढायचा असला तर तुमच्या बायकोला देखील विचारून काढता येईल. मन अत्यंत खुले करून असल्या विषयाची चर्चा एकमेकांवर संपूर्ण विश्वास असलेल्या नवराबायकोत अधिक चांगली होईल. "

"हे उत्तर देतांना डॉ. नंदिनीबाईंच्या तोंडावर हल्ला परतविल्याची विजयश्री आणि तिजबरोबर स्मितयुक्तता दिसू लागली प्रथम त्यास वाटले कीं आपल्या अंतःकरणात काय खळबळ चालली आहे तिचा विश्वमित्र आपल्या प्रश्नरूपी टाचाने थांग लावीत आहे, आणि आतां आपण आपल्या उत्तराने जणू काय प्रश्नाच्या मान्याचे तोंड फिरवून ते गोळे (प्रश्न) मारा करणाऱ्याच्याच गोटांत पडून धुव्वा उडवितील असे केले आहे. आता नवऱ्यावर बायकोचा किती विश्वास आहे हें आपोआप बाहेर पडेल. विश्वामित्र या सूचनेनें बराच पेचांत पडेल असे वाटले होते. पण तो

पेंचांत पडला असें मुळींच दिसलें नाहीं. त्यानें लगेच विहगमेकडे तोंड फिरवून विचारलें की "डॉक्टरीणबाईचे बोलणे तुला कसे काय पटते? आपण या विषयावर मोकळ्या मनाने बोलू इतका आपणा दोघामध्ये विश्वास वाढला आहे काय?" विहगमेला उत्तर काय द्यावें हे समजेना. पण उत्तर कांहीं तरी दिलेच पाहिजे म्हणून ती म्हणाली कीं "या तऱ्हेची चर्चा नवराबायकोनी आपापसात देखील करू नये."

विश्वामित्र म्हणाला "आपणां दोघामध्ये अकृत्रिमता पुष्कळ वाढली तर असली चर्चा करण्यास देखील हरकत नाही. पण कदाचित् तुझ्या बोलण्यातहि तथ्य असले पाहिजे. मी डॉक्टरीणबाईनाच आणखी एक प्रश्न विचारतो. एक प्रेमसबंध स्त्रीने विवाहाने कायम केला म्हणजे चित्त अगदी स्थिर होते काय? या प्रश्नाची चर्चा करण्यासाठी स्त्रियानी आपले मन अगदी मोकळे करून सांगितले पाहिजे. तसे केले तरच विवाहसबंधाविषयी पद्धतशीर विचार करतां येईल. पण प्रश्न असा आहे की याविषयी स्त्रियानी आपले मन कोणापाशी मोकळे करावे? अधिक देखणा पुरुष किंवा अधिक हुशार पुरुष दृष्टीस पडला तर त्याच्यावर तात्पुरते तरी प्रेम जडते किंवा नाही याविषयी स्वतःचा अनुभव तुम्हास सांगावयाचा झाला तर तुम्ही तो नवऱ्यास अधिक मोकळ्या मनाने सागाल किंवा तिऱ्हाइतास सांगाल?"

"तुम्ही तर माझी फेरतपासणी चालविली आहे!"

"तुम्ही माझ्या बोलण्याकडे तुमची परीक्षा चालली आहे या दृष्टीने पाहू नका, आपणांस आपल्या विवाहसस्थेविषयी विचार करावयाचा आहे. स्त्रिया व पुरुष ही दोघेहि आपापल्या मनाचीं निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या प्रसगीं जी स्थित्यतरे होतात ती जितक्या अधिक मोकळेपणानें सांगतील तितकी त्यावर उपाययोजना अधिक होऊन आपली विवाहसंस्था आपणांस अधिक यशस्वी करतां येईल."

"तुम्ही विचारलेल्या प्रश्नांचे उत्तर देण्याचे मी टाळते व याचे कारण कोणतीहि स्त्री समजेल. काही दिवसापूर्वी एका अमेरिकन बाईचे "कन्फेशन्स टु ए हीदन आयडॉल" म्हणून मी एक पुस्तक वाचले ते मेरियन ली हे नांव घेऊन एका अमेरिकन बाईने लिहिले आहे. तिचे तें खरें नाव नाहीच. तिचे खरे नाव मिसेस कामस्टाक असे आहे. ती अमेरिकेतील एका प्राणिशास्त्रज्ञाची बायको आहे असे कळते. ते पुस्तक तुम्ही अवश्य वाचा; त्यात स्त्रीच्या मनांत वारंवार येणारे विचार जसेच्या तसेच तिने मांडले आहेत आणि ते सर्व पुस्तक रोजनिशीच्या स्वरूपाचे आहे. त्या पुस्तकांत त्या बाईचे लग्न ठरते आणि त्यामुळे तिने ते आत्मनिवेदन बंद केले आहे. त्यात ती सांगते की, जेव्हां एखादी स्त्री लग्न करते तेव्हां तिला आत्मनिवेदन करणे बिलकुल परवडत नाही. मग ते आत्मनिवेदन अत्यत उदारपणाने सर्व कांही निमुटपणे ऐकून घेणाऱ्या लाकडी मूर्तीपुढें का असेना! विवाहोत्तर स्त्रीला खरं आत्मनिवेदन करण्याची चोरीच आहे."

"स्त्रियाना आत्मनिवेदन करण्याची इतकी चोरी कां असावी?"

"कां असावी! आहे खरी; स्त्रिया आपल्या मनात विवाहोत्तर प्रेमभावना निरनिराळ्या काळीं कशा जागृत होतात, त्यात काय स्थित्यतरे होतात हे नवऱ्यास सांगणार नाहीत एवढेच नव्हें तर तिऱ्हाइतासहि सांगणार नाहीत."

"मग विहगमेशी यासंबधीची मी चर्चा करावी असे आपण कसे सुचविले? मला वाटते कीं आम्हा नवराबायकोमध्ये परस्पर विश्वास कितपत आहे याची तुम्हास तपासणी करावयाची होती."

इतक्यांत विहंगमा म्हणाली कीं, " मी सांगते; बायकांचा नवऱ्यावर अविश्वास कां उत्पन्न होतो ते. माझ्या एका मैत्रिणीचे विसाव्या वर्षानंतर लग्न झाले; लग्नानंतर नवराबायकोंची प्रेमात बोलणी सुरू झाली; त्यावेळेस नवऱ्याने तिला विचारले की लग्नापूर्वी तुला सगळे कांहीं समजू लागले आहे. आम्हा पुरुषाचे जसे अनेक ओळखीच्या स्त्रियावर प्रेम जडू लागते तसे तुझे कधी कोणावर जडले नाही काय ? मुलीने भोळसरपणाने आपली हकीकत सांगितली की एका तरुण अविवाहित डॉक्टरवर माझे प्रेम जडले होते पण त्याने लग्नाची सूचनाच कधी केली नाही. एवढ्या कबूलीजबाबाने तिने नवऱ्याच्या हाती आपल्यावर उगारण्यासाठी एक हत्यार दिले असे म्हटले पाहिजे. नवऱ्याला न आवडणारी पण स्वतःस आवडणारी एखादी गोष्ट तिने केली की नवऱ्यान लगेच म्हणावे की "तुझे माझ्यावर प्रेम कोठे आहे. तुझे प्रेम अडकले असेल त्या टिनपाट डॉक्टरवर" अशा तऱ्हेने अगादरच काही वेडावाकडा प्रश्न विचारून नवरे त्याचा पुढे भलताच फायदा घेतात. तर असल्या गोष्टीविषयीं नवऱ्याना माहिती देणे म्हणजे माकडाच्या हाती कोलात देणे आहे. "

विहंगमेची ती गोष्ट एकून डॉ. नंदिकाबाई हंसू लागल्या.

डॉ. नंदिकेने पुढे बोलणे बदलण्यासच की, काय "स्वामी ब्रह्मगिरि आज आमच्याकडे जेवायला येणार आहेत म्हणून लवकर घरी गेले पाहिजे," असे सांगितले. तेव्हा विश्वमित्र म्हणाला "तुमची आणि स्वामींची ओळख कोठून? मला असे वाटले का, नागपुरात माझीच त्यांच्याशी जुनी ओळख असेल."

"मी त्यांना ओळखीत होते पण ते मला ओळखतील की नाही हे सांगतां येत नाही."

"तुम्हांला त्यांच्याविषयी काय वाटते?"

"ते हुशार मनुष्य आहेत असे वाटते, पण स्वामी म्हणून आयुष्यक्रमण करण्यापासून या दिवसांत कांही फायदा असेल असे वाटत नाहीं."

"स्वामी म्हणजे केवळ आपला भार लोकांवर टाकणारे लोक आहेत दुसरे कांही नाही." विहंगमा म्हणाली.

"सामान्यत हे खरे आहे पण स्वामी ब्रह्मगिरीविषयीं तसे म्हणतां येईल असे वाटत नाहीं." असे विश्वमित्र म्हणाले. इतक्यात समोरच्या घड्याळात सहाचे ठोके पडले त्यामुळे संभाषण जास्त न वाढू देता घरी जाण्याची इच्छा डॉ. नंदिकाबाईनी दर्शविली

डॉ. नंदिकाबाई घरी जावयास निघाल्या तेव्हा त्यांच्या बाजूला पडलेल्या शालीची नीट घडी करून ती त्यांच्या पाठीवर विश्वमित्रानीं घातली पण ते पाहून विहंगमेस जरा विचित्र वाटले असावे असे दाखविणारा फरक तिच्या तोंडावर दिसू लागला.

---

प्रकरण ११ वें.

## नागपूरची ओळख.

नागपूरच्या राजकीय विचारविषयक व सामाजिक विचारविषयक वातावरणाचा चांगला परिचय फारच थोड्यास असेल. निवडणुकीस उभे रहाणे, सार्वजनिक फंडासाठी वर्गण्या गोळा करणे, इत्यादि सार्वजनिक कामे करणाऱ्या अनेक व्यक्तींस तेथील वातावरण काही अंशानेच कळते. ज्याचा अनुभव जास्त त्यास त्या मानाने जास्त कळते, पण २५।२५ वर्षे चळवळींत असलेल्या लोकांसहि ते शहर पूर्णपणे समजले नाही असे लोक म्हणत असत. मराठी, परदेशी आणि तैलंग समाजातील निरनिराळ्या जाती व त्यांचा

निराळीं मतें यांचे नागपूर शहर हे एक संग्रहालयच आहे. नागपूरचें वातावरण समजावून घ्यावयाचें म्हणजे तेथील जनतेचें पृथक्करण करावयाचें एवढेच नव्हे, तर ज्या विचाराच्या वावटळी देशात उठतात त्या प्रत्येक वर्गावर काय परिणाम घडवितात ते समजून घ्यावयाचे. वातावरण, लोकांचें मन, माणसाची कृत्ये व या सर्वांचा अन्योन्य संबंध याविषयीं निवडणुकींच्या प्रसंगी चांगलाच अभ्यास होतो. कोणता उमेदवार निवडला जावा यासाठीं लोकांत चर्चा सुरू होते ती ज्या काम करणाऱ्यांच्या करामतीने उत्पन्न होते, तो धंदेवाईक राजकारणीचा वर्ग नागपुरात तयार होऊं लागला आहे. गांवातली सर्व जुनी वैरें व दोस्त्या यांची चौकशी राजकारण समजूं इच्छिणारा करीतच असतो नागपुरांतील प्रसिद्ध स्थानिक वर्तमानपत्राच्या ऑफीसात जगून जेव्हा चहाचिवडासमीतीचें काम सुरू होतें, तेव्हा राजकारण देखील शिजूं लागते असा लौकिक महालापासून इतवारीपर्यंत पसरलेल्या सुशिक्षितांत आहे. तेथें ज्या अनेक प्रकारच्या गप्पा सुरू होतात त्यात कोणता उमेदवार पुढे करावा ते ठरते असे पुष्कळांस वाटत असे; निदान त्या चहाचिवडा समीतीचे अनेक विद्वान सदस्य त्या प्रकारचा समज लोकांत पसरवून द्यावयाची खटपट करीत असत. कारण त्या तऱ्हेचा समज झाल्याशिवाय त्यांच्या बैठकांचे महत्त्व वाटणार तरी कसें? "चहाचिवडामभीति" हा त्रिन वर्गणीचा क्लब होता. या क्लबात वर्तमानपत्रे वाचायला फुकट मिळत, व सिगरेट्स किंवा विडयाहि फुकट मिळत प्रारभीं प्रारभीं चहाचिवडा करण्याचें काम संपादकाच्या बायकोवरच पडत असे पण पुढे पुढे त्यांची बायको, मंडळी जमली म्हणजे कपाळाला आठ्या घालूं लागली तेव्हा शेजारच्या पांडुरंग चहावाल्याकडून चहाचिवडा येऊं लागला. व यामुळे जरी संपादकांस खर्चहि जास्त येऊं लागला तरी त्याचा हिंदुस्थानास म्हणजे राष्ट्राचें भांडण अधिक जोराने आम्ही भाडतो असे सांगणाऱ्या पक्षास फायदा झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्या पक्षाच्या जाहिराती लावण्यास तें चहाचें दुकान हें स्वाभाविक स्थान झाले. शिवाय तो चहावाला या पक्षाचा अत्यंत अभिमानी मनुष्य बनला, आणि म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीत मदतहि करूं लागला त्या वर्तमानपत्राच्या कचेरीमध्ये जमणारी मंडळी म्हणजे त्या पक्षाचे गर्भगृह होते असें मुळीच नाही. काहीं "महत्त्वाच्या" चर्चेमध्ये तो वर्तमानपत्रकार वगळला जाई; का कीं तो तेथे "उपरी" पैकीं होतो अस्सल नागपुरी नव्हता. त्यातल्या त्यांत तो कोंकणस्थ होता, तेव्हा तो अस्सल नागपुरी मंडळीच्या संपूर्ण विश्वासास कसा पात्र होणार? या वर्तमानपत्राच्या आफीसमधली जमात म्हणजे दुसऱ्या वेष्टनातील मंडळी. पहिल्या वेष्टनांतली मंडळी अत्यंत गुप्तपणे एका अस्सल नागपुरी वकीलाच्या घरीं जमत असत. उन्हाळ्याचे व त्यातल्या त्यात चांदण्याचे दिवस आले म्हणजे या पक्षाच्या 'नान आफीशिअल" व "स्वाभाविक' बैठका शुक्रवार तलावाच्या पाळ्यावर होत. तेथें चहा मात्र मिळत नसे आणि पक्षान्तर्गत व्यक्तींचे सामाजिक संघटन धूम्रपानानेच होत असे. त्यात कांही कागदी सिगारेटचे भोक्ते असत, तर कांही खाकी सिगारेटसचे भोक्ते होते.

त्या पक्षातल्या अत्यंत प्रमुख मंडळीचें वर्णन येथे द्यावयास नको. दुय्यम प्रमुख मंडळींचें वर्णन येथे दिले असता, परिस्थितीचा बोध अधिक स्पष्टपणे होईल. अशा मंडळीमध्ये नारायणराव अलंकार यांची माहिती सांगितली पाहिजे. नारायणरावांस अलंकार हें उपपद केव्हां मिळाले हे सांगतां येत नाही ते वकील होण्या पूर्वी मास्तर होते तेव्हां मिळाले असावे असें म्हणतात हे त्या मंडळांतले रसिक गृहस्थ

म्हणून समजले जात असत. याना भामिनीविला-सांतील शृंगारोल्लासाचे श्लोक तोंडपाठ येत होते. "बदरामलकाम्रदाडिमाना—" हा "भामिनीवक्षोज-विकासदर्शक" श्लोक ते स्मितयुक्त पण चोर्चेसारखे तोंड करून म्हणत असत. हा श्लोक म्हटल्यानंतर ते या श्लोकाचे रहस्य "वक्षोजविकासक्रमाशीं अप-रिचय असलेल्या" प्रौढवधूबरोबर लग्न करणाऱ्या अर्वाचीन तरुणास कसे समजणार असे म्हणत असत. याच्या रसिकपणाची ख्याति होण्याचे मुख्य कारण म्हटलें म्हणजे नेहेमीचीं सामान्य दिसणारीं वाक्यें किंवा कोणी सहज म्हटलेले शब्द यांचा शृंगारविलासात्मक अर्थ लावण्यात हे मोठे कुशल होते हे होय. नारायणराव अलंकार हे राष्ट्रीय पुढारी होऊ पहात होते, आणि त्या पुढारी-पणास त्यांच्या अंगीं असलेली शृंगारविलासी रसिकता हें भांडवल महत्त्वाचे होते. कां की, या रसिकतेच्या तीव्रत्वामुळेच त्यांची स्वराज्यकांक्षा तीव्र झाली होती या तऱ्हेच्या श्लोकाची आवड व स्वराज्यकांक्षा यातील संबंध कोणाच्या लक्षात येण र नाही म्हणून ता जरासा स्पष्ट करून सांगितला पाहिजे स्वराज्यकांक्षा लोकांत उत्पन्न होण्यासाठी आपले वाङ्मय आणि आपली संस्कृति याची आवड लोकात वाढली पाहिजे; जर याची आवड असलेले तरुण देशात उत्पन्न होतील तरच ते स्वराज्य मिळवितील; आपल्या वाङ्मयाची आवड उत्पन्न होण्यास भामिनीविलासासारखे ग्रंथ जितके उपयोगी पडतील तितके कोणतेहि पडणार नाहींत रामायण महाभारत हे ग्रंथ नास्तिकास काय उपयोगी? वाङ्मयातील ज्या पुस्तकाच्या वाच-नास खिस्ती–मुसलमानांच्या धार्मिक समजुतीमुळे देखील हरकत उत्पन्न होणार नाही असे जे वाङ्मय तेंच राष्टीय वाङ्मय होय. आणि त्या राष्ट्रीय वाङ्मयाची आवड जेव्हां उत्पन्न होईल तेव्हांच लोकांत राष्ट्रीयता खरी जागृत होईल. नारायण रावांच्या मताप्रमाणे राष्ट्रीय वाङ्मयाची आवड उत्पन्न करण्यासाठी भामिनीविलासातील शृंगार-विलास हा उत्तम प्रवेशग्रंथ आहे असें नारायण-राव अलंकार मोठया उत्साहानें सागत असत.

नारायणराव अलंकारांचा अस्सल नागपुरी-पणावर हक्क होता, तथापि ते मधून मधून आपल्या कुळाचे संबंध पुण्याशीं भिडवीत असत, दामोदर चाफेकरानें जेव्हां त्यांडचा खून केला तेव्हा ते पुणेकर बनले होते आणि पुणेकरांत कसे पाणी आहे हे नागपूरच्या विद्यार्थ्यास मोठया आवेशाने सागत असत, असा त्यांच्यावर कांही मंडळींनी अपवाद उत्पन्न केला होता. ते पुण्याच्या चळवळीत असलेल्या लोकाशी मोठया ओळखी सागत आणि पुण्यांतील राष्ट्रीय भावना आणि नागपुरातील राष्ट्रीय भावना याचे संयोजक धागे आपण आहोत असे ते लोकांस भासवीत. ते खुद्द लोकमान्य टिळकांच्याकडे पाहुणे उतरले होते, आणि टिळकांच्याकडे संध्याकाळच्या जेव-णास पोळी नसून केवळ भात असल्यामुळे त्याची कशी तारंबळ झाली हेंहि मोठया मजेने दरसाल पचवीस तीस वेळ तरी सागत. टिळ-कांच्याकडचे ताक मात्र फार चांगले असे म्हणून ते त्या ताकाचेहि वर्णन पुष्कळदा करीत. लो. टिळकांची आणि त्याची ओळख केवळ मंडाले-हून आल्यानंतरची नव्हती; तर ते विंचूरकराच्या वाड्यात रहात होते तेव्हापासूनची होती. आपल्या राष्ट्रीय बाण्यास इतकी शिफारसपत्रे देणाऱ्या नारायणराव अलंकारांच्या राष्ट्रीय वृत्तीविषयी शंका घेण्याइतका नास्तिक नागपुरात असणे शक्य तरी आहे काय?

टिळकांच्या अंतेवासी मंडळीपेक्षांहि आपली "राष्ट्रीय" संस्कृति अधिक उच्च तऱ्हेची आहे असे ते मोठया अभिमानाने सांगत असत. लोक-मान्यांच्या अंतेवासी मंडळींमध्ये "राष्ट्रीय" रसि-कता जितकी असावी तितकी नसे अशी नाराय-णराव अलंकार याची तक्रार असे; तरी देखील त्या

कंपूमध्ये एका मनुष्याच्या अगीं ती दिसून येते असे नारायणराव कबूल करीत.ज्याच्या अगीं ती रसिकता आहे असे ते कबूल करीत त्या मनुष्याचे झुणका भाकरीवरील दृष्टांत, गोपाळकाल्याची रूपकें, श्रीखंडाच्या उपमा, याची नारायणरावांनीं अनेक वेळ तारीफ केली होती, तरी देखील आपल्या रूपकाचा नारायणरावास अधिक अभिमान असे पक्वान्नाच्या उपमांपेक्षां स्त्रिया व त्याचे अवयव यांच्या उपमा अधिक राष्ट्रीय होत असे नारायणरावाचे खास मत होते! ते शास्त्रीबोवा बनून त्याचे स्पष्टीकरण येणेप्रमाणे करीत.—उपमेचा अलंकार खुलून दिसण्यासाठीं जे उपमान असेल ते सर्वपरिचित असावे, उपमान जर फार थोडक्या लोकांना परिचित असेल तर ती उपमा पुष्कळ लोकांना समजणारच नाही. पक्वान्ने प्रदेशपरत्वे बदलतात एवढेच नव्हे तर कालपरत्वेहि बदलतात. पण स्त्रियांचे स्वरूप, त्याचे अवयव या गोष्टी सर्व प्रदेशांत आणि सर्व कालांत सारख्याच. तर पक्वान्नांची उपमा दिली तर ती अधिक मर्यादित लोकांना समजणारी म्हणजे "सेक्टेरियन" होय पुण्याचे वातावरण अधिक सेक्टेरियन आहे आणि नागपूरचे वातावरण अधिक व्यापक आहे ही गोष्ट एवढ्यावरूनच सहज सिद्ध होईल! नारायणरावांना एका गोष्टीचा मोठा राग येत असे तो याबद्दल की, पुण्याच्या लोकांनी नारायणरावांची आणि त्यांच्या उपमांची उच्चता कबूल करावयाच्या ऐवजी केवळ पुणेकरांची बाजू उचलून धरण्यासाठीं पक्वान्नाच्या उपमा देणे हा सभ्य विनोद ठरविला आहे, आणि बायकांच्या शरीराच्या व व्यवहाराच्या उपमा देणे हा ग्राम्य विनोद ठरविला, आणि हे पुणेकरांचे केवळ "लौच्य" आहे असे नारायणरावांचे मत झाले होते.

या पक्षांतील दुय्यम व्यक्तींपैकीं दुसरे एक प्रमुख गृहस्थ म्हटले म्हणजे बापूराव भोगळवार हे होत. हेहि एक वकीलच होते, पण यांची वकिली चालत नव्हती आणि आपली वकिली चालत नाही त्यास आपल्या नालायकीपेक्षा निराळे कारण देण्यासाठीं त्यांचा प्रयत्न असे. या प्रयत्नाचे एक अंग म्हटले म्हणजे आपले राजकारणांत किंवा वाङ्मयसेवेत लक्ष आहे, धंद्यांत नाहीं असे लोकांस भासविणे व तसा बोभाटा आपल्या बायकोमार्फत करविणे हे होय. यांची बायको आसपासच्या बायकांकडे जायची आणि म्हणायची कीं "वकिली कशी चांगली चालेल. जेव्हा चांगली चालत होती तेव्हा लोक आग्रह करतात म्हणून विनाकारण राजकीय भानगडींत पडले आणि आपला वेळ तिकडे खर्च करू लागले. खरोखर यांच्या इतक्या बुद्धीचा मनुष्य नाहीं अशी त्यांची विद्यार्थी असतानाच ख्याति होती. लोकांना काय! कोणाची बरी वकीली चालली आहे तर त्याला राजकारणांत खटपट करायला भर द्या. राजकारणांत पडले आणि सरकारचा रोष होऊं लागला म्हणजे पक्षकार म्हणतात की, हा वकील सरकारला आवडत नाहीं, याच्यामार्फत आपली कामं होणार नाहींत. यांना सरकारविरुद्ध चळवळ करण्यास चिथावून देऊन यांची प्रॅक्टिस कमी करण्याची खटपट दुसऱ्या वकीलांनी केली, ती प्रॅक्टिस आपल्याला मिळावी म्हणून केली हे आमच्या भोळ्या यजमानांना कसे समजणार?" इत्यादि गोष्टी बायको वर्डीवरच्या बायकांत बोले. बापू भोगळवार सुधारक नव्हते किंवा स्त्रीपुरुषांचा समान दर्जा म्हणून चर्चा करणाऱ्या मंडळींतले नव्हते. पण यांची बायकोपाशीं कसे वागावे या बाबतींतली वृत्त अनेक स्त्रीदाक्षिण्याच्या अभिमान्यास खालीं पहावयास लावील यांत शंका नाहीं. स्त्रियांना मान द्यावा,त्या सहधर्मचारिणी आहेत हे आपण ओळखले पाहिजे इत्यादि अनेक गोष्टी बोलणाऱ्या मोठमोठ्या वकीलांच्या घरची तपासणी करू

लागले तर प्रकार दिसेल तो असा —नवऱ्यानें सकाळी प्रातर्विधि व चहा करून साडे सात पासून १०॥ पर्यंत पक्षकाराना भेटणे व ब्रीफे वाचणे, तयार करणे या गोष्टी कराव्यात, साडेदहा पासून साडे अकरा पर्यंत जेवण करून साडे अकरा वाजता वकीलकोठीत जावे, ते तेथे साडे-चार–पांच वाजेपर्यंत बसावे, घरीं यावे, चहा वगैरे घ्यावा व क्लबात जावे, क्लबातून आठ–साडेआठ वाजतां यावे, जेवण करावे, पुन्हां पक्षकारानां वगैरे भेटावे आणि पुढे साडे नवापासून रात्री अकरा–साडेअकरापर्यंत पुन्हां लोकांच्या खटल्या-साठी वाचन करावे, आणि इतका वेळ धद्याला द्यावयाचा म्हणजे बायकोशी बोलायचे ते केवळ जेवतेप्रसगी जे बोलणे होईल तेवढेच घरचा व्यवहार असा असू देऊन पुन्हा बायकोला आम्ही सहधर्मचारिणी म्हणून समजतो असे म्हणण्यास ते तयारच; बायकोला खुष करण्यासाठी तिच्या अगावर पैशाचा पाऊस पाडावयाचा आणि तसे केल्याने आपण आपले काम केले असे समजावयाचे, आणि बायकोपाशी बोलणे बोला-वयाचेच झाले तर मुलांसबधाने; दुसरे कशा-बद्दलहि नाही. आपण पैसे जोपर्यंत आणीत आहो तोपर्यंत आपण आपले बायकोसबधानेच कर्तव्य बजावीत आहो असे लोकांस वाटते आणि जो वकील जितका मोठा तितका तो आपल्या सहवासाच्या बाबतीत बायकोला अधिक दुर्लक्षि-णारा होऊ लागतो.

बापू भोगळवार यांजवर असा आक्षेप कधींच घेता आला नसता. ते काय करीत असत हे बाय कोस पुरे ठाऊक असे. रोज पक्षकार कोण आले, त्यांनी किती पैसे दिले हे तर बापू आपल्या बायकोस सागतच असत. आणि जेव्हा जेव्हां त्यांनी कोर्टातली केस जिकली असेल तेव्हा तेव्हां तर त्या केसचे सविस्तर वर्णन बायकोला सांगत असत. त्यांनीं एका केसमध्ये आपली मांडणी केल्यानंतर जज्जाने तुम्ही आपली मांडणी चांगली केली आहे असे म्हटले, तेव्हां त्या न्यायाधीशाची गुणग्राहकता रा. भोगळवार यांनीं आपल्या बायकोस स्पष्टपणे समजावून दिली, एवढेच नव्हे तर त्या जज्जाचा चागला शेरा मिळणे किती कठीण आहे हेहि तिला समजावून सागितले. भोगळवार जरी आपल्या बायकोस पूर्ण विश्वासांत घेत तरी भोगळवाराची बायको जितकी सहा-नुभूतिपूर्ण असावी तितकी नव्हती. ती मराठी २।३ यत्ताच शिकली होती व त्यामुळे नवऱ्याच्या अगी जे अलौकिक लेखकाचे गुण होते त्यांची जाणीव तिला नव्हती. रात्रीचे जेवणखाण आट-पल्यानतर जेव्हा भोगळवार आपली कविता किंवा आपण लिहिलेले निबध बायकोस वाचून दाख-वीत तेव्हां ती ऐकत असे पण ऐकतां ऐकतां जाभया देई किंवा झोपी जाई. या तऱ्हेच्या परि-स्थितीमुळे भोगळवारास स्त्रीशिक्षणाच्या आव-श्यकतेविषयी फारच चागली जाणीव झाली होती, आणि नागपूरची जी स्त्रीशिक्षणविकासेच्छु मडळी खटपट करीत त्या मडळीत देखील भोगळवार जाऊन मिसळत असत, आणि जरी मी राष्ट्रीय कपूपकी आहे तरी तुमच्या राजकीय खेरीज इतर खटपटीत मी सहानुभूति दाखवि-ण्यास तयार आहे असें ते सागत असत.

या राष्ट्रीय मडळीत दुसरे काही सभासद होते; एकदोन डॉक्टर होते पण ते कोकणस्थ होते. तरी राष्ट्रीय गर्भगृहातील मडळी त्यानां तुम्ही अगदीं आमच्यातले आहात म्हणून दाखविण्याचा प्रयत्न करीत. त्याना आतल्या खटपटीत देखील कधीं कधीं घेणे जरूर होते आणि त्याच्यावर विश्वा-सहि पूर्ण आहे असे सागणे जरूर होते, कां की, हे दोघेहि डॉक्टर धाडसी आणि निर्भय म्हणून प्रसिद्ध होते. एक गावातल्या मारामाऱ्यांच्या योजनेत आपल्या विद्यार्थीदशेत उपयोगी पड-लेला होता आणि तालीमबाज होता, व दुसरा

सरकारी अधिकाऱ्यांशी प्रसंग आला तरी आपल्या मनातल्या गोष्टी निर्भयपणे पण स्मितमुखाने सांगत असे. तर अशा मनुष्याला वगळून कसे चालेल किंवा त्याच्यावर अविश्वास दाखवून कसे चालेल. याशिवाय एक जन्मत: तैलंगी पण मागाहून महाराष्ट्रीय बनलेला आणि कोकणस्थांशीं च लग्नव्यवहार करणारा एक वकील होता. याशिवाय दादासाहेब गेगणे यासारखे जुने मुत्सद्दी म्हणून नांवाजलेले गृहस्थ यांत होतेच.

नागपुरात राष्ट्रीय पक्ष म्हणून जो होता, त्यातील लोक प्रथम असहकारितावादी बनले. पुढे आपण असहकारितावादी बनल्यामुळे समाजातील प्रामुख्य मवाळ पक्षाकडे गेले आणि त्या पक्षांतील लोकांसच काही तरी कामगिरी करता आल्यामुळे त्या पक्षातील व्यक्तींच्याच हुशारीची थोडीबहुत ख्याती होऊ लागली हे असहकार पक्षातील मंडळींना दिसू लागले. राष्ट्रीय पक्षातली यवतमाळची मंडळी असहकारितेस मिळाली नाही त्यामुळे कांहीं काळपर्यंत "यवतमाळविरुद्ध हिंदुस्थान" असा लोकमताचा झगडा चालला होता, व मवाळपक्षाच्या सरशीबद्दल असहकारितावाद्यांस जसजसा मत्सर होऊ लागला तसतसे यवतमाळपक्षाच्या मतास जुन्या राष्ट्रीयापैकी अनुयायी नागपुरासच जास्त मिळू लागले व कौन्सिलांत शिरून असहकारिता सुरू करावी हें तत्त्व पुढे आले व कौन्सिलात शिरू इच्छिणाऱ्या मंडळीच्या पक्षास जोर उत्पन्न झाला. कौन्सिलात जाऊ इच्छिणारी मंडळी "कौन्सिलांत जाऊन असहकारिता" या आरोळीने जरी एकत्र झाली तरी त्यांची आपापसांत चांगली ओळख नव्हती व त्यांच्यामध्ये आपल्याच पैकी कोणास तरी ३।४ हजार रुपये पगार मिळावा याविषयी मत्सर होता; आपणांस तो पगार मिळणार नाहीं हे सामान्य मंडळीस ठाऊक होते, व आपणांस लठ्ठ पगार मिळणार नाहीं तर दुसऱ्या कोणासहि मिळू नये असे वाटत होते. त्यामुळे सर्व प्रकारच्या कौन्सिलांत शिरू इच्छिणाऱ्या लोकांस पटेल अशी मांडणी करण्याची जरूरी होती यामुळे व आपला निःस्वार्थीपणा लोकांस दाखवून मतें मिळविण्याची खटपट करावयाची असल्यामुळे कौन्सिलात जावे पण दिवाणगिऱ्या स्वीकारू नयेत या तत्त्वास पुढे मांडावे लागले; व त्याचा अंतिम हेतु द्विदलराज्यपद्धति मोडणे हा आहे असे दाखवावे लागले. इतकी हुशारी केल्यावर त्या पक्षास जोराचा पाठिंबा मिळाला. कौन्सिलात जावयाचे काहीं काम करावयाचे नाहीं दिवाणगिऱ्याबद्दल पगारच मंजूर करावयाचा नाहीं, व येणेप्रमाणे द्विदल राज्यपद्धति बंद पाडावयाची इत्यादि तत्त्वे निघाली, व द्विदल राज्यपद्धति देखील बंद पडली. पण कौन्सिलात जाऊन तुम्हांस काहीं करावयाचे नाहीं तर तिकडे गेला कशाला अशा तऱ्हेची भाषा गावातले लोक बोलू लागले, तेव्हा आपल्यातील कोणी तरी दिवाणगिरी पत्करू द्यावी अशा तऱ्हेचे तत्त्व निघाले.

राष्ट्रीय पक्षातली मंडळी असहकारितावादी झाली होती त्यावेळेस खादी वगैरे गोष्टींचा पुरस्कार म. गांधींनी केल्यामुळे आणि त्याबरोबर दुसऱ्या अवांतर गोष्टी आणल्यामुळे व्यापारी मंडळींची सहानुभूति त्या पक्षाला मिळून असहकारिता पक्ष जोरात आला होता पुढे त्या पक्षात फाटाफूट होऊन कौन्सिलात शिरण्याच्या कार्यक्रमास अनुकूल असलेली मंडळी निराळी निघाली, तरी व्यापारी मंडळींनीं राजकारणाले आपले लक्ष शिथिल केले नव्हतें कौन्सिलात जाणे पुढे मान्य झाले पण त्या मंडळीत पुढे फूट पडून कौन्सिलांत जाणारी पण दिवाणगिऱ्या घ्याव्यात कीं घेऊ नयेत यावर मतभेद होऊन पुन्हां दुही झाली, त्यावेळेस व्यापारी मंडळी दिवाणगिऱ्या घेऊ नयेत या मताची झाली. अशा प्रसंगी निवडणूक जिंकावयाचे काम कठिण होऊ लागले होतें व त्यासाठी प्रतिसहकारपक्षाची तयारी जोरानें

झाल्ली होती, आणि या तयारीचाच भाग म्हणून स्वामी ब्रह्मगिरीस आमंत्रण करण्यात आलें होतें.

बापू भोंगळवार यांच्याकडे स्वामी ब्रह्मगिरींचा कितपत उपयोग करून घ्यावा यासंबंधानें चर्चा करण्यासाठीं बैठक होती. आज बापू भोंगळवारांकडे मंडळी जमली होती ती स्वामी ब्रह्मगिरि डॉ. नंदिका हिच्याकडे जेवायला गेले होते, ती वेळ साधून जमली होती त्याच वेळेस दादासाहेब गेगणे यांनीं देखील व पूराव भोंगळवाराच्याकडेसच येण्याचे ठरविलें होते. नवीन पाहुणे आले त्याच्या विषयी संवाद व्हावयाचा होता, तर तो गेगण्यांच्या घरीं नको होता. कां की, संवाद चालू असता तो लांबला आणि जर पाहुणे अचानक घरीं आले तर करा काय? तसें झाल्यास जमलेल्या मंडळीचा विरस होणार होता. त्यातल्या त्यात दुसरी अशी एक गोष्ट होती की, बापू भोंगळवारांकडे मंडळींनी जमावें इतकें त्याला महत्त्व कधींच मिळालें नाही तर तें आता तरी दिलें पाहिजे, त्याच्या गरीबीकडे लक्ष न देता आम्ही त्याच्याहि घरीं जमलो असें त्यालाच वाटलें पाहिजे याचें महत्त्व प्रतिसहकारपक्षांतील अधिक शिष्ट मंडळी जाणून होती, व ही जाणीव त्यास व्यक्त करून दाखवावयाची होती, कारण पुढच्या इलेक्शनच्या वेळेस बापूचा उपयोग करून घ्यावयाचा आहे हे दादासाहेब गेगणे चांगल्या तऱ्हेने ओळखत होते.

तेथे पक्षांतली बरीच प्रमुख मंडळी जमली होती, नारायणराव अलंकार त्यात आपली राष्ट्रीय रसिकता व्यक्त करण्यासाठीं हजर होतच हें सांगावयाची आवश्यकता नाहीं.

"हा मनुष्य कसा काय आहे; नागपूरची मंडळी आपल्याकडे ओढण्यास त्याचा कसा काय उपयोग होईल" अशी नारायणरावांनीं पृच्छा केली.

"मनुष्य हुशार, अत्यंत बहुश्रुत आणि स्वतंत्र विचार करणारा दिसतो." दादासाहेब आपल्या पांढऱ्या शुभ्र दाढीवरून हात फिरवीत बोलले.

"वा; फारच चांगलें, अशा मनुष्याची ओळख अवश्य पाहिजे." दुसरा एक तरुण पोरगेवजा वकील बोलला.

"तुम्हा तरुण मंडळींना समजत नाहीं तें येथेंच. अरे, आपल्याला स्वतंत्र विचाराच्या मंडळीशीं काय करावयाचें आहे! शिवाय मनुष्य जितका बुद्धिमान तितका तो अविश्वसनीय समजावा. तो आपल्या मंडळीच्या तंत्रानें वागणार नाहीं."

"पण प्रत्येक मनुष्य आपल्या तंत्रानें वागणारा किंवा न वागणारा एवढ्याच गोष्टीकडे पाहून माणसाचें वर्गीकरण करावयाचें काय?" पुनः तो तरुण वकील म्हणाला.

"अर्थात नाही! आपण मनुष्य चांगला किंवा वाईट याविषयीं विचार करीत नसून आपल्याला तो उपयोगी कसा पडेल याच्या दृष्टीने आपण विचार केला पाहिजे. कालिदास चांगला कवि असेल, आणि पाणिनि चांगला वैय्याकरण असेल पण त्याचें महत्त्व आपल्याला काय? विद्वान माणसांना आपण जवळ करावयाचें तें आपल्या प्रभावळीचें महत्त्व वाढण्यासाठींच होय. पण त्याबरोबर आपण हेंहि पाहिलें पाहिजे कीं, जो मनुष्य आपण पुढें आणू तो आपणास डोईजड होतां कामा नये. जर आपण एखाद्या मनुष्याची हुशार आणि विद्वान म्हणून स्तुति केली आणि त्याची लोकांपुढें बढती केली आणि तो मनुष्य पुढें आपल्या पक्षावरच उलटला तर काय करावयाचें?"

"तर मग तुम्ही काय योजिलें आहे?"

"त्याचें व्याख्यान येथें करवू नये असें वाटतें. आपण स्वामींना असें सांगू कीं, येथील लोकांस गीतेची चाड फारशी नाहीं, सार्वजनिक व्याख्यानाची जरूरी नाहीं."

"पण आपण त्यांस व्याख्यानासाठीं बोलावले आहे."

"तर मग आपण खासगी प्रवचन करवू. त्या प्रवचनास कट्टी प्रतिसहकारपक्षाची मडळी हजर रहावी, आणि त्या मडळींनी त्याचे प्रवचन ऐकल्यानतर त्यांची स्वत. खासगी तऱ्हेने तारीफ करावी पण बाहेर कांहीं बोलू नये."

"पण तुम्हांस यांची इतकी भीति वाटावयास कारण काय झाले?"

"कारणें पुष्कळच आहेत; एक तर तो असे म्हणतो कीं आपल्याकडे नैतिक भावनेची आवश्यकता आहे; आणि आत्मशासनासाठी काय केलें पाहिजे या सबधाच्या विचाराचा अभाव आहे."

"मग, यांत बाधगे काय झाले?"

"बाधगे असें झाले की, जर हे विचार तो उघडपणे बोलूं लागला तर राजकीय सुधारणा अपुऱ्या आहेत, मध्याच्या दिवसांत काही एक करता येणार नाहीं असें जे आपण म्हणत आलों त्याला हरताळ लागेल कीं नाही? शिवाय मी असे म्हणतो की, राजकीय गोष्टींविषयी न बोलणारा हा विद्वान् असता तर गोष्ट निराळी. आपण त्यास पुढे आणण्यास हरकत नाहीं; पण हा राजकीय गोष्टींविषयी चर्चा करणारा आहे, व सन्यासी आहे, त्यामुळे लोकांवर त्याचें वजन पडेल, तो सडासोट असल्यामुळे कामहि सपाटून करील व हा सन्यासी असल्यामुळे याची कोठे मिनिस्टर वगैरे होण्याची इच्छा नाहीं असें गृहीत धरलें जाईल आणि त्यामुळे हाच सर्व राजकारणाचा सूत्रचालक होण्याचा सभव आहे."

"ब्रह्मगिरींनां राजकारणांत प्रामुख्य येऊं द्यावयाचें नाहीं, हें तत्त्व आपणास कबूल आहे. पण त्यांनां आपल्याच कामाला आपण का लावू नये? यांनां जागा नकोच आहे आणि आपणाला जागा मिळण्याशीं कारण!" नारायणराव मुत्सद्दीपणाच्या मुद्रेनें बोलले.

"ब्रह्मगिरींनां आपल्या पक्षानें केवळ निवडणुक जिंकून स्वस्थ बसावयाचे रुचणार नाहीं; शिवाय त्याचे लक्ष निवडणूक जिंकण्याकडे मुख्यत्वाने नसून कोणते कार्य करण्यासाठीं निवडणूक जिकावयाची अशी पृच्छा ते करतात. त्यानां विशिष्ट गोष्टी करावयाच्या आहेत. जर त्याचा कार्यक्रम आपण पत्करला नाही तर ते दुसऱ्या पक्षाला मिळतील. आणि जर पत्करला तर तो कार्यक्रम गळ्यात पडेल; आणि तो गळ्यात पडला तर त्याना इतके प्रामुख्य मिळेल की, राजकारणात आपल्याला दुय्यमपणाच पत्करावा लागेल." दादासाहेब म्हणाले.

"त्याचा जो कार्यक्रम आहे तो ऐकून घ्यावा, वाटेल तर पत्करावा, नाही तर पत्करू नये." बापूराव भोंगळवार बोलले.

"तुम्हांला समजत नाही तें येथेच. आम्ही जें धोरण ठरविले ते फार विचार करून ठरविले आहे. अधिकाराच्या जागा देखील आपल्या कबजांत घ्यावयाच्या हे आपण ठरविलेच आहे. तसे ठरविलें असले तरी सध्याच्या स्थितीत आपणास काही एक करता येणार नाही म्हणून आपण ओरड ठेवलीच पाहिजे नाही तर आपलें वजन काही एक रहाणार नाही. काही तरी करतां येईल असे आपण एकदा कबूल केले म्हणजे लोक म्हणणार कीं तुमचा कार्यक्रम तो काय आहे, व कार्यक्रम सांगायचा म्हटला म्हणजे तो कार्यक्रम ज्यांना सांगता येईल व आपले म्हणणे लोकांना पटवता येईल अशा लोकांच्या हातात सत्ता जाणार, आणि यूरोप-अमेरिकेहून नवीन नवीन गोष्टी पाहून आलेलीं पोरें कार्यक्रम सांगत बसणार. ते म्हणणार कीं आपल्याला या गोष्टी केल्या पाहिजेत, त्या गोष्टी केल्या पाहिजेत. तसें ते बोलायला लागले म्हणजे कोणकोणत्या गोष्टी सुधारलेल्या देशात आहेत त्या

सांगणारे पोरगे पुढें येतील, लोकांनां भुरळ घालतील, कांहीं तरी करायला पाहिजे म्हणून आज लोकांनां वाटतें हें पाहून हे अनेक अशक्य पण सुंदर योजना सांगतील, आणि त्यांनीं काढलेल्या कल्पनाचित्रामुळे मोहून जाऊन लोक त्यांच्याच पाठीमागें लागतील."

"तर मग आपण काय ठरविलें आहे?"

"आपण असें ठरवलें आहे की लुच्च्या आणि मिथ्या लोकांच्या हातीं अधिकार जाऊं नये म्हणून दिवाणगिऱ्या स्वीकारावयाच तत्त्व मान्य करून दिवाणगिऱ्या काबीज करावयाच्या. आणि आपल्यापाशी आज कार्यक्रम कांहीच नाहीं तर नोकरशाहीच्या बदमाषीमुळे आजच्या दिवसांत कांहींएक करतां यण्याजोगे नाही म्हणून ओरड करावयाची."

"पण ज्या लोकाच्या मनात काही कार्यक्रम असेल त्या लोकांच्या कल्पनेचा फायदा आपण कां घेऊ नये."

"दिवाणगिऱ्या आपल्या ताब्यांत येईपर्यंत आपण काही कार्यक्रमवाले पुढे आले तर त्याना स्वार्थी म्हणू ते खोटया थापा देत आहेत म्हणून सांगू. काही गरज असलेले लोक ज्याप्रमाणे नोकरशाहीच्या पुढे पूर्वी जात असत, त्याप्रमाणे आपल्यापुढे गरजवाले हात जोडून आले म्हणजे त्यांकडे आपण लक्ष देऊ, व ते आपल्या फंडांनां ज्या प्रमाणांत वर्गणी देतील त्या प्रमाणांत लक्ष देऊं. त्यांना जर कार्यक्रमाची चाड असेल व दिवाणगिरीसाठीं ते हपापले नसतील तर त्यांनींहि आमच्याकडे आम्ही अधिकारावर आरूढ झाल्यानतर यावे. ते जर तेव्हां आले तर त्यांच्या कार्यक्रमाचा सावकाशपणे विचारहि करू; पण आज कांहीं करता येणार नाही ही आरोळी सोडतां कामा नये."

"पण असें करणे म्हणजे लबाडी होणार नाही काय" तेथलाच एक पालिटिक्स कमी समजणारा तरुण बोलला.

इतक्यांत एक पुण्याचा कसलेला पुढारी तेथें आला होता; तो म्हणाला; "अहो, लबाडी कसची? लबाडी ही कल्पनाच चुकीची आहे. हा "गनीमी कावा" आहे, हें "मराठ्याचें ब्रीद" आहे."

"पण ब्रह्मगिरींनां पुढें येऊं द्यावें यांत बिघडल कोणतें!"

"अरे, आपल्याला जी खरी भीति आहे ती कार्यक्रमवाल्यांचीच आहे; आपण जन्मभर राजकारण केले, सरकारचा पुष्कळ त्रास सोसला आणि त्याचें फळ आपल्याला अजून मिळावयाचें राहिलें आहे. जर कार्यक्रमवाले पुढे आले तर आपल्याला पचाईत उत्पन्न होणार नाही काय? त्यानां पुढे यावयाचें असेल तर त्यांनां स्वतःच्या भाडवलावर पुढें येऊं द्या."

"ब्रह्मगिरि राजकारणात शिरणार आहेत कशावरून? शिवाय लोकास भुरळ पाडील इतका ब्रह्मगिरीपाशी कार्यक्रम आहे काय?"

"त्याच्या पोतडीत पुष्कळ चिजा असाव्यात असे दिसते, मजूरासाठी काय केले पाहिजे. राहणी सुधारण्याविषयी काय केले पाहिजे इत्यादि अनेक गोष्टीविषयी तो बोलतो. तो जर या कामालाच लागला तर बऱ्याच कोष्टी मंडळींची मने एका सपाटयासरशी मारील."

"पण आपण व्यावहारिक गोष्टी बोलायला त्याला सधीच देऊं नये. ब्रह्म, माया, सन्यासमार्ग आणि कर्मवाद इत्यादि गोष्टीच बोलत त्याला गुतवून ठेवावा म्हणजे झाले." बापूराव भोगळवार म्हणाले.

"शिवाय जर ब्रह्मगिरि लोकप्रिय फार होऊ लागला तर त्याला उलथून पडण्यासाठी आपल्यापाशी गोष्टी कमी आहेत काय?" गनीमी काव्याचे अभिमानी पुणेकर बोलले.

"आपल्यापाशीं काय गोष्टी आहेत?" दादासाहेब विचारतात.

"पुष्कळच आहेत. ते इतकीं वर्षे यूरोपांत राहिले ते मांसाहाराशिवायच राहिले असतील काय! ते इंग्लंडमध्यें असतांना त्यांनीं काय काय खाल्लें हें विचारा, आणि पुढें त्याच्याकडून मांसाहार केल्याचा कबूली जबाब आला म्हणजे स्वामी असून मांसाहार करतो वगैरे गोष्टी जाहीर रीतीनें कधीं तरी लोकांपुढे मांडू."

हें बोलणें ऐकून सर्व मंडळींना मौज वाटली. तेव्हां दादासाहेब म्हणाले; आतां तुम्हीं मार्गावर आला. ज्या मनुष्याला तुम्हीं पुढें सारणार तो जर फार लोकप्रिय होऊं लागला तर त्याला खालीं कसें पाडतां येईल याचा विचार करून मग जर त्याची नागपूरच्या जनतेशीं ओळख करून दिली तर हरकत नाहीं कदाचित् इलेक्शन होऊन जाईपर्यंत त्याला आपल्या पक्षालाच चिकटवून ठेवतां येईल."

अखेरीस जमलेल्या गुप्तसभेचें ब्रह्मगिरीस बोलू द्यावयाचें ठरलें.

---

## प्रकरण १२ वें.

## लालनाथांच्या मनांतील क्षोभ.

संध्याकाळीं लालनाथ घरीं आले ते आपल्या बायकोच्या आगमनाची वाट पहात होते. आपल्या कौटुंबिक भवितव्याविषयीं त्यांच्या मनांत विचार वारंवार जागृत होत होता. आपण जीवर अत्यंत प्रेम करतो ती आपली बायको आपल्याशीं जन्मभर इमानीपणानें राहील किंवा नाहीं, आणि ती सरकारी नोकरीसाठीं खटपट करीत आहे ती नोकरी तिला मिळाली तर आपली कौटुंबिक स्थिति सुधारेल कीं अधोगतीस जाईल याविषयीं ते विचार करीत होते. त्यांच्या मनांत डॉ. परमानंद याची वारंवार आठवण होत होती, पण त्या आठवणीबरोबर आल्हादकारक विचार उत्पन्न होत नव्हते. लालनाथानां परमानंदाविषयीं जें काय निरनिराळ्या वेळेस वाटत होतें तें समजण्यास त्याच्या आयुष्यक्रमाची हकीगत अवश्य आहे.

डॉ. परमानंद यांचें आयुष्य म्हणजे जे सुशिक्षित पण ज्यांचें लग्न कांहीं कारणामुळे विशेषेंकरून शिक्षणलालसेमुळें लांबणीवर पडलें आहे अशा लोकांच्या आयुष्यक्रमाचा निदर्शक एक इतिहासच होईल. हे जातीचे वाणी; मुंबईस यांचे वडील व्यापारांत पुढें आलेले होते आणि यांनीं आपल्या मुलास शिक्षण चांगलें दिलें व पुढें अभ्यास करण्यासाठीं विदेशीं पाठविलें, आणि त्यामुळें एडिंबरोला अभ्यास करून आय्. एम्. एस्. मध्यें डॉ. परमानंद यास प्रवेश करून घेता आला. परमानंदाचा आय् एम्. एस् मध्यें प्रवेश झाल्यानंतर ते प्रथम हिंदुस्थानांतील सरहद्दीवरच्या कांहीं ठाण्यांत काम करीत होते आणि त्यामुळें महाराष्ट्रांत त्यांनां वधूसंशोधनाकडे फारसें लक्षच देतां आलें नाहीं बापानें कांहीं मुली पसंत करून ठेवल्या होत्या त्या मुलाला पसंत नव्हत्या. प्रथम आपल्या कांहीं आप्तांपैकीं कोणातरी मुलीशीं डॉ. परमानंद याचें लग्न व्हावें अशी बापाची इच्छा होती पण मुलाची नव्हती मुली ज्या दाखवावयाला आणल्या त्या बारापासून चौदा वर्षांच्या आणि परमानंदाचें वय मात्र एकोणतीसतिशीच्या वर गेलेलें. त्यामुळें त्यांना या सर्व मुली लहान वाटत आणि अशा अर्भकाशीं लग्न करून मी काय करूं असें वाटे. ते पुष्कळदां म्हणत कीं माझें बालवयांत लग्न झालें असतें तर बरें झालें असतें. जी मुलगी त्या वेळेस दहाबारा वर्षांची असती ती आज अठराविशीच्या जवळजवळ आली असती. आणि सत्संगानें कांहीं तरी सुशिक्षित झाली असती. बरें, याबद्दल मी वडिलांनां तरी दोष कसा देऊं? वाटेल तर माझें लग्न लहानपणींच व्हावें या मताचे होते. मीच त्यांनां रुकार दिला नाहीं. माझ्या वडिलांनीं माझ्यावर सक्ती करूनच लग्न करून टाकावयाला पाहिजे

होतें. ज्या मंडळीचें लहानपणींच लग्न सक्तीने झालें आहे ती मंडळी देखील कौटुंबिक सुखांत रंगून गेलेली मी पाहिली आहे. मला प्रथम आपल्यावर जुलूम झाला असे वाटले असते पण, तो खरोखर आवडता जुलूम झाला असता, आणि हळू हळू लग्न झालेल्या बायकोवर प्रेम जडलेच असते. छे, छे! बालविवाहाची पद्धत फारच चांगली. लहानपणीं लग्न झाले म्हणजे अंतःकरण इकडे तिकडे भटकत नाहीं. तें स्थिर होतें. आयुष्याला सुरळीतपणा उत्पन्न होऊन चांगली दिशा लागते. बालविवाहाच्या विरुद्ध चळवळ झाली ही चुकीची झाली; आतां मला आमच्या जातींत शिकलेल्या मोठाल्या मुली मिळत नाहीत त्यामुळें प्रसंगीं परक्या जातीच्या मुलीशी देखील लग्न करण्याची माझी तयारी झाली आहे. आणि त्याचे परिणाम कांही चांगले होणार नाहींत. माझ्या जातींतल्या ज्या मंडळीवर मी प्रेम करतो ती मंडळी माझ्यापासून दूर होतील पण माझें मात्र प्रेम माझ्या मंडळींवर राहील. पण मला आमची मंडळी तुसडेपणानेच वागवितील; पण तेंच गरिबीनें सहन केलेंच पाहिजे; या तऱ्हेचे विचार ते लालनाथाशीं मोकळ्या मनाने बोलत असत. त्यांना असे वाटे कीं लालनाथांच्या ओळखी सुधारक मंडळींत पुष्कळ आहेत. ते आपल्याला मदत करूं शकतील.

"सक्तीची खुशी किंवा खुशीची सक्ति" ही जगात पाहिजेच आणि चालू पिढीचीं लग्नें अशा सक्तीच्या खुशीनेच वडिलांना घडवून आणली पाहिजेत असे ते विद्यार्थी मंडळींबरोबर बोलत किंवा ओळखीच्या कुटुंबाशीं बोलत त्यामुळे ते विद्यार्थ्यांमध्ये तसेच विद्यार्थ्यांच्या घरच्या वडील मंडळांमध्ये प्रिय झाले होते. विद्यार्थ्यांत लोकप्रिय झाले कारण पुष्कळशा विद्यार्थ्यांना ते नको नको म्हणत असता त्यांच्यावर लग्न करण्याची सक्ती वडील मंडळींनीं करावी हे इष्ट होतें. वडील मंडळींना ते प्रिय झाले होते कां कीं तसें करण्यांत वडील मंडळीचा लग्नाच्या बाबतींत सक्ती देखील करण्याचा अधिकार डॉक्टरांसारख्या पाश्चात्यविद्याविभूषित मनुष्याने कबूल केला असें त्यास वाटे.

आपल्या लग्नाविषयीं डॉ. परमानंद हे लालनाथाचा सल्ला घेत होते तेव्हा आपल्याला इतकें विश्वासांत घेतलें याबद्दल लालनाथांना आनंदच झाला. ते जेव्हां माझे लहानपणींच लग्न झाले असते तर बरें झालें असतें असें म्हणत तेव्हा त्यास त्यांच्याविषयीं जरी सहानुभूतिक मतैक्य वाटलें नाहीं तरी अनुकंपायुक्त स्नेहबुद्धि वाटे; पण ती देखील फार दिवस टिकली नाहीं. डॉ. परमानंद यांनी आपल्या बायकोस वारंवार भेटावयास यावें आणि कधीं कधीं आपण घरी येण्याच्या अगोदर डॉ. परमानंद आपल्या घरीं चहा घेताना दिसावेत हें त्यास आवडेनासें झालें. पण कधीं कधीं आपण त्यांच्याविषयीं मनात विनाकारण विकल्प आणीत आहोंत असे वाटे. आपल्याला चांगली बायको मिळवून देण्यासाठीं डॉ. नंदिकेला परमानंदांनी एकदोनदां आग्रह करत ना जेव्हा लालनाथानें पाहिलें तेव्हा बायकोशी यांची घसट असलेली बरी नाहीं असा जो विचार आला तो मनातल्या मनात जिरून गेला. तथापि डॉ. परमानंद यांच्याबरोबर नंदिकेने फिरावयास जावें असें त्यास वाटत नसे. पण त्यानी आपला आक्षेप एकाएकी बोलून दाखविला नाहीं, व त्यामुळे ते जेव्हा मोटार घेऊन येत तेव्हां नंदिका त्यांच्याबरोबर फिरावयास जाई. व पुढें लालनाथास अशी पंचाईत पडूं लागली कीं बायकोला त्यांच्याबरोबर जाऊं नको असें म्हणावें तर बायकोवर अविश्वास दाखविल्यासारखें होतें, आणि मनात संशय आला तरी तो दाखविणं हितावह नाहीं. जर आपण दोघांच्या भेटीचा निषेध केला तर त्याने चांगले

परिणाम होतील काय? बायको डॉक्टरीण, तिला डॉ. परमानंदांनीं एखाद्या केससाठीं कामठीला बोलावलें तर तिला गेलेंच पाहिजे एवढेंच नव्हे तर तिला आपण जाऊं न देणें हें लोकांच्या दृष्टीनें गैर ठरणार! लोक म्हणणार कीं तूं जर इतका सशयी नवरा आहेस तर मूर्खा, बायकोला शिकवून डॉक्टरीण केलीस कशाला? आणि या तऱ्हेच्या गोष्टी केवळ "स्त्रियांचे कैवारी"च बोलतील असें नाहीं तर डॉक्टरणीची गरज असलेले साधे लोक देखील बोलतील. या तऱ्हेच्या विचारांनीं लालनाथांचें मन व्याप्त असतां त्यांस असें वाटलें कीं, स्वामी ब्रह्मगिरींचें आगमन हा एक खरोखरच अलभ्य लाभ आहे. ब्रह्मगिरींविषयीं जर नंदिकेच्या मनांत आदर आहे, आणि नंदिकेला जर इतर लोकांचे आणि विशेषेंकरून तिला लहानपणापासून ओळखणाऱ्या इतर लोकांचें मत आपल्याविषयीं चांगलें राहिलें पाहिजे असे वाटूं लागलें तर ती गोष्ट हिताची होईल.

या तऱ्हेचे विचार चालू असतां त्यास नंदिकेचीं कांहीं संभाषणें आठवलीं आणि त्या संभाषणांचा त्यांना खोल अर्थ भासू लागला. बर्नार्डशा यांच्या नाटकामध्ये एका नाटकाचें चमत्कारिक संविधानक म्हणून नंदिकेनें नवऱ्यास सांगितलें होतें व तें नाटक वाचूनहि दाखविलें होतें. त्या संविधानकांत तरुण मुलांच्या वाखाणणीची आणि प्रेमपत्राची आवड असलेली पण लग्न झालेली एक स्त्री दाखविली होती. त्या स्त्रीचें नांव "उषा" या अर्थाचें होतें. तिच्यावर एका तरुणानें प्रेमकाव्यें केलीं तीं काव्यें "उषे"वर होतीं, आणि अनेक भीन भीन केलेल्या प्रेमकाव्यांप्रमाणें व्यर्थी होतीं. तीं प्रेमकाव्यें तिच्या नवऱ्याच्या हातीं पडलीं पण त्याचा परिणाम तीं प्रेमकाव्यें लिहिणाऱ्या तरुणानें कल्पिला होता त्यापेक्षां निराळाच झाला. नवऱ्याला आपली बायको इतकी देखणी आहे कीं तरुण मंडळी तिच्यावर आसक्त होऊन प्रेमानें बेफाम होतात याबद्दल राग न येतां अभिमानयुक्त आनंद झाला असें त्या नाटकांत दाखविलें आहे. हें नाटक जेव्हां बायकोनें प्रथम वाचून दाखविलें तेव्हां लालनाथ खूप हंसले होते, व नवऱ्याचें स्वभावचित्र मजेदार दाखविलें आहे असेहि त्यांनीं उद्गार काढले होते, पण आतां त्यांच्या मनांत जरासे निराळे विचार येत होते. हें नाटक वाचून दाखविण्यात बायकोचा उद्देश काय बरें असावा? डॉ. परमानंद तिच्यावर प्रेम करूं लागले याबद्दल मी आनंद मानावा अशीच तिची अपेक्षा आहे काय? मी इतका निर्मत्सर नवरा बनावें हें तिचें ध्येय आहे काय? असले विचार मनांत आले आणि ते मनाशीं म्हणाले छे! इंग्लंडला मुली शिकायला जाऊं लागल्या म्हणजे त्या "प्लेटोनिक लव्ह"च्या गोष्टी बोलूं लागतात, आणि ती "प्लेटोनिक लव्ह" कांहीं जगांत सांपडत नाहीं, प्लेटोनिक लव्ह म्हणजे लोखंड चांगलें तापण्यापूर्वीची स्थिति आहे, आणि नंतर "तप्तेनतप्तमयसा घटनाय योग्यम्' असेंच होतें. हें मला ठाऊक आहे.

लालनाथांच्या मनांत दुसऱ्या अनेक गोष्टी आल्या. आपल्या आयुष्यास आपण जें वळण लावूं इच्छीत होतो तें बाजूला राहून आपणांस अनपेक्षित असे निराळे परिणाम दृष्टीस पडूं लागले, याचें कारण काय बरें असावें असा त्यांनीं आपल्या मनास प्रश्न केला. आपल्या स्त्रीस आपण उच्च शिक्षण दिलें त्याचा परिणाम तिची कृतज्ञता वाढावी व तिनें आपल्यावर अधिक प्रेम करावें हा न होतां विपरीत कां झाला, या गोष्टीवर विचार करतां करतां त्यांना अनेक गोष्टी आठवल्या. आपली बायको इंग्लंडहून आली, तिचीं मोठमोठ्या मंडळींत चहा झाली आणि तिच्या अनेक मोठ्या मंडळींबरोबर ओळखी झाल्या, तिची प्रॅक्टिस सुरू झाल्यानंतर तिला

पैसाहि बरा मिळूं लागला. त्या बरोबर आपली पूर्वीची साधी राहणी तिच्या वाढत्या ऐश्वर्याशी कशी विसंगत दिसू लागली हेहि त्यांस आठवूं लागले. आपण साध्या कारकुनाप्रमाणे पोषाख करीत होतो, त्या पोषाखात आपण सुंदर पोषाख करणाऱ्या आपल्या बायकोबरोबर फिरावयास जावे हें पुढे आपणासच वाईट दिसूं लागलें; आणि आपण जेव्हा पोषाखाकडे पैसे जास्त खर्च केले तेव्हां आपली ऑफिसमध्यें टवाळी कशी झाली हेहि आठवले. आफिसमधल्या मडळीनां आपण त्याच्यापेक्षां निराळ्या दर्जाचा पोषाख करणे बरे वाटत नाही; बायको डॉक्टरीण झाल्याबरोबर यांचा पोषाख बदलला अशी टीका आपल्यावर होऊ लागल्यामुळे आपण पहिले कांहीं दिवस कसे अस्वस्थ झालो होतो हेहि त्यांस आठवले.

आपण व आपली बायको ही जर एका अरण्यात असतो तर आपल्या बायकोच्या वृत्तीत फेर पडला नसता, हे उघड आहे. पण बायकोने नवऱ्यापेक्षा अधिक उच्च पदवीला असावे ही गोष्ट जगास खपत नाहीं आणि आपण जरी आपल्या मनामध्ये निराळी दृष्टि ठेवली तरी ती दृष्टि जग टिकू देणार नाहीं असे त्यास भासले.

कृतज्ञता व तिचे प्रेमात महत्त्व याविषयीहि ते विचार करू लागले, आणि कृतज्ञतेमुळे प्रेम वाढत नाही व बायकोच्या उन्नतीसाठी नवऱ्याने प्रयत्न केला तर तो विवाहाच्या चिरस्थितीस कारण होत नाही असे लालनाथानी ठरविले. उन्नतास पोंचविणाराच्या मनाची स्थिति उन्नतीस पोंचविणाराशीं कृतज्ञतेची जगांतील इतर व्यवहारांत दिसत नाहीं. जर एखाद्या हुषार मनुष्यास कोणी एखाद्या संस्थेने पैसे देऊन शिक्षण दिलें तर तें उच्च शिक्षण मिळाल्यानतर त्या विद्यार्थ्यास नवीन कार्यक्षेत्र दिसू लागते आणि त्यास त्या संस्थेचीं अल्प उत्पन्नाची व अल्प कार्यक्षेत्राची नोकरी दुःखकारक वाटूं लागते किंवा एखाद्या कारखानदाराने मोठ्या काळजीपूर्वक माणसे तयार केली तर तीं माणसे अधिक लायक झाल्यानंतर त्या कारखान्यास चिकटून न राहता आपल्या महत्त्वाकाक्षेच्या पूर्तीसाठीं निराळा कारखाना पाहतात व जिकडे दोन पैसे अधिक मिळतील तिकडे जातात. हा मनुष्यस्वभाव एकदर बाहेरच्या व्यवहारांत दिसून येतो, तर कौटुंबीक व्यवहारांत तो मनुष्यस्वभाव लोपेल काय? कारखान्याचा मालक आणि कारखाना आपल्या योग्य नाहीं असे अधिक प्रवीणता प्राप्त झालेल्या कारागिरास वाटते व कारागीर तो कारखाना सोडून देतो. अशा प्रसगी त्यास कोणी दोष देत नाहीं. जर एखादी स्त्री नवऱ्याच्या मदतीने उच्च शिक्षण प्राप्त करून घेऊन पुढे आली आणि तिला आपला नवरा आपल्यापेक्षां कमी योग्यतेचा वाटूं लागला आणि अशा वेळी तिने तो आपला नवरा टाकून देऊन ज्या पुरुषाच्याबरोबर आपणास अधिक पुढे येता येईल असा नवरा पत्करला तर त्या स्त्रीचा दोष काय? अशा प्रकारचे विचार देखील त्याच्या मनात आल्याखेरीज राहिले नाहींत. आपल्या बायकोचे वर्तन या दृष्टीने आपण पाहूं लागलों तर गर्हणीय दिसत नाहीं, निदान अस्वाभाविक नाहीं. ती जर या बाबतीत दोषी नसेल तर आपण दोषी आहोत असे सरळ सत्य निघत नाही काय?

एकदरींत आपण आपल्या बायकोला तिची आपल्यापेक्षां अधिक योग्यता वाढविणारें शिक्षण दिले हीच मोठी चूक केली. आपण आपणांस पेचांत टाकले असें नाहीं तर आपण तिलाहि पेचात टाकले आहे. आपण वेडीवाकडी परिस्थिति उत्पन्न करून सद्वर्तनी व प्रेमळ अशा आपल्या बायकोच्या भोंवताली मोहाचें जाळें विनाकारण उपस्थित करून ठेवलें आहे. आपण आपल्यालाच थोबाडीत मारून घेतली पाहिजे.

लालनाथांचे विचार पुढेंहि चालू असते पण इतक्यात स्वामी ब्रह्मगिरि तेथें आले, व त्यामुळें त्यांचें व्याख्यान केव्हां होणार इत्यादि गोष्टी बोलण्यास सुरुवात झाली.

---

### प्रकरण १३ वें.

## नंदिकेच्या घरीं.

स्वामी ब्रह्मगिरींना आज चांगलें चमचमीत जेवण मिळालें, आणि चांगलें जेवण मिळालें म्हणजे स्वामी ब्रह्मगिरि अधिक उल्लसित होत त्याचप्रमाणे ते आजहि झाले होते डॉ नंदिका ह्या आदरातिथ्य करण्यांत चतुर होत्या, आणि त्यांना आपल्याकडे चार चांगली मंडळी जमा करावी याची आवड होती, आणि त्यांतल्यात्यांत स्वामी ब्रह्मगिरींचें संभाषण त्यांनी पूर्वी अनेकदा ऐकिलें होतें, व ते त्यांस आवडत असे व तसें भाषण आज आपणास ऐकावयास मिळेल, स्वामींनी रंगांत आलें मात्र पाहिजेत असें नंदिकाबाईंस वाटलें म्हणून त्यांनीं जेवणाची तयारीहि चांगली करून ठेवली होती. पाश्चात्य आणि भारतीय अशा दोन्ही प्रकारचे पाकशास्त्र उपयोगांत आले होते; दुपारीं बाहेर जाऊन संध्याकाळीं सहा वाजतां परत येऊन आणि पुन्हा आठ वाजतां इतकें चांगलें जेवण तयार केलें याबद्दल लालनाथांना आपल्या बायकोच्या हुशारीबद्दल आणि सुगरणपणाबद्दल शाबासकी द्यावी लागली, पण ती शाबासकी देतांना "हिचा आणि आपला विवाहसंबंध कायम राहील काय" असा उदासपणाचा विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

स्वामी ब्रह्मगिरींस कोणते प्रश्न विचारावेत म्हणून अनेक मुद्दे नंदिकेने मनांत योजून ठेवले होते. स्वामी ब्रह्मगिरींच्या बोलण्यांत अनेक मौजेच्या गोष्टी बाहेर पडतात हेंहि त्यांस ठाऊक होतें. स्वामी ब्रह्मगिरि हे राजकारणावर, आणि सामाजिक प्रश्नांवर अनेक विचार व्यक्त करीत, त्याचप्रमाणे ते जरी संन्यासी होते तरी संन्यासधर्म आणि विनोद व आनंदीवृत्ति हीं विसंगत आहेत असें त्यांस वाटत नसे.

आज दुपारीं आपली थोडीशी फेरतपासणी झाली तर संध्याकाळीं स्वामी ब्रह्मगिरींची आपण केली पाहिजे असें डॉ. नंदिकाबाईंस वाटून त्यांनीं जे अनेक प्रश्न योजून ठेवले होते, त्यांत संन्यासधर्माचा उपयोग काय, तुम्हाला आपण कोणतें कार्य जगांत करावें असें वाटतें, वैराग्यवृत्ति पुरुषांत कां उत्पन्न होते, संन्यासवृत्ति आणि वैराग्य ह्या गोष्टी एकच काय? संन्यास घेतला तरी कोणते मोह सुटत नाहींत, संन्यासी मंडळींना इंद्रियांवर जय मिळवावयाचा असेल तर त्यांनीं स्त्रियांशीं सहवास ठेवावा कीं चुकवावा, स्त्रियांशीं सहवास चुकविण्यानें मनोजय कसा होतो इत्यादि प्रश्न विचारून संन्यासधर्माची व्यर्थता डॉक्टरीणबाईंना त्यांच्या तोंडून वदवावयाची होती. पण या तऱ्हेच्या मसलतींत आपल्या नवऱ्याला घेण्याचा त्यांचा धीर होईना. आपले पतिराज आज विशेष गंभीर वृत्तीचे आहेत असें तिला वाटलें; आज जर डॉ. परमानंद असते तर सभ्य आणि सुशिक्षित कुचाळी करण्यास आपल्याला एक सवंगडा आहे असें वाटलें असतें, हाहि विचार नंदिकेच्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं.

प्रथमतः स्वामी ब्रह्मगिरींनीं डॉक्टरीणबाईंस तुम्ही हिंदुस्थानांत केव्हां परत आलां आणि सध्या धंदा कसा काय चालला आहे, गांवांत जम कसा काय बसला आहे इत्यादि प्रश्न केले. त्यास नंदिकाबाईंनीं जीं उत्तरें दिलीं तीं थोडक्यांत येणेंप्रमाणे—

"येथें आल्याला दोन वर्षें झालीं. सरकारी नोकरींत शिरण्याचा प्रयत्न केला नाहीं; कां कीं, सरकारी नोकरींत शिरलें तर बदलीचा संभव

आहे आणि बदला झाली म्हणजे नवराबायकोची पुन्हां ताटातूट होणार. खासगी धंद्यात जम चांगला बसू लागला आहे. मि. रेगे ( लालनाथ ) यांच्या गावात ओळखी पुष्कळ असल्यामुळे फार मदत झाली. मी कोण वगैरे लोकास नवीन ओळख करून द्यावी लागली नाही किंबहुना मी हिंदुस्थानात परत केव्हां येतें याचीच गावातली मंडळी वाट पहात होती असे दिसले. गावात ओळखी आता चोहोकडे झाल्या आहेत. सर दामोदरराव यांच्याकडेहि लेडी यशोदाबाई असताना दोनतीनदा गेले होते; विश्वमित्राची ओळख इंग्लंडमध्ये असताच झाली होती, तथापि मिसेस विश्वामित्र म्हणजे विहंगमाबाई यांची ओळख आजच झाली. चांगली मुलगी आहे सरळ बोलणारी आहे हे पाहून कौतुक वाटले, पण जरा साधीभोळी असे वाटले.''

स्वामी ब्रह्मगिरि या भोजनप्रसंगी स्मितयुक्त टीकेच्या व मार्मिक प्रश्नांच्या तडाक्यातून सुटले नाहींत. ''मला वाटले आपण हिंदुस्थानात परत येत नाही, इंग्लंडलाच रहाण्याची चटक आपल्या देशांतल्या स्वामींना देखील लागते असे मला वाटते, इत्यादि विधाने करून नाजुक हल्ल्यास नंदिकेने सुरवात केली आणि पुढे आपल्या देशांतले चांगले चांगले स्वामी बाहेर देशीच का दृष्टीस पडतात, हिंदुस्थानात का दिसत नाहीत, इत्यादि प्रश्न उपस्थित केले. हिंदुस्थानातल्या लोकांच्या स्तुतीपेक्षा यूरोपीअन लोकांची स्तुति मिळविण्याचा आपल्या स्वामींना मोह पडतो काय, इत्यादि प्रश्न डॉ. नंदिकाबाईनी विचारले आणि हिंदुस्थानी शिष्यिणीपेक्षा गोऱ्या शिष्यिणीच हिंदुस्थानांतल्या महत्त्वाकांक्षी स्वामींना जास्त आवडतात काय, हा प्रश्न विचारण्यासहि त्यांनीं कमी केले नाही.''

स्वामीजींनी प्रश्नांतल्या खोची ओळखल्या पण उत्तरे अगदी सरळ दिली. जे स्वामी यूरोप किंवा अमेरिका येथ जातात ते तेथे जाण्यानेच अधिक लायक बनतात; का की बरेच अमेरिकेला गेलेले स्वामी जाताना अगदी कच्चे पोरगे होते हे त्यास ठाऊक आहे असे स्वामींनीं सांगितले. व ''काही संन्यासी मंडळीस अन्यदेशनिवास आवडतो याचे एक कारण तेथे त्यांच्या उद्योगाच्या दृष्टीने क्षेत्र अधिक चांगले असते. सामान्यतः सुशिक्षित असा अनुयायी वर्ग मिळाला म्हणजे पैसे उकळण्यासाठी ढोंगधत्तुरे करण्याचा प्रसंग कमी येतो. आपल्याकडे ढोंगधत्तुरे न करणारा स्वामी असेल तो उपाशीच मरेल की काय अशी एकंदर स्थिति पाहून शंका उपस्थित झाली आहे. सुशिक्षित लोकास अध्यात्मिक उपदेश करणाऱ्या स्वामींची जरूरच नाही. आणि अशिक्षितांस मंत्र घालणारा चमत्कार करणारा स्वामी पाहिजे. पण पाश्चात्य देशात सुशिक्षित आणि उच्च गोष्टींविषयी विचार करणारा वर्ग मोठा आहे. त्या वर्गास एकत्र जमण्यासाठीं केंद्र होणारी अशी एखादी व्यक्ति असावी ही गरज उत्पन्न झालेली आहे. त्यामुळें तिकडील सुशिक्षित वर्गहि स्वामींचे योगक्षेम चालविण्यास तयार असतो. येथील धार्मिक बुद्धीच्या स्त्रियांपेक्षां तिकडील धार्मिक भावनेच्या स्त्रीवर्गामध्ये शिक्षण जास्त आहे, आणि त्यामुळे त्यांच्याशी संभाषण स्वामी बनलेल्या व्यक्तींस देखील अधिक आनंदकारक होतें, यांत शंका नाही, पण त्याबरोबर हेहि सांगितलें पाहिजे कीं आपल्यासारख्या चतुर हिंदु शिष्यिणी मिळाल्या असता जो आनंद होईल तो इंग्रज शिष्यिणी मुळे खास होणार नाहीं. माझा उपदेश ऐकायला पंचवीस तरुण इंग्रज मुली जमल्या आहेत असा देखाव्याच्या एवजी आपल्याप्रमाणें सुशिक्षित पंचवीस हिंदु स्त्रिया जमल्या आहेत असा देखावा माझ्या मनास अधिक आल्हाद उत्पन्न करील.''

स्वामी ब्रह्मगिरींचे हे भाषण ऐकून डॉ. नंदिकाबाई खुर्चीवरून उठून उभ्या राहिल्या; ब्रह्मगिरींनी शेवटल्या वाक्याने जो त्यांचा गौरव केला तो गौरव आपणास आवडला असे त्यांनी लवून सलाम करून दाखविले. व ते पाहून लालनाथाना देखील मौज वाटली.

पुढे दुसरीं कांही प्रश्नोत्तरे झालीं, पण नंतर डॉ. नंदिकाबाईना आपल्या योजून ठेवलेल्या प्रश्नाची आठवण होऊन त्या म्हणाल्या.—

"संन्यासी दृष्टीस पडले किंवा संन्यासी मंडळीच्या आयुष्याविषयीं मी विचार करू लागल्ये म्हणजे माझ्या मनांत एक विचार उत्पन्न होतो तो हा की संन्यासवृत्तीला अर्थशास्त्राचे नियम कितपत लागू आहेत? इतरांचा आयुष्यक्रम नेहमी आर्थिक नियमांनी जखडला असतो, "संन्यास" ही स्थिति इतर उद्योगाप्रमाणे आर्थिक नियमांनीं जखडली आहे की नाहीं हा पहिला प्रश्न उत्पन्न होतो, आणि असावी किंवा नसावी हा पुढचा प्रश्न उत्पन्न होतो. संन्यासवृत्तीचे ध्येय हे की सामान्य आर्थिक नियमांनी बद्ध न होणारा आयुष्यक्रम आचरण्याची व्यक्तीस संधि असावी. संन्याशी मंडळीचा आयुष्यक्रम जर आर्थिक नियमांनी बांधला गेला असेल तर संन्यासवृत्तीचे ध्येय साध्य होत नाही. जर देवघेव, स्वार्थ इत्यादि आर्थिक नियमांनी संन्यासधर्महि जखडला असेल तर त्या स्थितीस संन्यास कसे म्हणावे या तऱ्हेच्या कल्पना मनांत येतात."

"संन्यास ही उच्च आर्थिक नियमांनी जखडलेली स्थिति आहे असें मी समजतो. आणि त्यामुळे संन्यासधर्मास किंवा संन्याशाच्या धंद्यास वैगुण्य उत्पन्न न होतां त्याचे अर्थशास्त्र दृष्ट्या देखील समर्थन करतां येईल असे मी समजतो" स्वामींनीं उत्तर दिले.

"संन्यासवृत्ति हा एक धंदा आहे काय?"

"जगांत धर्मसंस्थापन, राज्यसंस्थापन हे सर्व धंदे आहेत. हे सर्व अर्थशास्त्रीय नियमांनी बांधले गेले आहेत; त्याचप्रमाणे संन्यास वृत्ति हाहि एक धंदाच आहे. ज्याला क्षुधा, तृषा, इत्यादि स्वाभाविक गरजा आहेत त्याच्या त्या पुऱ्या होण्याला लोकांच्याकडून पैसे हे मिळवावे लागतातच आणि त्यामुळे त्याला लोकानीं आपलें अनुयायी व्हावे इत्यादि गोष्टींची गरज संन्याशासहि असतेच. आणि त्याला लोकापासून जर कांही घ्यावयाचे आहे तर त्याबद्दल त्याने लोकास मोबदला हा दिलाच पाहिजे; आणि हा मोबदला दृश्यवस्तूच्या वैयक्तिक हिताच्या दृष्टीने व पुष्कळदां दृश्य वस्तूंचा रुपाने देतां येत नाही त्यामुळे संन्याशाच्या धंद्याला इतर धंद्यापेक्षां जरा निराळे स्वरूप येते. पण त्याचा धंदेपणा जात नाही."

"संन्यासीपणा हा जर तुम्ही धंदाच समजतां तर या धंद्याचे स्वरूप तरी काय? हा धंदा जगांतून गेला तर बरे होईल की वाईट होईल; जगाला या धंद्याचे अस्तित्व हवे आहे की, नको आहे."

"या धंद्याची जगाला अत्यंत गरज आहे. सामान्य धंद्यांत असे असते की, काम केले म्हणजे त्या कामाबद्दल पैसे ठराविक आणि ताबडतोब मिळतात न्हाव्याने हजामत केली म्हणजे त्याचे दोन आणे लागू झाले; डॉक्टरने चीरफाड केली म्हणजे त्याच्या आपरेशनचे पैसे लागू झाले पण प्रत्येक व्यक्तीला अशा अनेक गोष्टींची जरुरी असते की, त्या व्यक्तीला त्या गोष्टीचे मोल करतां येत नाही. पण ती अडचण संन्यास धर्म पुरी कशी पडतो. लोकानी संन्याशाला जेवण द्यावे हे पवित्र कर्तव्य म्हणून समाजावर लादले आहे त्यामुळें सामाजिक कार्य करणाऱ्याचे जीवन शक्य होते, संन्यासी देखील आपल्या योगक्षेमाची फिकीर न बाळगता आपणांस योग्य अशा कार्यात गढतो."

"पण संन्यासी नेहेमी समाजांत उपयुक्त कार्य करतात असे कोठे आहे."

"खरोखर सन्यासधर्म आचरणारे संन्यासी थोडकेच असावयाचे. शिवाय जे खरोखर आचरणाने संन्यासी असतात ते सन्यासाची दीक्षा घेणारेच असतात असे नाही."

"संन्यासाची दीक्षा न घेतलेले पण संन्याशाचे कार्य करणारे लोक कोणते" नंदिकाबाईनी विचारलें.

"जे लोक आपला वैयक्तिक फायदा न पहाता समाजाच्या ज्या गरजेची जाणीव समाजाला झाली नसेल त्या गरजेकडे लक्ष देऊन कार्य करीत राहतात ते लोक." स्वामीजीनी उत्तर दिले.

"आपल्या निरनिराळ्या मठात अनेक संन्यासी दृष्टीस पडतात. त्यांच्याविषयीं तुम्हाला काय वाटते."

"निरनिराळ्या मठांतल्या सन्याशाची मला माहितीच नाही पण गुरूच्या गादीवर बसण्यासाठीं सन्यास घेणारे शंकराचार्य किंवा मठाधिपति याच्या हृदयामध्ये गुरूच्या मृत्यूसमयी एकदम सन्यासधर्म कसा जागृत होतो याचे मला गूढच आहे"

आपली अर्थशास्त्रीय दृष्ट्या संन्याशाचे निरर्थकत्व सिद्ध करणारी पहिली गोळी लाग्र पडली नाही तेव्हा डॉक्टरीणबाईनी मोर्च्याची जागा बदलली आणि म्हणाल्या. " मी "असेटिझम" विषयीं कांहीं वैद्यकशास्त्रीय दृष्टीने विवेचन करणारे ग्रंथ वाचले आहेत, त्यांतील काही सिद्धान्त तुम्ही रागावणार नाही तर तुम्हास सांगते"

"खुशाल सांगा?"

"त्यात लिहिले आहे की असेटिसिझमचे कारण मनाची विकृति होय, ही मनाची इष्टस्थिति नसून अनिष्ट स्थिति होय."

"कदाचित् ते बरोबर असेल."

"पण तुमच्या मनाची विकृति झाली आहे, असें तुम्हाला कधी वाटले काय?"

"कधींच नाही, पण त्यात माझा प्रश्न कोठे येतो, संन्यासी व असेटिक हे मी एकच धरीत नाहीं. असेटिसिझम् म्हणजे मुद्दाम अगदी कठोरपणाची साधी राहाणी ठेवणे. खाणें, पिणे यांत देखील मुद्दाम कनिष्ट प्रतीचे अन्न वापरणे, शरीरदंडन करणे, त्यात शहर सोडून जंगलात जाऊन वनचराची वृत्ति आचरणे इत्यादि प्रकार येतात. यापैकी मी कोणत्याच गोष्टी योग्य मानीत नाहीं. चांगले जेवण मिळाले तर ते मला पाहिजेच आहे; मिळालें नाहीं तर जसे मिळेल तशावरहि जीवन चालवले पाहिजे; एवढेच."

"मग तुम्ही सन्यासी कसचे"

"सन्यासी याचा अर्थ मी एवढाच करतो कीं संसाराचा पाश आणि आपले जेवण मिळविण्यासाठीं स्वत. जो त्रास करावा लागतो तो त्रास ही चुकविणे ज्यांस शक्य होते असा भाग्यशाली मनुष्य, मी तसा पूर्ण भाग्यशाली नेहमीच नव्हतों पण बरेच दिवस होतो देखील."

"सन्याशास देहदंडनाची जरूर नाही काय?

"निदान मी तरी समजत नाही."

"ज्याला कठोर व्रत पाळावे लागत नाहीं त्यास समाजाने मान तरी का द्यावा."

"मान द्यावा कीं, नाही हा ज्याच्या त्याच्या इच्छेचा प्रश्न आहे पण काही व्यक्तींनीं नित्य भाजनविषयक अडचणीच्या बाहेर रहावे हें सामान्य हिताचे आहे यात शंकाच नाही, आपण असे म्हणू कीं, सन्याशाचा धंदा समाजास उपयोगी आहे. ही गोष्ट समाजाने ओळखावी म्हणजे झाले."

सन्याशाचा धंदाच निश्चित नाहीं मग तो उपयुक्त कसा?

"ज्या मनुष्याच्या पाठीमागे कुटुंब नसतें त्याच्या पाठीमागे व्याप कमी असतो. त्यास संचय करून ठेवण्याची बुद्धि उत्पन्न होत नाही, आणि त्यामुळे तो पुष्कळ अशी स्वतंत्र वृत्तीचा बनतो. कांही मंडळींनीं स्वतंत्र वृत्तीने रहावे ही गोष्ट जगाच्या हिताची आहे संन्यासवृत्ति म्हणजे स्वतंत्र वृत्ति,

संन्याशास लोकप्रियतेची किंवा मानाची आवश्यकता नाही. ज्यास पैसा हवा असतो त्यास तो मिळविण्यासाठीं लोकप्रियताहि मिळवावी लागते, किंवा केवळ लोकप्रियतेचाच मोह कित्येकास होतो. पैसा आणि लोकप्रियता याचा लोभ धरावयाचा नाही या तऱ्हेची वृत्ति ठेवण्यास सन्यासदीक्षा पुष्कळच उपयोगी पडते. काकी सन्याशाचा पोषाख ही त्याची जाहिरात आहे, सन्याशाचा पोषाख असला म्हणजे आपल्या योगक्षेमाचा भार लोकावर टाकणे सोपे जाते, तसा पोषाख नसला म्हणजे स्थिति कशी काय होते याची कल्पना आपणास राजवाडयान्या आयुष्यावरून असेल. सन्याशाचा पोषाख असला म्हणजे सन्याशाचा धर्म आचरणे म्हणजे सन्याशाच्या धदा करणे सोपे जाते, आणि तसा पोषाख नसतां तो आचरणे म्हणजे जाहिराती शिवाय धदा करणे होय? तसा धंदा करणे फारच कठिण आहे. यासाठी सन्यासदीक्षेचीहि आवश्यकता आहे.''

''अविवाहित किंवा स्त्रीसबधविरहित असलेली स्थिति ही एक पवित्र स्थिति आहे असे तुम्हास वाटते काय? स्त्रियाचा सहवास ही आध्यात्मिक आयुष्यास एक मोठी हानिकारक स्थिति आहे असे तुम्हास वाटते काय?'' नंदेकेने विचारले.

''मुळींच नाही. स्त्रीसमागमाने पावित्र्य कित पत बिघडते याविषयी प्राचीन लोकाचे मन निश्चयात्मक तऱ्हेने सांगता येत नाही. काकी हठयोगांत वज्रोलीसारख्या क्रिया योगाभ्यासी मनुष्यास बोधिल्या आहेत आणि त्या क्रिया करतांना स्त्रीसमागमाची आवश्यकता आहे.''

''मग स्त्रियाचा सहवास नको, स्त्रियाना टाळा इत्यादि गोष्टीचा उपदेश सर्वच धर्मसप्रदाय का करतात?''

''स्त्रियाचा सहवास नको, व सन्यासवृत्तीने रहावे हे सर्व उपदेश समाजाच्या आर्थिक दौर्बल्याचे म्हणजे लोकाच्या बौद्धिक अप्रगतीचे परिणाम आहेत. लोकांना सामाजिक कार्य करणारे लोक हवेत. त्यांना फारसे वेतन द्यावे लागू नये म्हणून त्यास अविवाहित ठेवले पाहिजे, ही समाजाची वृत्ति आहे. सामाजिक कार्यकर्ते हे लोकांचे कार्पण्य ओळखतात, आणि भावी कार्यकर्त्यास अविवाहित रहावयास सागतात, आणि ती अविवाहित स्थिति यशस्वी व्हावी म्हणून ब्रह्मचाऱ्यास आणि सन्याशास स्त्रियांचा सपर्कहि टाळावयास सागतात ''

''स्त्रियाच्या तिरस्काराची धर्मसप्रदायांमध्ये जी छटा दृष्टीस पडते त्याचे मुख्य कारण समाजाची कार्यकर्त्या मनुष्याचे कुटुब पोसण्याची नाखुशी एवढेच काय?''

''मला तर एवढेच दिसते.''

''तुमच्या स्वीकृत वृत्तीसबधाने तुमचे मत फार हलके आहे असे दिसते; स्त्रीसहवासत्याग आचारधर्मात शिरावा याचे कारण आपण केवळ द्रव्यविषयक करून आपण त्या आश्रमाचे म्हणजे सयमी आयुष्यक्रमाचे सर्व गौरव नष्ट करता.''

''मुळींच नाही, समाजाचे दौर्बल्य मी ओळखतो; व त्यासाठी सन्यासवृत्ती विशिष्ट व्यक्तीने स्वीकारण्याचे मी समर्थन करतो. सन्यासवृत्ति ही समाजाच्या विशिष्ट प्रगतीच्या स्थितीत आर्थिक दृष्टीने अवश्य होणारी स्थिति आहे. तथापि सामाजिक कार्य करण्यासाठी व्यक्तीला सन्यास घेणे भाग पडावे या अनिष्ट स्थितीचे आक्रमण पुढे मागे समाज करील अशी मला आशा आहे.''

''आशा का वाटते?''

''आपण आपली सामाजिक वृत्ति दिवसानुदिवस सुधारीत आहो म्हणून. एवढेच नव्हे, तर सन्यासधर्म हाच विशिष्ट सामाजिक प्रगतीचा दर्शक आहे.''

''तो कसा?''

''सन्यासधर्म म्हणजे व्यक्तीने सामाजिक हितासाठी कार्य करीत रहाणे, पण कामाबद्दल पैसे न

पैशाबद्दल काम ही भावना न ठेवणे; संन्याशाची उपजीविका समाजाने आपले कर्तव्य म्हणून पहावी आणि सन्याशाने आपणांस योग्य असे कार्य करीत रहावे ही वृत्ति समाजात उत्पन्न झाली ही गोष्ट मी प्रगतीची द्योतक समजतो. ही वृत्ति अधिक वाढल्याने समाजाचे हित होईल. आणि जोपर्यंत व्यक्ती काम करीत आहे तोपर्यंत त्या व्यक्तीला समाजाने पोसावे, व्यक्तीचे कार्य इतर कोणत्याहि विशिष्ट व्यक्तीच्या तात्कालिक हिताचे नसले तरी चालेल हे आजकालच्या समाजसत्तावादी लोकाचे मत आहे एवढेच आपण लक्षांत घेतले म्हणजे संन्यासधर्म हा सोशलिस्ट आयुष्यक्रमाचा आरंभ आहे असे समजतो."

"सोशलिस्ट आयुष्यक्रमाचा सन्यासधर्म हा प्रारभ कसा म्हणता, सन्यासधर्मामध्ये आपल्या योगक्षेमाची काळजी जनतेवर टाकली जाते, व त्या व्यक्तीस आपली बुद्धि व कर्तृत्वशक्ति आपल्या इच्छेप्रमाण काम करण्याकडे लावता यते या बाबतीत सन्यासधर्म आणि सोशलिझम याचे साम्य असले तरी सन्यासी मडळींना स्त्रियांशिवाय रहावे लागते म्हणजे प्रजोत्पादनाशिवाय रहावे लागते, तसे सोशलिझम मध्ये रहावे लागणार नाहीं."

"आणि म्हणूनच मी सन्यासवृत्ति हा सोशझमची पहिली पायरी समजतो, आज सामाजिक काम करणाऱ्याला केवळ त्याच्यापुरती उपजीविका द्यावयास समाज तयार आहे, त्याच्या कौटुंबिक अवस्थेस पुरेल इतके द्यावयास समाज तयार नाही. एवढाच आजच्या स्थितीचा अर्थ आहे. जेव्हा सामाजिक कार्य करणाऱ्याना गृहसौख्यहि समाज नाकारणार नाही तेव्हा तो समाज अधिक पुढे गेलेला मी समजेन "

"तर मग तुमचे म्हणणे असे की समाजाची जसजशी प्रगति होईल तसतसा सन्यासधर्म अनवश्य होईल."

"कांही अंशी माझे मत तसेच आहे. पण संन्यासधर्माची अनावश्यकता लौकरच उत्पन्न होईल असे दिसत नाही. लोक पैसे तात्कालिक गरजेसाठी खर्च करतात, व अत्यत दृश्य गरजेसाठी करतात. चांगले शिक्षण इत्यादि गोष्टींसाठी पैसे खर्च करण्यास समाज फार हळुहळु शिकतो. यामुळे ज्या व्यक्ती समाजाची असाधारण गरज लक्षांत घेऊन कार्य करू लागतील त्याना तात्कालिक प्राप्ती होणार नाहीं. सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तींना पैसे देण्याची वृत्ति समाजांत फार हळुहळु वाढते आणि यासाठी लोकाच्या आध्यात्मिक आणि नैतिक उन्नतीसाठी जी मडळी काम करतात, त्यानीं सन्यास घ्यावा किंवा अविवाहित रहावे, किंवा भिक्षेवर जीवन करावे असा उपदेश तसले काम करणाऱ्या मडळीकडून होतो. या सर्व गोष्टींचे कारण जनतेचें आपल्या आध्यात्मिक गरजेविषयी अज्ञान होय. समाजाची प्रगती कितपत झाली हे ठरवावयाचे झाले तर कर्तव्य म्हणून काम करणाऱ्या किती व्यक्ती वाढल्या हे पाहून ठरवावे. आणि त्याचप्रमाणे मडळीच्या तात्कालिक गरजा न भागवितां दीर्घकालीन गरजा पुरविण्याकडे जो वर्ग लागतो त्या वर्गाचे पोषण करण्याचे तत्त्व समाजाला ज्या मानाने पटेल तो समाज अधिक प्रगत होय. सन्याशाला पोसण्याचे कर्तव्य समाजाला पटेल तर समाज प्रगत आहे असे समजावे; ते सरकारला पटले तर सरकार सुधारले असे समजावे जर कर्तव्य म्हणून काम करणाऱ्या आणि दीर्घकालीन गरजेकडे लक्ष देणाऱ्या व्यक्तीस समाज वेतन देऊ लागेल तर व्यक्तीच्या स्वार्थत्यागाची आवश्यकता कमी होईल. वैयक्तिक स्वार्थत्याग ज्या मानाने अनवश्य होईल त्या मानाने समाज पुढे गेला असे समजावे. तथापि संन्यासधर्म, किंवा दान किंवा स्वार्थत्याग अजीबात अनवश्य होईल इतकी समाजाची प्रगति कधीं होईल असे वाटत नाही.

एखाद्या गोष्टीचें महत्त्व समाजास पटत नाहीं, पण समाजाच्या प्रगतीच्या दृष्टीने ती गोष्ट अत्यंत अवश्य आहे अशी स्थिति समाजात नेहमी असावयाचीच अशा प्रसंगी जे लोक ती गोष्ट घडवून आणू इच्छीत आहेत त्याजवर सांसारिक आयुष्यक्रमाचा बोजा टाकणें म्हणजे गैरकिफायतीचा व्यवहार आहे, आणि या दृष्टीने सन्याशाच्या आयुष्यक्रमाचे महत्त्व आहे, आणि तो आयुष्यक्रम समाजानें त्या व्यक्तीस पाळू द्यावयाचेंहि महत्त्व आहे."

"पण स्त्रीपुरुषांच्या संबंधामुळे धार्मिक भावनांचा विकास व्हावयास कांहीं अडचणी उत्पन्न होतात काय? आणि होत नसल्यास ब्रह्मचर्यावर असलेलीं धार्मिक व्याख्याने थोतांडेंच आहेत काय? "

"या प्रश्नाचे मी उत्तर व्यावहारिक म्हणजे अर्थशास्त्रीय दृष्टीने द्यावयाचे कीं, ब्रह्मचर्याच्या शारीरिक स्थितीचा म्हणजे वीर्यरक्षणाचा मनावर परिणाम काय होतो आणि त्याच्या योगानें आध्यात्मिक बल वाढते काय हे सांगण्याच्या म्हणजे शारीरशास्त्रीय मानसशास्त्राच्या दृष्टीनें द्यावयाचें ? "

"होय तसेच अगदीं फिजिआलॉजिकल दृष्टीने द्यावयाचे."

"तर त्याविषयी उत्तर देण्यास मी असमर्थ आहे. स्त्रीपुरुषांच्या समागमाचे मनावर परिणाम काय होतात हे माझ्यासारख्या सन्याशाने सांगावयाचें म्हणजे केवळ पुस्तकी मतांचा पुनरुच्चार करावयाचा, दुसरें कांहीं नाहीं. मला फार तर अविवाहित स्थितीमुळे जो नित्य राहाणीवर स्वाभाविक परिणाम होतो त्याविषयीं सांगतां येईल. विवाहरहित स्थितीत संचय करण्याची इच्छा कमी असते. आपल्या बरोबर सहज नेतां येईल इतकेंच सामान बाळगावयाचे ही सडयासोट मनुष्याची वृत्ति असल्यामुळे मनुष्य उदार बनतो, तसेंच त्यास प्रेम करण्यास निकटचा आप्तवर्ग नसतो त्यामुळें त्याचें प्रेम करण्याचें क्षेत्र विस्तृत होत जातें. प्रेमभावना स्नेहबुद्धि यासारखे मनोविकार मनांतून जात नाहींत पण त्यास निकटचे आश्रयस्थान नसल्यामुळे शेजारी देश, अखिल मानवजाती यांच्यावर प्रेम करणे त्यास शक्य होतें त्यामुळे तो व्यवहाराच्या बाबतींत अधिक तटस्थ होतो आणि त्यामुळे सन्याशास आपण इतर लोकांपेक्षां वरच्या कोटींतले मानव आहोत असे भासावयास लागतें. "

"पण आपण "फिजिआलाजिकल" म्हणजे शरीरधर्मावर होणारे परिणाम सांगितले नाहींत. मला विशेषेकरून ते पाहिजेत. अविवाहित स्थितीचे प्रथम शरीरावर आणि नंतर मनावर आणि त्यामुळे काहीं आध्यात्मिक परिणाम होतात कीं नाहीत." डॉ. नंदिकाबाई म्हणाल्या.

"होतात की होत नाहीत हे मला माहीत नाही. तुह्मींच आम्हास या विषयावर अधिक सांगू शकाल. तुम्ही डॉक्टरणीच्या धंद्यांत आहात. स्त्रियांच्या बाबतींत तरी पुरुषाकडून अस्पृष्ट असलेली स्त्री अधिक चांगल्या मानसिक स्थितीत असते कीं विवाहित स्त्री अधिक चांगल्या स्थितीत असते, याविषयीं तुम्ही माहिती सांग( शकाल."

"पुरुषांविषयीं पुरुष डॉक्टर काय म्हणतात?"

"साधारणपणे विवाहित पुरुष जास्त दिवस जगतो असे विधान आपणास जागोजाग आढळतें. पण मी जास्त सांगण्यात अर्थ काय, मी शारीर किंवा इंद्रियविज्ञान याचा ज्ञाता नाही, मी पुस्तकी माहितीच सांगणार." "

"मी ज्यावेळेस एडिंबरोला विद्यार्थिनी होत्यें त्यावेळेच्या इतर ब्रिटिश विद्यार्थिनी अविवाहितच होत्या. त्यांनां अविवाहित स्थितीमुळें त्यांच्या मनांत एक तऱ्हेची अतृप्त जिज्ञासा नेहमीं जागृत असे असे दिसे, आणि जे स्वाभाविक ज्ञान त्यांस

नाकारलें गेलें होतें त्याविषयी एकसारखी असंतुष्ट जिज्ञासा आणि कल्पना यात त्याचे मन गुंतत असे असे मला वाटते. पुरुषांच्या बाबतींत तेच होत असावे असे मला वाटते आणि त्या दृष्टीनें पाहिले म्हणजे स्त्रियांना अगदीं घाण समजणारा सन्यासी वर्ग मानसिक उच्च स्थितींत असेल असे वाटत नाहीं''

सभाषण या थराला आल्यामुळे लालनाथाचे मन जरा अस्वस्थ झाल्यासारखे दिसले, पण इतक्यांत स्वामी ब्रह्मगिरि म्हणाले.

''ही तुमची सन्यासधर्मावरील टीका मीं अयोग्य समजत नाहीं. पण कदाचित या दृष्टीने सन्यासी वर्गाची दुर्गति होत असेल हेहि शक्य आहे. पण तेवढयावरून सन्यासी वृत्तीचे अनौचित्य सिद्ध होत नाहीं; तुम्हीं म्हणता तो मुद्दा योग्य आहे व यासाठीं सन्यास ही वृत्ति गृहस्थधर्म आचरल्यानंतर पत्करावी हे प्राचीन धर्मशास्त्रकाराचे मत होते.''

या सभाषणामध्ये लालनाथानी विशेष भाग घेतला नाही पण हे वाग्युद्ध ते मोठ्या मौजेने पहात होते. जेव्हा आपली बायको स्वामी ब्रह्मगिरींस कोंडीत पकडल्यासारखे करी तेव्हां त्यांसहि मौज वाटत होती. तथापि सभाषण स्त्रीपुरुषसबधविषयक अधिक गूढ प्रश्नात जाऊ नये अशीहि त्यांची इच्छा होती. सासारिक आणि मनुष्यविषयक गोष्टींकडे शास्त्रीय दृष्टीने पहाणे किती जरी चांगले असलें तरी स्त्रीपुरुषांच्या सभाषणांत विशिष्ट मर्यादा ओलाडल्या जाऊ नयेत असें त्यास वाटे, आणि हेहि नंदिकेचा नवरा या दृष्टीने त्यास वाटणे स्वाभाविक होते. दुसऱ्याची बायको तिसऱ्याशीं असल्या वादात रंगून गेली असें दृश्य त्यांस आवडले नसते असे नाहीं, पण स्वतःची बायको असल्या स्त्रीपुरुषसबधाच्या वादांत फार शिरूं नये असें त्यांस वाटत असावे. या दोघांच्या वादविवादाच्या मनोरंजकत्वाशिवाय दुसऱ्या एका कारणामुळें या सभाषणाचा लालनाथांच्या मनावर इष्ट परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. स्वामी ब्रह्मगिरि येण्याच्यापूर्वी जो त्याच्या मनाचा क्षोभ झाला होता, तो कमी झाला. लालनाथाना या सभाषणांत आपल्या बायकोचे कांही विशिष्ट गुणहि दिसून आले. ज्याप्रमाणे टेनिसचे डाव खेळावे म्हणून आपली बायको उत्सुक असते त्याप्रमाणे ता वादविवादाचे डाव खेळण्यासहि तितकीच उत्सुक आहे असे त्यांस दिसून आले, आणि हा आपल्या बायकोचा गुण आपणास इतक्या दिवस कां बरे दिसून आला नाही, इत्यादि विचार त्याच्या मनांत आले, आणि त्यानी त्याला उत्तर दिले की आपणांशी भाषण करण्यांत आपल्या बायकोला स्वारस्यच वाटत नसावे, व डॉ. परमानंदांशी भाषण करण्यात अधिक स्वारस्य वाटत असावें, आपणात उच्च शिक्षणाचा अभाव असल्यामुळें आपल्या विचाराचे विषय थोडे आहेत आणि यामुळे जी स्त्री बुद्धिविकासामुळे अधिक सभाषणक्षम बनली आहे ती आपणाशी सभाषण करण्यात रगात येत नाही याचे कारण आपलेच दौर्बल्य होय. डॉ. परमानंद आले म्हणजे जें सभाषण होई त्यांत वैद्यक विषयच पुष्कळ असल्यामुळे त्या सभाषणांतून आपण अजीबात वगळलों गेलो असे आपणासच वाटे, पण आज तशी गोष्ट नव्हती. पाहुणे आणि बायको यांचें वाग्युद्ध चालले आहे आणि श्रोतृत्व आपल्याकडे आहे, ही स्थिति लालनाथास गैरसोईची मुळीच दिसली नाहीं. आपली बायको ब्रह्मगिरींवर हल्ला करून तिची हुशारी आपणांस दाखवूं पाहत आहे, आणि आपल्या प्रशंसेची आतुरताहि दाखवीत आहे असा त्यांस भास झाला व याबद्दल त्यांस आनद झाला. जर आपली बायको आपली प्रशसा अपेक्षित आहे तर ती अजून आपल्या ताब्यांत आहे, असें त्यांना वाटले आणि

हा विचार मनांत आल्यामुळे त्यांस फार बरें वाटलें. आणि त्यानीं आपल्या नायकोला तिच्या वाद-नैपुण्याबद्दल शाबासकी द्यावयाचे ठरविले.

लालनाथ सभाषण समाप्त करण्याच्या उद्देशाने म्हणाले की, "सन्यासधर्माच्या उपयुक्ततेबद्दलच्या प्रश्नांवर वादविवाद कधीच सपावयाचा नाही, आणि ब्रह्मगिरींस घरी जावयाचे आहे तर त्यास आपल्या आनंदासाठीं आपण संभाषणांत जास्त वेळ अडकवून ठेवणे हा निव्वळ स्वार्थ होईल तथापि आजच्यासारख्या सभाषणाचा आनद आम्हांस क्वचितच मिळतो, तर स्वामी आपल्या पंक्तीचा लाभ आम्हांस पुन: देतील अशी आशा आहे."

स्वामींनी सूचना ओळखली; घड्याळाकडे पाहिले आणि "मी यापूर्वीच अर्धा तास अगोदर निघावयास हवें होते" असे म्हटले.

---

## प्रकरण १४ वें.

## नंदिकेची डायरी.

नदिकेची डायरी हे एक चागल्या कागदाचे सुदर बाधणीचे पुस्तक होते. ही डायरी म्हणज केवळ रोजच्या व्यवहाराची टिपणे ठेवणारे पुस्तक नव्हते किंवा रोजच्या पूर्वी ठरलेल्या भेटीच्या नोंदीचें किंवा करावयाच्या कामाची पूर्व सूचना असावी म्हणून केलेल्या नोंदीचेहि ते पुस्तक नव्हते. नदिका व्यवहारात पडलेली स्त्री होती व पद्धतशीरपणे व्यवहार करणारी होती तर व्यवहारी स्वरूपाच्या तिच्या डायऱ्या निराळ्याच असतील पण तिची आम्ही वर वर्णन केलेली जी एक डायरी होती ती फार गुप्त ठेवली जात असे. या डायरीस "डायरी" म्हणण्यापेक्षा मनास क्षोभ देणारे विचार ओकण्याची किंवा आपली आप-णच समजूत करून घेण्याची जागा, किंवा ऐक-णारी पण उत्तर न देणारी मैत्रीण असे म्हटले असते तर ते अधिक शोभले असतें. नदिका डायरींत रोज लिहीत असे अशातला भाग नाही. कधीं कधीं दोन दोन महिने तिला या डायरीची आठवणहि होत नसावी. कधी कधीं ही डायरी घेऊन ती दिवसभरहि लिहीत बसे. प्लांचेटमागे लागलेला वेडापीर ज्याप्रमाणे प्लांचेटला एकसा-रखे काही लिहू देतो, आणि प्लांचेटचे खरडे आपल्या आयुष्यावर विचार करण्यास साधन आहेत असे समजतो तसे थोडेसे नंदिनीचे झाले होते. डायरी हीच तिची मैत्रीण, रोमन क्याथॉलिक लोकानां आपल्या पापाचा किंवा मक्षुब्ध मन.-स्थितीची कबूली देण्यास जशी कन्फशनची पेटिका असते त्याप्रमाणेच ती आपल्या डायरीस समजत होती. आपल्या आयुष्याचे परीक्षण कर-ण्याची, आत्मनिवेदन करण्याची, आणि आपल्या वर्तनावर विचार करून आपले वर्तन सुधारले जावे म्हणून, प्रयत्न करण्याची, आपण निश्चय करावे, ते पार पाडता आले नाहीत म्हणून आपण आपल्यावरच रागवावे इत्यादि गोष्टी करण्याची तिची एकच वेळ होती, आणि ती वेळ म्हटली म्हणजे तिची डायरी लिहिण्याची वेळ होय. त्यावेळेला ती इतकी पवित्र समजे की, ज्याप्रमाणे धार्मिक मनुष्य सोवळ्याने पूजेला बसतो किंवा योगाभ्यासी आसनमांडी घालून ध्यानस्थ होतो त्याप्रमाणे तिला गभीरपणे डायरीकडे वळावे लाग. डायरी लिहिणे तिची ईश्वरोपासना होती. उच्च भावना जागृत होण्याची तिची हीच वेळ होती. ती डायरींत लिही ते केवळ आत्मविषयक होते अशातला भाग नाही तर डॉक्टर या नात्यानें काम करताना जगाचा जो अनुभव येई त्याविषयी देखील अनेक उल्लेख त्यांत असत. अर्थात तीमध्ये अनेक लोकाची गुह्येहि असत. त्यामुळे त्या डायरीस अत्यंत गुप्त राखणे हे तिचें एक पवित्र कर्तव्यहि होते.

तिची डायरी लिहिण्यास सुरवात झाली, ती मात्र एडिंबरोला झाली. एके दिवशीं बाचार या

मोटाच्या लेखकाचें "सिडक्शन इन एडिंबरो" नांवाचें पुस्तक तिच्या कॉलेजच्या लायब्ररींत होतें तें तिच्या वाचण्यांत आलें. त्या पुस्तकावरून तरुण मुलींनां इतर लोक फूस लावून भ्रष्ट कसें करतात, तरुण मुलींमध्यें कोणत्या प्रसंगीं प्रेमोत्कटता उत्पन्न होऊन पुरुषांच्या अयोग्य सूचनेस कशी संमति देत त याची तिला चांगली कल्पना आली; आणि त्यानंतर तिला कांहीं टिप्पणें करण्याची स्फूर्ति झाली. नंदिका एडिंबरोंत होती तेथें मराठी जाणणाऱ्या स्त्रिया कोठून असणार? त्यामुळें मराठींत कांहीं आपण लिहून ठेवलें तर ते कोणास समजणार नाहीं इत्यादि कल्पना मनात येऊन मराठींत कांहीं टिप्पणें करण्यास तिची सुरवात झाली. मराठींत टिप्पणें करणेंच अवश्य होतें कां कीं तिला भोंवतालच्या परिस्थितीविरुद्धहि पुष्कळच लिहावयाचें होतें. स्काटलंडमध्यें इतर देशापेक्षां अधर्मसंततीचें प्रमाण अधिक आहे; आणि भोंवतालची परिस्थिति अशी होती कीं एखाद्या मनुष्यापाशीं लग्न न करता त्यापाशीं रहाणाऱ्या तरुण मुली तिला भोंवतालीं पुष्कळच दिसत होत्या. नंदिका स्कॉटलंडमध्यें गेली त्यावेळेस ती फार सोवळेपणांत वाढलेली होती. जगांतील ज्या अनेक अनिष्ट गोष्टींविषयीं लोक मूकवृत्ति ठेवतात त्यांविषयीं तिच्यामध्यें बऱ्याच अशीं अज्ञान होतें.

नंदिकेच्या डायरींतील उतारे दिले म्हणजे एक फारच विस्तृत आत्मचरित्ररूपी कथानक होईल. सध्यां त्या डायरींतला एकच उतारा येथें देतों.

× × × ×

आनंदीबाई जोशी यांचें चरित्र, हें पुस्तक वाचून टाकलें. किती सुंदर चरित्र आहे हें! या चरित्राचें मर्म माझ्यासारख्या स्त्रीला जसें समजेल तसें इतर स्त्रियांस समजेल काय? पुरुषानां कितपत समजेल बरें? हें आनंदीबाईचें चरित्र मला इतकें गोड कां बरें वाटतें. लोकांसहि तें पुस्तक फारच आवडतें असें दिसतें, पण हें पुस्तक आवडतें होण्याचीं लोकांचीं आणि माझीं कारणें निरनिराळीं असावींत. ती स्त्री स्वदेशाभिमानी होती, आणि तिला आपल्या देशाबद्दल, वाङ्मयाबद्दल अभिमान होता, यामुळेंच हें चरित्र लोकांस आवडत असावें. पण मला तिचें चरित्र जसें समजलें तसें दुसऱ्या कोणासहि समजणार नाहीं. आनंदी आणि मी ह्या दोघींच्या आयुष्यांत किती तरी सारखेपणा आहे, तिचा नवरा गोपाळराव हा साधारण शिक्षणाचा होता, आणि आनंदीबाई मात्र उच्च शिक्षणानें विभूषित होती. तिची प्रसिद्धि आणि तिची उच्च सामाजिक पदवी, तिच्या नवऱ्याच्या उदार मनाचा परिणाम होय. या तिच्या नवऱ्याच्या उदारतेबद्दल अमेरिकेंतल्या स्त्रियानीं आश्चर्य प्रदर्शित केलें ही गोष्ट त्या चरित्रात नमूद केली आहे. हा नवऱ्याचा गौरव माझ्याहि अनुभवाचा नाहीं काय? मी स्काटलंडमध्यें असतां आपण स्वतः कारकुनीसारख्या सामान्य नोकरींत राहून मला स्कॉटलंडमध्यें शिकावयास सवड देणारा नवरा लाभला त्याबद्दल अनेक स्काच स्त्रियानीं माझें अभिनंदन केलें नाहीं काय? त्यांनीं तसें अभिनंदन केलेंच व त्यावेळेस असा नवरा मला लाभला म्हणून मला कितीतरी अभिमान वाटला बरें! मला त्यावेळेस अभिमान वाटला तो मी त्यांस आनंदीबाईप्रमाणें मोठ्या आनंदानें व अभिमानानें कळविला नाहीं काय? व त्यावेळेस त्यांच्या औदार्याबद्दल मला अभिमान जी कृतज्ञता वाटे व त्यांमुळें जें प्रेममय अंतःकरण होई आणि पत्रांतल्या प्रेममय वाक्यांनीं तें व्यक्त होई तें पाहून या तऱ्हेनें आपण जो स्वार्थत्याग केला त्याचें आपणांस किती तरी चांगलें फल मिळालें असें टाळणाऱ्यांनां देखील खात्रीनें वाटलें असलेंच पाहिजे. आमचा आयुष्यक्रम इतर कुटुंबांपेक्षां अधिक सुखी आहे आणि तो

उत्तरोत्तर सुखाचा होत जाणार अशी त्यांनी व मी जी अपेक्षा केली तशीच आमच्या इतर परिचितांनीं केली नाहीं काय? बायकोने नवऱ्याविषयीं अभिमान बाळगावा आणि त्याच्या उदार बुद्धीबद्दल आपली अभिज्ञता तिने व्यक्त करावी व नवऱ्याने ती अभिज्ञता पाहून आनदित व्हावे या सर्व गोष्टी दोघांच्या एकत्र स्थिरप्रेमाच्या आयुष्यक्रमाचा पाया होय असे कोणास वाटणार नाहीं? लालनाथांना तसे वाटले; मला तसेंच वाटलें, आणि माझ्या तरुण मैत्रिणीनां तर इतर स्त्रियांस अलभ्य अशा माझ्या या दैवयोगाचा मत्सर वाटला, आणि त्यास तो मत्सर वाटल्यामुळे मला उलट किती तरी आनद झाला. त्यावेळेस ती तोंडाळ मेरी धोबीण काय बोलली हे मात्र पक्के आठवते. ती म्हणाली की कोणत्याहि नवऱ्यानें आपल्यापेक्षां आपल्या बायकोला अधिक उच्च प्रकारचे शिक्षण देणे हें चागलें नाही. त्या करण्यामुळे नवरा पस्तावेल आणि बायकोहि पस्तावेल. त्यावेळचें तिचे तें बोलणे मला किती वेडेपणाचे वाटलें? "ती हलक्या वर्गातली, तिला उच्च वर्गातल्या सुशिक्षित स्त्रियाची मनोवृत्ति कोठून कळणार? तिचा अनुभव तो काय? तिचा नवरा जान म्याकोमिश् हा तर जोडेदुरुस्ती करीत होता, आणि ती कपडे धुण्याला लागण्यापूर्वी भांडी घाशीत होती. आणि ती आपल्या वर्गातले अनुभव सर्व जगाला उपयोगी पडणारे म्हणून समजायला लागली आहे" असें त्यावेळच्या मेरीच्या म्हणण्याचे माझ्या खोलीत रहाणारी विद्यार्थिनी मिस् किंगने स्पष्टीकरण केले. मेरी म्याकोमिश् जे बोलली तें ऐकून मिस् किंग आणि मी किती तरी हसलो! पण तिच्या बोलण्यांत बरेच तथ्य आहे असे मला निदान आज तरी म्हणावे लागेल कीं नाही? आज मी बाहेर जाताना पुष्कळ प्रसगी नवऱ्याला बरोबर घेऊन जावेसे वाटत नाही. यूरोपांत शिकून आलेल्या डॉक्टरणीला जो मान द्यावा लागतो तो मान सरकारी नोकरींतल्या कारकुनास कोण देणार! आम्ही दोघे जर एकत्र कोठे गेलो आणि ज्याकडे जाऊ त्या गृहस्थानें किती जरी खबरदारी घेतली तरी त्याच्या हातून नकळत अशा अनेक गोष्टी होणार की ज्यांत त्याचें दोघांस समान तऱ्हेने गौरव करण्याकडे दुर्लक्ष झालेले दिसून येईल. गव्हर्नरच्याकडे ॲट होम झाला आणि त्यावेळेस आमंत्रणाची यादी करणाऱ्या कारकुनाच्या दुर्लक्षामुळे मला एकटीलाच आमत्रण आले आणि माझ्या नवऱ्याला आलें नाही तेव्हा त्यांस दुःख झाले नाही काय? जेव्हा इतर समारभाच्या प्रसगी लालनाथानां देखील इतर लोक काळजीपूर्वक आमत्रण करूं लागले. पण त्यानेंहि त्याचे समाधान झाले नाहीं? तेव्हां गाडयाबरोबर नळयाला यात्रा असे उद्गार त्यांनींच काढले नाहींत काय?

आनदीबाई पुढे निरीश्वरवादी झाली म्हणून तिचा नवरा तिला टोचून बोलू लागला, जणू काय ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास असणे किंवा नसणे ही स्वेच्छेचीच गोष्ट आहे! स्वेच्छेने काय करावे हे ठरेल, विश्वास कसा ठरणार? नवऱ्याला बरे वाटावे म्हणून पन्नास पूर्वजाकरितां पन्नास ब्राह्मण जेवावयास घालायाचे झाले तर मी घालीन, पण तें जेवण त्या पूर्वजांस पोचणार नाही अशी जर माझी समजूत असली तर त्यात माझा गुन्हा काय होईल? व्यक्तीस जे अनुभव येतात त्यामुळें किंवा जगांत चाललेल्या क्रियांच्याज्ञानानें जे विचार उत्पन्न होतात त्यावर ईश्वरविषयक विश्वास इत्यादि गोष्टी अवलबून असतात हें अर्धशिक्षित गोपाळरावास काय बरे माहीत. आणि तो तिला त्याबद्दल टोचून बोलूं लागला! तसेंच गोपाळरावाचे जे कमी शिकलेले संवंगडी होते त्यांनी वारवार भेटावयास यावे हे आनंदीबाईस आवडत नव्हते असें दिसते. याबद्दल आनंदीबाईस गोपाळराव दोष देत असत, पण मी तरी

देणार नाही. आजच्या सुशिक्षित वर्गास तलाठी, मराठी शाळाचे मास्तर या प्रकारच्याच वर्गाची म्हणजे अल्पशिक्षित मडळी वारवार भेटावयास येऊ लागली तर सुशिक्षित पुरुषास देखील कंटाळा येणार नाहीं काय'

छे, छे, आनदीबाईचे चरित्र हे दुर्दैवी स्त्रियांच्या चरित्राचा आदर्श आहे. स्त्रियांचे लग्न आपल्यापेक्षा जात किंवा पदवी या दृष्टीनीं कमी योग्यतेच्या पुरुषाबरोबर झाले म्हणजे त्या स्त्रियांचे व त्याबरोबर पुरुषाचे आयुष्य दु खमय होते.त्याप्रमाणेच शिक्षणाने फरक असलेल्या स्त्रीपुरुषाची गोष्ट होय. हा अनुभव बऱ्याच स्त्रियाना आला आहे. आनदीबाईचे चरित्र म्हणजे ज्या ससारांचा फजीतवाडा झाला आहे अशा संसाराचा आदर्श आहे. चरित्राने कोणत्या दृष्टीने अवलोकन करावयाचे बरे? ज्या प्रकारचा ससारक्रम भयावह आहे त्या ससाराची लोकास कल्पना देण्यासाठी आहे आनदीबाई अल्पवयात मृत्यु पावली हेच तिचे मी भाग्य समजते. आपल्यापेक्षा शिक्षणाने आणि सस्कृतीने कमी अशा नवऱ्याबरोबर जन्म काढण्याचे दिव्य सती जाण्याच्या दिव्यापेक्षांहि भयकर होय!

× × × ×

डायरींतील उतारे वाचण्याचे काम सध्या बंद ठेऊ. कदाचित नायिका इतक्यात येईल आणि आपणांस पकडील

---

## प्रकरण १९ वें.

## स्वामी ब्रह्मगिरींचें पहिलें व्याख्यान.

स्वामी ब्रह्मगिरींचे व्याख्यान नागपूरच्या एका प्रसिद्ध नाटकगृहात झाले. त्या व्याख्यानास बरीच गर्दी जमली होती व त्या गर्दीत नागपूरची बरीच प्रसिद्ध मडळीदेखील दिसत होती. काहीं स्त्रियाहि आल्या होत्या

तें संपूर्ण व्याख्यान येथे देण्याची जरूरीच नाहीं. त्या व्याख्यानाचा गोषवारा व परिणाम येथे सांगितला म्हणजे झाले. व्याख्यानाचा परिणाम सामान्य जनतेवर चांगला झाला आणि ते व्याख्यान ज्या पक्षाच्या नेतृत्वाखालीं झाले त्या पक्षाची थोडी बढती झाली असेल यात शका नाहीं. "कर्माचे महत्त्व सन्यासधर्मापेक्षा अधिक आहे; सन्यासधर्मच जर श्रीकृष्णास सागावयाचा असता तर मी लढणार नाहीं असे म्हणणाऱ्या अर्जुनास शाबासकी देऊन सन्यास घे म्हणून सागणे भगवतास अगदीं सोपे झालें असते; तर गीतेमध्ये कर्ममार्ग सागितला आहे इत्यादि गोष्टी लोकमान्यानी अगदीं मार्मिकपणाने उकलून सांगितल्या आहेत हे स्वामींनीं कबूल केले. आणि सन्यासी असलेल्या मनुष्याकडून कर्ममार्गाची तारीफ झाली आणि लोकमान्यांचा हा असा जय झाला याच्याबद्दल देखील जमलेल्या मडळीस आनद झाला. तथापि व्याख्यानाच्या शेवटीं जे कांहीं सांगितले त्यामुळे कांही वाईट परिणाम होईल काय याबद्दल अत्यत सावध दादासाहेब गेगणे यास थोडीबहुत काळजी पडली. व्याख्यात्यानी सागितले की, गीतेमध्ये काय सांगितले आहे एवढ्यावरच कर्ममार्ग चांगला की सन्यासमार्ग चांगला हे ठरवून उपयोगी नाही. किंबहुना कर्ममार्ग आणि सन्यासवृत्ति या दोन गोष्टी तुलनेसाठी घेतल्या हेच बरोबर झालें काय हाहि विचार येथे पाहिजे. कर्ममार्गाची तुलना फक्त ज्ञान, योग इत्यादि मार्गाशीं केली पाहिजे होती, आणि सन्यस्ताश्रमाची तुलना गृहस्थाश्रमाशी करावयास हवी होती. कोणता मार्ग चागला याविषयी आजच्या जनतेने आपले विचार अनेक मार्गाचें अवलोकन करून स्वत: ठरविले पाहिजेत. आपले आयुष्य क्रमण्यास उपयोगी पडेल असा गीता हा ग्रंथ आहे असे तुम्ही एकाएकीं ठरवू नये. गीता हा केवळ कर्तव्यशास्त्रावरील ग्रंथ

नाहीं. आपलें कर्तव्य आपण स्वतः विचार करून ठरविलें पाहिजे. एखादा विशिष्ट रोग झालेल्या मनुष्यापुढें खाद्य वस्तूंच्या भक्ष्याभक्ष्यतेविषयीं जें व्याख्यान डॉक्टर देईल ते व्याख्यान निरोगी स्थितींतल्या किंवा अन्य रोगानें पछाडलेल्या मनुष्यानें आपणास सल्ला म्हणून वापरणें चांगलें नाहीं, त्याप्रमाणेंच गीतेंतील उपदेशाची गोष्ट आहे. भगवंताच्या उपदेशाचा हेतु अर्जुनाला त्यावेळेस लढायला लावण्याचा होता. कर्म करणें म्हणजे लढणें असें ठरविलें तर जगांत लढाया बंद करण्याचेंच ध्येय ठेवायला नको. जो क्षत्रिय असेल त्याचें कर्म लढणें हेंच केवळ नाहीं. क्षत्रियाचें कर्म संरक्षण करणें, राज्यकारभार चांगला चालविणें आणि इतर धंद्यांतल्या लोकांना आपापले धंदे अधिक चांगल्या तऱ्हेनें करतां यावे म्हणून राज्यपद्धति वापरणें हे आहे. कर्मयोग म्हणजे कर्म करण्यांत दाखविण्याचें कौशल्य ही गोष्ट अत्यंत प्रशसनीय आहे, म्हणजे कर्मयोग आणि मनुष्यसंहार यांचें समीकरण करतां येणार नाहीं. ''

" श्रीकृष्णाचा कर्मयोग सांगण्यांत कोणता उद्देश होता?'' एका श्रोत्यानें विचारलें.

" गीता हा कर्मयोगावरचा उत्तम ग्रंथ नव्हे. समाजांतील अनेक वर्गांच्या कर्माविषयीं किंवा कर्तव्याविषयीं स्पष्टीकरण गीतेंत नाहीं. माझ्या मतें अर्जुनास लढावयास लावण्याचा भगवंताचा उद्देश होता.लढावयास लावणें म्हणजे सन्यास नव्हे. ती क्रिया धरली तर कर्मयोगांतच घालतां येईल; यासाठीं जी क्रिया ज्या एका मोठ्या क्रियासमुच्चयांत अंतर्भूत होते त्या क्रियासमुच्चयाचेंच समर्थन करणें हें कार्य श्रीकृष्णानें केलें. पण मोठ्या क्रियासमुच्चयाचें समर्थन केलें म्हणजे प्रत्येक क्रियेचें समर्थन होतें असा त्यांतला मुळींच भाग नाहीं हेंहि स्वामींनीं सांगितलें. जगांतील एकंदर मनुष्यवर्गाचें कर्तव्यासंबंधीं प्रश्न विचारास घेऊन त्यांविषयीं उपदेश करणाऱ्या तत्त्वज्ञानाचा ग्रंथ गीता हा नव्हे, श्रीकृष्णाचा त्यांत तत्त्वज्ञान सांगावयाचा मुख्य उद्देश नसून आपलें कार्य साधून घेण्याचा होता, म्हणजे वकीलीचा होता हें लक्षांत ठेवलें नाहीं तर अनर्थ ओढवेल. युद्ध कर हा उपदेश देखील त्या समयापुरताच खरा धरावा. युद्ध करणें मनुष्याचें खरोखर प्रधान कर्तव्य नाहीं. श्रीकृष्णाच्या दृष्टीनें हें जर कर्तव्य असतें, आणि "य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतं" या सारखी म्हणजे कोणी कोणाला मारीत नाहीं व कोणी मरत नाहीं हें व इतर तत्सम वाक्यें लक्षांत ठेवून मनुष्यानें नेहमीं वागत जावें असें जर त्याचें खरोखरच मत असतें तर धर्माला कर्णानें मारूं नये म्हणून श्रीकृष्णानें प्रयत्न कशासाठीं केला असता. अर्थात श्रीकृष्ण तत्त्ववेत्त्याचें काम करीत नव्हता आणि दोन्ही पक्षांतील सत्याचा निर्णय करण्याचा प्रयत्न त्याहून करीत नव्हता. तो केवळ एका विशिष्ट पक्षास जय येण्यासाठीं जें कार्य करावयाला पाहिजे तें करीत होता. आणि गीतेच्या वाचकानें गीतेकडे आयुर्विषयक सत्य या दृष्टीनें न पाहतां आयुर्विषयक आणि कर्तव्यविषयक एक बाजू मांडणारा एक ग्रंथ या दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. श्रीकृष्णास जीं कृत्यें साध्य करावयाचीं तीं साध्य करण्यासाठीं त्यानें वकीली पद्धतीचें पण तत्त्वज्ञानयुक्त एक व्याख्यान दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. तर आतां आपणास पुढें काय करावयाचें; गीतेसंबंधानें कोणती दृष्टि ठेवावयाची, गीतेचें प्रत्येक व्यक्तीनें पारायण करावयाचें किंवा नाहीं, सन्यासधर्म अजीबात वगळावयाचा काय याविषयीं प्रश्न उपस्थित करून त्यावर आपला आपणच निर्णय केला पाहिजे कर्मत्यागाची अशक्यता गीतेंत सांगितली आहे ती कोणासहि पटण्याजोगी आहे. सर्व कर्मांचा संन्यास कोणासहि शक्य नाहीं, आणि जोंपर्यंत भुकेसारख्या गोष्टी मनुष्यदेहाशीं संबद्ध आहेत

तोंपर्यंत प्रत्येक मनुष्यास मग तो संन्यासी असला तरी देखील, इतर मनुष्यास जे नियम लागू पडतात ते त्या नाहि लागू पडतील हेंहि सत्य आहे. तथापि संन्यासदीक्षेचा किंवा संन्यासीवृत्तीची अनवश्यकता तेवढ्यानेंच सिद्ध होत नाहीं. चार वर्गास त्याचप्रमाणें चारहि आश्रमांस कर्में स्वतंत्र आहेत. तर कर्ममार्ग आणि संन्यासाश्रम यांचें खरोखर वैरुद्ध्यच नाहीं. संन्यासाश्रमासहि धर्मशास्त्रकारांनीं कर्में सांगितलीं आहेत तर कर्मयोग आणि संन्यासाश्रम यांत द्वैत कोठून असणार? कर्मयोगाच्या तरफदारीसाठीं ज्या कर्मसंन्यासावर भगवद्गीतेनें कोरडे ओढले तो कर्मसंन्यास वास्तविक नसून काल्पनिक होय. पण गृहस्थाश्रमी मनुष्य कर्मयोगाच्या तरफदारीनें आपल्या आयुष्याचीच तरफदारी झाली अशी आपली चुकीची समजूत करून घेतो. खरोखर पहातां कार्यकर्त्यांच्या दृष्टीनें संन्यासाश्रम हा कर्ममार्गालाच अधिक यशस्वी करणाची पद्धति आहे असें म्हणण्यास काय हरकत आहे? अशा अर्थाचें स्वामी ब्रह्मगिरींचें व्याख्यान झालें.

स्वामी ब्रह्मगिरींचें व्याख्यान ऐकावयास जी मंडळी आली होती त्यांत विश्वमित्र, विहंगमा, डॉ. नंदिका, लालनाथ इत्यादि मंडळी देखील होती. ही सर्व मंडळी पहिल्या रांगेंत बसली होती. त्यांत सहजगत्या असें झालें की, विश्वमित्राच्या एका बाजूस डॉ. नंदिका बसल्या होत्या व दुसऱ्या बाजूस विहंगमा बसली होती, व नंदिकेच्या दुसऱ्या बाजूस तिचे पती लालनाथ होते. या परिस्थितींत विश्वमित्र आणि डॉ. नंदिका यांच्या सान्निध्यामुळें त्यांनीं एकमेकांशीं बोलणें अगदीं स्वाभाविक होतें, व कोणीहि मनुष्य बाहेर पडला म्हणजे इतर भेटणाऱ्या मंडळींशींच बोलणार घरच्याच मंडळींशीं बोलणार नाहीं, व यामुळें विश्वमित्रानें व्याख्यानाच्या स्थळीं नंदिकेशींच बोलणें स्वाभाविक होतें. तसेंच नंदिकेनें आपल्या नवऱ्याशीं न बोलतां विश्वमित्राशीं बोलणेंहि स्वाभाविक होतें. व्याख्यानानंतर डॉक्टरीण बाईंनां व लालनाथांनां त्यांच्या घरीं आपल्याच मोटारींतून विश्वमित्रानें पोंचविलें.

व्याख्यान चालू व्हावयाच्या पूर्वी डॉ. नंदिका व विश्वमित्र यांचें थोडें बोलणें झालें. त्या बोलण्यांत वेदांताचा उपयोग काय? हा काय व्यावहारिक विषय आहे, अशा तऱ्हेची पृच्छा नंदिकाबाईंनीं केली, व नंतर माझ्यासारख्या बायकांना एकंदर तत्त्वज्ञानाचा उपयोग काय असें वाटायला लागतें. हिंदुस्थानांतील लोकांनीं तत्त्वज्ञानावर चर्चा का करावी, हें मला समजत नाहीं. हें तत्त्वज्ञान तर समजायला फारच कठिण वाटतें. लोक चर्चा करतांनां आपण कांहींतरी उच्च विषयांवर विचार करतों अशी ते आपली समजूत करून घेतात कीं काय? माझ्या बायकी बुद्धीप्रमाणें तत्त्वज्ञानाच्या व्याख्यानापेक्षां मस्करीचा नकला ऐकायला जाणें अधिक चांगलें होईल असें वाटतें. आज तत्त्वज्ञानाच्या व्याख्यानास मंडळी जमली कशी! व इतक्या बायका कशा आल्या याचेंच मला आश्चर्य वाटतें. मी आलें याचें कारण स्वामींची व माझी पूर्वीची ओळख होती एवढेंच होय. अशा तऱ्हेचे विचार व प्रश्न नंदिकाबाईंनीं प्रगट केले. नंदिकाबाईंची बोलण्याची रीतच अशी होती कीं, मोठमोठ्या गोष्टींवर चेष्टेचे आणि तुच्छतेचे विचार प्रगट तर करावयाचे पण ते प्रगट करताना आपण बायकोमाणूस फार गहन विचार आपणांस समजत नाहींत असें दाखवावयाचें, ही रीति तिला फारच पसंत असे. स्त्री सुशिक्षित असतां आपण काय बायको माणूस आपलें वाचन फारसें झालें नाहीं इत्यादि गोष्टी जर ती बोलली तर सामान्य शिक्षित पुरुषाचा वर्ग बराच खुलून जातो आणि स्वतःस शहाणा समजून जे आपणास समजत नाहीं तें मोठ्या आस्थेनें समजावून देण्यास लागतो

असा तिचा अनुभव होता. स्त्रियांच्या मनावर परिणाम करण्यासाठीं अनेक पुरुष आपल्या बुद्धिमत्तेचे प्रदर्शन कसें करू पहातात याची तिला माहिती होती, आणि आपल्या मनावर परिणाम घडविण्यासाठीं पुरुषांनीं धडपडावें, आणि आपण या बाबतीतील त्यांच्या धडपडीची मौज पहावी ही गोष्ट देखील तिला आवडत होती एवढेच नव्हे तर आपल्या मनावर परिणाम करविण्यांत पुरुषांची चुरस लागावी हेंहि तिला हवे असे. नंदिका जरी वादविवादांतहि रंगत असे तरी आपल्या मनावर इष्ट परिणाम घडविण्यासाठी निरनिराळे पुरुष काय प्रयत्न करतात हे पहाण्याची तिला जास्त आवड असे वादविवादाचे सौख्य ती फारशी शोधीत नसे. आपणास लोकांनीं बुद्धिमान समजावे यापेक्षां आपण लोकांस आवडावें हेंच तिला अधिक प्रिय होते. आपण दुसऱ्यास आपली हुशारी दाखविल्याने आपली आकर्षकता वाढत नाहीं तर दुसऱ्यालाच आपण आपल्या शंकेचें समाधान करण्यास समर्थ समजतो असे दाखविले म्हणजे आपली आकर्षकता जास्त वाढते असे तिला वाटे. स्त्रियांच्या अंगीं आपल्या सौंदर्याचा मूर्ख गर्व आहे असे पुरुषास दिसले तर पुरुष स्त्रीला केव्हांहि फारसे दोषी धरणार नाहींत पण ज्या स्त्रीस आपल्या बुद्धिमत्तेचा गर्व असेल अशी स्त्रीच्या सहवासात कोणाहि पुरुषास आनंद वाटणार नाहीं असे ती समजे.

नंदिकेच्या प्रश्नामुळे आणि मधून मधून केलेल्या टीकेमुळे विश्वमित्रास तिच्या बोलण्याकडे लक्ष देणे भाग पडे, आपल्याकडे थोडासा अडाणीपणा घेऊन वेदांत म्हणजे काय? कर्मयोग म्हणजे काय? टिळकांचे मत काय होतें? असे साधे प्रश्न तिनें विचारले व विश्वमित्रास आपली विद्वत्ता दाखविण्याची संधि दिली. त्याचा परिणाम त्याच्या मनावर काय झाला असेल ते सांगता येत नाहीं. याच वेळीं आपण दुर्लक्षिल्या गेलों आहोत अशी भावना असलेली विहंगमा आपले अस्तित्व आहे, आणि आपल्याकडे दुर्लक्ष झाले आहे हे जणू काय आपणांस कळलेच नाहीं असे दाखविण्यासाठी मुद्दाम लालनाथांशीं बोलून आपलें डॉक्टरीणबाईप्रमाणेच मत आहे काहो, वगैरे प्रश्न करी. थिएटरमध्ये नवरा आपल्याकडे लक्ष न देतां दुसऱ्याच बाईपाशीं बोलत आहे, व शेवटीं व तिला आपल्या घरीहि मोटारीतून पोंचावेता झाला याचा खेदस्वरूपी परिणाम विहंगमेच्या मनावर झाल्या शिवाय राहिला नाही.

स्वामी ब्रह्मगिरींचे व्याख्यान चालू असता ते अनेकांस ग्राह्य तर कित्येकांस अग्राह्य असे दिसले. आपले कर्तव्य ठरविण्यास आपण प्रथांकडे न पहाता ते स्वतः विचार करून ठरविलें पाहिजे इत्यादि त्यांची मते बऱ्याच लोकांस आवडलीं. श्रीकृष्णास "वकील" म्हटले व गीतेस वकीली पद्धतीचें व्याख्यान म्हटले, यामुळे काही वकीलांस तर हर्षवायू झाल्यासारखे झाले, तथापि त्याच्या योगाने गीतेचे धार्मिक महत्त्व कमी होतें अशी भावना पुष्कळास उत्पन्न झाली. प्रवचनास कोणी अध्यक्ष नव्हतेच त्यामुळे ज्या कोणांस जं कांही बोलावयाचे असेल ते व्याख्यात्याचे आभार मानते वेळेसच बोलावे हीच कायती संधि होती. तेव्हां प्रतिसहकार पक्षाचे उपाग्रणी नारायणराव अलंकार उठले. त्यांनी स्वामींच्या कर्मयोगाचे महत्त्व सांगणाऱ्या प्रवचनाबद्दल स्वामींचे आभार मानलेच, पण त्याबरोबर कर्मयोग म्हणजे प्रतिसहकारपक्षच आहे हे देखील सर्व श्रोत्यास चांगल्या तऱ्हेनें समजावून देण्याचा प्रयत्न केला. आणि त्याचा परिणाम असा झाला कीं ब्यारिस्टर मोरे उभे राहिले व सभा बरखास्त होण्यापूर्वीच नारायणरावांनीं चांगल्या व्याख्यानात चालू राजकारण विनाकारण आणले आणि दुधांत मिठाचा खडा टाकून व्याख्यानाचें गांभीर्य आणि महत्त्व हीं

बिघडविण्याचा प्रयत्न केला असा आरोप रा. अलंकारांवर केला. पण त्यानंतर वादविवाद वाढूं नये म्हणून स्वामी ब्रह्मगिरीच उठून जाऊं लागले व सभाहि बरखास्त झाली, व नारायणराव अलंकार यांनां जे प्रत्युत्तर द्यावयाचे होते ते मनांतल्या मनांत राहून गेले. दुसऱ्या दिवशी स्वामी ब्रह्मगिरींस भेटावयास अनेक मंडळी आली त्यात व्या. विश्वामित्र, व्या. मोरे वगैरे मंडळी आलीच होती. ती मंडळी गेल्यानंतर कांहीं वेळाने दादासाहेब गेगणे यांच्याशी अगोदर गुप्त संभाषण करून नारायणराव अलंकार आले, व स्वामींस म्हणाले.

"आपले गीतेवर जे व्याख्यान झालें तें सुश्राव्य झाले पण त्याच्या योगाने जनतेवर परिणाम कसा होईल हे आम्हांस सांगतां येत नाही. परिणाम इष्ट होणार नाही अशीच आम्हाला फार भीति वाटते."

"कां बरें?"

"धार्मिक व्याख्यानांचा हेतु लोकांची श्रद्धा वाढावी हा आहे. व्याख्यानाचा परिणाम जर गीतेवरील श्रद्धा कमी होण्यात झाला तर ती गोष्ट बरी होणार नाही."

"आमच्या व्याख्यानाविषयीं तुम्हांस काय वाटले?"

"गीतेंतील अनेक वचनें आपण अशी बाहेर काढलीं की, जी लोकांस भांबावून सोडतील, आणि धर्म म्हणजे काय आहे याविषयी संशय पडेल."

"लोकांस शंकास्थाने उत्पन्न होणे, त्यावर त्यांनी विचार करणे आणि नंतर विचारांतीं शंकानिवृत्ति होणे या क्रिया तुम्हांस नको आहेत काय?"

'या क्रिया व्हावयास नकोत असे नाही. गीतेचा उपदेशक वर्ग तयार करावयाचा असेल तर त्या विद्यार्थ्यांस वादविवादाची कसरत देण्यासाठीं प्रथम शंकास्थानें उत्पन्न करून देणे आणि नंतर त्याची निवृत्ति करणे ही गोष्ट योग्य होईल. पण सर्वसामान्य जनतेमध्ये संदेह उत्पन्न करणे योग्य होणार नाहीं. गीतेंतच "न बुद्धिभेदं जनयेत् अज्ञानां कर्मसंगिनाम्" असे म्हटले नाही काय? त्या वाक्याकडे मी आपले लक्ष ओढूं इच्छितों."

"तुमचे असे म्हणणे की, व्याख्यानांचा उपयोग सामान्य जनतेची विवेचक शक्ति वाढविण्याकडे करू नये!"

"करू नये असे माझे म्हणणे नाहीं, माझे म्हणणे एवढेच की, सार्वजनिक धार्मिक व्याख्यानांचा प्रधान हेतु श्रद्धावर्धन हा असावा."

"श्रद्धा कशाबद्दल वाढवावयाची!"

"गीताधर्मावर म्हणजे आर्यधर्मावर श्रद्धा वाढावी आणि त्यांनां ख्रिस्ती किंवा मुसुलमान होण्याचा मोह पडूं नये यासाठी."

"आणि केवळ श्रद्धा वाढविण्यासाठीं व्याख्यान द्यावयाचे ते कसे द्यावयाचें?"

"ते असे द्यावयाचे की, पहिल्याप्रथम जगांतील सर्व धर्मांची हजेरी घ्यावयाची आणि त्यांत आर्यधर्म कसा श्रेष्ठ आहे हे सांगावयाचें."

"आणि पुढे?"

"महर्षी, मुनी, आचार्य, ब्रह्मद्रष्टे अशी विशेषणे देऊन वेदांतील ऋषी, उपनिषदांतले मुनी वगैरेंची नांवे घ्यावी. त्यांनी आर्यधर्म कसा मंडविला, श्रेष्ठतेस पोचविला, लोकादरास पात्र केला, त्याची दीप्ति उज्वल केली, त्याचा सुवास जगभर पसरविला इत्यादि गोष्टी केल्या हे सांगावयाचें."

"आणि पुढे?"

"श्रीमच्छंकराचार्यांनी अद्वैतसिद्धि कशी केली, मध्वाचार्यांनीं तशीच रामानुजांनीं कशी सेवा केली, हे सांगावे आणि तसेच महाराष्ट्रांतील साधुसंतांनी काय कामगिरी केली हे सांगावे."

"आणि पुढे?"

"लोकमान्यांसारख्या अलौकिक बुद्धीच्या गृहस्थाने या धर्माची उज्वलता जगभर कशी फांकविली आणि स्वामी विवेकानंद, रामतीर्थ यांसारख्या साधूंनीं हा धर्म जगमान्य आहे आणि सर्व

धर्मात श्रेष्ठ कसा आहे हें अमेरिकन लोकांस कसें सिद्ध करून दिलें हें सांगावें."

"आणि अमेरिकन लोकांवर मुळींच परिणाम झाला नसला तर--"

"तुम्ही जर-तसें म्हणूं लागला तर तें आम्ही ऐकणारच नाहीं. अमेरिकन लोक वेदांतील विचार आणि वेदांत ऐकून अगदी गार होऊन गेले हें आम्हांला ठाऊक आहे."

"तुम्हाला 'ठाऊक असेल" तर फारच चांगलें. पण मी अमेरिकेत असतां मला तर विवेकानंदाचें नांव ठाऊक असलेल्या फारशा व्यक्ती भेटल्या नाहींत."

"अमेरिकन लोकांवर परिणाम झाला नसला तरी व्याख्यानात झाला म्हणून तुमच्यासारख्यानीं सांगितलें पाहिजे. तुम्ही अमेरिकेंत जाऊन आलेले आहात; आणि अमेरिकेंत आर्यधर्माची वाहवा होत आहे हें प्रत्यक्ष अवलोकनानें सांगतां असें लोकांस कळल्यानंतर तुमच्या बोलण्याचा त्याची आपल्या धर्मावर भक्ति वाढण्यास खात्रीनें उपयोग होईल."

'धार्मिक व्याख्यानें देण्यासाठीं आपण मला बोलावलें. मी काय बोलावें हें तुम्ही ठरवावें आणि तुम्ही ठरवाल तेंच मी बोलावें असें आपलें म्हणणें आहे काय?"

"मी आपणांस शिकविण्यासाठीं आलों नाहीं. तथापि आपल्याविषयीं लोकांचें मत वाईट होऊं नये म्हणून मी आपणांस सांगतों दुसरें काहीं नाहीं.'

"पण माझ्याविषयीं वाईट मत झालें तर काहीं हरकत नाहीं. मला जे सांगावयाचें आहे तेंच मी सांगणार; लोकांना आवडेल तेंच मी बोलावें असें करून कसें चालणार!"

"व्यवहारांत प्रत्येकानें आपलें बोलणें लोकांस कितपत आवडेल या गोष्टीकडे पाहिलें पाहिजेच."

"पण मी संन्यासी आहे मला व्यवहारांतील तत्वें कशास सांगतां. तीं तत्वें व्याख्यानांवर पैसे मिळविण्याचा ज्याचा धंदा आहे अशासाठीं आहेत, माझ्यासाठीं नाहींत."

"संन्यासी मंडळींना देखील लोकमतेच्या मनाकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. निरनिराळया ठिकाणच्या शंकराचार्यांसारखी मंडळी येथें येतात त्यांना देखील आम्ही काय म्हणतों तें ऐकावें लागतें."

"लागत असेल पण मी कां ऐकावें?"

"अहो, आपल्या पाद्यपूजेसाठीं जेव्हा आम्हांला वर्गणी गोळा करावी लागेल तेव्हा आम्ही पंचायतींत पडूं. लोक आम्हांला म्हणतील कीं, हे संन्यासी नास्तिक झाले आहेत. गीतेंतील धर्म तोच खरा धर्म असें सांगत नाहींत."

"तर मग तुमचें काय म्हणणें आहे?"

"म्हणणें एवढेंच कीं, आज धर्माची जोपासना लोकाश्रयानेंच होणार आहे राजाश्रयानें होणार नाहीं. तर लोकांचीं मनें दुखवूं नये; किंवा आपल्याविषयीं हे नास्तिक आहेत असें मत होऊं देऊं नये."

"आणि झालें तर, त्यांत आमचें काय बिघडलें."

"तुमचें फारसें बिघडो किंवा न बिघडो, तुम्हांला आम्ही बोलावलें हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. आपल्या योगानें आम्हाला धक्का पोंचेल."

"आपल्याला धक्का कसा पोंचेल?"

"अहो, इलेक्शनें जिंकणें, निरनिराळ्या कार्यासाठीं फंड गोळा करणें इत्यादि क्रिया आम्ही नेहमीं करीतच असतों, आपलें व्याख्यान झालें त्यवेळेचें थिएटरचें भाडें आणि दिवाबत्तीचा खर्च आम्ही अशाच एका फंडांतून दिला होता."

"बरं मग."

'आमचें एवढेंच म्हणणें कीं ज्या कारणांस्तव आम्ही फंड गोळा केला तो फंड धर्मरक्षणासाठीं

होता म्हणजे श्रद्धा वाढविण्यासाठीं होता, आपलें व्याख्यान त्या हेतूशीं विसंगत झालें.''

"तर मग तुमचे असे म्हणणे आहे काय कीं त्या दिवशींचे दिवाबत्तीचे पैसे आणि थिएटरचे भाडें मी द्यावे. बरें आहे, तसे स्वच्छ सांगा.''

"अगदी तसेंच कांहीं नाहीं, आमचे म्हणणे एवढेंच की आपण पुढची व्याख्याने धर्मावर श्रद्धा वाढेल अशी द्यावींत.''

"संन्यासधर्मावर श्रद्धा वाढेल अशी दिलीं तर चालतील काय ? ' हे बोलताना स्वामी ब्रह्मगिरींच्या मनात काही कल्पना आली आणि त्यांनीं स्मितयुक्त होऊन पृच्छा केली.

"काहीं हरकत नाही. संन्यासधर्मावर तरी आपली श्रद्धा आहे असे लोकास दिसू द्या. कर्मयोगाविषयी आपण बोललात, आतां आपण संन्यास धर्मावर बोलला आणि त्यावर श्रद्धा उत्पन्न केलीत तरी ती गोष्ट वाईट नाहीं.''

नारायणराव अलंकार मोठया विजयी मुद्रेनें बाहेर पडले. आपण आपल्या पक्षाला मोठया कचाटींतून वाचविलें ही भावना त्यांच्या तोंडावर चांगलीच दिसत होती.

---

## प्रकरण १८ वें.

## मायलेकींचें संभाषण.

"तुझ्या तोंडावर उल्लसितवृत्ति उत्पन्न करण्यांत जरी मला काही यश उत्पन्न झालें आहे तरी मधून मधून तूं कांहीं गूढ विचारांत गढण्याचे अजून टाकून दिले नाहींस. तूं माझ्याजवळ आल्याला सतरा वर्षे झालीं, आलीस त्यावेळेस तुझे वय पंधरा वर्षांचे असेल नसेल, आणि पंधरा वर्षांच्या मुलीला जग फुलांनी आणि अद्‌भुत रसाने भरलें आहे आणि आपणास त्या जगांत पुष्कळ बागडावयाचे आहे असे वाटलें पाहिजे. तुला असें वाटावे म्हणून मी पुष्कळ प्रयत्न केला पण तूं मला या बाबतींत चांगले यश दिलें नाहींस.''

"आई, मी आनंदांत असावें म्हणून तूं ज्याप्रमाणे प्रयत्न केलास त्याप्रमाणे मीहि प्रयत्न केला नाहीं काय? आल्यें त्याच्या दुसऱ्या दिवशीं उडया मारण्याची दोरी तूं माझ्यापुढे ठेवलीस, आणि त्यावेळेस जरी माझ्याएवढ्या मोठया मुलीला उडया मारण्याचा संकोच वाटला तरी दोन तीन दिवसानीं मी उडया मारायला देखील सुरवात केली नाही काय?''

"तू सुरवात केलीस पण ज्या त्रासांतून तूं मुक्त होऊन मजकडे आलीस त्या त्रासाच्या दिवसाना तू अजीबात विसरून जावे म्हणून मी तुला सांगितलें; पण तू आलीस तेव्हापासून तुझें पूर्वायुष्यावर विचार करणे सुटलें नाहीं.''

"पण सुटावे म्हणून मी प्रयत्न केला नाहीं काय? विसरणे किंवा न विसरणे ही आपल्या हातची गोष्ट आहे काय? ''

"त काय प्रयत्न केलास? ''

"मी प्रयत्न पुष्कळच केला. माझें पूर्वीचें नाव आणि आडनाव यांची मला आठवण देखील राहूं नये म्हणून मी बाप्तिस्मा घेतला; व बाप्तिस्म्यानंतर इग्रजी नाव धारण केले आणि तुझीच मुलगी या भावनेने आपण रहावें, तुझ्या हेतूशी आणि धोरणाशीं माझें पूर्ण तादात्म्य व्हावें म्हणून खटपटहि केली; तू प्रत्येक वेळेस मला जें सांगितलेस की, वागणूक किंवा नीति यांचा बिघाड ज्या स्त्रीपुरुषात झाला असतो त्यांच्या बावतींत दुर्वृत्तीपेक्षा दुर्दैव हेंच कारण असते. त्यावर विश्वास ठेवून मी जगाकडे पाहूं लागल्यें तेव्हां तूं सांगितलेल्या तत्त्वाची मला प्रचीति दिसूं लागली. तूं सांगितलेस त्यावर मी विश्वास ठेवून दुराचराणी म्हणून समजल्या जाणाऱ्या परंतु खरोखर दैवानें फसविलेल्या प्रत्येक स्त्रीस नवा आनंद प्राप्त व्हावा म्हणून प्रयत्न केला कीं नाहीं. मी स्वतः आनंदांत रहावे यासाठीं मीच आनंदाची प्रचारक बनल्यें आणि त्याचा मला फायदाहि झाला; दुःखी स्त्रियांना जगाकडे आनंदाच्या दृष्टीनें पहावयास

लावण्यासाठीं जी मी दृष्टी त्यांच्यापुढे मांडू लागले ती दृष्टी माझीच होऊं लागली. आनंद पेरण्याचे काम मी कर्तव्य म्हणून करीत होत्ये, निराश झालेल्यांना आशांचे किरण दाखवीत होते, तर त्याच्या योगाने माझ्यावर परिणाम होऊन माझीच आनंदी वृत्ति वाढत चालली आणि माझे बोलणे अधिक अंत:करणपूर्वक होऊ लागले."

"होय, पहिली पांच सहा वर्षे तुझ्यासंबधाने हे मी कबूल करते कीं, तू त्यावेळेस आनंदित दिसत होतीस. पण पुढे तुझ्या आयुष्यांत गंभीरपणा वाढावयाला लागला. तो गंभीरपणा पोक्त बाईस शोभला असता, पण तुझ्यासारख्या लहान मुलीला म्हणजे एकवीस बावीसाव्या वर्षाच्या मुलीला मुळींच शोभला नाहीं; आणि त्यावेळेस मी तुला ते सांगितलेहि."

"पण मी त्यावेळेस दिलेले उत्तर तुला आठवतहि असेल."

"होय, चांगले आठवते, तू मला सांगितलेस कीं, गंभीरपणा दु:खाच्या अनुभवामुळे येतो, पण त्यावेळेस मी तुला सांगितले नाही कां कीं, पूर्वीचा दु:खाचा काल तू अजीबात विसरून जा, आणि दु:खाचा काल दिवसानुदिवस मागेच पडत चालला आहे हे ओळख."

"होय, तू ते सांगितलेस आणि त्यावेळेस मला उत्तरहि देतां आले नाहीं, पण त्यावेळेच्या काळापासून माझी गंभीरवृत्ति उत्पन्न झालेली कायम आहे पण ती केवळ दु:खाच्या कालाच्या आठवणीमुळे नाही."

"तर मग काय कारण?"

"कारण एवढेच की, माझे आयुष्य व्यर्थ चालले अशी भावना त्यावेळेस जी उत्पन्न झाली ती पुढे कधींच गेली नाहीं."

"तू जे काम करतेस त्या कामांत तुला आनंद होत नाहीं काय?"

"आनंद होत नाही असें कसे म्हणूं. उलट त्या कामाच्यामुळेच मला आयुष्य कमी कष्टमय वाटते. नाहींतर मी त्याच त्याच गोष्टीवर विचार करून वेडी झाले असते."

"तूं ज्या गोष्टावर वारवार विचार करतेस ती गोष्ट कोणती, तुला तुझ्या दिरानें आपल्या बायकोचे ऐकून एकदम दोषी ठरविले आणि घरांतून घालवून दिले एवढीच ना? कीं तुझ्या जावेने तुझ्यावर कुभांड रचले याबद्दल दु:ख करतेस? कीं तुझ्या नवऱ्याने तुझी चौकशी केली नाही याबद्दलच तुला एकसारखे दु:ख होत आहेच?"

"माझे दीर आणि माझी जाऊ यांच्याविषयी मला राग पुष्कळच होता. विशेषेकरून माझ्यावर खोटा आळ आणणाऱ्या जावेवर होता; माझे पती कोठे अगोदरच नापत्ता झाले होते. लग्न करावयाचे आणि बायकोची काळजी कांहीच करावयाची नाही असले नवरे तरी कसले? असा विचार मनांत येइ पण त्याबरोबर असेहि मनात येई की, त्यानी गृहत्याग केला तर ते कोणत्या बरें अडचणीत असतील? काही तरी अडचणींत किंवा आपत्तींत असल्याशिवाय त्यांच्या हातून आपल्या लग्नाच्या बायकोसंबंधी कर्तव्याच्या उपक्षेचे वर्तन झाले काय असेहि विचार मनांत गेली कित्येक वर्षे येत आहेत आणि हे विचार येण्याचे कारण "दुर्वृत्तीचें कारण दुर्दैव होय" हा तुझाच उपदेश होय. नवरा नापत्ता झाला व त्यामुळे माझ्या पोषणाचा सर्व भार माझ्या दिरावर पडला होता, अशा स्थितींत माझ्याविरुद्ध काहींहि कोणी सांगितलें कीं, त्यांना ताबडतोब पटे. आणि माझी जाऊ तर फारच संशयीपणाने वागे. एकदां जाऊबाई घरीं नव्हत्या, आणि माझे दीर ऑफीसांतून घरीं लवकर आले तेव्हां त्यांना मी फराळासाठीं ओले पोहे आणि चहा करून दिला, तेव्हां जाऊबाईंना माझ्याविषयीं फार वैषम्य वाटलें. मी फराळाचें

केलें याचें कारण मी घरांत काम करीत असून कांहींच काम करीत नाही याच्याबद्दल अगोदरच बोभाटा झाला होता, तेव्हा म्हटले की. जाऊबाईनीं असे म्हणू नये कीं, एक दिवस मी बाहेर गेल्ये तर हिला चहा करून सुद्धां देतां आला नाहीं. पण मी चहाचे आणि फराळाचे करून दिले तेव्हां पुरुषाच्या पुढे पुढे करून त्यांनां भाळवायला पाहिजे असे जाऊबाईनी उद्गार काढले, आणि संध्याकाळी जेवताना माझ्या दिरानी सहज माझ्या फराळाची स्तुति केली तेव्हा तर माझ्या जाऊबाईनीं यजमानांची पाद्यपूजा केली. काळ्या बायकोचा फराळ कसा आवडेल? धाकटी भावजय गोरीगोमटी आहे. तिच्या हातचा फराळ आवडावयाचाच असे माझ्या जाऊबाई बोलायला लागल्या. माझे दीर साधारणपणे सभ्यतेच्या कल्पनानी घेरलेले होते. त्याना असे वाटे की, आपल्या बायकोने शेजाऱ्यापाजाऱ्यांस ऐकू जाईल असे मोठमोठ्याने बोलू नये; आपल्या नवऱ्याला अब्रूची भीति वाटत आहे हे तिने ओळखले, आणि तेव्हापासून ती मोठमोठ्याने बोलून आणि आपल्या घरांतिल वर्म शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या दृष्टीस पडेल ही भीति नवऱ्याच्या मनात उत्पन्न करून त्याला चप्प करून आपल्या हुकमतीत वागवीत असे. तेव्हा मला असे दिसून आले कीं, अब्रूच्या खोट्या कल्पनानी कुलीन स्त्रियानां ज्याप्रमाणे दुष्ट भाऊ व दीर याच्या तावडीत रहावें लागते त्याप्रमाणेच पुरुषानांहि बायकांच्या तावडींत रहावे लागते "

"तर मग तुझ्या मतानं तुझ्या दिरापेक्षा तुझी जाऊच तुझ्या दु:खमय आयुष्यास कारण झाली."

"मी असे कसे म्हणू, मला असे वाटते कीं तिनें आपल्या दुष्टपणानें माझ्यावर उपकारच केला. मी तेथेच जर असते तर माझे आयुष्य अधिक दु:खमय स्थितीतच असते."

"जावेने तुझ्या वर्तनाविषयी खोटा आळ उत्पन्न करून तुला घरांतून घालवून देण्याचा जो प्रयत्न केला तो तुला हितावहच झाला?"

"झाला असे वाटते, आज माझे दीर गेले, जाऊबाईहि परलोकीं गेल्या, आणि घरात राहूनच मी आतांपर्यंत दिवस काढले असते तर माझे दीर वारल्यानतर मी आता काय करू असे झाले असते; आणि त्यावेळेस जर या संस्थेची बातमी समजली असती तर या संस्थेतच मी आले असते."

"पण तूं घरांतील ही इतकी परिस्थिति मला आतांपर्यंत कशी सांगितली नाहीस मी तुला भेटल्यें त्यावेळेसच तुला मी तुझ्या पूर्वेतिहासाविषयी प्रश्न केला. पहिल्याप्रथम तर तर तुझ्या नवऱ्याचा पत्ता नाही हेहि तू मला सांगितले नाहींस तर तुझा नवरा मृत्यू पावला असेच मला भासविलेस; आणि जावेने तुझ्यावर वाईट आळ घेऊन घराबहिर घालवून दिले एवढेच तू मला सांगितलेस, त्यापेक्षा जास्त सागितले नाहींस. आणि तुला जी गोष्ट सागावयाची नसेल ती तुझ्याकडून काढून घेण्याची माझी इच्छा नव्हती, आणि त्यामुळे मीहि सर्व कथा बाहेर काढण्याच्या भरीस पडले नाही. पण ही एवढी साधी गोष्ट तुला लपविण्याचे काय कारण होते!"

"कारणे पुष्कळच होती "

"ती कोणती "

"एक तर तुझ्याविषयी मला परकेपणा वाटत होता."

"कां बरे?"

"जरी तू मला सांगितलेस कीं, मला तू आपल्या आईच्या जागी समज, तरी देखील ती भावना माझ्या मनांत उत्पन्न होईना. तूं यूरोपीअन बाई आणि मी हिंदु मुलगी ही जाणीव माझ्या मनांतून जाईना."

"माझ्या वागण्यांत तुला ममतेशिवाय दुसरे काही दिसले काय! मला तर वाटे कीं मी अत्यंत ममतेनें वागत होते एवढेच नव्हे तर तू मला एक मोठा ठेवा सापडलीस असेच मला वाटत होते; तुला आनंदी करण्यात मला आनंद वाटत होता."

"तू जरी ममतेनें वागत होतीस तरी माझ्या मनांतून तुझ्याबद्दलची निराळेपणाची भावना गेली नाहीं पुष्कळदा लाघवी मिशनरी बाया पुष्कळ प्रेमाचें सोंग करतात असे मी ऐकले होते आणि तुझे माझ्यावर प्रेम करणे हे केवळ त्या मायावी वागणुकींतला एक डाव आहे असे मी समजत होतें."

"युरोपीयन आणि हिंदी या दोन जातींतला एकमेकांविषयीं असलेला अविश्वास केव्हा जाईल तेव्हां जावो, हा अविश्वास अगोदर आलेल्या युरोपीयन लोकांच्या पापाचें फळ असावे."

"असेलहि, पण काही अंशी हा अविश्वास केवळ तू आमच्या सारखी नाहीस एवढ्याच मुळेहि उत्पन्न झाला असेल."

"बरे, मग हा अविश्वास केव्हा गेला?"

"केव्हा गेला हे नक्की सांगतां येत नाहीं, पण हा अविश्वास जाण्यास चारपांच वर्षे लागलीं असावींत असें वाटतें."

"केवळ मजविषयीं परकेपणा वाटत होता म्हणून का तूं मला काहीं सांगितले नाहीस!"

"होय, मला असें वाटत होतें कीं, ही सर्व कथा तुला समजली तर आम्हा हिंदू लोकांच्या विषयीं तुझा इंग्रज बाईचा एकंदर वाईट समज होईल."

"जर आमच्याविषयीं इतका अविश्वास व परकेपणा वाटत होता तर तू ख्रिस्ती धर्म तरी कसा स्वीकारलास! लाघवी मिशनरी स्त्रिया ज्या दुष्ट हेतूसाठी माया दाखवितात म्हणून तुझी समजूत झाली होती तो दुष्ट हेतू तर तू उलट आपण होऊनच कसा साध्य होऊं दिलास. मी तुला ख्रिस्ती होण्यास आग्रह देखील केला नाहीं. मी तर तू हिंदू असतांनाच तुला आपली मुलगी म्हणून समजत होतें."

"मी ख्रिस्ती धर्म का स्वीकारला; त्याचे कारण निराळेंच आहे. मला तुमच्या लोकांविषयी संशय होता त्याप्रमाणे हिंदू लोकांच्या मनाची जाणीव होती मी मिशनमध्ये राहिले, तुमच्याबरोबर जेवले एवढ्याने मीच ख्रिस्ती झाल्ये, बाटल्ये, पतित झाले, असे माझे मलाच वाटत होते. तर आता हिंदूमध्ये परत जाण्याचाच विचार नको; आतां ख्रिस्ती म्हणूनच दिवस काढावे; हिंदू समाजात परत जाऊ नये; आणि ज्या समाजात माझी जाऊबाईनी पुरी अपकीर्ति करून ठेवली असेल त्या समाजात परत जा तरी कशाला, व लोकांनीं माझ्याविषयी कुजबुजावे हे पुन्हा पहावे तरी कां, तर हिंदुसमाजाला कायमचा रामराम ठोकावा व एकदा आपण ख्रिस्ती आहों असे ठरवून घ्यावे म्हणून मनाचा निश्चय करून शेवटी मी ख्रिस्ताचा आश्रय केला."

"ख्रिस्त हा मनाच्या शांतीचा ठेवा अशी तुझी समजूत झाली होती की नव्हती!"

"त्यावेळेस तर तशी समजूत मुळीच नव्हती. मी उच्च भावना जागृत करण्यासाठीं नव्हे, तर गतगोष्टींची आपली आठवण पुसटली गेली नाही तरी लोकाची पुसटली जावी, व या फायद्यासाठीं आपण आपले अंतःकरण सैतानाला विकून टाकावे याच भावनेने ख्रिस्ती संप्रदायाचा आश्रय केला. ख्रिस्ताविषयीं आदरभाव माझ्या मनांत मागाहून वाढला."

"तू आज अंतःकरणाने ख्रिस्ती-आहेस काय!"

"मी ख्रिस्ती आहे असे वाटते. पण अशी खोटी बढाई मी कशासाठीं मारू? जगात ख्रिस्ती मंडळी क्वचितच असतात. ख्रिस्ती असणें ही सोपी गोष्ट नाही अशी माझी समजूत आहे. ख्रिस्त हा माझा गुरू आहे एवढेच मी कबूल करतें."

"अरे, प्रारंभी तुला माझ्याविषयी परकेपणा वाटत होता याच्याबद्दल मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं, पण तुला माझ्याबद्दल अधिकाधिक आपलेपणा केव्हां वाटावयास लागला."

"आई, मशयाचे दिवस गेले, तरी एकदम परकेपणा गेला नाहीं. तुझे हेतु एखाद्या मिशनरी बाईप्रमाणे धर्मांतराचे नाहीत अशी माझी जरी खात्री झाली तरी तू माझ्यापेक्षां निराळी आहेस ही भावना होतीच. तू जेव्हा मजप्रमाणेच दुःख भोगलेली आहेस अशी माझ्या मनाची खात्री होऊ लागली तेव्हा मात्र तुझ्याविषयी मला अधिक सारखेपणा आणि आपलेपणा वाटू लागला. जोपर्यंत तू मोठी धैर्याची, करारी कर्तव्य-दक्ष, आणि लोकावर उपकार करण्यास तत्पर आहेस असे दिसत होते तोपर्यंत तुजविषयी मला आदर वाटे; पण आपलेपणा किंवा खरे प्रेम उत्पन्न झाले नाहीं. तू मला एकादी उच्च कोटी-तली स्त्री वाटत होतीस पण जेव्हा तुला मी मि हटर याच्या फोटोकडे पाहून अश्रु गाळ-तांना पाहिले तेव्हां तू माझ्यासारखांच स्त्रियांच्या दौर्बल्याने युक्त आहेस असे मला कळून चुकलें आणि तेव्हा तुझ्याविषयीं मला अधिक आपले-पणा वाटला."

"माझे अश्रु तुझ्या दृष्टीस पडले काय!"

"पुष्कळदां पडले. आपला दोघींचा इतका निकट संबंध असता तुझे दुःख माझ्या दृष्टीस पडणार नाहीं काय? तुझे दुःख माझ्या दृष्टीस पडले पण आई तू कां रडतेस असें विचारण्याचे धैर्य मला झाले नाहीं."

"माझ्या पतींची आठवण मला वारवार होते आणि त्यामुळे अनेकदां माझ्या डोळ्यांतून अश्रु येतात."

"वैधव्याचे दुःख कितीतरी तीव्र दिसते, तुला इतके दिवस झाले आणि अजून जर आपल्या पतीची आठवण होते, आणि आठवण झाली म्हणजे अश्रु येतात तर तुम्हां दोघांमध्ये प्रेम चांगलेच असले पाहिजे."

"तसे असतें तर मला इतके दुःख झालें असते कीं नाही, याची शंका आहे. प्रेमाच्या दिवसांच्या आठवणीनी इतके दिवस गेल्यानतर दुःख होत नाही; तर उलट आनंदच होतो पण वाईट दिवसांच्या आठवणी दुःखास कारण होतात." मिसेस हटर अश्रुयुक्त होऊन म्हणाली.

"काय आई तुझ्या पतीनी तुला वाईट रीतीनें वागविले?" मुलीने आपल्या आईच्या पाठीवर मायेने हात ठेवून म्हटलें.

"नाहीं मीच त्यांनां वाईट रीतीनें वागविले." मिसेस् हटर उद्गारल्या आणि काही वेळ स्तब्ध राहून पुढे म्हणाल्या.

"मुली तू माझ्यापेक्षा खरोखरच भाग्यवान आहेस. जे दुसऱ्यापासून विनाकारण दुःख पाव-तात ते खरे भाग्यवान होत. दुखावलेल्या मनु-ष्यास दुखविणाराविषयीं राग येईल त्यांचा संताप येईल आपण त्यास उलट दुःख द्यावें किंवा त्याचा सूड ध्यावा म्हणूनहि इच्छा उत्पन्न होईल, दुखा-वलेल्याच्या मनात दुःख देणारास क्षमा करावयाची हें कायमचे ठरविले म्हणजे दुःखाचा कायमचा परिहार होतो. पण आपण इतरास दुःख देतो त्याबद्दल जो आपल्या मनाला पश्चात्ताप होतो. तो एकाएकीं पुसला जात नाहीं, किंवा आपल्या हातून झालेल्या अपराधाची आठवण नाहींशी होत नाही. आपण जिला दुःख दिले ती व्यक्ति आपणास क्षमा करील; पण त्या क्षमेचा उपयोग काय? त्या व्यक्तीने आपणास कठोरता दाख-विण्याऐवजीं जर क्षमाशीलता दाखविली तर ती क्षमाशीलताच आपणांस अधिक पश्चात्तापांत ठेवून आपल्या दुःखाच्या वाढीस कारण होते. आपण ज्यास दुखावले असेल त्याच्या क्षमा-शीलतेमुळे त्याच्याविषयीं आपल्या मनात आदर वाढतो पण, जसजसा आदर जास्त वाढत जातो, तसतसा आपल्या वर्तनाविषयी आपणासच राग

येत जातो, आणि आपण आपणापच शिक्षा करण्यास असमर्थ असल्यामुळे आपण अगदीं असहाय होतो. मला असे वाटू लागले आहे की, दुसऱ्याला दुखविणारें क्षमेसारखे दुसरे शस्त्र अस्तित्वांतच नाहीं. अपकाराची फेड उपकारानीं करावीं हे तत्व दयेचे आहे कीं, अपकार करणाऱ्यास लाजवून त्याची शांति बिघडवून त्याचा पुरा सूड घेण्याचे आहे हे मला समजत नाही."

"आई तू खिस्ताच्या तत्वावरच घसरलीस."

"होय, हे खरेंहि आहे पण आपण असे धरू की, प्रत्येक मनुष्य स्वार्थी आहे त्याप्रमाणेच द्वेषकरणाराहि आहे. द्वेष करणारासच विरुद्ध पक्षाच्या मनाला टोचणया उत्पन्न करणाऱ्या दृष्टीने जर क्षमेचे महत्व भासू लागले तर ती जगाची प्रगतीच झाली असे होत नाही काय? क्षमेकडे दुसऱ्याचा सूड घेण्याची युक्ति या दृष्टीने पाहून जरी लोक क्षमायुक्त बनले तरी खिस्ताचे कार्य सिद्ध होत नाहीं काय? मी आपल्या नवऱ्याला विनाकारण दु:ख दिले आणि नवऱ्याने मात्र मला क्षमाशीलता दाखविली याबद्दल मला एकसारखे दु:ख होत आहे. नवऱ्याने क्षमा करून मला जी पश्चात्तापाची शिक्षा दिली ती मी आज अनेक वर्षे भोगीत आहे, तर क्षमा करणे हा कठोर शिक्षेचा एक प्रकारच म्हणू नये काय? ज्या मनुष्याच्या मनात सुडाचीच कल्पना तीव्रत्वाने वागत असते त्यास उत्तम प्रकारचा सूड क्षमाशीलतेनेच साध्य होतो हे कळलें म्हणजे त्याचा स्वार्थ साधून समाजाचे कल्याण होत नाही काय? क्षमा स्वार्थसाधक आहे असे मला वाटतेच; पण तरीहि क्षमेचे महत्व कमी होत नाहीं. आईने आपल्या मुलाचे पालन कर्तव्य म्हणून न करता हा पुढे आपल्याला आधार होईल म्हणून केले तरी तें प्रशसनीय नाहीं काय? प्रत्येक उच्च आचरणतत्वाच्या अवलबनामध्ये स्वार्थ साधतो ही गोष्ट सिद्ध केली तर आपण त्या उच्च तत्वाच्या प्रसारासच मदत केली असें होत नाहीं काय?"

"आई जेव्हा तू ही आयुष्यक्रमणास मदत करणारी तत्वे बोलू लागतेस तेव्हा तुझ्याविषयीं मला निराळाच आदर उत्पन्न होतो."

"तुझ्या मनात काय भावना असतील याविषयी मला वारवार जिज्ञासा उत्पन्न होते. जगाचे अनेक अनुभव तुला अगदीं अल्प वयांत आले; तुझे लग्न अशा वयात झाले की लग्न म्हणजे काय याची तुला कल्पनाच नसेल."

"अगदीच असे काही नव्हते मी जरी त्यावेळेस नऊ दहा वर्षाची होते, तरी लग्न म्हणजे जन्माच्या गाठी हे मला ठाऊक होतें, का की लग्न होऊनच माझी आई व बाबा एकत्र झालीं हें ठाऊक होते, लग्न झाले म्हणजे मुले होतात हे ठाऊक होते, मग बाहुली घेऊन किंवा भातुकली करून लटका ससार करावयास नको, खऱ्याच ससारास लग्नामुळे सुरवात होते हेंहि माहीत होते, आणि हा नवरा "माझा" ही कल्पनाहि माझ्या लग्नाच्या वेळीं मला होती; म्हणजे माझ्या मालकीच्या जिनसात लग्नामुळे काही भर पडला अशा तऱ्हेची भावनाहि उत्पन्न झाल्याचे आठवते."

'वा! तुला इतके समजत होते तर अगदींच काही कल्पना नव्हती असे कसे म्हणावे, मी आठ नऊ वर्षाची होते, तेव्हा फेअरीच्या गोष्टी वाचीत होते, आणि कोणी तरी राजपुत्र मला घेऊन जाईल की नाहीं याचा विचार करीत होतें हें मला आठवते; लहानपणी लग्नाच्या योगाने आयुष्याचे खरे स्वरूप किंवा त्याची कल्पना तुम्हां हिंदुस्थानच्या मुलीस अधिक लहान वयांत आणि बरीचशी स्पष्ट येते असे दिसते. तुला इतक्या लहान वयात इतक्या गोष्टी स्पष्ट समजत असतील अशी माझी कल्पनाच नव्हती. आमच्या सारख्या पाश्चात्य स्त्रियांना निराळ्या परिस्थितींत वाढलेल्या हिंदू मुलींचा कल्पनाविकास कसकसा होत जातो याची कल्पनाच नसते."

" बरें, तूं काय म्हणत होतीस बरं? "

" मी असे म्हणत होते की इतक्या लहान वयांत लग्न, पतीशीं ओळखीचा अभाव, नवऱ्याने बायकोला पत्र लिहिण्याची चोरी, नवरा केव्हां पळून गेला याची तुला नक्की माहिती नाहीं आणि त्यांतल्यात्यांत तुझ्या सौंदर्याच्या योगानें तुझ्या जावेला मत्सर उत्पन्न झाला, तुझ्यावर दुराचरणाचा आळ आला. तुला आत्महत्याच करावीशी वाटली आणि दिरानें तुला कांहीं पैसे देऊन तोंड काळें करावयास सांगितलें, या सर्व गोष्टींच्यामुळे तुझ्या अंतःकरणास बरेंच शिक्षण बाल्यांतच मिळालें आहे. "

" दिरानें तोंड काळें करायला सांगितलें नाहीं जावेनें सांगितलें आणि तें दिराच्या समक्ष सांगितलें; दिरानी घराबाहेर पडतांना खर्चासाठीं म्हणून कांहीं पैसे दिले एवढेच. "

" मग तुला तुझ्या दिराबद्दल इतका राग वाटत नसेल. "

"मी ज्यावेळेस घरांतून बाहेर पडले तेव्हां विहिरींत जाऊन जीव द्यावा किंवा वीष खाऊन जीव द्यावा हेंच विचार माझ्या मनांत येत होते. आणि मी देखील तेंच करावें म्हणून जाऊबाईची इच्छा होती. मी कशीतरी घरांतून निघावें असेंच त्यांना वाटत होतें. माझा खर्च त्यांच्यावर पडतो, आणि कदाचित त्यांच्या गृहसौख्याचे मी मातेरें करीन अशी भीति त्यांस होती. "

"मग जाऊबाईविषयीं तुला काय वाटतें? "

"त्या अगदी दुष्ट होत्या असें वाटतें. "

"मुली, तुझ्या जावेविषयीं मी इतकें वाईट मत बनवीत नाहीं; मनुष्यस्वभाव तुला जसजसा अधिक कळत जाईल तसतशी चांगलीं माणसें आणि वाईट माणसें यांतील फरक तुझ्या दृष्टीनें कमी कमी होत जाईल. "

"मग जाऊबाई आणि इतर चांगल्या बायका यांत फरक कांहींच नाहीं काय? "

"तुझ्या जावेचें करणें तरी वाईट काय होतें? तुझा खर्च तिच्या नवऱ्यावर पडूं नये ही तिची इच्छा स्वाभाविक होती. नवरा ठराविक पैसे आणतो व त्या पैशावर सर्व गरजा भागविण्याची जबाबदारी बायकांवर पडते, त्यामुळें तुझा आणखी खर्च नको म्हणून तुला घरांतून घालवून देणें हें तिला अवश्य वाटत होतें. "

"बरें, माझ्यावर तिनें तिच्या नवऱ्याला भाळविण्याचा प्रयत्न करण्याचा दोषारोप केला तो? "

"ती आपल्या मनांतील स्वाभाविक भीति बोलली. तसल्या गोष्टी होणें शक्य आहे असा तिच्या मनांत किंतु आल्याखेरीज ती बोलली काय? "

"नाहीं. "

"बरं, मग तिनें तसा संशय व्यक्त केला मनांतल्या मनांत ठेवला नाहीं हें बरें केलें कीं वाईट केलें? "

"बरें केलें असेंच म्हणावें लागेल. "

"या सगळ्या गोष्टी लक्षांत घेतां तिचें वर्तन वाईट कितपत झालें? "

"पण माझ्यावर वाईट वर्तनाचा आळ घेऊन मला घराबाहेर तिनें घालविलें. "

"तिनें तुला घराबाहेर घालविण्यास दुसरें काय करावयास पाहिजे होतें? तिला जो मार्ग सुचला तो अनुसरला."

"तिनें आमच्या घरांत तुला भाकरी नाहीं म्हणून सरळ सांगायला हवें होतें. "

"आणि तिनें असें सांगितलें असतें तर तिला शेजाऱ्यांनीं चांगलें म्हटलें असतें कीं वाईट म्हटलें असतें? "

"लोकांनीं तिला वाईट म्हटलें असतें, "

"आणि तूंच वाईट आचरणाची आहेस असें म्हटलें म्हणजे-"

"म्हणजे, मला घालवून देण्याचें समर्थन होतें."

"तर मग तू आपल्या जावेला फार दोष देशील काय?"

"दोष द्यावा हे योग्य होणार नाहीं असे तुझ्या बोलण्याने मला वाटायला लागले आहे हें खरें, जाऊबाई गेल्या आहेत, तरी त्याच्यावरचा राग माझ्या मनातून अजीबात गेला नाहीं. त्यांच्या-विषयीं उत्पन्न झालेल्या रागाचे उद्गं काढण्यास मी असमर्थ आहे. त्या वारल्याचें कळलें तरी एक दोन वर्षे त्याच्याविषयीं माझ्या मनांत राग होताच, आणि त्या आटपल्या तर त्याच्यावर राग करून उपयोग काय असे मी माझ्या मनाला सागत होते पण ते सागणे पूर्ण शाति देत नाहीं. तथापि तू त्यांची जी बाजू माडलीस तीमुळे माझ्या मनाला बरेच वाटते. तिचा मला छळ-ण्याचा जो खटाटोप होता तो न्याय्य नसला तरी स्वाभाविक वाटतो; असे आपण म्हणू कीं, एकत्र कुटुंबपद्धतीच्या अपेक्षांविरुद्ध तें जाऊबाईंचे बड होते, माझ्या पालनपोषणावर खर्च व्हावा आणि माझ्यापासून त्याना विशेष फायदा मिळू नये, याचें त्यास दु ख होत असाव."

"अर्थातच असणार, जर तू पैसे मिळविणारी असतीस म्हणजे मास्तरीण वगैरे असतीस तर तुझा खर्च तिच्यावर पडलाच नसता, आणि तुझी कुटुंबास मदत झाली असती आणि मग तुझ्या जावेपुढें एक प्रश्न पडला असतां तो एव-ढाच कीं आपल्यापेक्षा देखणी आणि नवऱ्या शिवाय असलेली धाकटी जाऊ घरांत राहूं देणें चांगलें आहे काय? आणि मग तिने यापासून विशेष कांहीं वाईट परिणाम होऊं नयेत म्हणून दक्षता बाळगली असती एवढेच."

"आई, गृहकलहाचीं खरी कारणे केवळ पैशा-सबधाची किती असतात याची मला जर जाणीव त्यावेळेस असती, तर मी खराखरच आपला पोषणखर्च माझ्या दिराजावेच्या कुटुंबावर पडूं नये म्हणून प्रयत्न केला असता."

"प्रयत्न केला असता असे तू म्हणतेस पण तसा तुला करता आला असता कीं, नाहीं याची मला शका आहे. ब्राह्मणाच्या घरातल्या स्त्रियांनीं घराबाहेर म्हणजे उदाहरणार्थ दुकानात नोकरीला जावे ही वृत्ति आज देखील कितपत वाढली आहे? त जरी जावे असे ठरविले असतेस तरी तुला तुझ्या दिरानें जाऊ दिले असते असे वाटत नाही. का कीं आपल्या भावजयीला पोसण्याचे कर्तव्य चुकाविते असे लोकानी तुझ्या दिराला म्हटले असते, एव-ढेच नव्हे तर त्याचे त्यालाच तसे वाटले असतें."

"कदाचित तसे वाटलेहि असते. म्हणजे स्त्रियाना पोसणें जड जाते आणि बाहेर जाऊन स्त्रियांनी पैसे मिळवावे याला समाज विरुद्ध आहे म्हणजे आई जेवायला घालीना आणि बाप भिकेला धाडीना अशीच स्त्रियाची स्थिति नाहीं काय?"

"मला आणखी एक प्रश्न तुला विचारावासा वाटतो तो हा कीं, तुझा नवरा नापत्ता झाला आहे असे सागण्याच्या ऐवजी तू मला तुझा नवरा वारला असेच प्रथम का सागितलेस?"

"आपली जेव्हा आगगाडीत गाठ पडली तेव्हा मी कोणत्या मनःस्थितीत होते व त्या वेळेस मी प्रत्येक शब्द का बोलले याची मला आज अगदी बिनचूक माहिती देता येणार नाहीं, तथापि त्या वेळच्या मनःस्थितीचा आज जी थोडी कल्पना आहे ती मात्र देतां येईल—"

"त्यावेळची तुला पक्की आठवण नसणार हे स्वाभाविक आहे, पण आपण जेव्हां कांहीं असत्य सागतो तेव्हां ते सहेतुक सांगत असतो; त्यावरून असें वाटते कीं नवरा वारला असे सांगण्यापूर्वी तुझा कांहींतरी विचार झाला असावा."

"केवळ एकच कारणामुळे मी माझा नवरा वारला अशी तुझी समजूत करून दिली असें वाटत नाहीं."

"तर मग?"

"मला असें वाटतें कीं, नवरा पळून गेला असे मी सांगितले व दुसरे कोणी त्याचे कारण काय म्हणून कोणी विचारले तर तें सांगतां येणार नाहीं, अशी स्थिति होती; आणि तसे सांगतां आले नाहीं म्हणजे बायकोच्याच अपराधामुळें नवरा पळून गेला असेल अशी तुझी कल्पना होईल, आणि तुझे मत माझ्याविषयीं विनाकारण वाईट होईल अशी मनाला भीति वाटली असावी."

"आणखी?"

"आपल्या बायकोची कांहींच फिकीर न करता बेजबाबदारपणे पळून जाणारा नवरा आहे अशी नवऱ्याविषयी माझ्याच मनाची समजूत झालेली नव्हती, आणि ते मृत्यू पावले अशी तुम्हीं त्यांच्याविषयी कल्पना करून घेतली तर काहीं वाईट वाटलें नसते. का की त्यामुळे नवऱ्याला वाईटपणा येत नाहीं. पण ते दुष्ट आहेत अशी तुमची समजूत करून देणे हेच माझ्या मनाला आवडले नसावे असेहि वाटते."

"आपली काहीच काळजी न करणारा असा जो नवरा असेल तो आहे काय, की मेला काय, सारखाच असे वाटून तो वारला असे त्राग्याने तूं बोललीस किंवा नाहीं?"

"ही त्राग्याची वृत्ति कितपत होती, याची मला आठवण नाही. पण ते वारल नाहीत, केवळ नापत्ता झाले आहेत असे मी केव्हां बरे सांगतले?"

"बाप्तिस्म्यानंतर तू नांव बदललेस आणि आपले दागिने विकून टाकलेस आणि ते पैसे संस्थेला दिलेस, तेव्हा तू मगळसूत्र मात्र विकले नाहीस, आणि तेव्हा मला जरा मौज वाटली. पण त्यावरून संशय मात्र आला नाही. मला असे वाटले की, हिंदु स्त्रिया आपल्या नवऱ्याचें स्मारक म्हणून फोटो वगैरे न बाळगता मगळसूत्र जपून ठेवतात. आणि मी तसे तुला म्हटलेदेखील. तेव्हां मात्र काही दिवसांनी तुझा नवरा जिवत असणें शक्य आहे. तो नापत्ता झाला आहे एवढेच तुला माहीत आहे असे तूं सांगितलेंस."

"होय, हे मला सर्व आठवते."

"माझे लाडके, तुला समाधानाला एक तरी जागा आहे, तू स्वत: कोणास दुखविले नाहींस, आणि तू इतराच्या दुष्ट वर्तनास बळी पडलेली आहेस."

"आई, तेवढयाने माझे समाधान कसे होईल. माझी माझ्या नवऱ्याने कांहींच चौकशी केली नाहीं—"

"तर अशा नवऱ्याचा तुझ्यावर हक्कच नाहीं. तूं त्याला अगदी विसरून जा, आणि त्याबद्दल विषाद मानावयाचेंहि तू सोडून दे. उलट तुझ्याबद्दल ज्याने चोकशीहि केली नाहीं तसला नवरा तुझ्यासारख्या चागल्या मुलीस मुळीच लायक नाहीं."

"पण आई तेवढयानेंहि माझे समाधान होत नाहीं."

"कां बरें?"

"आई तू मला जो उपदेश करीत होतीस कीं प्रत्येक मनुष्य जी वाईट गोष्ट करतो, तिचें कारण बहुधा त्याच्या दुष्टपणापेक्षां दुर्दैव असतें; तो उपदेश स्वत:चें अवलोकन होऊन पटला. असे असता माझी माझ्या पतीनी जी उपेक्षा केली त्याबद्दल मी त्यांच्यावर नुसती रागावूनच राहीन असे कसें होईल. त्यांतल्यात्यांत असा विचार मनात येई कीं माझी चौकशी त्यांनीं केली नाहीं एवढीच गोष्ट विचारांत घेऊन चालणार नाही. जगातून उठून जाऊन नापत्ता होण्याइतकी ज्याअर्थी त्यांच्या मनाची वृत्ति बनली त्याअर्थी तेच अशा आपत्तींत असतील कीं, आपणांस तोंड दाखवावयास कोठेंच जागा नाहीं असें त्यांस झाले असेल. अशीच जर स्थिति असेल तर मी त्यांच्यावर तरी राग कशी करूं! माझी उलट अशी समजूत आहे कीं, जे लोक

अत्यंत चांगल्या प्रवृत्तीचे पण कोमल मनाचे असतात त्यांच्यावर कांहीं अगदीं क्षुद्र आक्षेप आला असताच त्यास आपण कोणास तोंड दाखवू नये असें वाटू लागते. मोठमोठी दुष्कृत्यें करणारे लोक आपले तोंड कधीहि लपवीत नहींत. ते अगदी निर्ढावलेले असतात. जर अशीच माझ्या पतीची स्थिति असेल तर माझ्या झालेल्या उपेक्षेबद्दल मी रुसणेंफुगणे गैर आहे. उलट त्यांस शोधून काढण्याचे आणि धैर्य देण्याचे कर्तव्य मीच केले नाही असे वाटू लागतं. शिवाय मी जसजसा विचार करू लागते तसतसे असे वाटू लागते की, जेव्हा विवाहित जोडप्यांपैकी एकावर आपत्ति आली म्हणजे ती दुसऱ्यासहि भोवते अशा प्रसंगी पुष्कळ व्यक्ती आपल्याच नुकसानीचा विचार करू लागतात, व दुसऱ्या पक्षास त्याच्या अडचणीच्या काळात सहानुभूति न दाखविता दोष देऊ लागतात. नवरा सांपत्तिक अडचणीत असता अल्पबुद्धीची स्वार्थी बायको नवऱ्याच्या अडचणीचा विचार न करता आपल्याला काय मिळाले नाही याचाच विचार करीत बसते. खरोखर पहाता मी देखील त्याचप्रमाणे केले नाही काय? अनेक वर्षे मी आपल्यापुरताच विचार करून आपल्याला वाईट दिवस आणले म्हणून मी नवऱ्यासच दोष देत बसले, तर ही गोष्ट केवळ स्वार्थी अंतःकरणाची द्योतक नव्हे काय? या अनेक गोष्टी मनात आल्या म्हणजे आपल्या पूर्वीच्या मनोवृत्तीची आपणास लाज वाटल्याशिवाय रहात नाही. आई तू मला म्हणालीस कीं, आपण दुसऱ्याला दुःख दिले असतां त्याची आठवण लवकर बुजणे शक्य नाहीं. तशाच गोष्ट आपण आपले कर्तव्य करीत नाहीं असे मनाला वाटू लागले म्हणजे होते. व मला मी आपले कर्तव्य बजाविले नाही अशीच जाणीव मला आता अधिकाधिक होऊ लागली आहे. जेव्हां मी दुष्टकृत्याचे कारण दुर्दैव होय या नियमांतील सत्य ओळखू लागले तेव्हां हळूहळू माझी उपेक्षा केली याबद्दलचा माझा नवऱ्यावरील राग नाहीसा होऊ लागला व कालांतराने अगदीच नष्ट होऊन त्यांस एकदम अज्ञातवासात जाण्याचे कारणच काय इत्यादि प्रश्नांविषयी मन विचार करू लागले असे असताहि मी त्यांच्याविषयी चौकशी केली नाही. मला माझे कर्तव्य करण्यासाठी तुझ्यापाशी भांडावे लागेल किंवा तुला नाखूष करावे लागेल असा विचारहि मनांत येई आणि त्यामुळे मी आजचे दिव्य उद्यांवर ढकलीत होते."

"माझ्याशी भांडणाचा प्रसंग येणार म्हणून तुला का भीति वाटली?"

"आई, पाठीमागचे एकदर संबंध विसरून जावे आणि अगदीं निराळ्या नावानें निराळा आयुष्यक्रम आचरावा, जणू काय जन्माला आलें ती जात, कुल, विवाहसंबंध या सर्वांसच विसरून जावे आणि पूर्वीची गोदावरी मृत्यू पावली, आणि ही निराळी व्यक्ति होय असे समजावे, अशी तुझी इच्छा होती काय?"

"होती, पण ती तुझ्या हितासाठींच होती. तुझे पाठीमागचे सर्व शत्रु, मित्र पुसटले जावेत आणि जगांत अगदीं नवीन वृत्तीने आयुष्यक्रम आचरण्यास सुरवात करावी यासाठींच माझा तो प्रयत्न होता दुसरें कांहीं नाहीं."

"तुझ्याकडे आल्यानंतर आठदहा वर्षांनी म्हणजे जेव्हां मला अधिकाधिक समजूं लागले तेव्हां मी त्यानां शोधून काढण्याचे कर्तव्य केले नाहीं असे वाटे, आणि त्याबरोबर असेहि वाटे कीं जर मी त्यांस शोधून काढण्याचा प्रयत्न केला तर पूर्वीचे जीवित मी विसरून जावे अशी खटपट करणाऱ्याच्या ऐवजी पूर्वीचे पाश अधिक घट्ट करण्याचा प्रयत्न करीत आहे असे तुला वाटेल."

"पण हे तू मला त्याच वेळेस कां सांगितलें नाहीस?"

"सांगितले नाहीं याचे कारण माझ्याच मनाची तयारी झाली नाही हे होय. असेंहि मनांत येई की नवऱ्याने आपणांस टाकून दिल्याला बरींच वर्षे झाली; इतक्या वर्षांत त्याचा दुसऱ्या कोणा स्त्रीबरोबर सबंध उत्पन्न होऊन आयुष्याला निराळेच वळण लागले असेल तर आपण त्याची चौकशी करून चांगले करू की वाईट करूं. इतक्या मधल्या काळात त्यांनीं माझी चौकशी करून माझा पत्ता लागत नाही म्हणूनहि दुसरे लग्न केले असेल; तर आपण आता चौकशी करणे म्हणजे खाजवून खरूज काढून त्याच्या आयुष्यात बिघाड करण्यासारखेच हाणार नाही काय?"

"तुला दुहेरी पेच पडला आहे. जर नवऱ्याची चौकशी करू नये तर कर्तव्य केले नाही असे होते, आणि नवऱ्यास अज्ञातवासात राहण्यास जी कारणे उत्पन्न झाली असतील ती दूर करण्यासाठी आपण काहीच प्रयत्न करत नाही असे होते. आणि चौकशी करून जर तुला त्याचा पत्ता लागला व त्यामुळे त्यानी निराळे घर वगैरे केले आहे असे दिसून आले तर पुन्हा आपण काय करावें हे समजत नाही. तू स्वतः कोण वगैरे लोकास ठाऊक झाले म्हणजे तुला आपले पूर्वीचे जीवित विसरून नवीन जीवनक्रम चालू ठेवणे कठीण जाईल. एवढेच नव्हे तर आपण एका स्त्रीस अन्याय केला आहे याची आठवण नवऱ्यास कायम राहील व ज्या स्त्रीने तुझ्या नवऱ्याशीं लग्न केले असेल त्या स्त्रीच्या डोक्यावर एकसारखी तरवार लाबती ठेवल्यासारखे होईल."

"यासाठीच मी असे म्हणते की, त्याची परभारी चौकशी करण्यास तर लागावे आणि माझे तर अस्तित्व कोणासहि कळू नये."

"तुझी इच्छा असेल तर ते काम मी आपल्या अंगावर घेते माझ्या ओळखीचा पूर्वी पोलीसखात्यांत काम करून पेन्शन घेतलेला एक मनुष्य आहे, त्याच्याकडे हे काम सोपविते. तुझ्या नवऱ्याचे व दिराचे संपूर्ण नांव आणि जुना पत्ता हीं माझ्या वहींत आहेतच. कोणत्या स्त्रीकडून तुला तुझ्या दिराच्या आणि जावेच्या मृत्यूची बातमी कळली बरे!"

"श्री. रुक्मिणीबाई परांजपे शिक्षक म्युनिसिपल स्कूल याच्या कडून. ह्या कांही दिवस आपल्याकडे रहावयास हात्या त्या आमच्या गावच्याच आहेत. त्यांनी मला मात्र ओळखले नाही. आतां त्या मुंबईलाच असतील असे वाटते."

---

## प्रकरण १७ वें

## स्वामीजींचे दुसरें व्याख्यान.

स्वामीजींच्या आजच्या व्याख्यानास तरुण मंडळीची जरा गर्दी झाली होती. पहिल्या व्याख्यानामुळे हा स्वामी जरा स्वतंत्र विचार करणारा आहे अशी गांवभर चर्चा झाली होती, आणि आजच्या प्रवचनाचा विषय "सन्यासधर्माचें समर्थन" असा होता, त्यामुळे आज टिळकांच्या विचाराच्या विरुद्ध स्वामी सन्यासधर्माचे समर्थन कसे काय करतात अशी जिज्ञासा लोकांस उत्पन्न झाली होती. अलंकाराकडून दुसरी एक तयारी झाली होती. स्वामींचे व्याख्यान झाल्यावर सन्यास धर्माचीं उच्च तत्वें खरोखर टिळकांच्या कर्मयागातच कशी व्यक्त होतात, आणि प्रतियोगी सहकारिता पक्षाची तत्वें म्हणजे खरोखर सन्यास धर्मातील उच्च तत्वाची केवळ व्यावहारिक मांडणी आहे दुसरे कांही नाहीं हे देखील सप्रमाण सिद्ध करून देण्याचे नारायणराव अलंकार यांनी ठरविले होते. दिवाणगिऱ्या स्वीकारणे ही गोष्ट खरोखर "नियत कर्म कुरु" या तत्वाप्रमाणे कशी "क्रमप्राप्त" आहे, दिवाणगिऱ्या स्वीकारल्या म्हणजे अमूक एक गोष्ट करून दाखवू अशी आम्ही बढाई मारीत नाही; लोकांचें कर्तव्य मते देणे आहे आणि कौन्सिलांत गेलेल्या लोकांचे मुख्य काम म्हटले म्हणजे कोणीतरी

अधिकारपद स्वीकारून काम करावें हें आहे. आमच्या आणि सरकारच्या लढ्यालढ्यांत जे काय व्हावयाचे असेल तें होईलच. लोकानी आपले कर्तव्य म्हणून मत द्यावें, फार फलप्राप्ती होईल अशी आशा धरूं नये "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" हें प्रत्यक्ष भगवतानींच सांगितले नाहीं काय? सन्यास म्हणजे वासनात्याग आहे. तुम्ही तुमचा काहीं विशिष्ट फायदा होणार आहे असें मनात धरून जर तुम्ही एखाद्या उमेदवारास निवडून द्याल तर तुमची निराशा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. बाकी आजच्या परिस्थितींत नोकरशाहीच्या लटपटीपुढे कोणाला कांहींच करतां येणार नाही इत्यादि गोष्टी सागावयाचें नारायणराव अलकार यांनीं योजून ठेवले होते. नारायणराव अलकार याची पुढारीपणाची कल्पना म्हणजे ज्यास व्याख्यान देतां येते, किंवा ज्यानें व्याख्यान द्यावे असे लोकाना वाटते असा मनुष्य ही होती. आणि व्याख्यान देण्याच्या सधिसाठीं ते हपापलेहि असत. त्यांच्या या प्रकारच्या इच्छेमुळें प्रतिसहकार पक्षाच्या तत्त्वाची वारंवार उजळणी करणे वगैरे गोष्टी यान्यावरच सोंपविल्या जात.

स्वामीजींचें प्रवचन झाले गीतेचा उद्देश कर्मयोगाची सिद्धि हा मीं मुळींच धरीत नाहीं व संन्यासधर्माच खंडन हाहि धरीत नाहीं. गीतेचा उद्देश अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त करणे एवढ च होता व विशिष्ट हेतूच्या सिद्धीसाठीं उपयोगी पडेल असें तत्त्वज्ञान त्यानीं उपयोगाला लावले होतें हे मी मागच्या प्रवचनांत सातितलेच आहे. सन्यासधर्मा विषयीं गीतेचे म्हणणें काय याविषयी सागावयाचे तर एवढेंच सागतों कीं या विषयावर आपण अगदीं स्वतंत्रपणे विचार केला पाहिजे. श्रीकृष्ण हा कांहीं संन्यासधर्मी नव्हता, तो संसारी होता, तर त्यास दाखवावयाचें एवढंच होते की संन्यासधर्मानें जें कांहीं साध्य धरावयाचें तें ससारांत राहून निष्काम कर्म केल्यानेहि होतें. श्रीकृष्ण जे म्हणाले ते सर्व सत्य म्हणून मुळींच घेतां [illegible] नाहीं. श्रीकृष्ण हा उपनिषदाचे दूध काढणारा म्हणविला गेला आहे तर श्रीकृष्णाच्या शब्दाला जर किंमत असली तर सर्व उपनिषदाचे दूध त्यानीं जितपत बराबर काढले असेल त्यावर आहे. त्याविषयीं एवढेंच सांगतां येईल कीं गृहस्थाश्रमी मनुष्यानें आपल्या पक्षाला किंवा मताला जुळती अशीच वाक्ये उपनिषदातून घेतली आहेत. श्रीकृष्णाचे म्हणणे हे गृहस्थाश्रमी मनुष्याचे म्हणणे धरून चालावें. त्यात श्रीकृष्ण काय दाखवितात, ते एवढेच की जे कार्य सन्यास घेऊन होतें तेच कार्य सन्यासाचे अंत:करण ठेवून गृहस्थाश्रमी वागू लागला तर त्याच्याकडूनहि होऊ शकते, तर त्यात मीं सन्यासधर्माचे खडन न समजता विजयच समजता. प्रत्येक मनुष्य ज्या स्थितींत असतो त्या स्थितीचे तो अजाणतां किंवा बुद्धिपुरस्सर मडन करीत असतो, गीताधर्मलेखक गृहस्थाश्रमी असेल म्हणून श्रीकृष्णाच्या तोंडाने उपनिषदाचे सार देण्याचे निमित्त करून तो गृहस्थाश्रम चालवून कर्मयोग करावा असे म्हणत आहे. श्री शंकराचार्य गीताच आधारास घेऊन सन्यासधर्माचे मडन करीत आहेत, आणि लोकमान्य टिळक हे पुन्हा कर्मयोगाचे मंडन करण्याच्या निमित्तने गृहस्थाश्रमाचे मडन करीत आहेत आणि त्याच्या वाचकातील बहुतेक वर्ग गृहस्थाश्रमी असल्यामुळे संन्यासधर्माची व्यर्थता गीतेतून सिद्ध होते या गोष्टीचे मोठ्या आनदाने स्वागत करीत आहे.

मला जर कांहीं तुम्हास सागावयाचे असेल तर हेंच आहे की, आपल्या कर्तव्याविषयी आपणांस विचार अगदीं स्वतंत्रपणे केला पाहिजे. प्राचीनाचे विचार प्राचीनाच्या विशिष्ट स्थितीमुळे मर्यादित झाले होते तसेच ते विचार व्यक्त करणाऱ्याच्या वैयक्तिक गुणधर्मामुळे व स्थितीमुळे मर्यादित झाले

होते. आपणांस आपल्या कर्तव्याविषयीं विचार करताना प्राचीनांच्या अपुऱ्या अनुभवाने जे विचार उत्पन्न झाले त्यांवर अवलबून मुळीच रहाता येणार नाही. प्राचीनांनीं उत्पन्न केलेले रीतिरिवाज आपल्या आजच्या परिस्थितीस उपयोगी पडणार नाहींत म्हणून अनेक लोक सांगत आले आहेत; पण मी त्याच्याहि पुढे जाऊन म्हणतों की प्राचीनांचे धर्मशास्त्र आणि नीतिनियम ही देखील आपणास फारशी उपयोगी नाहीत; आपण आपली बुद्धि अगदी स्वतंत्र ठेवली पाहिजे. गीतेतला उपदेश आज आपणांस आयुष्यक्रमण करण्यास कितपत उपयोगी आहे असे मला विचारल तर मात्र मी सरळ सांगेन कीं त्याचा आपणास काहीं एक उपयोग नाही."

इतके प्रवचन झाले तेव्हा एकदम प्रवचन बंद करा म्हणून गोंगाट सुरू झाला. हे व्याख्यान कशासाठी करविले म्हणून कांही मंडळी बोलू लागली. व्याख्यान चालू द्या म्हणूनहि काही मंडळी बोलू लागली. आणि थिएटरमध्ये बरीच गडबड सुरू झाली. इतक्यात दादासाहेब गेगणे पुढे आले आणि म्हणाले कीं "आमच्या आमंत्रणाला मान देऊन तुम्हीं स्वामी ब्रह्मगिरि याचे व्याख्यान ऐकावयास आला. आमच्या पक्षातल्या तरूण मंडळींनीं हे व्याख्यान करविले याच्या मी विरूद्धच होता पण या वक्त्याचे विचार येथपर्यंत जातील अशी मुळीच कल्पना नव्हती. ब्रह्मगिरींनी आपले व्याख्यान बंद करावे आणि आपला मान राखून घ्यावा ही माझी सूचनाआहे."

"स्वामी ब्रह्मगिरी म्हणाले कीं, मी प्रवचन करीत आहे येथे सभाध्यक्ष कोणी नाहीं आणि ज्याचा अधिकार मी मान्य केला पाहिजे अशी येथे व्यक्तीच नाही. प्रवचन ऐकण्याचा नियम असा आहे कीं ज्या मंडळींनां माझे प्रवचन ऐकावयाचे असेल त्यांनीं ऐकावे; इतरानीं ऐकू नये एवढेंच मी म्हणतो. मी आपला मान राखून घ्यावा म्हणून आमचे आदरातिथ्य करणारे दादासाहेब गेगणे सुचवितात पण संन्यासधर्म-पत्करलेल्या मनुष्याच्या मानापमानाच्या कल्पनांचाहि संन्यास करावा लागतो. तर मी असे ठरवितो कीं अपमान होण्याच्या भीतिनें मी प्रवचन बंद करू नये."

स्वामी ब्रह्मगिरींचे हें बोलणें ऐकल्यानतर दादासाहेब गेगणे तेथून उठून गेले. आणि त्याबरोबर काही दुसरी मंडळी उठून गेली कोणी तरुण पुढे येऊन म्हणाले, आम्ही उठून तर जाणार नाहींच पण हें व्याख्यानहि पुढे होऊ देणार नाहीं, पण इतक्यात दुसरी काहीं तरुण मंडळी पुढे झाली आणि म्हणाली की, हें व्याख्यान जबरदस्तीने आम्ही बंद करू देणार नाहीं. दोन्ही पक्षांची थोडाशी बाचाबाची झाली. व्याख्यान बंद करावे म्हणणाऱ्या पक्षाची पुढारी मंडळी दादासाहेबाबरोबर अगोदरच निघून गेली होती. ब्रह्मगिरींनी प्रवचन पुढे सुरू केले. ते म्हणाले, आज आपणांस जो देखावा दृष्टीस पडला, त्याच्याबद्दल तुम्हास खेद मानावयास नको; माझे पूर्वीच्या विचारपरंपरेपासून निराळे असे भाषण असता देखील बरीच मंडळी येथे राहिली यावरून धार्मिक बाबतींत नव्या विचारांचा प्रवेश व्हावयास क्षेत्र आहे हे आपणच सिद्ध केले आहे मला असे कळते की, माझी व्याख्याने विशिष्ट फंडाच्या पैशाने झालीं आहेत, म्हणजे थिएटर, दिवाबत्तीचा खर्च त्या फंडाने भरला आहे आणि असे असता मी जें व्याख्यान केलें ते फंडाच्या हेतूशीं विसंगत असेल तर त्यानी तो पैसा मजपासून सक्तीनें वसूल करून घेण्याची मोकळीकहि मी त्या निधीच्या संरक्षकांस आनंदाने देत आहे.

आज जो देखावा तुमच्या दृष्टीस पडला त्याबद्दल मला तर कांहींच खंति नाहीं. या सर्व प्रकाराची अपेक्षा मी पूर्वींच केली होती. माझ्या

कार्यास प्रारंभ आजपासून झाला असे समजा. आपणा सर्वांस एक मोठें धार्मिक कार्य करावयाचें आहे. त्या कार्यामध्ये आपण माझे सहकारी व्हावे हाच व्याख्यानाचा उद्देश आहे.

राजकारणाकडे आपलें लक्ष ओढलें आहे व आपल्यांतील बरीच मंडळी स्वराज्य पाहिजे म्हणून भाषा बोलत आहे ही गोष्ट आनंदाची आहे. मनुष्याची जागृति कोणत्याहि बाजूने होवो आणि तो कार्यप्रवृत्त होवो. तो कार्यप्रवृत्त झाला म्हणजेच आपली वागणूक विचारामुळे आणि विचारोत्पन्न नियमामुळे नियमित करीत जाणार. आपल्या आयुष्याचें विचारानें नियमन करीत जाणे हे धर्माचे महत्त्वाचे लक्षण आहे.

धर्म हा विषय अनेक लोकांच्या आवडीचा असून त्याविषयीं सुशिक्षितांत औदासीन्य का आहे बरें. औदासीन्य वाढत आहे हे खचित. सुशिक्षितांना धर्माविषयी औदासीन्य वाटते म्हणून धर्माभिमानी मंडळीची सुशिक्षितास दोष देण्याकडे प्रवृत्ति दिसून येते. पण ही प्रवृत्ति चांगली नाही. जर सुशिक्षितास धर्म पटत नसेल तर धर्मच निरुपयोगी वस्तू का ठरवू नये. मला असे वाटते की, सुशिक्षितांस पटेल असे धर्माचे स्वरूप स्पष्ट करून दाखविणारे वक्ते व लेखक बाहेर पडले नाहीत हेच धर्माविषयी आज असलेल्या औदासीन्याचे कारण आहे. राजकीय चळवळ देशात पाहिजे तशीच शास्त्रीय ज्ञानाची चळवळ पाहिजे आणि या दोन्ही चळवळींना जोर येण्यासाठी धार्मिक चळवळहि पाहिजे. आपणास स्वराज्य कां पाहिजे असे विचारले असता इंग्रजास मिळणारे पैसे आम्हाला मिळावेत म्हणून अर्थशास्त्री उत्तर देईल, पण मी त्याचे उत्तर हे देतों की, आपल्या सार्वजनिक आयुष्यक्रमासंबंधी आपणच विचार करून आपणास उच्च आयुष्यक्रम आचरण्याचा संधि हवी म्हणून. माझ्या दृष्टीने स्वराज्य हे साधन आहे व उच्च आयुष्यक्रम हे साध्य आहे. धर्माविषयक अत्यंत निराळी वृत्ति आपणांस निर्माण केली पाहिजे. सन्यासधर्म हा ब्राह्मणासहि माकळा आहे एवढेच नव्हे तर सन्यास घेणारामध्ये ब्राह्मणांचीच संख्या जास्त आहे. ब्राह्मण हा गृहस्थाश्रमी असता देखील धार्मिक कार्य करीत असतो; पण भिक्षुकी पुराणिकी, हरिदासवृत्ति इत्यादि कार्यें करीत असता तो धंदेवाइकाची दृष्टि ठेवीत असतो त्यानेच पुढे सन्यास घेण्याने समाजाचा एक फायदा हा होतो की त्या ब्राह्मणाची धंदेवाइक दृष्टि कमी होत जाते. प्रत्येक विचारसंप्रदाय तयार झाल्यानंतर त्या विचारसंप्रदायाच्या आश्रयानं उपजीविका करणारे लोक तयार होतात. यज्ञ याचा अर्थ वस्तूचे ईश्वराला समर्पण, व ते अग्नीमार्फत समर्पण एवढी कल्पना समाजमान्य झाल्याबरोबर ते समर्पण करणाराचा वर्ग उत्पन्न झाला, तेव्हा यज्ञ करण्याचा अर्थ नाही भक्ति पाहिजे किंवा ज्ञान पाहिजे असा विचारसंप्रदाय उत्पन्न झाला, तर तो विचारसंप्रदायच अधिक लोकप्रिय करून त्यावर उद्योग करणारे लोक निघाले. जेव्हा विचारसंप्रदायाशी काही लोकांची उपजीविका संबद्ध होते तेव्हां धर्माचा मूळ हेतु बाजूला राहून संप्रदायाचेच महत्त्व राखण्याचा प्रयत्न करण्यात येतो. नवीन विचाराच्या प्रसाराला जुन्या विचारावर उपजीविका करणारा वर्ग विरोध करू लागतो. धार्मिक शुद्धीसाठीं जी आपणास चळवळ करावी लागणार तीत वाईटपणा अनेक वेळ घ्यावा लागणार आहे.

मी धार्मिक गोष्टीत चळवळ करण्यास आरंभ केला आहे. मी नागपुरास आलो तो येथील विशिष्ट पक्षास आपले तुणतुणे वाजवून त्यांना राजकीय जागा काबीज करण्यास मदत करावी म्हणून आलो नाहीं. कोणत्या राजकीय पक्षाचा जय व्हावा आणि कोणत्याचा पराभव व्हावा याविषयी मला कांहीच फिकीर नाही. मला कार्य धर्माचे करावयाचें आहे.

गीता, महाभारत, रामायण यांसारखे जे सुंदर ग्रंथ आहेत त्याविषयी तुमच्यांत अनादर उत्पन्न व्हावा म्हणून मी कार्यप्रवृत्त मुळींच झाला नाहीं. लोकांतली धार्मिक भावना नष्ट व्हावी हीहि माझी इच्छा नाहीं. उलट धार्मिक भावना वाढावी ती अधिक उज्वल व्हावी हीच माझी इच्छा आहे. तथापि ज्या भारतीय अंतःकरणाच्या आणि बुद्धीच्या प्रभावाने गीता ग्रंथासारखे ग्रंथ तयार झाले ती भारतीय बुद्धि आणि अंतःकरण ही ग्रंथापेक्षांहि श्रेष्ठ आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, आणि तीच दृष्टी तुमच्यामध्ये उत्पन्न व्हावी म्हणून आजच्या प्रवचनाचा पूर्वार्ध मी सांगितला आहे.

धर्मप्रचार मला हवा आहे पण तो तत्त्वें चांगली आचरून अत्यंत प्रामाणिकपणे प्रचार करता येईल तरच तो हवा आहे. यासाठी मला पीठ स्थापावयाचे नाहीं शिष्यमंडळ तयार करावयाचे नाहीं. मनुष्याने पीठ स्थापन केलं आणि शिष्य-मंडळ तयार केले म्हणजे काय होते याचा परिणाम मी अनेक धर्मांचा इतिहास पाहून जाणून ठेवला आहे. जर सत्य आणि साधुत्व ही विकण्यासाठीं त्यांत लबाडी मिसळावी लागत असेल तर त्या मनुष्याने लबाडीचाच प्रचार केला असे होईल.

धार्मिक सत्याच्या उपदेशाचा लोकांनी स्वीकार करावा यासाठी चमत्कार करणे, भुतें काढणे, रोग बरे करण्याचे ढोंग करणे, आणि पाण्याचे मद्य तयार करणे यासारख्या लटपटी कशासाठी हव्यात. विचारसंप्रदायाचा प्रसार विचारांच्याच उच्चतेमुळे होवो. आपणांस अनुयायी मिळावे ही भावनाहि उपदेश करणारास नको. तो लोभहि मी सोडून दिला आहे. जर मी संन्यासी असेन तर मला पालखीचा किंवा सुवर्णमुकुटाचा अभिलाष कशाला हवा. तो जर अभिलाष मी धरला तर माझा संन्यास-धर्म बाजूलाच राहील, आणि मी पालखी उचलणाऱ्या भायाचा आणि माझ्यासमोर मशाल जाळणाऱ्या मशालजीचा मी नोकर बनेन. संन्यासधर्म पाळू इच्छिणाऱ्या मला मशालजीचे नोकर बनावयाचे नाहीं. माझ्या उपदेशांत जर अर्थ असेल तर तो उपदेश विचारांतल्या सत्यतेमुळेच प्रसार पावेल. तो उपदेश तुम्हास ग्राह्य होण्यासाठीं माझे गौरव तुमच्या मनांत स्थापन व्हावं ही देखील मला इच्छा नाहीं. विचाराचे महत्त्व त्या विचाराच्या सत्यतेवरच अवलंबून असो. माझं नांव इतिहासांतून पुसटून गेलं तरी त्याची मला खंत नाहीं. मी त्याहि मोक्षाचा संन्यास केला आहे.

आज मी तुम्हांस जास्त सांगू शकत नाहीं, पण आपणांस पुढे अनेकदां भेटावयाचेच आहे तेव्हा विचारविनिमयाचा प्रसंग पुन्हा येईलच.

स्वामीजींनी व्याख्यान संपविलं तेव्हा काही मंडळी भोंवताली गोळा झाली. आणि पुन्हा केव्हा भेटावें म्हणून विचारूं लागलीं. तेव्हा स्वामींनीं त्यांची नांवें व पत्ते चिठ्यांवर उतरून देण्यास सांगितले. व स्वामींनी त्या चिठ्या आपल्यापाशीं ठेवून घेतल्या, व तुम्हांस पत्रानें कळवीन म्हणून आश्वासन दिलें.

---

## प्रकरण १८ वें.

# एक चौकशीचें फल.

उमरावतीला एक मुंबईचा मनुष्य आला होता आणि तो देवीदास नांवाच्या एका जुन्या विद्यार्थ्याची चौकशी करीत होता. तेथें त्यास जुने देवीदासचे मास्तर, त्याचप्रमाणे पूर्वी बरोबरचे विद्यार्थी पण आतां कारकून इत्यादि त्यास ओळखणारी मंडळी भेटली. त्यांस देवीदास नांवाच्या मनुष्याची माहिती होती ती यानें उतरून घेतली ती माहिती साधारणपणे येणेंप्रमाणें होती.

देवीदास हा पक्का वऱ्हाडा, हा पुढे नोकरीसाठीं आफ्रिकेत गेला होता, आणि पुढें युरोपांतहि कांहीं वेळ होता. अशी तेथील लोकांत माहिती आहे. याच्या आतांपर्यंतच्या वर्तनाकडे पाहून त्याच्या आप्तांनीं हा भटक्या आहे असे ठरविलें होते. याचे लग्न वगैरे झालेलें होते पण याला आपल्या आयुष्यात स्थिरता अशी कधीं मिळालीच नव्हती. हा वाचक वऱ्या प्रकारचा होता. याने पुष्कळ पाहिले पुष्कळ वाचले. पण व्यावहारिक असे त्याने कांहीच केले नाही असा त्याच्यावर त्याच्या मित्रांचा आक्षेप होता. तो विद्यार्थी असताच व्याख्याने देई त्यावेळेस कित्येक मंडळी असें म्हणत कीं, याच्या हातून व्यावहारिक कामगिरी ती काय होणार? याचा सर्व वेळ बकबक करण्यांत जाणार; याचीं व्याख्याने मौजेची होत, त्याप्रमाणेच बरोबरीच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने माहितीने भरलेलीहि असत पण त्याचा उपयोग काय असा त्यांच्याविषयीं लोकांचा आक्षेप असे.

देवीदासाबरोबर फिरायला जाणाऱ्या एका विद्यार्थ्याने माहिती दिली ती येणेप्रमाणे आहे. देवदिासाचा आयुष्यक्रम त्याच्या वळच्या विद्यार्थ्यांमध्ये अत्यंत वेडेपणाचा आणि अपेशी म्हणून ठरलेला होता. तो विक्षिप्त म्हणून लौकिक होता म्हणजे तो ज्या अनेक गोष्टी करी त्या गोष्टींची सहेतुकता कोणास समजत नसे. तो ज्या वेळेस उमरावती हायस्कूलमध्यें होता तेव्हां त्याला शास्त्रीबोवा म्हणत. तो कधी पास होई तर कधी नापास होई. तो पास होणार कीं नापास होणार हें कधींच कोणाला सांगता येत नसे त्याच्या डोळ्यापुढचीं ध्येयें म्हणजे वकील डॉक्टर किंवा सरकारी नोकर हीं नव्हती. कधी उमरावतीस हरिदास किंवा कथेकरी आला म्हणजे त्याच्या कथेला देवीदास गेला नाही असे झाले नाही. त्या हरिदासाची नक्कल तो दुसऱ्या दिवशी वर्गात करीत असे. उमरावतीच्या हिंदू हायस्कूलमध्यें त्यावेळेस मास्तर लोकांची बसून गप्पा मारावयाची कोठी आणि हेड मास्तरची कोठी ह्या दोन निरनिराळ्या ठिकाणी असत आणि त्यामुळे पुष्कळदां अनेक मास्तर मंडळी वर्ग सोडून गप्पा मारावयाला कोठींत जाऊन बसत. मुलाना कांही वाक्ये भाषांतराला द्यावीत किंवा कांहीं उदाहरणे सोडवायला द्यावीत आणि मुले उदाहरण सोडवीत असता किंवा भाषांतर करीत बसले असता मास्तर लोकांनी मास्तरकोठींत जाऊन गप्पा माराव्यात असा त्यावेळचा संप्रदाय असे. त्यांतल्यात्यांत असेंहि होत असे की हेडमास्तर कधीं कधीं एक वाजेपर्यंतहि शाळेत येत नसत. त्यावेळेस मास्तर लोकांना शाळा हा क्लब करण्यास चांगलेच फावे. अशा प्रसंगी म्हणजे शिक्षक गेले असता आणि वर्ग भरलेला असतां आमच्या देवीदास पंताचे खरे गुण दृगोचर होत असत. त्यांचीं कीर्तनें सुरु होत, आणि त्यामुळे मुलांमध्ये चांगलाच हंशा पिके.

देवीदासपंताच्या अंगीं केवळ कीर्तनकाराची नक्कल करण्याचा गुण नव्हता तर दुसरे अनेक गुण वसत होते. देवीदासपंत कविता करीत. पण कविता करतांनां वृत्तदर्पणातले वेडेवाकडे नियम त्यास संताप उत्पन्न करीत. आणि त्यांच्या भोंवतालची दुसऱ्याच्या बुद्धीने जाणारी मंडळी त्याच्या कविता वाचून त्याना त्या बरोबर नाहीत म्हणून विनाकारण त्रास देत. शार्दूलविक्रीडित १९ अक्षराचा असावा म्हणून वृत्तदर्पणात लिहिले असेल पण २० अक्षराचा केला तर तुमच्या घरचें काय जाते म्हणून देवीदासशास्त्री सरळ पृच्छा करीत. अर्थात या प्रश्नाचें उत्तर मुलाना देताच येत नसे, पण ते हसत असत व मुले उत्तर देता येत नाहीं म्हणून आपले अज्ञान लपविण्यासाठी हसतात असे देवीदासशास्त्री त्यावर भाष्य करीत. तुम्ही तरी वीस अक्षरांचा शार्दूलविक्रीडित कां करावा म्हणून पृच्छा केल्यास

कुणी निंदा कुणी वंदा
अमुचा स्वहिताचा धंदा

हें देवीदासाचे अभंगात्मक उत्तर असे.

देवीदासानी बाकी या वेडया मडळीच्या मनाला थोडाबहुत मानहि दिला होता. ते पुढे पुढे कवीच्या निरकुश बुद्धीला विनाकारण वेसण लावणारे श्लोक करीनासे झाले. त्याची कविताशक्ति, अभग किंवा ओवी या वृत्तात दृग्गोचर होऊ लागली. अभग जरी त्यानी करावयास घेतले तरी ते वृत्तदर्पणी नियमाप्रमाणे मुळीच करीत नसत. सहा सहा सहा आणि चार अक्षरे हा वृत्तदर्पणी नियम! त्याऱ्याऐवजीं सात सात सात आणि चार अशीं अक्षरे घालून अभग लिहिला तर काय झाले? तुकारामापासून सगळे कवी चूक की वृत्तदर्पणकार चूक असे ते विचारीत. आणि वृत्तदर्पणामुळे बिघडलेल्या आक्षेपकास गप्प बसवीत.

साधारणपणे देविदासपतांना जर कसली आवड असेल तर ती धार्मिक उपदेश आणि भजन यांत पुढारीपण करण्याची. आपण हरिदास बनावे की व्याख्याते बनावे याविषयी त्यांचे मत निश्चित नव्हते. आपण बोलाव आणि लोकांनी ऐकावे या तऱ्हेने आपले आयुष्य जावे याविषयीं त्याच्या मनाचा निश्चय पक्का झाला होता. एकदां त्यावेळेस एक हिंदुधर्मसरक्षक व्याख्याता आला होता. तो व्याख्याने देई तशी व्याख्याने देण्यास देविदासपतांस आवडे. त्याचे व्याख्यान गद्यपद्यमिश्रित होते. त्या व्याख्यानांत मिशनऱ्यांवर टीका होती. ख्रिस्तीधर्म वाईट म्हणून त्यांत उपदेश होता व आपल्या पूर्वजाची आठवण दिली जात होती. देवीदासपतांनी त्या व्याख्यात्यांचीं अनेक पदे तोडपाठ केलीं होतीं एवढेच नव्हे तर त्यांचा त्यावेळच्या विद्यार्थीमडळीमध्ये प्रचारहि केला होता.

धीरवीरमणि पृथ्वीराया,
भीमसिंह, पद्मिनि तज्जाया,
हमीरसिंह, प्रतापराया
धर्मरणीं बळि हो पडले;
नच घाबरले;
नच बावरले.
जात गोत यां मनांत नाणा;
काय आज ये प्रसंग जाणा;
"देशकार्य करु" असाचि बाणा
आर्य तुम्ही निजाचित्तिं धरा;
मनि धैर्य धरा;
निज दैन्य हरा.

त्याच व्याख्यानामध्यें आजकालचे लोक कसे बिघडले आहेत हे सागण्यासाठीं व थोडा हास्यरस उत्पन्न करण्यासाठीं नवरे बायकोच्या तंत्रानें वागून आईबापांस कसे अवमानितात हें सांगणारीहि कित्येक पद्ये असत.

जयदेवी जयदेवी जयजय बाईले
जे जे कष्ट केले ते तुज वाहीले
माझे मायबाप तुझे चाकर
तुझे मायबाप माझे ईश्वर॥जयदेवी जयदेवी॥
तुझ्या मायबहिणी माझ्या स्वामीणी
माझ्या मायबहिणी तुझ्या कुळंबिणी॥जय०॥

अथवा हेच विचार कधी कधीं अभंगाच्या द्वारें उद्गीर्ण होत.

मला नको बाप, तुला नको सासरा
तुझा मला आसरा, बायको गे॥
मला नको आई, तुला नको सासू
आपण दोघे आसूं, बायको गे॥
मला नको भाऊ, तुला नको दीर
तुझा मला धीर, बायको गे॥
मला नको बहीण, तुला नको नणंद
आपण करू आनंद, बायको गे॥

या तऱ्हेने आजकालच्या लोकांवर केलेली टीका लोकांच्या--निदान देवीदासपंतांच्या मनावर परिणाम करी.

त्याच व्याख्यानामध्यें "ज्यांच्या जिवावर आपण सर्व जगतों त्या शेतकऱ्यांची" स्तुति केलेली असे व त्याची दुर्दैवी स्थिति वर्णिलेली असे.

कुणबी श्रम करिती, शेतीवरती।
पूर्वीची धरती॥
माती घालुनिया दगडांवरती।
धान्य पेरीती॥
त्यांतुनियां कांहीं चोर नेती।
बहु कष्टी होती॥
त्यातुनियां उरलें धान्य धन्याचें।
देवा हर संकट या लोकांचे॥
गाती यश साचें॥

स्वधर्मावरचें व्याख्यान! तर स्वधर्म बुडविणारे जे सुधारक त्यांच्यावर टीका केल्याशिवाय तें व्याख्यान साजेल तरी कसें? म्हणून सुधारक, रावबहादुर या सर्वांवर त्या व्याख्यानांत टीका केलेली असे. सुधारक लोक जुन्या लोकांचें खरें ब्रीद सोडून अलीकडे काय करतात.–

तूझिया कृपेवीण ईश्वरा।
आसरा अम्हा नाहिं दूसरा॥

याच्या ऐवजीं

तूझिया कृपेवीण इंग्रजा।
आसरा अम्हां नाहिं तो दुजा।

हें वाक्य उराशीं धरतात.

शिवाय आज खरी ईश्वरभक्ति सोडून देऊन
घालीन लोटांगण, वंदीन चरण।
डोळ्यांनी पाहीन, रुपये तुझे॥

अशी भावना धरून इंग्रजांच्या पुढे नाचतात. तर या तऱ्हेनें अधम बनलेल्या लोकांनां व्याख्यात्याचे म्हणजे तेंच व्याख्यान पुन्हा म्हणून दाखविणाऱ्या देवीदासपंतांचें एकच सांगणें असे तें हें की,

स्मरत जा पूज्य पितरांनां।
पसरा न तोंड इतरांनां।
श्री दाशरथी रामाला।
श्री कृष्णसख्या धर्माला।
श्री एकनाथ साधूला।
सद्गुरु रामदासाला।
नृपतिलका शिवरायास।
आत्मदेशास।
दई सौख्याला।
जो पुनः स्थापि धर्माला.॥

याप्रमाणे त्यावेळचे स्वधर्माभिमानी उपदेशक हिंदुधर्माचे महत्त्व समजावून देत. आमच्या देवीदासपंतांवर या तऱ्हेच्या उपदेशाचा फारच परिणाम होई. त्यास असे वाटे की, आपले पुढील आयुष्य कसे जावे तर हा व्याख्याता ज्याप्रमाणें उपदेश करीत आहे त्याप्रमाणे उपदेश करीत जावें.

उमरावतीला सध्या डेप्युटीकमिशनरच्या कचेरीत कारकून असलेल्या एका देवीदासाबरोबरच्या विद्यार्थ्यानें देवीदासाच्या पुनरुच्चारित व्याख्यानाचा सारांश जितका आठवला तितका वर दिल्याप्रमाणे मोठ्या प्रयत्नाने दिला आहे.

दुसरा देवीदासाचा सहाध्यायी येणेप्रमाणें माहिती देतो.–देवीदासाचे लग्न अगदी लहानपणीं झाले असे म्हणता येणार नाही. १९०० साली त्याचें लग्न झाले आणि लग्नाच्या वेळेस त्याचे वय १५–१६ वर्षाचे होते. त्यावेळेस त्याच्या बायकोचे वय मात्र लहान म्हणजे आठ नऊ वर्षाचे होते. देवीदासाचे लग्न काहीं अशीं त्याच्या मनाविरुद्ध झाले होते. तो लग्नाला विरुद्ध असण्याचे कारण स्वामी केवलानंद नांवाचा एक साधु उमरावतीला आला होता, त्याच्याबरोबर आपण जावें आणि त्याच्या जवळून हठयोग शिकून घ्यावा अशी त्याची इच्छा होती. हा स्वामी सुमारें चाळीस वर्षाचा दिसत होता पण त्याचें वय १०० वर्षांचें आहे अशा गप्पा त्यावेळेस प्रसृत झाल्या होत्या, आणि इंग्रजी शिक्षणानें आम्ही बहकलों नाहीं असें दाखवू इच्छिणारी बरीच मंडळी त्याच्याकडे

जाऊं लागली होती. त्या स्वामीजींनीं ५० वर्षांपूर्वी आपण अमुक गोष्टी केल्या, आपण फक्त दहा वर्षे आपणांस पुरून घेतले होतें इत्यादि कथा कांही श्रद्धाशील मडळीस सांगून ठेवल्या होया, आणि त्या कथाचा देवीदासाच्या मनावर परिणाम झाला. देवीदासाने कांहीं योगावरचीं पुस्तकेंहि वाचलीं होतीं आणि त्यावरून या शास्त्रांत कांही तरी गूढ ज्ञान आहे, आणि जें अर्वाचीन सुशिक्षितांनां समजण्यासारखे नाहीं असे ते ज्ञान आहे अशी आपल्या मनाची समजूत करून घेतली. वज्रोलीसारख्या क्रिया, 'ज्या क्रिया साध्य झाल्या असता संभोग होऊन देखील रेतस्खलन होत नाही अशा क्रिया' योगांत आहेत, त्या क्रिया साध्य झाल्यानंतर आपण लग्न केले तर त्यांत अर्थ आहे. आजच लग्न करून काय फायदा असे तो म्हणू लागला होता. कांहीं मंडळींनी वज्रोलीसारख्या क्रिया करणारे योगी ते ब्रह्मचारी कसचे असा गैरसोईचा प्रश्न विचारला असता देवीदासाला उत्तर देण्यास कठीण जाई. दुसरे हठयोगाचे अभिमानी असे म्हणत कीं, स्खलन न होणे हेच तर ब्रह्मचर्याचे लक्षण. श्रीकृष्ण इतकी लग्ने करून आणि इतक्या स्त्रियांनां उपपत्नी करून तो ब्रह्मचारी होतांना! अज्ञ मंडळींनां त्याच्या ह्या म्हणण्याचे आश्चर्य वाटते किंवा तें खोटे वाटते, पण आपण "जाणणार" मडळीनां यांत काय आश्चर्य आहे असे ते म्हणत; पण पुढें शकेखोर मंडळी विचारीत की वज्रोली क्रिया साध्य होण्यासाठी पूर्व शिक्षण सर्व केलं तरी पहिल्याच स्त्रीसबंधाच्या प्रसगी ती क्रिया साध्य होईल याची खात्री काय? आणि जरी वज्रोली साध्य झाली तरी तो मनुष्य तुम्हांस ब्रह्मचर्याचे पालन करणारा वाटतो काय? हे सर्व वादविवाद देवीदासानें ऐकले, पण हठयोगाविषयींचा आदर त्याच्या मनांत कमी झाला नाहीं. अणिमा गरिमा, यांसारख्या सिद्धी प्राप्त होणे ही ज्या योगाची अलीकडली पायरी आणि समाधि ही शेवटची पायरी त्या योगास नांवें कशी ठेवावीं? हठयोगाच्या विरुद्ध जुन्या काळांतहि लोक होते हे देवीदासास ठाऊक होतें पण त्याचे स्पष्टीकरण तो आपल्या मनाशीं असें करून घेत असे कीं, ती विरुद्धता योगग्रंथांची भाषा न समजल्यामुळे असावी. गगा म्हणजे उजव्या व यमुना म्हणजे डाव्या नाकपुडीने श्वसन आणि बालरडा म्हणजे दोन नाकपुडया सारख्याच वहात असतानाचा काल हे ज्यास ठाऊक नसेल तो,

> गंगा यमुनयोर्मध्ये बालरंडा तपस्विनी ।
>
> बलात्कारेण गृण्हीयात्ः तद्विष्णो परमं पदम् ॥

या श्लोकाला ऐकून योगमार्गास चांगलें कसें म्हणेल? अर्थात हठयोगाविरुद्ध असलेला आक्षेप व्यर्थ आहे. केवलानंदांच्या निंदकानीं एवढें लक्षांत ठेवावे कीं, केवलानंद लुच्चा आहे असें तुम्हीं सिद्ध केले तरी हठयोग असिद्ध होत नाहीं. हठयोगावरील अनेक पुस्तके स्वामी केवलानंद यांनी कोठे उत्पन्न केलीं. हीं पुस्तके पूर्वकालाचा अनुभव नाहीत काय? या अणिमा गरिमासारख्या अद्भुत गोष्टी सत्य आहेत हे तर ग्रथच सांगतात. त्यांस खोटें म्हणणे म्हणजे केवळ अज्ञान आहे. ते अज्ञान ग्रथ वाचनाच्या अभावामुळे उत्पन्न होतें. केवलानद या सिद्धी आपणांस अवगत आहेत असे सांगत असले व त्यास त्या सिद्धी अवगत नसल्या तर ते लोकांना ठकवीत असतील असेहि होईल. पण त्यावरून योगमार्ग कांहीं खोटा नव्हे. योगमार्गाकडे लागू नये या विचाराचेंहि समर्थन होणार नाही. फार तर केवलानदांच्या नादीं लागू नये एवढेंच सिद्ध होईल. पण केवलानंदांचा खोटेपणा तरी कोठे सिद्ध झाला आहे. हे स्वामी कांही दिवस उमरावतीला होते, आणि पुढे त्यांनी एका वाण्याची विधवा मुलगी पळवून नेली अशी गांवातल्या लोकांनीं निंदा

करण्यास सुरवात केली. त्यावेळेस देवीदासाची केवलानंदावरील श्रद्धा ढळली नाहीं. तो म्हणे की, "जर कुणी "बाई, मी सद्गुरूची आहे चेली," असें गाणें म्हटलें तर तें मात्र लोकांनां आवडते व कोणी बाई जर सद्गुरुची खरोखरच चेला बनली तर तें मात्र आवडत नाहीं. ती बाई आपल्या अध्यात्मिक उन्नतीसाठीं स्वामींबरोबर गेली नाहीं हे कशावरून? योगमार्ग स्त्रियानां निषिद्ध आहे असें नाहीं."

देवीदासाच्या गृहस्थितीविषयींहि थोडीशी माहिती दुसऱ्या एका मनुष्याकडून मिळाली, ती येणेंप्रमाणे—

देवीदासाची हायस्कुलांत असतां अभ्यासा-बद्दल ख्याति नव्हती आणि त्यामुळे तो म्याट्रि-कच्या परीक्षेंत उत्तीर्ण झालाच नाहीं. म्याट्रिक नापास झालेल्या मंडळींना खुले असलेले त्यावे-ळेस दोनच अभ्यासक्रम मोकळे होते. एक पशु वैद्यकाचा आणि दुसरा टेक्निकल इन्स्टिटयूटचा. मुंबईला देवीदास गेल्यानंतरची माहिती उमराव-तीला फारशी कोणास नाहीं; कां कीं तो उन्हा-ळ्याच्या सुट्टींत क्वचितच येत असे. त्याचे लग्न तो मुंबईला शिकत असताच झाले; ते देखील बाहेर गांवींच झालें; लग्न झाल्यानंतर देवीदास उमरावतीला एकदांच दिसला. त्याची बायको खामगांवच्या एका शाळामास्तरची मुलगी. पण तिचा बाप लग्नापूर्वींच वारला होता, आणि आई लग्न झाल्यावर थोडक्याच दिवसांनी मृत्यु पावली. तो मुंबईला असतां त्याची बायको उमरावतीस म्हणजे सासरींच होती देवीदास मुंबई सोडून कोठे-तरी नापत्ता झाला होता असे कळते तरी त्याची बायको सासरींच होती. पुढे १९०७ सालच्या प्लेगांत देवीदासाचे आईबाप वारले. तेव्हां देवी दासाची बायको आपल्या दिराजावेजवळच रहात होती. व याचे कारण तिला माहेरचे कोणी नव्हतें असें सांगण्यांत आले होतें. पण पुढे कांही दिवसांनीं बायकोहि दिसेनाशी झाली तेव्हां असें कळले कीं, तिचा मामा कोठे कोंकणांत आहे त्याच्याकडे ती रहावयास गेली. तिच्या मामाचे गांव कोणते इत्यादि गोष्टींविषयीं येथे कोणास माहिती नाहीं. देवीदास पतांचे थोरले बंधु गणपतराव हे देखील काही वर्षा-पूर्वी वारले. नंतर त्यांची बायको कोठेशी निघून गेली;व नंतर तीहि वारली असे कळते कमिशन-रच्या ऑफीसात व पोलीसच्या वह्यांत काय काय माहिती मिळते, ती मिळाल्यानंतर पुढे लिहीनच.

येथपर्यंत वृत्तांत वाचल्यानंतर एल्मा म्हणाली, "अस्सं, माझ्या जावेने मी मामाकडे म्हणजे माझ्या माहेरीं निघून गेले अशी बातमी उठवली.पण अशी बातमी उठविली हे माझ्यावर मोठे उपकारच केले. मी कोणाबरोबर तरी पळून गेले अशी बातमी उठविली नाही, हे भाग्यच म्हणावयाचे.मला माझ्या जाऊबाईच्याविषयीं एवढ्याबद्दल तरी कृतज्ञता बाळगली पाहिजे." एल्माचे हे बोलणे ऐकून मिसेस हंटर म्हणाल्या, "वेडे अगदी चुकतेस, तुला तुझ्या जावेवर विशेष रागावण्याचे जसे कारण नाहीं तसेच तिच्याविषयीं फारसे कृतज्ञ अस-ण्याचेंहि कारण नाही. तू कोणाबरोबर पळून गेलीस अशी जर बातमी तिने उठविली असती तर लोकांनी पोलिसकडे वर्दी द्यावी वगैरे गोष्टी तुझ्या दिरास सांगून तसे करावयासहि लावले असते. वर्दी दिली असती तर चौकशी झाली असती आणि ती चौकशी तर त्यांस नको होती.

बाबासाहेब देशपांडे यास कमिशनरच्या ऑफिसात परदेशी गेलेल्या लोकांची जी यादी असते तींत देवीदास अत्रे यांची संपूर्ण माहिती सांपडली. त्या माहितीत एस्. एस्. झाबीजी या बोटीनें १९०६ सालांत देवीदास अफ्रिकेत रवाना झाल्याचे कळले, व पुढे त्याची स्थलांतरे देखील दिलीं होतीं. शेवटी देवीदास हिंदुस्थानांतहि आल्याचा उल्लेख होता, आणि तो नांव बदलून प्रवास करीत आहे ही देखील माहिती होती.

बदललेले नाव बाबासाहेबांनी वाचले तेव्हां बाबासाहेब जरा चकित झाले आणि म्हणाले यासंबंधीं आपण पुरी चौकशी केल्याशिवाय देवीदासपंत हिंदुस्थानात आले आहेत ही बातमी देऊ नये. जर आपण ही बातमी आजच दिली आणि पोलीसच्या माहितींत कोठे चूक असली तर भलताच परिणाम व्हावयाचा. मिसेस हंटर या देवीदासाबद्दल इतकी चौकशी कां करीत आहेत कोण जाणे? कारण तसेंच कांही महत्वाचे असावे. देवीदासाची आपल्या मामाकडे जाऊन राहिलेली बायको मिसेस हंटर यांच्या ओळखीची नसेल कशावरून? जर ती त्याच्या ओळखीची असेल तर त्या तिच्याकरत देखील ही चौकशी करीत असणे शक्य आहे. व पोलीसच्या वहीत व सरकारी दप्तरात देवीदास निराळे नाव धारण करून आहे अशी माहिती आहे; पण तो निराळे नाव धारण करणारा मनुष्य दुसराच नाहीं कशावरून. आपण जर दोन्ही व्यक्ती एक म्हणून समजलो आणि तो मनुष्य निराळाच निघाला तर नवऱ्याची वाट पहात राहणाऱ्या एका स्त्रीच्या मनात प्रथम आशा उत्पन्न करून मग निराशा उत्पन्न करण्याचा दोष आपल्यावर येणार नाही काय? इत्यादि गोष्टींविषयी विचार करून नावासंबंधी मिळालेल्या माहितीसंबधाने आपल्या रिपोर्टांत देशपांड्यांनी मुग्धताच ठेवली. बाबासाहेब देशपांडे यांस सर्व माहिती एकदम न कळविण्यांत केवळ वर सांगितलेला एका अज्ञान स्त्रीच्या कल्याणाचाच हेतु होता असे नाही, तर त्यात त्यांची कांही व्यावहारिक दृष्टि देखील होती. सर्व माहिती त्याना जरी दोन दिवसांतच मिळाली तरी ती माहिती मिळविण्यास त्याना पुष्कळ त्रास पडला असे दाखवावयाचे होते. मिसेस हंटरकडून ५०० रुपये खर्चासाठी आगाऊ मिळालेच होते, आणि त्यांचा आतापर्यंत खर्च पंचवीस रुपये देखील झाला असेल नसेल. तर चौकशी निदान महिना दीड-महिना लांबवावी हे त्यांस अवश्य होते, मुंबईहून उमरावतीला येणें, डाकबंगल्यांत रहाणे, टांगाखर्च इत्यादि गोष्टी मिळून त्यानां तीन चार दिवसाचाच म्हणून कितीसा खर्च लिहिता येणार! याशिवाय त्यानां मिसेस हंटर यांच्या दुसऱ्या एका आदेशाची आठवण झाली. तो आदेश असा होता की, देवीदास जर दुसरें एखादें नांव बदलून किंवा कोणाबरोबर तरी लग्न करून राहिला असेल तर त्याच्याशी ओळख करून जितकी माहिती मिळेल तेवढी मिळवावी. त्याला आपली चौकशी कोणी करीत आहे असेंहि दिसूं देऊ नये. त्या चौकशीचें फळ मात्र ताबडतोब कळवावें. आता यामुळे बाबासाहेब देशपांडे यांस नागपुरास जाणे अवश्य झाले.

बाबा देशपांडे डिटेक्टिव्ह याचा आलेला रिपोर्ट वाचल्यानंतर एल्मा हंटर हिला नवरा फरारी झाल्यानंतरची जरी जास्त माहिती मिळाल्यासारखे वाटले नाही तरी नवऱ्याचे पूर्ववृत्त बरेंचसे जास्त समजले; आणि त्यामुळे जो डिटेक्टिव्ह नेमला होता त्याविषयी विश्वास उत्पन्न झाला. नवऱ्याचे लहानपणचे वृत्त समजले आणि त्यामुळे देवीदासाचे पूर्ववृत्त वाचीत असतां आपला नवरा गोसावी—बैराग्याच्या नादी लागून कोठे गेला असणे शक्य आहे असा विचार तिच्या मनांत येत होता पण जेव्हां त्याच्या आफ्रिकेत जाण्यासंबधाची निश्चित माहिती मिळाली तेव्हां तो गोसावी बैरागी कांही झाला नाहीं, आणि परदेशीं गेला तर परत येण्याची आशा आहे इत्यादि गोष्टी तिच्या मनांत आल्या. मिसेस हंटरनीं तिला सांगितले की, जर तुला नवऱ्याचा पत्ता लावावयाचा असेल तर तो जगाच्या पाठीवर कोठेहि असला तरी आपण पत्ता लावू. त्यासाठीं पैसा खर्च झाला तरी हरकत नाही. आफ्रिकेंत माझ्या ओळखीची मंडळी पुष्कळ आहेत. मी तिकडील एका वकीलास चौकशी करण्यासाठीं तार करते.

## प्रकरण १९ वें.

## स्वामीजींच्या स्वतंत्र बिऱ्हाडीं.

स्वामी ब्रह्मगिरि व्याख्यान झाल्यानंतर घरीं परत आले, त्यावेळेस दादासाहेब झोपलेले होते. दुसऱ्या दिवशीं ब्रह्मगिरींस सर्व वातावरण बदललेलें दिसलें. सकाळचा चहा आला नाहीं, नोकरानें आंघोळीला पाणी दिलें नाहीं, ब्रह्मगिरीस स्वत: जाऊन आंघोळीला बंबातून पाणी काढून घ्यावें लागले व ब्रह्मगिरी गंगाळ मोरींत घेऊन जात असतां तुमची छाटी धुण्यात टाकू नका म्हणून मोलकरीण त्याच्या अंगावर ओरडली. आम्ही दादासाहेबाची मंडळी ह्या घरात आपले स्वागत करूं इच्छीत नाही असे दाखविणारे वीसपंचवीस पुरावे दोन तासातच स्वामीस मिळाले.

आपल्या नोकराकडून स्वामीचा अपमान व्हावा आणि स्वामींनी नोकरास उलट बोलावे किंवा आपल्याकडे तक्रार यावी आणि आपण शांतपणे दोघामध्ये निवाडा करण्याचा घाट घालावा आणि नोकरांकडे दोष काहीं नाहीं असा आपण निकाल द्यावा; व या पद्धतीनं पाहुणा घालवून द्यावा असा दादासाहेबाचा उद्देश होता. पण तो उद्देश साध्य झाला नाही. नोकर पाहुण्याशी अमर्यादेनें कां वागतात याचे रहस्य स्वामींनीं ओळखलें; नोकराच्या दुर्वर्तनानें स्वामीस राग आला नाही. सूड घेण्याची ही दादासाहेबाची पद्धति—ज्या पद्धतीस अस्सल नागपुरी मुत्सद्दीगिरी म्हणून दादासाहेब म्हणत ती—पाहून उलट हसू येत होते. ब्रह्मगिरींस या एकदर गोष्टीमुळे राग कसा येणार? आपण काय केले हे ब्रह्मगिरीस ठाऊक होतें व ते त्याचा परिणामहि ओळखून होते. आपणांस या मंडळीनीं आपल्या मतलबासाठीं बोलावले आणि तो मतलब आपण साध्य होऊ दिला नाहीं तेव्हा या मंडळींस फसल्यासारखे वाटत आहे. आपला हेतु साध्य होत नाहीं असें या राजकारणी मंडळींस दिसून आल्याबरोबर त्याची तावडतोब वृत्ति बदलणार हें त्यांस ठाऊकच होतें. म्हणजे आपली हकालपट्टी होणार, व ती व्हायला पाहिजेच आहे असे ब्रह्मगिरींचे मत होते. पण ब्रह्मगिरींस जे पाहिजे होते ते हे कीं आपणांस सभावितपणाने आपल्या यजमानांनीं निरोप द्यावा. ब्रह्मगिरींस दादासाहेबांची केवळ मौजच वाटली नाही तर थोडीशी कींवहि आली. कींव जी वाटली ती एवढयाच साठीं कीं दादासाहेबाच्या पक्षाने ज्या हेतूनें बोलावले होतें तो हेतु साध्य न झाल्यामुळें दादासाहेबांनी सरळपणाने तुमचा आम्हांस उपयोग नाहीं हे आपणास न सांगतां वाममार्ग अमलात आणला ही गोष्ट वाईट झाली. याचे कारण काय बरें? असा विचार करून मनोदौर्बल्य हेच कारण होय असे ब्रह्मगिरींनीं ठरविलें. आपला राजकारणांत उपयोग करून घेणार होतो पण ते शक्य दिसत नाही यासाठी आम्ही तुम्हास निरोप देतो असें ब्रह्मगिरींनां सरळ सांगण्यासाठीं लागणाऱ्या धैर्याचा अभाव दादासाहेबानी दाखविला. महाराष्ट्रीय म्हणविणाऱ्या मनुष्याच्या अंगी हा सरळपणाचा आणि धैर्याचा अभाव आहे ही रागाची गोष्ट नसून खेदाची आहे आणि ज्या महाराष्ट्राचा आपण अभिमान धरला त्यातल्या एका शिष्ट व्यक्तीने ही गोष्ट करावी याचेच त्यास वाईट वाटले. जगांत प्रत्येक मनुष्य मतलबी आहे आणि जो तो आपापल्या फायद्यासाठीं करावयाचे ते करतो त्यात ब्रह्मगिरीस कांहींच वाईट दिसत नव्हते. जे काय वाईट झाले ते एवढेच की आपला हेतु साध्य करण्यास जी सभावितपणाची रीति वापरावयाची तिच्या ऐवजी दुर्बलाची गैरसंभावित रीति वापरली गेली. ज्या पुढच्या पिढीस आपण कार्यक्षम करूं इच्छितो ती तरुण पिढी दादासाहेबांसारख्या पुढाऱ्याच्या गलिच्छ उदाहरणांनी अगोदरच बिघडली नाहीना! हा विचार देखील त्यांच्या मनांत आला.

ब्रह्मगिरींनीं त्याच दिवशीं ती जागा सोडून आपलें चंबुगवाळें उचलून तें बर्डीवर एका भाडयाच्या जागी नेले.

ब्रह्मगिरींच्या स्थानांतराची बातमी चोहोकडे अगदीं थोडया वेळांत पसरली. दादासाहेबांनी ११ वाजतांनाच आपल्या वकीलकोठीत ब्रह्मगिरींच्या जाण्याचें स्पष्टीकरण केले, ते असे—मला जरा उठायला उशीर झाला तो कळले कीं स्वामी निघून गेले. कारण एवढेच कीं आमच्या स्वैपाक्याचें आणि त्याचें भाडण झाले; ब्रह्मगिरींचे व्याख्यान आम्हांस आवडले नाहीं म्हणून आम्ही त्यांस जावयास सांगितले अशांतला भाग मुळींच नाहीं. मला न सागताच ते निघून गेले. ब्रह्मगिरींचे जाण्याचे स्पष्टीकरण करण्या साठी दादासाहेबांनीं इतका खटाटोप करण्याचे कारण काय, याचे पुष्कळास आश्चर्य वाटेल पण त्यांत आश्चर्याचे कारण काहीं नाहीं. दादासाहेबास आपल्या आतिथ्यधर्माचा मोठा अभिमान होता. त्यांच्या घरी गेलेल्या आणि वाटेल तितके दिवस राहिलेल्या पाहुण्याला, दादासाहेबांनी जा असे कधी म्हटले नाहीं, असें दादासाहेब शपथेवर सागू शकतील.

ब्रह्मगिरि राजकारणी मडळीच्या तडाक्यातून निघाले त्याच दिवसाच्या सध्याकाळपासून त्यांच्याकडे बरीच मडळी जमू लागली. त्यांत तरुण विद्यार्थ्यांचा भरणा बराच होता. मडळी सध्याकाळची जमत असत आणि विविध विषयांवर पुष्कळ चर्चा करीत. या मडळीमध्ये एक रिटायर्ड गृहस्थ बरेच प्रश्न विचारीत होते. ते त्याना त्यांचे पूर्वाश्रमींचे नाव देखील विचारण्यापर्यंत आले. तेव्हां "आमचें काय चरित्र आपणांस लिहावयाचे आहे? आमचे चरित्र लिहिण्याजोगे आम्ही काय करू तेव्हा आम्हीं आपले पूर्वाश्रमीचे नांवहि आपणांस मोठया आनदाने कळवू" असे ब्रह्मगिरींनीं उत्तर दिले.

तेथें होणारी एकदर चर्चा प्रश्नोत्तररूपानें न देतां ब्रह्मगिरींचे सांगणें म्हणून देतों.

तरुण मडळीनी जे प्रथम प्रश्न विचारले त्यांत "तुम्ही गीतेला निरुपयोगी ग्रंथ कां समजतां" असा प्रश्न होता. त्याला स्वामीजींनीं उत्तर दिलें तें येणेप्रमाणे.--

"गीता मी अगदीं निरुपयोगी ग्रथ समजत नाहीं. जो मनुष्य मृत्युशय्येवर पडला आहे त्याला "प्रत्येक देहीला ज्याप्रमाणें कौमार, यौवन आणि जरा हे विकार असतात त्याचप्रमाणे देहांतरप्राप्ति हा विकार आहे;" इत्यादि गोष्टी सांगणार श्लोक फारच उपयुक्त आहेत यांत शका नाहीं. आणि माणसें मृत्युशय्येवर पडली असतां गीतापाठ करवितात, त्यामुळे त्यांच्या मनाला समाधान होत असेल यातहि शका नाही. पण गीतेचा एकदर व्यवहारात राहणाऱ्या मनुष्याला काय उपयोग आहे? सामान्य नागरिकास गीतेतील उपदेशाचा उपयोग काय? सर्व प्रकारचे तत्त्वज्ञान पुढे करून कार्य कोणते सागितलें आहे, तर "तस्मात् युध्यस्व भारत."या उपदेशाचा आपणास कितपत उपयोग आहे. प्रत्येक नागरिकास लढण्याचा प्रसग केव्हा येणार? आणि जगाची प्रवृत्ति युद्धे वाढविण्याकडे असावी की कमी करण्याकडे असावी? सामान्य जनास उपयोगी असें गीतेतलें एकच सूत्र आणि ते म्हटले म्हणजे "नियत कर्म कुरु;" म्हणजे न्हाव्याने जन्मभर ताशीतच रहावें; आणि "नियत" म्हणजे काय? कोणी नियत केलेले? असा प्रश्न विचाराला म्हणजे "जन्मानेच" हे उत्तर द्यावे लागेल की नाही? प्रत्येक व्यक्तीचे कर्म जन्मानें नियत होते हे तत्त्व उच्च परिस्थितीतल्या लोकांनां ठीक आहे; त्यांची खुशामत होते, पण कनिष्ठ स्थितींतील लोकांस हे तत्त्व निराशा उत्पन्न करणारे नाहीं काय? तर थोडक्यांत सांगावयाचे म्हटल्यास गीतेचा उपदेशच आजच्या स्थित्यंतरक्षम जगांत योग्य नाहीं.

गीतेंतला मोठा तारीफ केलेला उपदेश काय? तर, "फलाशा सोडून कर्म करावें." फलाशा म्हणजे काय? आपण योजिलेले कार्य शेवटास जावे हेच फल जो अपेक्षीत आहे त्याने तेहि सोडून द्यावयाचें काय? स्वार्थ सोडून काम करीत जावे या उपदेशाने किती लोक कामास लागणार; स्वार्थ कधी कोणास सुटला आहे काय? मी सन्यासी आहें पण मी हे सांगतो की, एक-रुपया मजपासून घेऊन आठ आण्याचाच माठ माझ्या हातावर ठेवला तर ते मला आवडत नाही. इतका तर मनुष्यप्राणी स्वार्थाने गढलेला आहे. स्वार्थ सोडून काम करावे हे तत्त्वज्ञान वापरून कोणी मोठाल्लीं कार्ये काय केली आहेत? जे तत्त्वज्ञान व्यवहारात आणता येत नाही ते सांगणारा ग्रंथ "नैतिक ग्रथ" म्हणून तरी कां समजावा? नीतिनियम, आणि पापपुण्याचे नियम याचे महत्त्व ज्या ससारात आपण आहोत त्या ससारांत उपयोगी पडतात म्हणूनच आहे एरव्ही नाही. शिवाय सोळाव्या अध्यायात गीताकार तर इतके बहकले आहेत कीं जो कोणी चागले कृत्य देखील अहकारयुक्त बुद्धीने म्हणजे स्वत चा गौरव व्हावा म्हणून करतो तो नरकास जातो आणि जो कोणी केवळ परार्थ बुद्धीनें करतो तो स्वर्गास जातो. अशा अर्थाची वाक्ये श्रीकृष्णाच्या तोंडीं घातलीं आहेत.हे म्हणणे काय सत्य समजावयाचे की,वेडया ग्रथकाराची लाडकी कल्पना समजावची? कोण स्वर्गास जातो व कोण नरकास जातो याविषयीचे हे विधान सत्य आहे असे ग्रथकाराचे म्हणणे असल्यास ते सत्यज्ञान प्रत्यक्ष अवलोकन करून झाले आहे काय असा प्रश्न उपस्थित होतो. मी ग्रथकारास विचारतो कीं बाबारे, तू नरकाला किती फेऱ्या मारून आलास? आणि तेथे अहकारानें चांगले कृत्य करणारे किती लोक नरकाधिपतीच्या तावडींत सांपडलेले पाहिलेस? लोकांनी आपणांस चांगलें म्हणावें या हेतूनेंच सत्कार्य करणाऱ्या लोकांनां जो तत्त्ववेत्ता नरकास पाठवितो तो नरकांतच कायमची वसाहत करण्यास योग्य आहे अशी माझी खात्री आहे. नीतिसूत्रांचा हेतु जर जगात चागलीं कार्ये व्हावीं, चागल्या प्रवृत्ती उत्पन्न व्हाव्या हाच जर असेल तर नीतिवेत्त्याचें कर्तव्य हे की ज्या हेतूने मनुष्य सत्कृत्यास प्रवृत्त होतो त्या हेतूच्या नाशास नीतिवेत्त्याने प्रवृत्त होऊ नये. मी असे विचारतो कीं, जर कोणी मनुष्याने नागपुरात लोककल्याण व्हावे या हेतूनेच इस्पितळ बाधले आणि दुसऱ्याने आपला गौरव व्हावा म्हणून इस्पितळ बाधले तर त्या दोन्ही मनुष्याचा समाजाला सारखाच उपयोग होतो ना? नीतिनियम जर समाजधारणेसाठी आहेत आणि दोन्ही मनुष्याकडून समाजकल्याण सारखेच होत आहे तर एकाला स्वर्गाला पाठविण्याची आणि दुसऱ्याला नरकाला पाठविण्याची हिकमत या ग्रथकाराने आपले नीतिनियम सांगताना का धरावी? याशिवाय हेहि सागतो की, कोणतेहि कृत्य करताना मनुष्याच्या भावना अगदी तुटक असतात काय? एकादे चागले कृत्य करताना त्या कृत्याचा इतरास उपयोग होईल याची जाणीव जर एखाद्यास असली तर त्या कृत्यापासून स्वत.ला मान्यता मिळेल याचीहि जाणीव असणें अशक्य आहे काय? मी तर उलट असे म्हणतो की बहुतेक लोकांनां सत्कृत्य करताना दोन्ही जाणीवा असतात.

गीता हा ग्रथ उपयोगी न समजता सैतानी ग्रथ आहे असे मी समजतो, का की, फलाशा सोडून कर्म करावे, स्वार्थाचा मागमूस नको, अहंकारभावना नको इत्यादि गोष्टी बोलून या ग्रथानें लोकांनां आडमार्गास नेले आहे. स्वार्थाची भावना निसर्गाने म्हणा किंवा ईश्वराने म्हणा, आपल्या हृदयांत जागृत ठेवली आहे ती तिचे निर्मूलन करण्यांसाठी ठेविली आहे काय? दिसण्यांत गोडस पण अशक्य उपदेश करणारे लोक वेडे

किंवा लुच्चे आहेत. जगांतील मोठालीं कार्यें अहंकारामुळे म्हणजे द्रव्याच्या व कीर्तीच्या लोभामुळें झालीं आहेत कीं, अहंकारभाव पुसटून टाकण्याने झाली आहेत! स्वाभाविक गोष्टीस नादान ठरविणे आणि अशक्य गोष्टीस स्तुत्य बनविणे ही क्रिया जे "महात्मे" करतात ते लोकांस थोताडी आणि ढोंगी बनवितात.

मला जे काहीं सांगावयाचे ते हे कीं, स्वार्थाकडे लक्ष देण्याची जी प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत बुद्धि आहे ती मारून टाकूं नका. " निःस्वार्थीपणाचे महत्त्व लोक सांगतात आणि निःस्वार्थीपणा हा चांगला सद्‌गुण आहे असेहि लोक समजतात त्यात तथ्य नाही काय ? " असा जर कोणी प्रश्न विचारला तर त्याला माझे उत्तर असे आहे की खरोखर स्वार्थत्यागी म्हणून जगात ज्या आपणांस व्यक्ती दिसतात आणि ज्या व्यक्तीचा आपण गौरव करतो त्या व्यक्ती स्वार्थीच असतात, पण त्यांची स्वार्थबुद्धि सुशिक्षित म्हणजे अधिक दूरदृष्टीची झालेली असते. चांगले गुण म्हणून ज्यांची आपण वाखाणणी करतो ते गुण केवळ दूर असलेला स्वार्थ साधण्याचे साधन आहेत. यासाठी मी तुम्हास हे सांगतो कीं तुम्ही आपल्या मनांतील स्वार्थबुद्धि मारून टाकू नका तर ती अधिक सुशिक्षित करा स्वार्थबुद्धि अधिक सुशिक्षित झाली म्हणजे तुम्ही जगाची सेवा अधिक चांगली करू शकाल. अहंकार मारून टाकू नका. जगांत अत्यंत उपयोगी झाले पाहिजे असा अहंकार तुमच्या मध्ये निरंतर असो. स्वार्थबुद्धि सुशिक्षित होऊनच मनुष्य परोपकारी होणार आहे. मनुष्याच्या स्वार्थबुद्धीच्या योगाने दुष्परिणाम होतात म्हणून ती त्याज्य नव्हे. तिला वळण म्हणजे दिशा पाहिजे आणि नियंत्रण पाहिजे, त्याचप्रमाणे मनात जी परोपकाराची भावना असते तीस देखील स्वैरता प्राप्त होऊं द्यावयाची नाहीं; तिला देखील विचाराचे नियंत्रण पाहिजे.



तुम्हाला गोड पदार्थ आवडतात तसेच मधुमेह झालेल्या मनुष्यास देखील ते आवडतात, पण तो साखरेचे पदार्थ खात नाहीं. आजारी मनुष्य जेव्हां त्याला आवडणाऱ्या अन्नापासून अलिप्त रहातो, तेव्हां तो स्वार्थामुळेंच अलिप्त रहातो किंवा नाहीं ? या सर्व गोष्टींमध्यें आपण पहातो ते हे कीं काहीं दूर असलेलें सुख मिळविण्यासाठीं मनुष्य निकटचे सुख किंवा हातचे पैसे गमावतो. तो जेव्हां असें करतो तेव्हां त्याची स्वार्थबुद्धि अधिक सुशिक्षित झाली, आणि तो मनुष्य अधिक सद्‌गुणी झाला असे म्हणावयास हरकत नाहीं. स्वार्थी मंडळीमध्यें देखील उच्चनीचता आहे. जो दृश्य स्वार्थाकडे लक्ष देतो त्यापेक्षां जो आज अदृश्य असलेल्या स्वार्थासाठीं झटणारा मनुष्य अधिक उच्च होय.

मी स्वार्थाकडे लक्ष देऊ नका म्हणून सांगावयास आलो नाहीं; त्याचप्रमाणें संसार हा दुःखमय आहे,त्याचा त्याग करा म्हणून सांगावयास मी आलो नाहीं. कालच्यापेक्षा आजचे दिवस बरे आहेत, व जगांतील निवास अधिकाधिक सुखावह करण्याकडे मनुष्यप्राणी जो प्रयत्न करतो त्यास यश येत आहे असे मी सांगावयास आलो आहे.

देशास दुर्गति प्राप्त होत आहे असे राजकीय चळवळ करण्यासाठीं सांगणारे लोक बोलोत पण स्थिति दिवसानुदिवस सुधारतच चालली आहे असे मी सांगू शकतो. प्रत्येकाने आपल्या वडिलांच्या वेळची रहाणी आणि आजची रहाणी यांची तुलना करावी. देशास पारतंत्र्य आहे म्हणजे देशांतल्या व्यक्तीस पूर्वीपेक्षां स्वातंत्र्य कमी आहे अशांतला भाग नव्हे. पूर्वकालीन स्थितीपेक्षां आजची स्थिति खरोखरच सुखावह होय.

राष्ट्राचे भवितव्य उज्वल आहे त्याचप्रमाणें राष्ट्रांतर्गत व्यक्तीचे भवितव्य देखील उज्वल आहे. हिंदुस्थानाचा जगाशीं जो अधिक अधिक संबंध येत आहे त्याच्या योगानें आपल्या उन्नतीस चालनाच मिळणार आहे.

ख्रिस्तानें त्याचप्रमाणे हिंदुस्थानांतल्या अनेक तत्ववेत्त्यांनीं संपत्तीच्या पाठीमागे लागणें चांगलें नाहीं, संपत्ति ही सर्व दु:खाचें कारण आहे म्हणून सांगितलें; पण मी तुम्हांस असे सांगतों कीं, संपत्तीच्या पाठीमागे लागणें ही गोष्ट अनिष्ट तर नाहींच पण आध्यात्मिक आयुष्यक्रमासहि पोषक आहे. संपत्ति हें बल आहे, जो आपलें बलवर्धन करतो तो अनेक पापापासून अलिप्त राहूं शकतो. संपत्ति वाढविणे म्हणजे स्वत: पुष्कळ काम करणे व इतरांसहि कामाला मदत करणे आहे.

तुमच्यापैकीं पुष्कळांच्या हातून चुका झाल्या असतील, आपले आयुष्य बिघडलें असें तुम्हांस वाटत असेल व त्यामुळे तुमचा आत्मविश्वास कमी झाला असेल तर तुम्हास माझे हेंच सांगणे आहे कीं तुम्ही विनाकारण स्वत:वर गैरविश्वास उत्पन्न होऊं देऊं नका. हे लक्षांत ठेवा की चुका होणे ही गोष्टच यश:प्राप्तीसाठी प्रारंभी व्हावी लागते. ज्यास अपयश आलें असेल त्यानें लक्षांत ठेवावें कीं, यशाची पूर्वतयारी आपण केली.

जे लोक भित्रे असतील त्यांनी हे लक्षांत ठेवावे कीं, ज्या लोकांची धैर्याबद्दल ख्याति झाली आहे ते लोक देखील अत्यंत भित्रेच होते, धैर्यवान व भित्रे या मनुष्यांच्या दोन जन्मसिद्ध जाती नाहीत. हे गुण जन्मसिद्ध नसून कर्मसिद्ध म्हणजे प्रयत्न-सिद्ध आहेत. ज्या लोकांना भीति वाटत असेल त्यांना मी हेच सांगतो कीं, ज्याची तुम्हास भीति वाटते ते काम एकदा करावयास लागा, म्हणजे तुमची भीति जाईल. तुमच्या मनांतील भीति तुमचें काम यशस्वी करण्यासाठींच निसर्गानें उत्पन्न केली आहे. प्रत्येक काम करण्यास जो काळजीपूर्वक-पणा लागतो तो तुमच्यांत उत्पन्न व्हावा एवढया-साठींच तुमच्या मनांत भीति ही ठेवली आहे. कार्य यशस्वी होण्यासाठी पूर्वावलोकन करविणारें यंत्र भीति हे आहे; तुमचा जगांत अपकर्ष व्हावा यासाठीं नाही.

मी मोठाल्या योद्धयाशीं, मुत्सद्यांशीं, त्याच-प्रमाणे व्यापारांत किंवा उद्यमांत जे महत्त्व पावले त्यांशीं परिचय केला. तेव्हां त्यांनीं मजपाशीं असें कबूल केले कीं, कार्याच्या आरंभीं ते देखील अनेकदां पराभव पावले आहेत. लोकांनां त्यांचें यश ठाऊक झालें, पण त्यांना ज्यांत अपयश मिळालें अशा गोष्टी पुष्कळच आहेत. त्या मात्र लोकांस ठाऊक नाहींत त्यांचें अपयश त्यांनांहि कल्याणपर झाले अपयशामुळें निराश न होतां अपयशाच्या कारणांचे ते वारंवार पृथक्करण करूं लागले तेव्हां त्यांस यशस्वी साधनें व मार्ग दिसूं लागले.

तुम्हांला जगामध्ये दुष्टांची भीति वाटत असेल पण ती भीति तुम्ही सोडून द्या, विचारी व्हा, म्हणजे तुम्ही निर्भय व्हाल. दुष्टपणा माणसें करतात तो अज्ञानामुळे करतात. तुम्ही ज्यांस दुष्ट समजतां त्यांचा दुष्टपणा एक तर मत्सरानें उत्पन्न होतो, भीतीमुळे उत्पन्न होतो किंवा लोभा-मुळे उत्पन्न होतो. मत्सरी मनुष्य आणि निर्मत्सर मनुष्य असे आपणांस माणसाचें वर्गीकरण कर-तांच येणार नाहीं. प्रत्येक मनुष्य मत्सरी आहे, पण मत्सरामुळे तो फारसें वाईट करूं शकत नाहीं. मत्सराला तर मुळींच भिऊं नका. तुम्हीं आपले कर्तव्य करीत जा म्हणजे मत्सराच्या कक्षेच्या बाहेर केव्हांच जाल. जेव्हां मनुष्य तुमच्या विषयीं भीति वाटून दुष्टपणास प्रवृत्त होईल, तेव्हा तुमचे हित आणि त्याचें हित हीं परस्पर-विरोधी खरोखर आहेत काय हे पहा. म्हणजे तुम्हांस असे दिसून येईल कीं, दुसऱ्याच्या नुक-सानीमुळे तुमचा फायदा नाहीं. व तुमच्या नुक-सानीमुळे दुसऱ्याचा फायदा नाहीं. हे तुम्हांस कळलें म्हणजे तुमचेच वर्तन निराळे होईल आणि तुमची भीति बाळगणारा मनुष्य आपला दुष्टपणा टाकील.

जगांतील अनेक राष्ट्रे मी स्वत: हिंडलों, त्यांचे इतिहास वाचले, अर्वाचीन प्रवृत्तीकडे मी

सूक्ष्मपणानें पाहिलें, तेव्हां माझ्या मनांत नवीन आशेचा प्रादुर्भाव झाला आहे. त्या आशेमुळें माझ्या मनाला जी कार्योत्सुकता व आनंद उत्पन्न झाली तीं तुम्हांस प्राप्त करून द्यावीं, म्हणून मी हिंडत आहें.

बोधिसत्त्वाला बोधिवृक्षाखाली आपल्या विशिष्ट ज्ञानाची व कर्तव्याची जाणीव झाली. मला तशी एखाद्या विशिष्ट काली किंवा स्थली झाली नाही. ती हळू हळू होत गेली आणि आतां मी आनंदमय बनलो आहे.

मी आनंदमय होण्याचे कारण मला हिंदुस्थानचें भवितव्य उज्वल दिसूं लागले आहे. ज्या गोष्टी तुम्हांस आणि मला पूर्वी अशक्य किंवा हानिकारक वाटत होत्या त्यासंबधाने देखील माझी दृष्टि पालटली आहे.

जगद्गुरूचा मी नवा अवतार आहे. असें मला वाटूं लागले आहे. हे मला जे वाटूं लागलें आहे ते मला पूर्व जन्माची आठवण होऊं लागून झालेले नाहीं. माझी पूर्वजन्माविषयीं अजून खात्री पटली नाही किंबहुना माझा विश्वासच नाही पण मी जे बोलत आहे ते अनुभव आणि अवलोकन याच्यामुळे जे ज्ञान प्राप्त झालें आहे त्या ज्ञानामुळे बोलत आहे. ईश्वरी संदेश मला पोचल्याचे मी सांगत नाही. पाणी तुंबल्यामुळे त्यास आपोआप कोठेतरी वाट फुटते व ते पाणी त्या वाटेने वेगाने वाहू लागते त्याप्रमाणे पूर्वीपासून माझ्या मनात संचय पावलेले विचार बाहेर पडत आहेत.

मला जो तुम्हास मुख्य निरोप सांगावयाचा तो हाच की, फलाशा न धरतां कर्म करणें, स्वार्थ अजीबाद विसरणें या गोष्टी जर तुमच्या हातून झाल्या तरच तुमची उन्नति होईल असें सांगून एखादी अशक्य अट तुमच्या मार्गात ठेवणाऱ्या लोकांविषयीं अविश्वास धरा. सर्व जग पूर्वीपेक्षां अधिकाधिक सुधारत आहे व आपल्या या प्रियदेशाचे भवितव्य फार उज्वल आहे. आपल्या-कडून आपली संपत्ति वाढविण्यासाठी, आरोग्य वाढविण्यासाठी, सुख वाढविण्यासाठी प्रयत्न मात्र पाहिजे. या उज्वल भवितव्याचा बिघाड कोणीहि करूं शकणार नाही.

---

## प्रकरण २० वें.

## विश्वमित्राचें गृहसौख्य.

सरकारी नोकर होऊन अधिकार गाजविणें आणि गांवांतील लोकाना आपलें मोठेंपण दाखविणे इत्यादि गोष्टींची विश्वमित्रास मोठी अभिरुचि वाटत नव्हती, आणि समाजाचा आयुष्यक्रमच अधिक सुखकर व्हावा इत्यादि गोष्टींकडे त्याचें लक्ष असे, तथापि मोठ्या मनुष्याची बायको म्हणून मिरवण्याची विहंगमेची इच्छा पुरी झाली नव्हती. अलकनंदेने आपला मोठेपणाचा तोरा तिच्यापुढे दाखविला तर "कलेक्टर म्हणजे चार पठाण जवळ बाळगणारा वसुली कारकून" ही विश्वमित्राची व्याख्या तिने तोंडपाठ केली होती आणि एकदां बहिणीपुढें ती व्याख्या म्हणून दाखविण्याचा तिनें निश्चयहि केला होता, पण तिला मनांतून आपल्या थोरल्या बहिणीविषयी मत्सरच वाटत असे. त्यातल्यात्यांत असे झाले कीं, विश्वमित्र अलीकडे राजकारणांत लक्ष घालू लागला होता आणि त्याला नागपूरची प्रतिसहकारपक्षाची मंडळी आवडत नव्हती म्हणून दुसऱ्या कोणत्यातरी पक्षाला मिळावे असा त्याचा विचार होता. आणि यासाठी तो कट्टर, आणि स्वराज्यपक्षीय मंडळींविषयीं स्नेहबुद्धि दाखवीत असे, आणि राष्ट्रीय शाळाचे मास्तर, गांवांतले खादीवर व्याख्याने देणारे लोक इत्यादि मंडळीशी त्यानें दळणवळण ठेवले होते. सर दामोदरराव त्याच्याकडे विशेष लक्ष देत नसत. त्यांची त्याला सहानुभूति असावी असेंच वाटतें. परंतु

गांवांतली अनेक राजकारणी मंडळी घरीं आली म्हणजे विहंगमेच्या मनांत आपला नवरा गांवांतल्या उनाड गांवगुंडांशी दोस्ती करतो, त्याला सभ्य मंडळी भेटायला येत नाहींत, आपल्या मेहुण्याचे कसे चांगलें आहे, त्याला भेटावयास गांवांतले सिव्हिल सर्जन, एक्झिक्युटिव्ह एंजिनिअर यांसारखी चांगले कपडे घातलेली, चांगल्या उंची सिगारेट्स चांदीच्या डबीतून काढून ओढणारी मंडळी येतात, असे तुलनात्मक विचार तिच्या मनांत येत; आणि आपली बहीण कोणी बायका भेटायला आल्या असतां त्यांनां परत जाण्यासाठीं सूचना देणारी "नॉट अॅट होम"ची पाटी बाहेर लावून कोचावर कादंबरी वाचीत लोळत बसते, आणि आपणास भेटावयास येण्यास एक वार ठरवून त्यादिवशीच बायकांना घरीं येऊं देते, आपल्या मेहुण्याला भेटण्यासाठीं गांवांतली वकीलांसारखी मोठमोठी मंडळी आली तरी ती व्हरांड्यावर कशी ताटकळत ठेवली जातात, शिपाई कोणी नेटीव मनुष्याचे कार्ड हातीं घेऊन आला तर मेहुणा त्या कार्डावरच अमक्या वारीं आफीसांत भेटणे म्हणून लिहून त्या मंडळींनां कसे परत लावतो, आणि आपला पत्त्यांचा डाव कसा पुढे चालू देतो इत्यादि बहिणीच्या ऐश्वर्याच्या गोष्टी तिला आठवत. "तुम्हांला असली कसली मंडळी भेटायला येतात" म्हणून ती नवऱ्याला बोलतहि असे.

विश्वामित्राला आपल्या बायकोची एकंदर वृत्ति आपल्या आयुष्यांत अंगिकारिलेल्या मनोवृत्तीला व मनोवृत्तीमुळे उत्पन्न होणाऱ्या कार्यक्रमाला अनुकूल रहाणार नाहीं अशी भीति वाटूं लागली. आपण उच्च सरकारी नोकरी मिळविण्याचे महत्त्व कमी समजून तिकडे दुर्लक्ष केले, व खासगी आयुष्यक्रमामध्येच आपणांस आपली महत्वाकांक्षा तृप्त करून घेतां येईल हे सर्व आपल्याला दिसत असून आपल्या बायकोला दिसत नाहीं याला काय करावें असे विचार त्याच्या मनांत आल्याशिवाय राहिले नाहींत. आपल्या घरीं प्रत्यक्ष आपल्या बायकोच्या दृष्टीने ज्यांनां आपण कमी समजतो त्या सरकारी आय्. सी. एस्. च्या नोकरापेक्षा आपली किंमत कमी ठरते, तर आपणांस कांही तरी गृहसौख्य मिळावें यासाठी आपण आपल्या बायकोला ज्या गोष्टीचें महत्त्व वाटतें त्या गोष्टी साध्य होतील अशा तऱ्हेने आपल्या आयुष्यक्रमास वळण दिले पाहिजे. नाहीतर गृहसौख्याची आशा सोडून दिली पाहिजे असे वाटल्याखेरीज राहिले नाही. तथापि सरकारी नोकरीत आतां शिरण्याची कल्पना सोडून दिली पाहिजे; का की, त्या दिशेने आयुष्याला वळण द्यावयाचे असते तर आपण इंग्लडमध्येच असता त्यासंबंधाचा विचार करावयास हवा होता. पण आतां त्यासंबधाचा विचार करून उपयोग काय? आपल्याला आपला आयुष्यक्रम बदलणे शक्य नाही; आणि एखाद्या अजाण बायकोस जो आयुष्यक्रम अधिक मोठेपणाचा वाटतो त्याकडे कां जावयाचे, तर बायकोच्या मनांत आपल्याविषयीं आदर रहावा म्हणून. छे! ही दृष्टि तर अगदीच अयोग्य आहे. शिक्षितानें आपल्या आयुष्याचें स्वरूप अशिक्षिताच्या मताने ठरूं द्यावें यासारखी अयोग्य गोष्ट कोणतीच नाही. आपल्या बायकोला आपली दृष्टि उत्पन्न करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे आणि तिने आपल्या प्रयत्नांस चांगली सहकारिता करण्यासाठी आपल्या कार्यक्षेत्राविषयी आवड उत्पन्न केली. पाहिजे नाहीतर बायको अडाणी, तिच्याशी ती स्त्री व आपण पुरुष एवढ्याच कारणामुळे जो व्यवहार उत्पन्न होईल तेवढा ठेवून तिला आपल्या एकंदर व्यवहारांतून, विश्वासांतून आणि आपल्या विचारांतून वगळलें पाहिजे व बायको म्हणजे सहधर्मचारिणी ही कल्पना वगळून केवळ संतानप्राप्तीसाठी उपयोगी

पडणारी वस्तु एवढीच तिच्याविषयीं कल्पना ठेवली पाहिजे असें वाटूं लागलें.

आपली बायको देखणी आहे, पण तिच्यामध्यें संभाषणचातुर्य देखील बेताचेंच आहे, आणि उच्च विचारांत संचार करण्यास ती आपणांस सहचरी होऊं शकत नाहीं. आपण तिचें सौंदर्य पाहून पसंत केलें त्याचें कारण शिक्षण ही वाटेल तेव्हां मिळवितां घेण्याजोगी गोष्ट आहे पण सौंदर्य मिळवितांयेण्याजोगी गोष्ट नाहीं हा आपल्या वडिलांचा विचार आपणांस अगदीं पसंत पडला हे होय. आपण याविषयावर लग्नापूर्वी अधिक विचार केला नाहीं ही आपली मोठी चूक झाली. शिक्षण आपण देऊं असें म्हणतो पण विवाहोत्तर ते कितपत दिलें जातें, हेंहि आपण भोंवतालची स्थिति पाहून अजमावयास पाहिजे होतें. नंदिकेसारखी हुषार बायको आपणांस मिळाली असती तर आपले दिवस किती तरी आनंदांत गेले असते. स्त्रियांना जगांत कर्तृत्व करतां येणार नाहीं, त्यांचें क्षेत्र गृह आहे हे जरी सत्य आहे तरी उच्च मनोवृत्तीच्या, विचारांच्या आणि शिक्षणाच्या पुरुषाशीं त्यांना सौहृद वाटेल इतपत तरी शिक्षण स्त्रियांस पाहिजे. जर विहंगमेसच पत्नीपदास योग्य बनवावयाचें तर तिच्या मनांत आपण अनेक गोष्टी उतरविल्या पाहिजेत. आजची सामाजिक स्थिति आहे ती बदलून अधिक उच्च स्थिति यावी म्हणून आपणांस प्रयत्न करावयाचा आहे ही सामाजिक स्थिति पालटण्यासाठीं जो परिश्रम करूं इच्छितो, त्याला गृहसौख्य शक्य होण्यासाठीं त्याच्या बायकोच्या मनांत निदान नवरा ज्या तऱ्हेनें आयुष्य नेऊं इच्छितो त्या तऱ्हेच्या आयुष्यक्रमाविषयीं सहानुभूति तरी पाहिजे. विश्वमित्रास विहंगमेच्या मनांत जे काय उतरवावयाचें होतें ते सोपें नव्हतें. तो असें समजे कीं सरकार म्हणजे कारभार करणारी यंत्रपद्धति होय आणि सरकारी नोकर म्हणजे त्या यंत्रपद्धतींत ठराविक काम करणारीं माणसें होत. विचार करणारे लोक आहेत त्यांनीं सरकार हें यंत्र ताब्यांत घेऊन त्या यंत्राकडून वाटेल तें काम करवून घ्यावयाचें आहे. देशास काय पाहिजे याविषयीं विचार करणारा, देशहिताचा कार्यक्रम ठरविणारा आणि तो कार्यक्रम सरकारयंत्रामार्फत करून घेणारा मनुष्य फारच उच्च दर्जाचा होय. आपल्या मनांत जी महत्त्वाकांक्षा आहे ती लोकहितासाठीं काय पाहिजे ते शोधून काढणें आणि तें या सरकारयंत्रामार्फत घडवून आणणें इत्यादि क्रिया करण्याची होय यासाठीं आपणांस लोकांत जागृति केली पाहिजे, अनुयायी मिळविले पाहिजेत, आणि ते अनुयायी मिळाल्यानंतर कौन्सिलांत गेलें पाहिजे व आपल्या कल्पना पुढें मांडीत गेलें पाहिजे. पण या सर्व कल्पना अमलांत येण्यास वेळ लागणार. तोंपर्यंत आज केवळ तात्कालिक महत्त्वासाठीं भुकेली असलेली विहंगमा आपणाशीं सहकारिता कितपत करील? आणि आज आपण आपल्या बायकोस देखील अनुयायी करूं शकत नाहीं, तर इतरांस कसे करूं? असे कार्याविषयीं निरुत्साह उत्पन्न करणारे विचारहि त्याच्या मनांत येत. विहंगमेला या सर्व गोष्टी त्यानें सांगितल्या पण तिला त्या पटत होत्या असें नाहीं. आपल्या नवऱ्याला दिवाणगिरी मिळालीच तर ती म्हातारपणीं मिळणार त्यावेळेस आपल्या बहिणीचा नवरा पेनशन घेऊन बसला असेल; किंवा आपल्या नवऱ्यापेक्षांहि मोठ्या पदवीवर जाऊन बसला असेल. तर लोकांमार्फत उच्चतेला येण्याचा उपयोग काय? ही तिची दृष्टि असे.

जेव्हां नवरा लोकहितासाठीं लोकांमध्यें मिसळून त्यांच्याच जोरावर काम करण्याच्या गोष्टी बोले, तेव्हां एक तऱ्हेची संशयी किंवा प्रश्नचिन्हात्मक वृत्ति तिच्या तोंडावर दिसूं लागे. आणि

त्यामुळें पुढें पुढें विश्वमित्र आपण काय करणार याच्या संबंधानें तिच्याशीं बोलेनासाच झाला. त्याच्या मनांतील घरीं जाण्याचा आनंद नाहींसा होऊं लागला. आपल्यासंबंधानें अविश्वास आपली बायकोच बाळगीत आहे याची जाणीव त्यास फार दु:खकारक होई. तो गृहसौख्याविषयी अधिकाधिक उदासीन झाला. आणि तुकारामाची त्याच्या बायकोजवळ जशी किमत नव्हती त्याप्रमाणे आपली आपल्या बायकोपाशीं नाहीं असें तो तुकारामाच्या आयुष्याशीं आपले सादृश्य करूं लागला. तो पुढे पुढे आपल्या राजकीय बाबतींत विचारविनिमय करणाऱ्यांस घरी न बोलवितां ऑफीसमध्येच बोलावूं लागला; किंबहुना रात्रीं साडेआठ वाजेपर्यंत घरींच येईनासा झाला. व घरीं आल्यानंतर देखील तो आपलें वाचन करण्यांत गढलेला असे. नवरा घराबाहेरे रहातो हे पाहून विहंगमेस बरें वाटेना. नवऱ्याच्या या वृत्तीस खरोखर कारण आपण आहोत याची तिला कल्पनाहि नव्हती. तिला एक मात्र दिसे कीं, नवरा आपल्यापेक्षां डॉ. नंदिकेपाशी अधिक उत्साहानें बोलतो व तिला आपला नवरा डॉ. नंदिकेच्या कडेसच जाऊन बसला असतो काय अशी शंका येऊं लागली. डॉ. नंदिकाबाई यांच्याकडे जाणे येणे ठेवावे असे तिला वाटूं लागलें. तिने कपाळ दुखणें, पोट दुखणे इत्यादि विकाराबद्दल सल्ला घेण्यासाठीं किंवा औषध घेण्यासाठीं डॉ. नंदिकेच्याकडे जाण्यास सुरवात केली. नंदिकेनें औषध द्यावें व विहंगमेनें ते औषध घरीं आणून ओतून टाकावे असा क्रम देखील कांहीं दिवस चालू होता. विहंगमेला डॉ. नंदिकेविषयी मत्सरबुद्धि उत्पन्न झाली होती. आपण ब्रह्मगिरीचे व्याख्यान ऐकावयास गेलों तेव्हां नवरा एकसारखा नंदिकेशीं बोलत होता आणि नंदिकेला घरी आपल्या मोटारींतून पोंचविण्याची त्यानें तसदी घेतली. या गोष्टी विहंगमेच्या मनावर कायमच्या संस्कार करित्या झाल्या. आणि आपल्यावर नजर ठेवण्यासाठीं आणि आपले विश्वमित्राबरोबर संघटन वाढलें असल्यास तें पकडण्यासाठीं विहंगमा आपल्याकडे येत आहे ही गोष्ट नंदिकेच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं. पण याबद्दल नंदिकेस वाईटहि वाटलें नाहीं. आपल्याविषयीं असा संशय दुसऱ्या स्त्रीने घ्यावा ही गोष्ट तिला उलट मनोरंजकच वाटली. आणि विहंगमेसारख्या तरुण व सुंदर स्त्रीला आपल्याविषयीं असा मत्सर उत्पन्न व्हावा ही गोष्ट स्वत:चे मोठे अभिनंदन करण्याजोगीच तिला वाटली. दुसऱ्या स्त्रियांचे नवरे आपल्याकडे आपल्या संभाषणचातुर्यामुळे आकर्षिले जातात याची जाणीव नंदिकेस अनेक प्रसगीं झाली होती. तथापि आपल्याकडे विश्वमित्र एकसारखा आकर्षिला जाऊन त्याच्या गृहसौख्याचें मातेरें व्हावे अशीहि तिची इच्छा नव्हती, तर त्या दोघांच्या संसारास जर आपल्या प्रयत्नानें सुरळीतपणा आणता येईल तर आणावा असें तिला वाटत होतें.

एके दिवशीं नंदिका एक इंग्रजी पुस्तक वाचीत होती, त्यावेळेस विहंगमा तेथे गेली. त्या पुस्तकाचें नांव "विवाहित स्थिति सुखकर कशी करतां येईल" या अर्थाचें होते. त्या पुस्तकाचे नाव पाहून त्या पुस्तकामध्यें काय आहे हे जाणण्याची विहंगमेने इच्छा दर्शविली. तेव्हां नंदिकेने विचारले की "तुम्हींच कां वाचून टाकीत नाहीं. चांगले वाचण्यासारखे पुस्तक आहे."

"मला वाचून समजेल कीं नाहीं हाच मला संशय आहे. माझे चारपांच यत्तांच्या पलीकडे शिक्षणच झालें नाहीं" म्हणून विहगमेनें उत्तर दिले.

"या पुस्तकांत लेखकाने १०० लग्नमोडीचे खटले घेऊन त्यांचा सूक्ष्म अभ्यास केला आहे, त्याप्रमाणेच स्त्रिया आपल्या स्थितीविषयीं असंतुष्ट कां होतात, त्यांनां नवऱ्यांचा राग कां येतो, आणि लग्न मोडून टाकावें असें केव्हां वाटतें, या

प्रश्नावर या खटल्यांत दिसून येणाऱ्या गोष्टी काढल्या आहेत, व त्यांशिवाय दुसरे अनेक पुरावे गोळा करून दिले आहेत. तसेंच विवाहित स्थिती-विषयीं असंतुष्ट असतां बायका आहे तोच संबंध चालू कां ठेवतात याविषयीं विचार केला आहे. अर्थात हा सर्व विचार त्यांच्या देशांतली स्थितीच पाहून केला आहे.''

''स्त्रिया आपल्या स्थितीविषयीं असंतुष्ट कां होतात याचीं कारणें, त्यांनीं काय सांगितलीं आहेत ?''

''कारणे पुष्कळच सांगितलीं आहेत. पण स्त्रियांस, झालेल्या लग्नाविषयीं असंतुष्ट होऊन ते मोडण्यापर्यंत पाळी येण्यास एकच कारण पुरे असतें असे नाहीं, अनेक कारणे झालीं म्हणजेच काडी मोडण्यापर्यंत पाळी येते असें दिसतें.''

'' स्त्रिया, नवरा आवडत नसता तरी देखील त्याला चिकटून रहातात याचे कारण त्यानें काय दिलें आहे. '' विहंगमेनें उत्सुकतेनें विचारलें.

''याचें कारण असें दिलें आहे कीं, स्त्रियांनां स्वत: पैसे मिळविण्यास समर्थ करणारें शिक्षण ज्या मानानें कमी त्या मानानें त्या स्त्रियांनां नवरा नको असला तरी त्याला चिटकून रहावे लागतें.''

''माझ्या मनांत वारवार असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, स्त्रियांनां पैसे मिळविण्याची शक्ति असणे चांगलें कीं, नसणे चांगलें!''

''मला असे वाटतें कीं, ती शक्ति स्त्रियांस अवश्य असावी.''

''ती शक्ति स्त्रियांस असल्यास किंवा त्यांच्या-मध्यें उत्पन्न झाल्यास ती गोष्ट नवरा आणि बायको या दोघांसहि हितावह नाहीं असें मला वाटतें.'' विहंगमा म्हणाली.

''कां बरें?'' नंदिकेनें विचारले.

''कारण एवढेंच कीं स्त्रियांनां आपल्याला स्वत: पैसे मिळवितां येत नाहींत ही जाणीव असली तर त्या स्त्रिया नवरा आवडत नसला तरी त्याला धरून राहतील असें जें तो लेखक म्हणतो तीच गोष्ट खरी. पण त्या जाणीवीमुळें तरी लग्न मोड-ण्याचें रहाणें हें दोघांच्या फायद्याचेंच आहे.''

''आणि स्त्रियांनां पैसे मिळवितां येत असले तर काय लग्न मोडेल ?''

''स्त्रियांनां पैसे मिळवितां येत असून नवराहि आवडत असला तर ठीक आहे. पण स्त्रियांनां पैसे मिळवतां येत असून नवरा आवडत नसला म्हणजे कुटुंबाची वाताहात झाली !''

हें संभाषण चालू असतां हें आपल्या आयु-ष्यावरच टीका करणारें होऊं लागतें काय अशी डाक्टरीण बाईस धास्ती पडूं लागली. आपल्या हृदयांत कल्लोळ करणारे विचार हे संभाषण खेचून काढतें कीं काय असे तिला वाटूं लागलें, पण ती लगेच मन दृढ करून म्हणाली.

''जोंपर्यंत स्त्रियांनां पैसे मिळविण्याचें सामर्थ्य नसतें, किंबहुना पैसे मिळविण्यासाठीं पुरुषांनां काय कष्ट पडतात याची जाणीव नसते तोंपर्यंत नवऱ्याचे कर्तव्य आपल्या गरजा पुरविणें आहे असेंच स्त्रीस वाटत असते. मला असे वाटते कीं ज्या स्त्रियांस स्वत: पैसे मिळविण्यासाठीं श्रम करावे लागले आहेत त्या स्त्रियांनां पुरुषांच्या मेहेनतीची जाणीव चांगली राहील आणि त्यामुळें त्या स्त्रियांची वागणूक पुरुषांस सहानुभूतीची आणि आकर्षक अशीच होईल. ज्या स्त्रियांनां पुरुषांच्या मेहनतीची खरी जाणीव होते, त्यांचेच पुरुषांवर खरें प्रेम असणे शक्य आहे.''

''स्त्रिया काम करणाऱ्या बनल्याशिवाय त्यांचें पुरुषांवर चांगल्या तऱ्हेनें प्रेम जडणार नाहीं हे तुम्हीं म्हणतां; पण स्त्रिया काम करणाऱ्या बनल्या म्हणजे त्यांची ओळख अनेक पुरुषांशीं होईल आणि तशी झाली म्हणजे त्या स्त्रिया आपल्या नवऱ्याची आणि इतर पुरुषांची तुलना करून

लागतील. आणि कांहीं स्त्रियांनां आपला नवरा इतर पुरुषांपेक्षां कमी योग्यतेचा आहे असें वाटूं लागेल त्याची वाट काय?"

"त्याच्या योगाने फारसे नुकसान होईल असें वाटत नाही; आज जरी स्त्रिया व्यवहारात पडल्या नाहींत तरी त्यांनां आपल्या नवऱ्यापेक्षां दुसरे पुरुष अधिक हुषार आहेत असें दिसून येणे अशक्य आहे काय? आणि असे दिसले म्हणजे तेवढ्यामुळें स्त्रिया आपल्या नवऱ्याविषयी असंतुष्ट होतात काय?"

हा प्रश्न विहंगमेस जरासा तपासणीच्या स्वरूपाचा वाटला, आणि ती म्हणाली.

"इतर पुरुष आपल्या नवऱ्यापेक्षां अधिक हुषार आहेत एवढ्यावरून आपल्या पुरुषांविषयीं जरी प्रेम अजीबाद उडून जाणार नाही तरी आपल्या नवऱ्यापेक्षा श्रेष्ठ दिसणाऱ्या पुरुषांशी ज्या स्त्रियांचे लग्न झाले आहे अशा स्त्रियांविषयीं मत्सर वाटल्याशिवाय राहणार नाहीं."

डॉ. नंदिका एकदम हंसून म्हणाली. "विहंगमाबाई, तुम्ही फार मोकळया मनाच्या आहांत. जें मनांत आले तें तुम्हीं मोकळेपणाने बोलता; पुष्कळ स्त्रिया तसे बोलणार नाहीत. स्त्रियांनीं आपल्या मनांत विचार कसे उत्पन्न होऊं द्यावेत याविषयी जी इतर लोकानी मते उत्पन्न करून ठेवलीं आहेत त्यांचे दडपण सामान्य स्त्रियाच्या मनावर इतकें पडले आहे की, त्या मनांतले खरे विचार बोलावयासच भितील.व लोकांत जे विचार स्त्रियांनां योग्य आहेत म्हणून ठरले आहे तसलेच विचार आमच्या मनांत येतात, दुसरे कसले येत नाहींत असे दाखविण्याची स्त्रियांची जी प्रवृत्ति झाली आहे ती स्त्रियाच्या मनावर जे बाहेरचे दडपण पडतें त्यामुळे झाली आहे. हे दडपण स्त्रियांनां प्रामाणिकपणानें बोलण्यास रोधक आहे आणि त्यामुळें बायकांमध्ये खोटे बोलण्याची प्रवृत्ति झाली आहे. "माझ्या मनांत अन्य पुरुष आलाच नाहीं. जन्मोजन्मीं हाच नवरा मिळावा म्हणून मी ईश्वराची प्रार्थना करतें" असें स्त्रियांनीं बोलावें हीच आज सभ्यपणाची रीति बनली आहे. या तऱ्हेचे बोलणे जेव्हां स्त्रिया बोलतात, तेव्हां या पतिव्रता असतात असें मला वाटत नाहीं. तर जिच्या मनावर परिस्थितीचें फार दडपण पडलें आहे अशी ही स्त्री आहे असें मला वाटते. तुमच्या मनावर असे दडपण पडले नाही याबद्दल मी तुमचे अभिनंदन करते; आणि हे दडपण नसण्यास कारण जी तुमची गृहस्थिति असेल ती फार चांगली आहे असे मला वाटते. पण त्याबरोबर मी तुम्हांस हेहि सांगतें की तुम्हांस जर दुसऱ्या एखाद्या स्त्रीचा मत्सर वाटत असेल तर तो तुम्ही टाकून द्या. मी डॉक्टरणीचा धदा करीत असल्यामुळे मला अनेक स्त्रियांचीं चरित्रे ठाऊक झाली आहेत, आणि स्त्रियांच्या प्रकृतीसबधाने चौकशी करतांना अनेक कौटुंबिक गुह्य माझ्या नजरेस आलीं आहेत. त्यावरून मला असे वाटू लागले आहे की कोणत्याहि स्त्रीने दुसऱ्या स्त्रीचा मत्सर करण्यांत अर्थ नाही.जी स्त्री आपणांस फार सुखी म्हणून दिसत आहे त्या स्त्रीच्या मनात काय दुःखे भरलीं आहेत याची जाणीव इतरास असणे अशक्य आहे. मी उलट स्त्रियांनां असे सांगेन की, तुम्हाला जो नवरा प्राप्त झाला आहे तो उत्तम नसेल, पण जो पुरुष तुम्हाला तुमच्या नवऱ्यापेक्षां जास्त चांगला वाटतो तो देखील स्पृहणीय खास नाहीं. गरीब व्यक्ति आणि श्रीमंत व्यक्ति या दोहोंमध्यें मला पुष्कळदां श्रीमंताची बायको जास्त अभागिनी आहे असे दिसून येतें. पुष्कळदां श्रीमंत कुटुंबांतील तरुणांनां तरुणपणांतच वाईट रोग जडतात, ते रोग पुढे त्याच्या बायकांस जडतात, व त्यांचीं मुले भाजून निघाल्यासारखीं असतात. आणि तीं जगतहि नाहींत इत्यादि गोष्टी या नागपुरांतच मला किती तरी दिसत आहेत."

"स्त्रियांना महत्त्वाकांक्षा असून ती पुरुषांना नाहीं असें झाल्यामुळें दोघांच्या प्रेमाला व्यत्यय आल्याचीं उदाहरणे नाहींत काय?"

"यामुळे प्रेमाला तात्पुरता व्यत्यय येत असेल कदाचित्; पण तेवढ्यामुळें लग्न मोडेल असें मुळींच नाही."

"लग्न मोडणार नाहीं हे खरें आहे; पण त्यामुळे कुटुंबसौख्य नाहींसे होत नाहीं काय? पुरुषांच्या मध्ये महत्त्वाकांक्षेचा अभाव असला म्हणजे स्त्रीचीहि कुचंबणा होत नाही काय?"

"स्त्रियांची महत्त्वाकांक्षा पुरी करावयाला पुरुष जेव्हां असमर्थ असतो तेव्हा स्त्रियाची महत्त्वाकांक्षा योग्य आहे किंवा अयोग्य आहे असाच विचार पडतो. द्रव्यार्जनासाठीं स्वतः काम न करणाऱ्या स्त्रियांची महत्त्वाकांक्षा बहुधा स्वतःच्या लायकीवर नसून शेजारणीच्या मत्सरामुळें उत्पन्न झालेली असते."

"स्त्रियांनीं आपल्या शेजारच्या स्त्रियांचा मत्सर करूं नये असे आपण म्हणतां, पण ते शक्य कसे आहे. ज्याप्रमाणे पुरुषांत मोठेपणाबद्दल चुरस लागते तशी बायकांत नसते काय, आणि बायकांत जर मोठेपणाची इच्छा उत्पन्न झाली तर बायकांनीं ती दाबून टाकावी काय?"

"दाबून टाकावी असें कोणी म्हटले, पण मोठेपणा मिळवूं इच्छिणारी स्त्री आपल्या पराक्रमावर मोठी होणार कीं, नवऱ्याच्या पराक्रमावर मोठीं होऊं इच्छिणार? आपल्या विद्येवर किंवा पराक्रमावर मोठेपणा मिळविणे ही स्त्रीच्या हातची गोष्ट आहे. नवऱ्याच्या मोठेपणावर मोठें होणें हे तिच्या हातचें नाहीं."

"पण पुरुषांनीं बायकांची महत्त्वाकांक्षा पुरी करावी याबद्दल प्रयत्न नको काय? नवऱ्याला मोठेपणासाठीं प्रयत्न करण्यास भाग पाडणे हें स्त्रीच्या हातचे किंवा अधिकारांतलें नाहीं काय?"

"मुळींच नाहीं."

"मग गरीबींत असलेल्या पुरुषांच्या स्त्रियांनीं काय करावयाचें? अगदीं स्वस्थ बसावयाचें, असें त्यांना तुम्हीं काय सांगाल?"

"मी एवढेंच सांगेन कीं, तुझा नवरा जरी गरीब आहे तरी त्यांत त्याचा दोष नाहीं. मंडळी गरीब असतात याचे कारण पुष्कळदां त्यांस श्रीमंत व्हावयाची संधीच मिळाली नसते हें होय, शिवाय आयुष्यांत श्रीमंती हीच केवळ महत्त्वाची गोष्ट नाही. तुमचा नवरा सद्गुणी आहे किंवा नाहीं एवढेच तो तुमच्यावर प्रेम करीत आहे किंवा नाहीं, तुम्हीं पहा. पैसे न मिळवणाऱ्या स्त्रीनें आपले मुख्य कौशल्य घरांत येणाऱ्या पैशाचा सदुपयोग करण्यांत दाखविलें पाहिजे. नवरा द्रव्यार्जनासाठीं किंवा महत्त्व पावण्यासाठीं ज्या खटपटी करतो त्या जर बायकांना अपूर्ण वाटत असतील तर त्यांनीं नवऱ्याला महत्त्वास पोचण्यासाठीं उत्साह उत्पन्न व्हावा म्हणून प्रयत्न करण्यास हरकत नाहीं. पण इतर स्त्रियांचे नवरे जास्त पगार मिळवतात, किंवा जास्त महत्त्वाला चढले आहेत त्यांच्याकडे बोट दाखवून नवऱ्याला असमाधान उत्पन्न करणे हेहि चांगले नाहीं. जी स्त्री महत्त्वाकांक्षी असेल तिने असा विचार केला पाहिजे कीं, आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्यास नवऱ्यास प्रेरणा करावयाच्या ऐवजीं आपणच ती महत्त्वाकांक्षा पुरीकरून घेण्यास समर्थ आहों काय?"

"बायका व्यवहारांत कोठें पडल्या आहेत? बायकांनीं जर मोठेपणा मिळविण्यासाठीं काबाडकष्ट करणें किंवा नोकरी करणें जरूर असेल तर नवरा तरी कशाला करायचा? आपणाला जें पाहिजे असेल तें नवऱ्यामार्फत मिळविणें हेंच बायकांचे काम आहे!"

"नवऱ्यानें अमुक पदवपर्यंत चढलें पाहिजे अशी नवऱ्याला टोंचणी लावायला बायकोला अधिकारच काय?" डॉ. नंदिका म्हणाली.

"कां बरें, नवऱ्याला मोठेपणाला चढण्याला प्रेरणा करणें हें बायकांचें काम आहे एवढेच नव्हे तर हा बायकांचा हक्क आहे असे मी समजते." असें पुन्हां पूर्वपदावर येऊन विहंगमा म्हणाली.

"प्रेरणा करण्यास हरकत नाही. नवऱ्याची महत्त्वाकांक्षा जागृत करणे हेहि वाईट नाहीं, पण ही प्रेरणा करताना नवऱ्याला एकसारखी टोंचणी लावणे हे कधीच चांगले नाही. घराबाहेरचा व्यवहार आणि गृहकृत्य या ससाराच्या दोन शाखा आहेत. नवरा जो घराबाहेरचा व्यवहार करील तो जर बायकोस पसंत नसला तर तिने भागीदाराच्या अटी बदलून घराबाहेरचा व्यवहार हातीं घ्यावा; पण स्वत: बाहेरचा व्यवहार करण्याची लायकी नाही आणि नवऱ्यानें जे मिळविलें त्यापेक्षां अधिक मिळविले पाहिजे असा आग्रह धरून बसणे हा नवऱ्यावर निव्वळ जुलूम आहे."

"तुम्हीं म्हणतां तें मला मुळींच पटत नाही. शौर्याची कामे करण्यास नवऱ्यास प्रवृत्त करणें हें आर्यस्त्रीचे लक्षण आहे, असे आजपर्यंत आपण ऐकत आलों नाही काय ?"

"नवऱ्यास कर्तव्यास प्रवृत्त करणारी बायको निराळी, आणि बायकोला मोठेपणाचा तोरा मिरवायाला पाहिजे म्हणून नवऱ्याला एकसारखी टोंचणी लावणारी बायको निराळी. दुसऱ्या प्रकारच्या बायकोंची कर्तव्यास प्रवृत्त करणाऱ्या आर्य स्त्रियांशी तुलनाच होत नाहीं. ही बायको केवळ आपलपोटी आहे असे मी समजेन. बायकोला मोठेपणा पाहिजे असेल तर तो तिने आपल्या लायकीवर मिळवावा. नवऱ्याला कर्तृत्ववान अधिक बनवून मोठालीं कामें करण्यास त्यास प्रोत्साहन देणें किंबहुना दुर्बळ नवऱ्याला ब[illegible]न करणे ही गोष्ट देखील सोपी नाहीं. ज्या स्त्रिया स्वत: कर्तृत्ववान नाहींत त्या स्त्रिया नवऱ्यामध्यें कर्तृत्व उत्पन्न करावयास लायक आहेत काय? माझ्या मतें मुळींच नाहींत. स्वत:ला कर्तृत्व नसून महत्त्वाकांक्षा मात्र ज्यांस असते त्या स्त्रिया सहानुभूतीला मुळींच पात्र नाहींत. पुष्कळदां अशा महत्त्वाकांक्षी बायकांच्या तावडींत पुरुष सांपडला म्हणजे ती बायकोच त्याच्या गृहसौख्याच्या नाशास कारण होते. मी जर पुरुष असते आणि फार महत्त्वाकांक्षा असलेल्या बायकोशीं माझी गांठ पडली असती तर त्या बायकोला मी केव्हांच सोडचिठ्ठी दिली असती, किंवा घरांतूनच पळून गेले असते."

हें जेव्हां डॉ. नंदिका बोलत होती तेव्हां आपल्या हृदयांतच ही बया खंजीर खुपसते आहे काय असे विहंगमेस वाटले. थोडा वेळ विहंगमा स्वस्थ आणि सचिंत बसल्यासारखी दिसत होती. पण थोडक्या वेळानेंच डोकें वर करून विहंगमा म्हणाली "तुम्ही हें सर्व बोलला हें आमची घरची स्थिति कळून बोललां काय?"

"नाही, मी महत्त्वाकांक्षी स्त्रियांचीं जेव्हां चरित्रें वाचते तेव्हां हे विचार मनांत येतात. स्त्रिया आपली महत्त्वाकांक्षा पुरी करून घेण्यासाठीं नवऱ्यास आपल्या हातचे खेळणे बनवितात हें मी पुष्कळदां पाहिलें आहे, आणि यामुळें स्त्रियांचेंहि कल्याण होत नाहीं आणि पुरुष असल्या स्त्रियांनां कंटाळून जातील असा माझा समज आहे."

"तुम्ही बोललां ते जणुं काय मलाच उद्देशून बोललां असें मला वाटले. मि. विश्वामित्र अलीकडे माझ्यापाशीं बोलायला देखील कंटाळा करतात."

" विहंगमाबाई, तुमच्या घरची स्थिति मला माहीत नाही, पण तुमच्यासारखी सुंदर बायको लाभली असतांहि विश्वामित्र सुखी नाहींत असें मला अनेकदां वाटलें आहे. "

"ते घरांत अलीकडे फार वेळ नसतातच."

"याच्याबद्दल बराचसा दोष तुमच्याकडेसच असेल अशी माझी कल्पना आहे.तुमच्या सहवासांत

त्यांस कांहीं तरी कारणामुळें सौख्य वाटत नसावें; तुम्ही त्यांच्यापुढें कोणती महत्त्वाकांक्षा ठेवीत असतां."

"त्यांनीं आय्. सी. एस्. मध्यें शिरण्यासाठीं खटपट करावी असें माझें मत आहे."

"पण आतां तर तें नाहीं."

"नसल्यास त्यांनीं मामंजीमार्फत खटपट करून दुसरी कोणती तरी अधिकाराची जागा मिळवावी."

"विहंगमाबाई, तुम्ही या आग्रहामुळे विश्वमित्रांस अत्यत असुखी करीत असाव्यात असें वाटतें. तुमच्या सौंदर्यामुळें पुरुष तुमच्याकडे सहज आकर्षिले जातात हें मला ठाऊक आहे. तुम्हीं नाटकाला गेला असतां अनेक पुरुषांचे डोळे तुमच्याकडे लागले असतात, एवढेच नव्हे तर तुम्ही कधीं कोणाशी बोलला तर त्या पुरुषाला आपला मोठा सन्मान झाला असे वाटते आणि हें तुमच्या श्वशुरांच्या मोठेपणामुळें नसून तुमच्या सौंदर्यामुळें घडून येतें अशी माझी समजूत झाली आहे. तुमच्यासारखी बायको विश्वमित्रांस मिळाली असतां व त्यांच्यासारखा नवरा तुम्हाला लाभला असतां विश्वमित्र आणि तुम्हीं एकमेकांत अगदीं गढलीं असाल असे दिसावें पण प्रत्यक्ष तर तसे दिसत नाहीं. तुमचे आकर्षकत्व कमी होण्याचें कांहीं कारण असलें पाहिजे असे मला वाटल्याखेरीज राहिले नाहीं."

"आतां तुम्हीं इतक्या मोकळेपणाने बोलावयास लागला तेव्हां मी तुम्हांस विचारतेंच कीं विश्वमित्रांना आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न तुम्हीं केला नाही काय? विश्वमित्र महत्त्वाकांक्षी नाहींत म्हणून माझ्या मनांत असंतुष्टता उत्पन्न झाली हें मी कबूल करतें, पण मला असेंहि वाटते कीं, तुम्ही आमच्या यजमानांनां आकर्षित करण्याचा प्रयत्न करीत आहांत आणि तुमच्या या प्रयत्नामुळें माझ्या मनाला जे दु:ख होते त्यापुढे त्यांच्या अंगीं असलेल्या महत्त्वाकांक्षेच्या अभावाचं दु:ख कांहींच नाहीं."

"विहंगमाबाई, तुम्हाला जर असे वाटत असेल कीं, तुमच्या नवऱ्याला आकर्षिण्याचा मी प्रयत्न करीत असेन तर ती कल्पना चुकीची आहे."

"मला तुमचा राग फार येत असे. तुम्ही आमच्याकडे चहाला आला होतां तेव्हांपासून तुमच्या संभाषणचातुर्याची तारीफ मजपुढे करणें चाललें होते."

"आणि ते बंद केव्हां पासून झाले?" डॉ. नंदिकाबाईनीं जरा खोडकरपणाच्या मुद्रेने विचारलें.

"अलीकडे त्यांचे व माझे संभाषणच कमी होऊ लागल्यापासून."

"आणि तुमच्या सौंदर्याची आणि मोकळ्या मनाची तारीफ करणें लालनाथांनीं चालविलें होते. लालनाथांचे मन आकर्षित करण्याचा प्रयत्न तुम्ही कधीं केला होता काय?"

"मुळींच नाहीं."

"त्याचप्रमाणें मी विश्वमित्रांवर छाप टाकण्याचा प्रयत्न कधींच केला नाहीं."

"पण त्यांची घरांत उदासीन वृत्ति कां दिसते, आणि घरीं ते उशीरानें कां येऊ लागले? मला असें वाटते कीं, घरापेक्षा घराबाहेर रहाणे हें त्यांस आकर्षक वाटत असलें पाहिजे. तुम्ही त्यांनां आवडाव्यांत याच्याबद्दल तुम्ही कांहीच प्रयत्न केला नाहीं असे तुम्हीं शपथेवर म्हणावयास तयार आहांत काय?"

"अर्थात तयार नाहीं. माझ्याशी ओळख अधिक वाढावी ही इच्छा विश्वमित्रांमध्यें तर काय पण अनेक पुरुषांच्या मनामध्ये जागृत करण्याचा मी प्रयत्न करीत असते. अनेक मंडळींनी माझ्याकडे यावें हें मला पाहिजे आहे; आणि जर गांवांतली बरीच सुशिक्षित आणि चतुर मंडळी माझ्याकडे जमत जातील आणि माझे

घर जर गांवांतल्या शिष्ट व सुशिक्षित तरुण मंडळींचें केंद्र होईल तर तेहि मला पाहिजे आहे. माझ्या भोंवतालीं जर अशा मंडळीचा घोळका जमला तर मला त्यांत आनंद होतो."

"नंदिकाबाई, मी तुम्हांस काय म्हणूं. स्त्रियांनीं आपलें सौंदर्य आणि आपला आकर्षकपणा आपल्या नवऱ्याचें चित्त वेधण्याकडे लावावयाचा कीं इतर मंडळी आपल्या भोंवताली जमावींत म्हणून लावावयाचा?"

"स्त्रियांनीं आपल्या आकर्षकतेचा उपयोग फक्त नवऱ्याचें मनोरंजन करण्यापुरताच ठेवणे हे मला मुळींच शक्य दिसत नाही. निदान आमच्यासारख्या धंद्यांतल्या स्त्रियांनां तरी ते शक्यच नाही."

स्वतःच्या संबधाने इतका उघडपणे कबुली-जबाब डॉ. नंदिका देत आहे, हे पाहून विहंगमेस मोठें आश्चर्य वाटले आणि ती म्हणाली.

"कां बरें?"

"कारण एवढेंच की ज्याप्रमाणे पुरुषांस व्यवहारांत आपला जम बसविण्यासाठीं चार लोकांशी संघटन वाढवावें लागते, आणि लोकांनीं आपल्याकडे यावें यासाठी प्रत्येकाशी स्नेहभावाने वागावें लागतें; ह्याचप्रमाणे आम्हांसहि करावे लागतें. आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येक मनुष्याचा स्मितपूर्वक सत्कार करावा लागतो, आणि आमची प्रॅक्टिस जरी विशेषेंकरून स्त्रियामध्ये असते तरी आपल्या इच्छेने आमच्याकडे येणाऱ्या स्त्रिया थोडया. स्त्रियांस घेऊन पुरुषच आमच्याकडे येणार, आणि यासाठीं पुरुषवर्गासच आम्हांस खूष ठेवावे लागतें."

"धंद्यांत पडलेल्या सर्वच बायकांचे पुरुषांस आकर्षण करण्यासाठीं कांहीं तरी प्रयत्न चालू असतात काय?"

"दुसऱ्या डॉक्टरणी काय करतात हें मला पुरें माहीत नाही."

"डॉक्टरणीचा धंदा पुरुषांनां खूष ठेवण्याच्या हुशारीवर चालवावयाचा कीं, कामांतल्या वाकबगारीवर चालवावयाचा?"

"कोणताहि धंदा केवळ कामांतल्या हुशारीवर चालत नाहीं. लोकांशीं जो गोड गोड बोलणारा डॉक्टर असतो त्याचा धंदा चालतो. वकीलीचा धंदा ज्यांचा चांगला चालतो, त्यांनां कायद्याचे ज्ञान उत्तमच असते, अशांतला भाग नाहीं. डॉक्टर आणि वकील यांच्यामध्ये गिऱ्हाइकांवर छाप पाडण्याची हतोटी ज्यांनां साधलेली असते, त्यांचाच धदा चांगला चालतो. हे धंदा चालविण्याचे नियम सर्व धद्यांस लागू पडतात."

"मग तुमचे असें म्हणणे आहे काय कीं, जी मडळी तुमच्याकडेस येतात त्यांचे स्मितयुक्त स्वागत तुम्ही केवळ धंद्याच्याच दृष्टीने करतां व इतर लोकांच्या अंतःकरणांत जर तुमच्या वागण्याने खळबळ उडाली तर तुमचा त्यांत दोष काहीं नाही?"

"होय, माझा दोष कोठून असणार!"

"हे जितके पुरुषमंडळीनां तुम्ही स्पष्ट कराल तितकें त्याचे डोळे अधिक उघडतील.

'जरी वक्त्रीं हास्य प्रकट करिती प्रेम न मनीं॥'

ही गोष्ट डॉक्टरीणबाईसबधाने पुष्कळ लोकांस ठाऊक झाली पाहिजे. पण इतर डॉक्टरणींची पुरुषाशीं वागतांना याचप्रमाणे वृत्ति झालेली असते काय?"

"असते असें वाटत नाहीं. कां कीं, पुष्कळ डॉक्टरणी अविवाहित असतात. पुरुषांशीं बोलतांना त्यांच्या मनांत संभ्रम उत्पन्न होतो. त्यांनां पुरुषांशीं धंद्यापुरतेंच बोलावें असे वाटतें. पुरुषाशीं थट्टामस्करी करण्याचे धैर्यच त्यांस व्हावयाचे नाहीं. आणि मजसारख्या लग्न झालेल्या बाईला हा एक मोठा फायदा आहे. आपल्यासारख्या लग्न झालेल्या बायकांनां तरुण मंडळींची जेवढी

थट्टामस्करी करतां येईल तितकी तेवढ्याच वयाच्या अविवाहित स्त्रियांनां करतां येईल काय?"

"नाहीं करतां येणार. अविवाहित मुलीनें जर थट्टामस्करी जास्त केली तर पुरुष येऊन अगदीं लगट करतील. पण लग्न झालेल्या बाईशीं लगट करावयाची त्यांची छाती होणार नाहीं."

"बरें, तें असो. मि. विश्वमित्र यांच्या मनांत जी उदासीनवृत्ति उत्पन्न झाली आहे ती दूर करण्याचा तुम्ही प्रयत्न केला पाहिजे. विश्वमित्रांचें मन आकर्षित करण्याचा प्रयत्न मी करीत आहे असा समज तुम्ही मुळींच करूं नका. विश्वमित्रांविषयीं मला कौतुक वाटतें; त्यांच्या मनांतील उच्च विचार वारंवार मला ऐकावेसे वाटतात आणि ते जर कधीं खरोखरच आले तर मला आनंदहि होतो."

"ते तुमच्याकडे कितीवेळ आले?"

"तुम्हाला सांगायला हरकत नाही पण तुम्ही त्याबद्दल त्यांनां धारेवर धरूं नका म्हणजे झालें. नाही तर ते मजकडे यावयाचे बंद होतील किंवा मी चुगली केली असे त्यांस वाटेल."

"तुम्ही सांगाच ते कितीवेळ आले. ते येतात हें मि. लालनाथांना ठाऊक आहे काय? ते येतात हे त्यांस आवडते काय?"

"आवडत असावेसे दिसतें; का की तेच विश्वमित्रांस पुन्हां पुन्हां येण्याचा आग्रह करतात. लालनाथांनां देखील विश्वमित्रांचे बोलणें ऐकत राहावेसें वाटते."

"त्यांच्या मनांत कसले उच्च विचार आहेत?"

"विहंगमाबाई, तुम्ही त्यांची पत्नी असतां देखील त्यांच्या स्वभावाची तुम्हाला माहिती नसावी आणि त्यांच्या आयुष्यांत सहधर्मचारिणीचा अधिकार तुम्हाला मिळाला असतां त्याचा तुम्हीं फायदा घेऊं नये याबद्दल मला फार वाईट वाटतें. तुमच्या नवऱ्यानें जें मोठें ध्येय आपल्या डोळ्यासमोर ठेवलें आहे तें पार पाडण्यासाठीं तुम्ही त्यास मदत करावयाची कीं, ते सरकारी नोकरींत शिरले नाहींत म्हणून त्यांच्यावर असंतुष्ट रहावयाचें. विहंगमाबाई, "पुरंध्रीणां प्रज्ञा पुरुषगुणविज्ञानविमुखी" असें एक संस्कृत कवी बोलला तें अगदीं चुकीचें दिसतें. पुरुषगुणाविषयीं अज्ञान माझ्यासारख्या पुरंध्रीच्या ऐवजीं तुमच्या सारख्या तरुणींच्या अंगांत अधिक दिसून येते. आज जर मला लग्न करावयानें असतें आणि कोणी आय्. सी. एस्. नें माझ्यासाठीं मागणी घातली असती आणि त्या बरोबर देशसुधारणेच्या बऱ्याच कल्पना असून त्यांच्यासाठीं खटपट करणाऱ्या विश्वमित्रासारख्या तरुणानें मागणी केली असती तर मी त्या आय्. सी. एस्. ला सोडून विश्वमित्रांसच पत्करलें असतें."

हें संभाषण किती लांबलें असतें तें सांगतां येत नाहीं. कां कीं हें संभाषण इतपत चालूं असतां दरवाजाची घंटा वाजली आणि एकदोन मिनिटांत कपाउंडरणीने तुम्हांस भेटावयास कोणी मनुष्य आला आहे असे डॉक्टरीणबाईस कळविले, तेव्हां विहंगमा निरोप घेऊन परत गेली.

---

## प्रकरण २१ वें.

## राजकारणी मंडळीची खास बैठक.

दादासाहेब गेगणे यांच्या घरांतून स्वामी ब्रह्मगिरि, निघून गेल्यानंतर तीन दिवसांनीं पुन्हां त्यांच्याकडे पक्षाच्या प्रमुख मंडळींची सभा भरली. त्या सभेमध्यें स्वामी ब्रह्मगिरि आपल्या कांहीं उपयोगाचे नाहींत हें गृहित धरून आतां पुढें काय करावयाचें यासंबंधानें चर्चा झाली. स्वामींचें प्रवचन आपण सोडून गेलों पण आपल्या पाठोपाठ सर्व मंडळी गेली नाहीत हें कांहीं चांगलें झालें नाहीं असे दादासाहेब बोलले. कांहीं मंडळी मुद्दाम शेवटपर्यंत राहिली आणि दुसऱ्या दिवशीं स्वामी जेव्हां दुसऱ्या एका ठिकाणीं जाऊन बसले

तेव्हां तरुण मंडळी त्यांच्याभोवतीं गोळा झाली, व दोन दिवस संध्याकाळीं तर त्यांच्याशीं संभाषण करण्यास अनेक मंडळी उत्सुकतेने गेली हें वृत्त देखील पक्षाच्या प्रमुख मंडळीस कळले होते पण त्या बातमीचा नारायणरावांनी पुनरुच्चार केला, आणि म्हणाले कीं "स्वामी आपले चंबुगबाळें नागपुरहून एकाएकीं हलवील असे वाटत नाही, आणि तसें झालें तर स्वामींचे येथे रहाणे आपणांस फायदेशीर न होतां अपकर्षक होईल ही धास्ती आपल्या पक्षाच्या अभिमानी मंडळीपैकीं पुष्कळांस पडली आहे."

दादासाहेब गेंगणे म्हणाले की, "हा अनेक देश हिंडून चवचाल बनलेला स्वामी आपल्या कांहीं एक उपयोगीं पडावयाचा नाहीं, हें मला पूर्वीपासूनच वाटत होतें. त्याने आपणांस चकविलें एवढेच नव्हे तर तो आपल्या अपेक्षेविरुद्ध लोकप्रिय होईल अशी धास्ती वाटत आहे. आतां आपणांस हा आपला प्रतिस्पर्धी आहे असे धरूनच विचार केला पाहिजे आणि त्याच्या पदरी दोष बांधला पाहिजे. स्वामींचें पहिले व्याख्यान झाल्यानंतर देखील आपण दुसरे व्याख्यान होऊ दिले, त्यांत स्वामी जेव्हां भडकले तेव्हां आपल्या पक्षाची निदान प्रमुख मडळी सभास्थान सोडून गेली ही गोष्ट आपण चांगली केली. त्यात आपली धर्मश्रद्धा व पक्षाच्या मंडळींची जूट दिसून आली ही गोष्ट चांगली झाली. आपण ज्यास पुढें सारूं तो मनुष्य बेताल होऊ लागला तर आपण त्यास जुटीने नियत्रण करूं शकतो ही गोष्टहि लोकांनां दिसली. "आपण स्वामींस बोलावलें तें श्रद्धेनें बोलावले; पण हा मनुष्य इतका धर्मलंड असेल हें आपणांस काय माहीत." असा आपण कांगावा केला पाहिजे, आणि आपण केवळ धर्मश्रद्धेने कसे फसलों गेलो इत्यादि गोष्टींसंबंधानें बोभाटा केला पाहिजे. आपली धर्मश्रद्धा किती तीव्र आहे आणि आपल्याला स्वामीच्या हातून शुद्धिसंघटनसारख्या कोणत्या मोठमोठया धार्मिक चळवळी करून घ्यावयाच्या होत्या त्याचीं चित्रें काढून या स्वामीस धर्मलंड आणि नादान तर आपण ठरवलेच पाहिजे आणि निदान असें केलें पाहिजे कीं "भगव्या कपडयाचा" दुसरा कोणी तरी नागपुरास आणून त्याचा बडेजाव केला पाहिजे. पण जो दुसरा कोणी "छटीवाला" आणावयाचा तो आपल्या हातांत राहील असाच आणला पाहिजे आणि जर ब्रह्मगिरीचा मॉडरेट मडळींनीं किंवा ब्राह्मणेतरांनीं किंवा स्वराज्यपक्षीयांनीं उपयोग करून घ्यावयास सुरवात केली तर या स्वामीस मांसाहाराचे जेवण दोन दिवस मिळाले नाहीं म्हणून हा तडफडून डॉ. नंदिका यांच्याकडे कसा जेवायला गेला याबद्दल लोकांत बोभाटा करविला पाहिजे. खरोखर पाहतां स्वामीनें महिन्यांतून एकदाच हजामत करावी, असें असून देखणें दिसण्याकरितां आणि बायका भाळविण्याकरितां हा दररोज हजामत करतो, आणि हजामत देखील आपल्या हातानेंच करतो ही माहितीहि लोकानां दिली पाहिजे."

इतक्यांत नारायणराव अलकार म्हणाले कीं, "हा हातानें हजामत करतो याप्रकारच्या गोष्टी सांगून आज आपण लोकांवर वजन कसे पाडणार? स्वामींच्याकडे जी विद्यार्थी मंडळी जमतात ती स्वतःच हजामत करणारी आहेत!"

"अरे नारायणराव, तू असा कसारे अजून. राजकारण म्हणजे काय, ते कशाशीं खातात हें तुला कांहींच समजत नाहीं."

"कां बरें!" वृद्ध दादासाहेबांच्याकडून मिळालेलें नालायकीचे सर्टिफिकेट न आवडून नारायणराव अलकार बोलले.

"अरे, विद्यार्थीमंडळीचा विचार काय करावयाचा विद्यार्थ्यांनां काय मते आहेत विद्यार्थीवर्गामध्ये आज मनुष्य कितीहि लोकप्रिय झाला

तरी त्याची आपणांस किंमतच नाहीं. विद्यार्थ्यांचे वडील किंवा थोरले भाऊ यांनां मतें असणार; ते बहुतेक सरकारी नोकर किंवा वकील किंवा डॉक्टर असेच आहेत, आणि ते आपल्याकडेसच रहातील, आणि कदाचित स्वामी ब्रह्मगिरि रोजच्यारोज हजामत करतो ही मात्रा त्यांचीं मनें देखील कलुषित करण्यापुरती लागू पडेल. कां कीं तो वर्ग देखील दररोज हजामत करणार नाहीं. पण ज्या वर्गाला स्वामी ब्रह्मगिरीकडे फिरकूं द्यावयाचें नाहीं, तो वर्ग म्हटला म्हणजे कापडवाले, सराफ, हलवाई, वाणी, शिंपी, पानाबिडीवाले, यांचा आहे. आणि जर स्वराज्यपक्षीयांस पाठिंबा कोणाचा असेल तर याच वर्गाचा आहे; तर स्वराज्यपक्षाच्या मंडळीचें आणि ब्रह्मगिरीचें सूत जमणार नाहीं एवढी आपण खटपट केली पाहिजे. निदान महात्मा गांधींच्या विरुद्ध तरी ब्रह्मगिरींस बोलायला लावलें पाहिजे. स्वराज्यपक्षाचे पुढारी तर ब्रह्मगिरि आमच्याकडून निघून गेला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं जाऊन भेटून आले आहेत. तर त्या पक्षाची मंडळी दुकानदारांवर वजन पाडण्यासाठीं ब्रह्मगिरींचा उपयोग करण्यापूर्वी आपणच या मांसाहार करणाऱ्या स्वामीची नाचक्की करून ठेवली पाहिजे."

"पण दादासाहेब, या सगळ्या गोष्टी सोप्या नाहींत; स्वराजिस्ट पक्षांतली मंडळी पूर्वी आपल्यांतलीच; त्यांनां आपली सगळीं बिंगे माहीत आहेत, आणि कोण काय खातो, काय पितो या गोष्टी आपण मुळींच काढू नयेत. तसें आपण केलें म्हणजे स्वराजिस्टांचे ते फटकळ पुढारी आपण सर्व मंडळी केलनरच्या हॉटेलमध्यें कशीं जेवणें जेवीत होतों तें तारखा देऊन बाहेर काढावयास कमी करणार नाहींत. त्या फटकळ मंडळीच्या तोंडीं कोणी लागावें? ते आहेत ब्यारिस्टर; आम्हीं मांसाहार करतों म्हणून ते स्वतः कबूल करतील; आणि लोक तो आहार त्यांनां क्षम्य धरतील; कां, तर ते विलायतेला जाऊन आलेले आहेत; ते फटकळ पुढारी आपल्या कबुली जबाबामध्यें तुमचीं आमचीं सर्वांचींच नांवें सांगतील, आणि तुमच्या आमच्यासारख्या धर्माला महत्त्व देणाऱ्या मंडळीसंबंधानें मात्र लोकांचें वाईट मत होईल."

"तो ( स्वराजिस्ट पुढारी ) लेकाचा अगदीं बहानचोद आहे खरा. याला आपणच पुढें आणून शेंफारूं दिला." दादासाहेब पाठीमागच्या आठवणी मनांत आणीत आणीत म्हणाले. त्यांच्या मनांत यावेळीं अनेक आठवणी आल्या. वऱ्हाडांतले वकील जेव्हां अधिक शिष्टपणाच्या गोष्टी करीत आणि जेव्हां समाजांत त्यांची मानमान्यताहि होती, तेव्हां त्यांचा पाडाव करण्यासाठीं नागपूरच्या राष्ट्रीयांनां त्या मवाळांविरुद्ध एक फटकळ बोलणारा आणि आपले उच्च दर्जाचे अधिकार सांगणारा एक मनुष्य हवा होता. त्यावेळेस हा एक ब्यारिस्टर त्यांनां लाभला तेव्हां त्याला त्यांनीं पुढें करून त्याच्या मार्फत वऱ्हांडांतल्या शिष्ट वकीलांनां शिव्या देवविल्या. "पण आतां तोच लेकाचा आमच्या विरुद्ध होऊन शहाणपणाच्या गोष्टी सांगत आहे; आणि आमचा पाडाव करूं पहात आहे. आम्हालाच तो लेकाचा लबाड स्वार्थसाधु म्हणतो;" इत्यादि गोष्टी त्यांस आठवल्या. इतक्यांत बापू बंगळवभरे म्हणाला "पण दादासाहेब, आतां या स्वामींनीं स्वराजिस्ट पक्षाला मिळू नये म्हणून काय करावयाचें? आणि जर मिळालेच तर काय करावयाचें हें आपण ठरविलें पाहिजे."

"अरे, काय करावयाचें; मी म्हणतों कीं, स्वराजिस्टांना तो स्वामी जाऊन मिळूंच द्या, आपण आपल्या हातीं दुसराच एखादा स्वामी घेऊं आणि तात्पुरती पतितपरावर्तनाची चळवळ हातीं घेऊं. आपण एखाद्या शंकराचार्यालाच आणूं; या शंकराचार्य मंडळीविषयीं ब्रह्मगिरीचे

मत वाईट होऊन गेलें आहे. मग आपण शंकराचार्यांनां हाती घेतल्यानंतर त्याचें शंकराचार्यांच्या विरुद्ध बोलणे सुरू होईल, आपण शंकराचार्यांच्या अध्यक्षतेखालीं पतितपरावर्तन करवूं. जर एखादा कोणी ख्रिस्ती किंवा मुसुलमान हिंदु होतोच असे म्हणाला तर त्याचें शुद्धीकरण गाजावाजा करीत करूं; म्हणजे एकंदर हिंदुजात आपल्यावर संतुष्ट होईल. मुसुलमान आपल्या विरुद्ध जातील पण आपला मतदार संघ मुसुलमानेतर आहे."

"हा शंकराचार्यांची निंदा करील तर स्वराज्य पक्षालाच अधार्मिक ठरवता येईल." नारायणराव अलकार हास्यमुद्रेने बोलले.

"होय, त्या करतांच मी म्हणतो कीं, त्याला स्वराज्य पक्षाला मिळूंच द्या."

"हा शंकराचार्यांची निंदा काय करतो ?" भोगळवार विचारते झाले.

"तो म्हणतो की, हे शंकराचार्य हिंदूंच्या धार्मिक अभिमानास आग लावणारे हे कुलांगार आहेत. यांनां आपल्या स्वतःच्या पदवीचें महत्त्व नाहीं; संन्यासी या पदवीचें महत्त्व त्याहून नाहीं, अमेरिकेंतल्या किंवा यूरोपांतल्या एखाद्या लफंग्या संस्थेने जर यांनां पी. एचडी. दिली तर तिचें महत्त्व यांस जास्त आहे. व आपले वर्तमानपत्रकार देखील इतके गधडे बनले आहेत कीं, ते देखील तमल्या पदव्यांचे महत्त्व शंकराचार्यपणापेक्षां जास्त आहे अशी स्वतःची समजूत करून घेतात व तीच समजूत जनतेमध्यें पिकविण्याचा प्रयत्न करतात. या शंकराचार्यांनां खरोखर सामाजिक कार्य करायला कांहीं नको. आपण मोठ्या इतमामानें इतस्ततः संचार करावा एवढेंच काय ते कार्य त्यांनां दिसत आहे. म्हणजे ते सर्व जनतेचे नोकर नाहींत. कांहीं ढोंगें धत्तुरे करून केवळ मध्यम वर्गापासून ते पैसा काढणार, दहाबारा पालखी उचलणारे भोई आणि चार मशालजी पोसणार; शंकराचार्य या शब्दाची व्याख्याच ब्रह्मगिरि अशी करतात कीं, चार मशालजी, दहा पालखीवाले भोई आणि एकदोन कारकून पोसण्यासाठीं पैसे उत्पन्न करणारा, आणि ते उत्पन्न करण्यासाठीं अनेक लटपटी करणारा व या लटपटी करण्यासाठीं संन्याशाचा वेष देऊन सजविलेला प्राणी !"

"ही व्याख्या त्यांनीं व्याख्यानांत कोठे केली नाही."

"मीच त्यांनां सांगितलें की हे असले कोठे बोलूं नका."

"मग ते काय म्हणाले?"

"मला एकंदर गोष्टी पाहून सन्यासी वर्गाचीहि चीड आली आहे. असे वाटतें की, असल्या माळकेत आपण अजून बसण्यापेक्षां आपली छाटी जाळून टाकली तर चांगले नाही?"

"तर मग आपण शंकराचार्यांनां नागपूरला बोलावलेच पाहिजे म्हणजे हा लेकाचा ब्रह्मगिरि त्याच्याविरुद्ध बोलेल, आणि लोक त्याच्याविरुद्ध होतील, मग स्वराजिस्ट देखील त्याला हातांशीं धरणार नाहींत."

---

## प्रकरण २२ वें.

## परमानंदांचें मोहजाल.

विहंगमा डॉ. नंदिकाबाईंचा निरोप घेऊन गेली तेव्हां संध्याकाळ झाली होती, आणि त्यावेळेस ज्याने घंटा वाजवून आंत आपला प्रवेश करून घेतला तो मनुष्य डॉ. परमानद यांचा शोफर होता. शोफर डॉ. परमानंद यांची चिठ्ठी घेऊन आला होता. चिठ्ठीमध्यें एका बाईच्या बाळंतपणासाठीं आपण ताबडतोब यावें, मोटार पाठविली आहे; म्हणून मजकूर होता. तेव्हां डॉ. नंदिकाबाई तावडतोब तयारी करून मोटारमध्ये बसल्या आणि मोटार तांतडीनें कामठीला गेली.

कामठीला एक स्त्री अडली होती, फोरसेप्स लावून मूल बाहेर काढण्याचें मुख्य काम होतें.

जर फोरसेप्स लावायचें काम असलें तर डॉक्टरणीलाच बोलवावें, तें काम पुरुष डॉक्टरनें करूं नये असें गृहपतीचें मत असल्यामुळें आणि तो मनुष्य सधन असल्यामुळे म्हणजे नागपुराहून डॉक्टरीणबाईंनां येऊन जाण्यासाठी १०० रुपये फी द्यावयास समर्थ असल्यामुळे डॉ. परमानदांनीं मुद्दाम नंदिकाबाईस पाचारण केले होते. डॉ. नंदिकाबाईस येणेंप्रमाणें कामठीला तीन चार व्हिझिट्स परमानद मिळवून देत व आपली मोटारहि पाठवीत असत.

आज रोजीं त्या बाईसाठीं रात्रीं साडेनऊ दहा वाजेपर्यंत काम करावे लागले, तेव्हां डॉ. नंदिकाबाईची सुटका झाली. काम आटपल्यानंतर कांहीं तरी अल्पाहार घेण्यासाठीं डॉ. परमानंदांनी डॉ. नंदिकाबाईस आपल्या बगल्यावर बोलावले होतें, आणि डॅाक्टरीणबाईनी भूक सपाटून लागल्यामुळे त्या आमंत्रणाचा स्वीकारहि केला होता.

रात्रीं अपरात्रीं आपणांस कोठें जावे लागलें तर सोबत म्हणून आणि त्याप्रमाणेंच लोकापवाद उत्पन्न होण्यास जागा राहूं नये आपण कोणीकडे एकटया गेलो नाहीं, असें लोकांस वाटावें म्हणून डॉ. नंदिकाबाई बरोबर एक नर्स किंवा कपाउडरीण घेऊन जात असत. त्याप्रमाणे आजहि एक नर्स त्यांच्या बरोबर होती. ही नर्स देखील नंदिकेबरोबरच परमानंदांच्या बंगल्यावर गेली होती. ही नर्स जरी डॉक्टरीणबाईच्या बरोबर असे, तरी तिनें एकसारखे बरोबर असणें शक्यच नव्हतें. अनेकदां तिचा आणि डॉक्टरीणबाईचा वियोग होई. जेव्हां डॉ. परमानंदांच्या दिवाणखान्यांत नंदिकाबाई जाऊन बसल्या तेव्हां डॉ. परमानंद यांच्या समोर आपणहि त्यांच्याबरोबरच कोचावर जाऊन बसावें हें तिला आवडलें नाहीं म्हणून ती दुसऱ्याच एका खोलीत बसली होती.

थोडक्याच वेळानें जेवणास सुरवात झाली. डॉ. नंदिकाबाई परमानंदांसमोर जेवण जेवीत होत्या, आणि डॉ. परमानंदांचा खानसमा एकामागून एक भोज्यें आणीत होता. सूप झालें, करीचावलचा हल्ला झाला, एक साईड डिश झालें; आणि शेवट गोड करण्यासाठीं अंजीराचा स्टू व मलई या वस्तू आल्या. जसजलें एकेक भोज्य पोटात जाई तसतशी दोघांचीहि वृत्ति अधिकाधिक उल्लसित होत होती. डॉ. परमानंद ह्यांनीं सूप झाल्याबरोबरच शांपेनची बाटली काढली व शांपेन घेण्यासाठीं परमानंद आग्रह करीत होते; आणि डॉ. नंदिकाबाई ती घेणें नाकारीत होत्या एवढेच नव्हे तर तुम्हीं शांपेन घेणें बंद करावें असा उपदेश करण्यासहि नंदिकबाईनीं कमी केले नाहीं.

"मजससारख्या अविवाहित मनुष्यास श्रमविनोदनासाठीं काय आहे? मला जर तुमच्यासारख्या हुशार पत्नीचा लाभ झाला असता तर मी दारू कधींच घेतली नसती." डॉ. परमानंद म्हणाले.

नंदिकाबाईनीं गौरवयुक्त भाषणाचा स्वीकार हास्य करून केला, आणि गौरवाच्या भाषेबद्दल आभार मानले, व म्हणाल्या "तुम्ही आतां लौकरच चतुर्भुज व्हावे."

"पण तें शक्य कोठें आहे? मजसारख्या मनुष्याचें भवितव्य लिहिलेलेंच आहे. आम्ही काम करावे; घरीं यावें; घरीं कोणी नाहीं म्हणून वेळ घालविण्यासाठीं व्हिस्कीचा एक पेग मारावा आणि सिगार ओढीत स्वस्थ बसावे; या तऱ्हेचा आमचा "बॅचलर्सचा लाईफ" असतो."

"तुम्ही आपल्या आयुष्याचें फार वाईट चित्र काढतां!"

"वाईट असो की, चांगलें असो तें स्वाभाविक स्थितीचें प्रामाणिक चित्र आहे."

"मला तुमच्याविषयी फारच सहानुभूति वाटते."

"पण ही सहानुभूति केवळ तडफडणाऱ्या कुत्र्याकडे पाहून जो कळवळा उत्पन्न होतो त्या स्वरूपाची आहे कीं, त्याहून कांहीं निराळी आहे? मला दया नको आहे. खरी सहानुभूति पाहिजे."

"तुमच्याबद्दल मला खरोखरच सहानुभूति वाटते; केवळ दया वाटत नाहीं. तुमच्यासारख्या तरुणांचीं आयुष्यें व त्यांची भावी सुखाची आशा हीं व्हिस्कीच्या अग्नीने दग्ध होऊन जावींत याबद्दल कोणत्या सहृदय स्त्रीस खेद होणार नाही?"

"नंदिकाबाई, तुमच्यासारखी स्त्री मला लाभली असती तर माझें आयुष्य किती तरी सुखाने गेलें असते असे वाटतें. तुम्हीं नागपूरला आहांत आणि मी येथे आहे पण मी तुमचेच्च चिंतन करीत असतो."

"पण तें व्यर्थ आहे. मी लग्न झालेली स्त्री आहे"

"मी तुमचे चिंतन करणें ही गोष्ट व्यर्थ मुळींच समजत नाहीं. माझ्या केवळ कष्टाने भरलेल्या आयुष्यक्रमांत तुमची आठवण तेवढाच कायतो सुखाचा क्षण वाटतो. तुमचें लग्न झाले आहे पण तरी देखील तुमच्यावर प्रेम करणे मला गैर वाटत नाही. कोणत्या व्यक्तीविषयीं मनांत प्रेम उत्पन्न व्हावे हे आपल्या इच्छेनें थोडेच ठरत असतें?"

"तर मग मी असें म्हणेन कीं, मनांत ज्या भावना उत्पन्न होतात त्यांस विवेकाचें आवरण घातले पाहिजे."

"नंदिकाबाई, विवेकाचें आवरण घालणें केव्हां शक्य होतें? ज्या गोष्टींनां आपण महत्त्व देतो त्या अनेक गोष्टींस आपण अविवेक केल्यास मुकूं असें जेव्हां वाटतें, तेव्हांच. आज, मला मी अविवेक केल्यानें जें सुख प्राप्त होईल असें वाटतें त्यापुढें अविवेकाने जें गमावीन त्याचें महत्त्वच वाटत नाहीं, पण मी तुम्हांस असें विचारतों कीं तुमच्या मनांत लालनाथांविषयीं प्रेमभाव पूर्वीसारखाच अजूनहि आहे काय?"

"मनुष्य जोंपर्यंत दूर आहे तोंपर्यंत त्याविषयीं आपण आपल्या मनानेंच कल्पना करीत असतों. आणि त्याची प्रत्यक्ष गांठ पडली म्हणजे तो मनुष्य आपणांस त्याच्या गुणावगुणांसह दिसतो व तो गुणावगुणासह दिसला म्हणजे आपल्या मनानें त्याची कल्पना जितकी उच्च प्रकारची तयार केली असते त्या प्रकारची वस्तुस्थिति नाहीं हे दिसूं लागतें; तसें लालनाथांच्या बाबतींत झालें असेल पण त्यांच्याविषयीं माझ्या मनांत प्रेम नाहीं असें नाहीं."

"नंदिकाबाई, तुम्हीं उत्तर देण्याचें टाळूं नका. माझ्या संगतींत तुम्हाला जो उल्हास होतो तो तुम्हांस लालनाथांच्या संगतींत होतो काय?"

"लालनाथ हे खेळ खेळण्याच्या बाबतींत माझे सवगडी नसतील पण ते माझे पति आहेत ही जाणीव मला कधींच दूर करतां यावयाची नाहीं."

"म्हणजे नंदिकाबाई, तुम्ही प्रेमाला प्राधान्य देत नाहीं. तुम्ही तो मंगलाष्टकांचा विधि प्रेमाच्या आड येऊं देता; तुम्हीं प्रेमास महत्त्व देत नाहीं. विवाहाचा विधि म्हणजे कांहीं अनुलंघ्य गोष्ट आहे असें तुम्ही समजतां काय? जगात विवाह ही केवळ संस्था म्हणून जर सन्मान्य आहे तर डायव्होर्स हीहि संस्थाच नाहीं काय? विवाहास अनेक कायदेशीर विधींनीं बांधले आहे म्हणून जर विवाहाचें पावित्र्य आहे तर तितक्याच कायदेशीर विधींनीं डायव्होर्स मडविला गेला नाहीं काय? जे विवाहसंबंध दोघांस असुखकारक आहेत ते मोडून टाकण्यासाठींच "डायव्होर्स" ही कायदेशीर संस्था आहे. आणि या संस्थेचा जर आपण अंगीकार केला तर त्यांत गैर काय आहे?"

"तुमचें म्हणणें काय आहे?"

" मी तुम्हांला असा प्रश्न करतों कीं तुम्हीं जर अविवाहित असतां तर तुम्ही माझा अंगीकार केला असता काय ? "

" केला असता कदाचित् ! "

" तर मग आज अंगीकार करावयास काय हरकत आहे? "

" मुख्य हरकत हीच कीं मी लग्न झालेली आहें. "

" पण मी असें म्हणतों कीं जे आपण घडवून आणतों तें आपणच मोडून टाकावयास कोणती हरकत आहे? ज्यास घडविण्याचा अधिकार आहे त्यास मोडण्याचाहि अधिकार आहे ! "

" माझा झालेला विवाहसंबंध मोडून टाकण्याची माझी इच्छा नाहीं. माझे आयुष्य जर सुखांत गेले नाहीं तर मी ते दु:खांत काढीन पण झालेला विवाहसंबध हा तोडून टाकणार नाहीं. "

"नंदिकाबाई, मी तुमच्यावर प्रेम करतों; माझ्या आयुष्याचा मातेरा होईल त्याची तुम्हांस कांहींच पर्वा नाहीं काय ? "

"मी असे म्हणते कीं जरी तुमच्यावर माझें प्रेम असलें तरी देखील मला तसे पेम चालू ठेवण्याचें स्वातत्र्य नाहीं."

"धार्मिक विधीस तुम्हीं कितपत महत्त्व देता? ईश्वर आहे म्हणून तुमची खात्री आहे काय? जर तुमची खात्री नाहीं, तर लग्नसंबंध ईश्वरी इच्छेनें जडतो तो मोडून टाकणें बरोबर नाही इत्यादि वाद तुम्हांस करतां येणार नाहीं."

डॉ. नंदिकाबाईस तेथे बसण्याची भीति वाटूं लागली. आपले मन डॉ. परमानंद यांच्याकडे बरेचसे आकर्षिलें गेलें आहे ही गोष्ट त्यांसच ठाऊक असल्यामुळें तर त्यांनां फारच भीति वाटूं लागली. आणि आपला ईश्वरावर विश्वास नाहीं, लग्नाचा ईश्वरी आज्ञाशीं कांही सबंध नाहीं, लग्न ही केवळ व्यक्तीच्या सुखासाठींच संस्था निर्माण झाली आहे असा आपलाहि समज आहे. असे असतां ज्या वादांत आपणांस यश येणार नाहीं तर तो वाद आपण चालूच कशासाठी ठेवावा? इत्यादि विचार त्यांच्या मनांत चालू झाले. त्यांनीं आपल्या जेवणाच्या टेबलावरील घंटा वाजविली. ती ऐकून बटलर आला तेव्हां त्यांनी आपल्या नर्सला बोलावणे पाठविलें आणि डॉ. परमानंदांनां म्हटले "तुम्हीं म्हणतां त्यांत पुष्कळच तथ्य आहे. जर आपण विवाह ही सामाजिक संस्था म्हणून मानार्ह ठरविली तर डायव्होर्स ही सस्था देखील सन्माननीय धरली पाहिजे हे आपले म्हणणे बरोबर आहे. लग्न मोडावयाचें झाले तर ते डायव्होर्स करून पद्धतशीर मोडावे यासाठींच डायव्होर्स ही संस्था आहे आणि जर लालनांथांचा मी द्वेष करीत असतें आणि तुमच्यावर माझे अपरंपार प्रेम असतें तर डायव्होर्स करण्यासहि मी कमी केले नसतें. स्त्री आपला इष्ट हेतु साध्य करण्याकरतां काय करील याचा नेम नाहीं असें अनेक स्त्रियांचीं चरित्रें पाहतां दिसतें खरे. पण ज्या अर्थी मी तुमचे म्हणणे कबूल करीत नाही त्याअर्थी माझे तुमच्यावर तितके प्रेम नसलें पाहिजे. तुम्ही दुसऱ्या कोणत्या तरी स्त्रीशीं लग्न करावे आणि तुमचा संसार सुखानें व्हावा असेच माझें अंतःकरण मला सांगतें."

इतक्यांत नंदिकाबाईची नर्स तेथें येऊन पोचली तेव्हां डॉ. परमानंद यांनीं सिगार पेटविली आणि शोफरला हांक मारली.

डॉ. नंदिकाबाई जावयास निघाल्या तेव्हां त्यांचा ओव्हरकोट त्यांच्या अगावर जेव्हां डॉ. परमानदांनीं घातला तेव्हां त्यांनीं मोठया आवेशानें नदिकेचे बाहुपीडन केलें तेव्हां नंदिकेला देखील आपल्या भावना जागृत होत आहेत असें वाटलें. जेव्हां एखादी पुरंध्री प्रेमानें वेडया झालेल्या पोराच्या प्रेमाच्या सक्रिय प्रदर्शनानें मनाची यत्किंचितहि चलबिचल न होऊं देतां केवळ हास्यवदन होतें त्याप्रमाणे आपण केवळ तटस्थ राहिलों नाहीं; आपणहि चलितचित्त झालों

आहेत असें नंदिकेस वाटलें. आणि ही गोष्ट नंदिकेच्या जेव्हां लक्षांत आली तेव्हां ती अधिकच बिचकली. आपल्या संयमशक्तीवर तिच्या मनांत अविश्वास उत्पन्न झाला. आणि त्या अविश्वासामुळे आपण उघड्यावर आणि अनेकांच्या नजरेखालीं गेले पाहिजे असें वाटूनच कीं काय ती दिवाणखाना सोडून व्हराड्यावर आली. नंदिकेस आपलें मनोदौर्बल्य कळून आलें. आपण विवाहित स्थितींत सोळा सतरा वर्षे काढलीं; पुरुषस्पर्श आपणांस कांहीं नवा नाहीं; असे असतांहि पुरंध्रीचा आत्मविश्वास आपल्या अगीं कां बरे नाहीं ? परमानंदांसारखा तरुण मनुष्य आपल्या चित्तास संभ्रम कां बरे करू शकतो ? आपल्या अनेक पिपासा तृप्त झाल्या असतां देखील परमानंदांचें सक्रिय प्रेमदर्शन आपणांस कां बरें चलित करते? हे विचार तिच्या मनांत आले. तिनें आपल्या आयुष्यांतील अनुभवांकडे सिंहावलोकन केले आणि आपणांस होणाऱ्या या नवीन संवेदनेविषयीं कांहीं कल्पना तिच्या मनांत आल्या व ती आपल्याशी म्हणाली; होय. आपणांस कारण समजलें. आजचें परमानंदांचें बाहुपीडन हा केवळ साधा पुरुषस्पर्श नाही, परमानंदांच्या अनेक अनुनयात्मक चेष्टांचा हा कळस आहे. आपल्या नवऱ्यानें आपणास अनुनयसौख्य दिलेच नाहीं. आपल्या नवऱ्याची प्रेमसाधनाच्या बाबतींतील अशिक्षितता हेच आपल्या चित्तसंभ्रमाचें मुख्य कारण असले पाहिजे असे तीस वाटलें. प्रेमविषयक मानसशास्त्र आपल्या नवऱ्याला शिकावयासच मिळाले नाहीं. अनुनयाचें अवलोकन होऊन आपल्या मनांत ज्या अपेक्षा उत्पन्न झाल्या त्या नवऱ्याकडून पुऱ्या झाल्या नाहींत. मी स्कॉटलंडमध्ये असतां अनेक प्रेमलीला पहात होतें. त्यांचा माझ्या मेंदूवर परिणाम झाला आहे. प्रेमाच्या म्हणजे स्त्रीपुरुषांतील परस्पराकर्षणाच्या बाबतींत जे आपणांस देखावे दिसले त्यामुळें भावना जागृत मात्र झाल्या पण त्या तृप्त झाल्या नाहींत अशा स्थितींत आपण एका काळीं होतो. अनुनयसौख्याच्या अनुभवांतून आपण गेलो नाही, हें आपणांस त्यावेळेसच भासत असे. आपण परत आल्यामुळें आपल्या पतीनां आनंद झाला, पण आपणांस ज्या अनुनयसौख्याची माहिती झाली तें अनुनयसौख्य पतीकडून मिळाले नाही आपल्या भेटीविषयीं आतुरत्व दाखविणें, सुंदर फुलें व चाकोलेट आपणांस आणून देऊन आपले मन प्रसन्न करणें, आपणांला अनेक रम्य स्थळीं घेऊन जाणे, इत्यादि गोष्टी आपल्या पतींनी केल्या नाहीत, व त्या परमानंदांनीं केल्या त्यांच्यायोगानें आपली आराधनाची तहान भागत होती. आपल्या आयुष्यास एक विचित्र स्वरूप येत होते, म्हणजे एक पुरुष नवरा व दुसरा पुरुष प्रियकर असे स्वरूप येऊ लागले होते; त्यास मुख्यत. आपली शृंगारचेष्टांची तहान, व ती तहान भागविण्यासाठीं आपल्या हिंदुस्थान न सोडलेल्या नवऱ्याची असमर्थता ही कारणें आहेत.

आपण कित्येक संस्कृत प्रेमकाव्यांचीं भाषांतरे वाचलीं होतीं, आणि तीं वाचलीं तेव्हां काल्पनिक सृष्टींतीलच तो व्यवहार आहे, वास्तविक सृष्टींतील तो व्यवहार नव्हे असे आपण समजत होतो. पण स्त्रीपुरुषे परस्परांकडे कशीं आकर्षिली जातात आणि ते आकर्षण लपवून ठेवण्याचा कोणींच प्रयत्न करीत नाही त्यामुळें आपले प्रेम व्यक्त करण्याचे जे अनेक प्रकार उत्पन्न होतात त्या प्रकारांतून आपण गेलो नाहीं, आपल्या पतींनीं आपली प्रेमयाचना कोठे केली? माझें अंत:करण ओढण्यासाठीं त्यांनी प्रयत्न तरी काय केला? मुळींच नाहीं! जेव्हां स्काच मुलींचा प्रियकर, आपणांस प्रिय असलेल्या छोकरीचें अंत:करण ओढून घेण्यासाठीं जें चेष्टायुक्त प्रेमदर्शन करतो, ते आपण पाहिलें तेव्हां आपण हंसलो, तेव्हां आपणांस स्काच मुली

काय बरें बोलल्या? त्या म्हणाल्या, तुम्ही या सर्व अनुभवांतून गेलेल्याच आहांत त्यामुळें तुम्हांस हंसूं येणें स्वाभाविकच आहे. तुम्हांस प्रियाराधनाच्या दिवसांची यामुळें आठवण येत असावी. त्यांना कोठें ठाऊक होतें कीं, बालविवाहामुळे स्त्री–पुरुषसंबंधविषयक ज्या योग्यायोग्यतेच्या कल्पना आमच्या देशांत उत्पन्न झाल्या त्या कल्पनांमुळें प्रेममूलक अद्‌भुतरसाचा आस्वाद आपणांस मिळालाच नाहीं! माझें ते हास्य पूर्वीच्या अनुभवांच्या आठवणीचे नव्हतें. तें नवीन सृष्टि पाहिल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या कौतुकाचें होतें, तें अवलोकन केवळ कौतुकास्पद झाले काय? नाहीं. ते अवलोकन आपणांस काय मिळाले नाहीं याची जाणीव उत्पन्न करणारे झाले. आपण अजूनहि अविवाहित असतो आणि लालनाथानीं या सर्व चेष्टा शिकून आपल्या आराधनासाठीं लावल्या असत्या तर बरें झालें असते असे त्यावेळेस आपणांला वाटले नाहीं काय? प्रेमाच्या उद्‌भवाबरोबर ज्या चेष्टा उत्पन्न होतात, त्यांचा अनुभव आपणांस न मिळाल्यामुळें आपण कांही तरी अद्‌भुतरसास आंचवलोच नाही काय? मी जरी पुरध्री झाले आहे तरी प्रेमचेष्टाचा परिचय झाला पण त्यांचा आस्वाद मिळाला नाही या विशिष्ट परिस्थितीमुळें माझी प्रेमातुरता कायम राहिली आपले आयुष्य अपुरेच झाले आहे, अजून आपणास प्रेमानुनयाचा अनुभव जणूं काय मिळावयाचाच आहे अशी कल्पना आपल्या मनांत गुप्तपणें वास करीत नाहीं काय? आपली स्थिति खरोखर शृंगारिक पुस्तकें वाचलेल्या बालविधवेप्रमाणें झाली नाहीं काय? अर्थात अनुनयाचे जे प्रयत्न डॉ. परमानदांकडून झाले ते आजच नव्यानें झाले नहीत. गेले कित्येक महिने त्यांचें प्रेमचेष्टांचे प्रदर्शन भीत भीत चालूंच होतें. मी ते कां बरें बंद केलें नाहीं याचे कारण एवढेंच कीं, माझी प्रेमचेष्टांची भूकच शांत झाली नव्हती.

डॉ. नंदिकाबाई मोटारींतून नागपूरास परत येत होत्या तेव्हां नर्सपाशी काहीएक न बोलता विचारांत गढून गेल्या होत्या. डॉ. परमानद यांनीं जी सूचना केली ती आपण संतापाने झिडकारली कशी नाही याचेच त्यांना आश्चर्य वाटत होतें. आणि परमानदानीं, मी लग्न मोडून त्यांच्यापाशीं करावें असें स्पष्टपणे सुचविण्याचें त्यांस धाडस तरी कसे झाले हे विचार त्यांच्या मनांत येत होते. तसेच आपणांस परमानंदांच्या सूचनेचा मनांत अजूनहि राग येत नाहीं ही देखील त्यांच्या मनाची स्थिति त्यांस कळली. आपले मन फार दुर्बल आहे, या गोष्टीची जाणीव त्यांस झाली. त्यांनी आपल्या मनाचे पृथक्करण करण्याचे चालविले. "डॉ. परमानंद ह आपणांस अप्रिय आहेत काय?" हा पहिला प्रश्न त्यांनीं आपल्या मनाला केला आणि त्याचें "नाहीं" हें त्यांनी उत्तर दिले. "परमानदांची संगति पूर्णपणें तोडून टाकावयास आपण अजूनहि तयार आहो काय?" यालाहि त्यांच्या मनाचे "नाहींच" उत्तर आले. त्यानी मनाला तिसरा प्रश्न केला की, "कर्मधर्मसंयोगानें आज लालनाथ वारले तर आपण परमानंदांचा स्वीकार करूं काय?" यालाहि त्याच्या मनात "होय" हेच उत्तर उत्पन्न होऊं लागले. या तीन प्रश्नांनां त्यांचीं उत्तरे हीं इतकी स्पष्ट उत्तरे आली की, त्यांस आपलें मन कोणत्या स्थितीत आहे याविषयी संभ्रम पडला. परमानंदांचे एकदर वर्तन त्यांस आठवले. एडिंबरोला आपण असतांना आपलें वय पंचवीस होतें त्यावेळेस परमानंद जेमतेम एकोणवीस–वीस वर्षांचे होते तेव्हांपासून त्यांची व आपली ओळख आहे. तेव्हां आपण त्यांच्या हुशारीबद्दल कौतुक करीत होतों, आणि परमानंद आपल्यापाशीं मोठया आदरानें वागत होते. नवऱ्याबद्दल माझ्या मनांत जो अभिमान वाटत होता, त्या अभिमानाबद्दल परमानंदांनां अभिमान वाटत होता, आणि सद्वर्तनाची सुशिक्षित हिंदु स्त्री कशी असते याचें

उत्तम उदाहरण म्हणून मला तेहि समजत आणि माझी प्रशंसा करीत. जेव्हां त्यांनां परीक्षेंत चांगले यश आले किंवा त्यांनीं दुसरें कोठें मान मिळविला म्हणजे परमानंद आपल्याकडे येऊन ते सर्व कसे उत्साहानें सांगत याचीहि तीस आठवण झाली. परमानंदांच्या उत्कर्षाकडे आपण कसे कौतुकानें पहात होतो, आणि त्यांचा "आय्. एम्. एस्." मध्ये प्रवेश होईल असें आपणांस तेव्हांच वाटत होते. परमानंदांकडे आपण थोडी-बहुत वात्सल्यदृष्टि ठेवली होती. आणि परमानंद जसजसे मोठे होऊं लागले तसतसे ते आपणांस बरोबरीचे सवंगडी वाटूं लागले. आणि अलीकडे तर ते एखाद्या प्रेमार्ताप्रमाणे वागत आहेत.

नंदिकेला आपलें नैतिक नियमाच्या उल्लंघना-विषयीं डॉ. परमानंदांशीं जे बोलणें पूर्वी झाले होते तें आठवलें. त्यावेळेस आपण आपली जी धार्मिक मतें सांगितलीं त्यामुळें लालनाथांनां फारच दुःख झाले हेहि तिला आठवलें. धर्म, नीति यांच्या मुळाशीं जाऊं पहाणारे वादविवाद लालनाथांनां आवडत नाहीत, त्या वादांत आपण शिरले म्हणजे फार उंचीवर नेलेल्या मनुष्याला जशी भोंवळ येते तशीच त्यांना येते हे तिला आठवलें. मी त्यावेळेस काय बोलले होते बरें? मी बोललें होते कीं "माझा ईश्वरावर विश्वास नाहीं. ईश्वरानें कांहीं नियम केले आहेत आणि ते निमूटपणें आपण पाळले नाहींत तर ईश्वर आप-णांस शिक्षा करील इत्यादि विचार माझ्या मना-वर परिणाम करूं शकत नाहींत. इहलोकीं आपल्या इच्छेनें सौख्य भोगल्यानंतर त्याबद्दल वचपा म्हणून परलोकीं दुःख असेल तर मी असें म्हणेन कीं आम्हीं येथें सुख भोगूं आणि त्या सुखासाठीं परलोकीं शिक्षा आनंदानें सोसूं. पर-लोक आहे किंवा नाहीं याविषयींच आपणांस शंका आहे आणि ईश्वर परलोकीं शिक्षा काय देतो याची आपणांस निश्चित कांहींच माहिती नाहीं, असें असतां ईश्वराच्या किंवा परलोकाच्या भीतीमुळे प्रत्यक्ष दिसणारा फायदा टाकून देणें हे कोणत्याहि सुशिक्षित पुरुषास अगर स्त्रीस योग्य होणार नाहीं. जर एखादा "परमेश्वरी" म्हणून जाहीर केलेला नियम आम्हांस असुख-कर वाटला तर त्या नियमाविरुद्ध सविनय कायदेभंग करण्याचे स्वातंत्र्य आम्हांस नको काय? जर सरकारच्या दुष्ट नियमांनां मान न तुकवितां तो मोडणें आणि त्यामुळे उत्पन्न होणारी शिक्षा स्वीकारणे हे जर उच्च नागरिक-त्वाचे लक्षण होते, तर परमेश्वरी म्हणून जाहि-रात झालेला सामाजिक नियम मोडल्यानें तित-कीच समाजसेवा होणार नाहीं काय?" हीं तत्त्वें मी त्यावेळेस बोलले होतें आणि त्यांचीच परमा-नंदांनी आतां आठवण दिली. मला जो विवाहसंबंध असुखकर वाटत असेल तो मी तोडून टाकाव-याचा मनांत आणला तर मला परमेश्वरी कोपाची त्यांत भीति वाटत नाही हे स्पष्ट आहे. तर मी परमा-नंदांचा स्वीकार करण्यास कां बरें तयार नाहीं? मला कसली तरी भीति वाटत आहे हे खरें. ती भीति सामाजिक आहे, दुसरी कसली नाहीं. तर मला परमानंदांच्या म्हणण्याचा शांतपणानें विचारच केला पाहिजे यांत शंका नाहीं, येथ-पर्यंत नंदिकेच्या मनाची तयारी झाली.

नंदिकेच्या मनांत परमानंदांविषयीं विचार पुन्हां सुरू झाले. परमानंद म्हणतात त्याप्रमाणें आपण आपल्या नवऱ्यास टाकून देऊन परमान-दांशीं लग्न करावें, ही गोष्ट योग्य होईल काय! प्रेमावर विवाहस्थिति अवलंबून असावी की नसावी यावर आपला विश्वामित्राबरोबर झालेला वादविवादहि आठवला. आणि प्रेमाला आपण जें महत्त्व देतो त्यांत योग्ययोग्यता कितपत आहे हाहि विचार तिनें केला आणि ती आपल्या मनाशीं पुन्हां म्हणाली.

"छे! छे! प्रेम हें विश्वसनीय मुळींच नाहीं. आज प्रेमाचा आवेग मोठ्या जोराचा असला

म्हणजे तो उद्यां ओसरणार नाहीं हें कशावरून? परमानंदांस आज मी हवी आहे म्हणून ते आहे तो नवरा सोडून द्या म्हणून म्हणण्यास प्रवृत्त होतात. उद्यां त्यांस मी नकोशी झालें म्हणजे त्यांस माझ्याविषयीं काय आदर वाटेल बरे ? जी स्त्री एका नवऱ्यास खरोखर सबळ कारण नसतां टाकून देते त्या स्त्रीला टाकून देण्यास परमानंदांच्या मनांत कांहीं एक कितु उत्पन्न होणार नाहीं.

परमानंदांवर रागावण्यांत तरी अर्थ काय आहे? तो बिचारा अडलेला आहे, आणि या स्थितींत तो आपलें गृह स्थापन करण्यासाठीं धडपड करीत आहे. मी त्याच्यापेक्षां वयानें वडील आहे. आपल्यापेक्षां अधिक वयाच्या स्त्रीबरोबर संबंध त्यांस खरोखरच सुखावह नाहीं. आतां आपण आपल्या आयुष्यास निराळें वळण दिलें पाहिजे. आपल्या नवऱ्याचें आपल्यावर प्रेम नाहीं काय ? नाहीं असें कसें म्हणावें? मला मोठेपणा प्राप्त व्हावा, मला माझ्या बुद्धीला क्षेत्र सांपडावें म्हणून लालनाथांनीं मनोनिग्रह थोडा थोडका केला काय? गृह चांगले चाललें असतां बायकोला आपलें शिक्षण चालू ठेवण्यास जे स्वातंत्र्य त्यांनीं दिलें तितकें कोण देणार आहे. त्यांनीं मजवर जो विश्वास टाकला तो देखील प्रेमाची दृढता असल्याशिवाय टाकला काय? एवंच सर्व गोष्टी पाहतां प्रेमाची दृढताच लालनाथांच्या ठायीं दिसून येते. परमानदांसारख्या पोरास या लालनाथांच्या दृढतेची कांहीं तरी कल्पना येईल काय? मला शिकणें शक्य व्हावे म्हणून त्यांनी आपला खर्च २९ रुपयांत आटपून मला सर्व पैसे पाठविले, इतका तरी स्वार्थत्याग परमानंदांस शक्य होईल काय ? प्रेमाचे प्रदर्शन करण्यास लागणाऱ्या चेष्टा करण्याचे लालनाथ शिकले नसतील. पण माझ्यासारख्या सुशिक्षितेनें त्यांस महत्त्व कां द्यावें? आपण उलट लालनाथांनां या सर्व गोष्टी शिकविण्याची खटपट कोठें केली. आपण जर लालनाथांनां सांगितलें असतें कीं मी जरी आज सतरा वर्षें लग्न झालेली आहे तरी माझी प्रेमविषयक अद्‌भुतरसाची तहान शांत झाली नाहीं तर लालनाथांनां आपल्या बायकोचाच अनुनय करणे शिकवितां आले नसतें काय?

आपणांस स्वतःला प्रौढा समजून परमानंदांसारख्या तरुणाच्या वेड्या आणि गूढ अनुनयास उत्तेजन देणे हे चांगले नाहीं. लालनाथांनी परमानदांनीं मजविषयीं जी लक्षपरता दाखविली तिच्याविरुद्ध आक्षेप घ्यावयास हवा होता. पण त्यांनी तो घेतला नाहीं याचे कारण काय बरें? यूरोपियन स्त्रीपुरुषामध्ये जें केवळ संभावित सामोपचाराचें दळणवळण असतें, ते आपणांस नाहीं, आपण आक्षेप घेतल्यास परिचित आपणच गांवढळ ठरू आणि आपल्या बायकोविषयीं आपण विनाकारण संशय घेतो असे होईल असे वाटून परमानंदांच्या लक्षपरतेस लालनाथांनीं आक्षेप घेतला नाहीं, ही गोष्ट माझ्या लक्षांत आला नव्हती काय? आली होती. तरी देखील परमानंदांच्या लक्षपररेस का बरें उत्तेजन दिलें. आपण उत्तेजन दिले याचे कारण दुसरें तिसरें कांहीं नसून आपल्या मनांतील लोभ होय असे नंदिकेस एकदम वाटलें. आपणांस कांहीं अनिष्ट वळणाच्या मुलींची संगति लाभली होती. पुरुषापासून देणग्यांचा स्वीकार करावयाचा, त्यांचे आभार मानावयाचे पण त्यांनां फार लगट करूं द्यावयाची नाहीं असें करणाऱ्या कांहीं मुली आपल्या हॉस्टेलमध्यें होत्या. त्या मुलींच्या वागणुकीस कांहीं मुली गैर समजत; तर कांहीं मुली तसली वागणूक म्हणजे विशेष हुशारीची समजत. तसल्या स्वार्थसाधु मुलींचें आपणांकडून न कळत अनुकरण झाले नाहीं काय?

येणेप्रमाणें नंदिकेच्या मनांत विचार घोळत होते. घरीं येऊन पहाते तो लालनाथ आपल्या

करतां जागत बसले आहेत आणि जेवण अगदीं तयार आणि गरम ठेवून कॉफी करण्याचें साहित्य निजण्याच्या खोलींत आणून ठेवून आपली वाट पहात आहेत. ते पाहून त्यावेळेस नंदिकेस जो आनंद झाला त्या आनदांत तिने लालनाथांचे आवेशानें चुंबन घेतले.

---

## प्रकरण २३ वें.

## बाळंतीण.

नंदिकेच्या खासगी इस्पितळांत एक तरुण स्त्री बाळंतपणासाठी आली, ती एकदर पोषाखावरून साधारण बऱ्या प्रतीच्या घराण्यांतली दिसत होती. तिचे नाव तिने सांगितलें आणि ते नंदिकेने लिहून घेतले.

नंदिका एका बाळंतपणाचे ७५ रुपये घेत असे, त्यांपैकी कमींतकमी २५ रुपये आगाऊ घेत असे. त्या बाईपाशी नंदिकेच्या कंपाउडरणीनें पैसे मागितले, तेव्हां तिने आपल्या हातातील एक पाटली काढून तिच्या हाती दिली. नंदिकेला ही स्त्री आली ती मोटारींतून एकटीच आली तेव्हां थोडेसे आश्चर्य वाटलें होतें. पण अलीकडे स्त्रियांमध्ये आपल्या इच्छेनें इस्पितळांत जाण्याची प्रवृत्ति वाढत आहे, व सुशिक्षित स्त्रिया चांगल्या निर्भय होऊं लागल्या आहेत असे वाटलें आणि खासगी इस्पितळांत हिंदु बायका देखील एकटयाच निर्भय-पणे आतां येऊ लागल्या इत्यादि विचार तिच्या मनांत येऊन तिच्या एकटेच येण्याचे नंदिकेच्या मताप्रमाणे स्पष्टीकरणहि झालें होतें. पण दुपारीं तिच्या कपाउण्डरणीने जेव्हां त्या स्त्रीने पैसे न देता पाटली काढून दिली हे नंदिकेला कळले तेव्हां याच्या पाठीमागे काहीं तरी गुह्य आहे असा तिचा समज झाला. तथापि विशेष आपल्या नज-रेस कांहीं आलें नाहीं असेंच तिनें दाखविलें, आणि जास्त चौकशी न करतां पाटली अडीच तोळ्याची आहे, अदमासानें किंमत नक्की काय होते तें उद्यां कळवीन, असें बाळंतपणास आलेल्या स्त्रीस सांगितले.

ती स्त्री साधारणपणे २०।२१ वर्षांची मुलगीच दिसत होती. तिने आपले नांव मिसेस पद्मावती हिरवे असे सांगितले होते.

दुसऱ्या दिवशी सकाळीं ती स्त्री बाळंत झाली. तिला मुलगी झाली. प्रसूतीनतर स्त्रीची अशी प्रवृत्ति दिसू लागली की, ती आपल्या मुलीकडे कांहींच लक्ष देईना. ती मुलाला पाजी, पण मुलाचे प्रेम आपणांस लागू नये म्हणून प्रयत्न करण्याकडे तिची प्रवृत्ति असे. नंदिकेने सेविकेस एवढच सांगून ठेवले होतें की त्या बाईपाशीं तिच्या घरच्या स्थितीसंबंधाने कांही एक चौकशी करू नका.

तुमच्या सुरक्षित प्रसूतीसंबंधानें कोणास तार वगैरे करावयाची आहे काय? असा नंदिकेने प्रश्न विचारला असतां मला कोणाला कांहीं एक कळवा-वयाचे नाहीं असें उत्तर त्या स्त्रीने दिले, तेव्हां "बरे आहे" एवढेच नंदिकेनें म्हटले. त्यानंतर दोन तीन दिवस गेले तरी नंदिकेने जास्त चौकशी केली नाहीं.

चवथ्या-पाचव्या दिवशीं नंदिकेनें कांहीं गोष्टींची पुस्तके तिला आणून दिलीं. नंदिका वारंवार खोलीत जरी येई तरी स्नेहयुक्त दृष्टीनें पाहून स्मित करण्याशिवाय ती कांहींहि करीत नसे. पण ते स्नेहयुक्त स्मित त्या स्त्रीचें अंतः-करण आकर्षित करून तिला आश्वासन देते झालें.

पुढें एके दिवशी नंदिका त्या नवीन अर्भका-कडे पहात होती तेव्हां त्या मुलीचा चेहेरा तिच्या आईसारखा आहे हें तिला दिसलेंच. तरी तो कोणा तरी ओळखीच्या मनुष्यासारखा दिसतो असा तिला भास झाला आणि ती चपापली. आणि आपण मुलीकडे लक्षपूर्वक पहात आहों

ही गोष्ट तिच्या आईच्या लक्षांत आली आहे, आतां आपण लक्षपूर्वक पहाण्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं कांहीं तरी बोललेंच पाहिजे असें वाटून तिनें पद्मावतीस म्हटलें "मुलगी सुंदर आहे." पद्मावतीनें ते ऐकून सुस्कारा टाकला.

मुलीच्या चेहेऱ्याकडे पाहिल्यापासून तिच्या-संबंधानें सर्व चौकशी करण्यासाठीं नंदिकेचें मन उत्कंठित झालें होतें, व यांतील गूढ आपणांस समजलेंच पाहिजे अशी वृत्ति तिच्या मनांत एक-सारखी वाढू लागली होती. तरी देखील धंद्याच्या दृष्टीनें जें तिचें नीतिशास्त्र बनलें होतें तें अधिक चौकशी करण्यास तिच्या मनाला परवानगी देत नव्हतें. पण तिला जे पाहिजे होतें तें सहजच घडून आलें. आपणांस येथे किती दिवस राहतां येईल म्हणून नंदिकेला पद्मावतीनें विचारलें—

"साधारणपणें पंधरा दिवस राहण्याची पद्धति आहे. बाळंतपणाच्या पूर्वीचे एकदोन दिवस आणि नंतरचे अकराबारा दिवस मिळून ७५ रुपये मी आकार करतें. जास्त दिवस रहावयाचें झालें तर त्याचें देणे कांहीं तरी ठरवूं जागा शिल्लक असेल तर रहावयास हरकत नाहीं. मला वाटतें पुढे पंधरा दिवस निम्मा आकार म्हणजे अडीच रुपये रोज आकारीन. तुम्हाला किती दिवस रहा-वयाचें आहे ?"

"मला तोंड लपवायला दुसरी जागा सांपडे-पर्यंत !"

"तुम्हीं असें कां बोलतां ?"

"तुम्हाला माझा इतिहास समजला म्हणजे मी हें कां बोलतें हें समजेल. पण माझा इतिहास सांगावयाचा म्हणजे दुसऱ्याच्या कानीं कटकटच करावयाची !"

"पेशंटचा सर्व इतिहास जितका समजेल तितका आम्हांस हवाच असतो, पण आम्हांस कोणाचीहि फाजील चौकशी करतां येत नाहीं, किंवा लोकांचीं गुह्यें काढून ध्यावींत ही इच्छा ठेवतां येत नाहीं. तुम्हांस देखील आम्हीं प्रश्न केले त्यांत तुमचें बाळंतपण पहिलेंच काय एवढाच प्रश्न केला. तुमचा इतिहास समजला तर आम्हाला तुम्हीं मुलीच्या प्रकृतीसाठीं कसें जपलें पाहिजे यासंबंधानें सूचना करतां येतील. आईच्या गर्भारपणीच्या मानसिक स्थितीचा मुलावर काय परिणाम होतो तो लक्षांत आणून तुम्हांस जो सल्ला द्यावयाचा तो मी देऊं शकेन."

"मुलीच्या हितासाठीं जरी तुम्हाला सर्व इति-हास सांगणें मला भाग आहे. तथापि दुसऱ्या एका कारणासाठीं तरी मी तुम्हांस सर्व इतिहास कळविणार होतेंच."

"तें कोणतें कारण?"

"तें कारण माझा वृत्तांत सांगितला तर तुम्हास कळेलच. माझी नागपुरास ओळख बरीच आहे, आणि मी नर्सचा धंदा करणारी असल्या-मुळे स्त्रियांच्या सरकारी इस्पितळांतील पुष्कळ नर्सेस मला ओळखतात आणि यासाठीं मी त्या इस्पितळांत गेलें नाहीं. मी विधवा आहें आणि मला मूल झालें आहे यावरून माझ्यासंबंधानें जास्त सांगणें आवश्यक नाहीं. मी अनीतीनें आयुष्य घालविणारी असेन असा माझ्याविषयीं तुमचा समज होणें स्वाभाविक आहे. पण तशी गोष्ट नाहीं. माझ्या हातून चूक एकदांच घडली आहे, आणि त्या प्रसंगीं ती चूक माझी कितपत आहे हें माझें मलाच समजत नाहीं. मी माझ्या ओळखीच्या नर्सेसनां भेटूं इच्छीत नाहीं; कां कीं, नर्सेसमध्यें मी "नाकानें कांदे सोलणारी"म्हणून प्रसिद्ध होतें आणि या धंद्यांतल्या इतर स्त्रियांची त्यांच्या कधीं कधीं दिसून येणाऱ्या आक्षेप घेण्या-जोग्या वर्तनाबद्दल कानउघाडणी करीत होतें. व यासाठीं अनेक नर्सेस माझें उणें केव्हां दृष्टीस पडेल म्हणून टपलेल्या होत्या. त्यांनां माझी लाज चव्हाठ्यावर आली असें कळलें म्हणजे दोन बोटें स्वर्ग उरेल. माझ्यासंबंधीं खोट्यानाट्या गप्पा

त्यांनीं अनेक पिकविल्या होत्या आणि त्या गप्पा देखील माझ्या अधःपातास कारण झाल्या असतील."

"लोकांमध्यें केवळ उठलेल्या खोट्यानाट्या गप्पा एखाद्या स्त्रीच्या अधःपातास कशा कारण होतील?"

"लोकांच्या खोट्यानाट्या गप्पांचाहि परिणाम होतो ही गोष्ट तुम्हाला दिसून येईलच. अमुक नर्स वागणुकींत जरा अघळपघळ आहे असा तिच्या संबंधाने एकदां बोभाटा झाला म्हणजे ती नर्स कांहीं डॉक्टरांमध्यें बरीच लोकप्रिय होते. ज्या नर्सच्या नीतीसंबंधाने बोभाटा डॉक्टरांच्या कानावर अगोदरच गेला असेल तिच्यासंबंधानेंच डॉक्टरमंडळीमध्येंच केवळ नव्हे तर तिच्याशीं संबंध येणाऱ्या अनेक मंडळींत नाना प्रकारच्या अपेक्षा उत्पन्न होतात. आणि त्या नर्सेसनां मदत करतांना तसल्या प्रकारची अपेक्षा डॉक्टरमंडळींच्या मनांत असली म्हणजे नर्सेसचा आयुष्यक्रम अधिकाधिक कठीण होऊं लागतो. ज्या डॉक्टरमंडळीच्या साहाय्यानें नर्सेसचा धंदा चालणार त्या डॉक्टरमंडळींनां झिडकारणे नर्सेसनां सोपें नसतें."

"तुमचें म्हणणे असे कीं, ज्या डॉक्टरनीं तुम्हांस मदत केली त्या डॉक्टरनींच तुम्हाला पुढें फशीं पाडले."

"होय."

"तुमच्याशीं फार स्नेह करणारे आणि शेवटीं तुम्हांला फशीं पाडणारे डॉक्टर कोण?

"परमानंद."

"काय, परमानंद!"

"होय, तुम्ही चपापल्यासारख्या दिसतां याचे मला आश्चर्य वाटत नाहीं. ते तुमच्या ओळखींचे आहेत हें मला ठाऊक आहे मी तुम्हाला देखील त्यांच्या बरोबर दोनचारदां पाहिलें होतें."

"मला आश्चर्य वाटतें याचें कारण मी परमानंदांस फार सद्गुणी मनुष्य समजत होतें."

"तर मग त्यांनीं आपले प्रताप तुम्हांला दाखविले नसतील. मी देखील त्यांनां फारच सद्गुणी समजत होते व तुम्ही त्यांच्याशीं वागतांना अजून तरी जपून वागा एवढेच तुम्हांस मी सांगतें, एवढेंच नव्हे तर तुमच्या इस्पितळांत येण्यांत माझा उद्देश जितका ओळखीच्या स्त्रिया टाळाव्या हा होता तितकाच तुम्हांस सूचना द्यावी हा होता."

"पद्मावतीबाई, तुम्ही मजकडेसच आला याबद्दल मी तुमचे आभार मानते. तुम्ही येथें आहां तोपर्यंत तुम्ही केवळ पेशंट या नात्याने न वागतां पाहुण्या आहांत असे समजा. मी तुमच्याकडून एक पै देखील घेणार नाहीं. मी तुम्हांस तुमची पाटली परत देवविते."

"डॉ. परमानंद याची व तुमची किती दिवसांची ओळख आहे?"

"आज बरीच वर्षे ओळख आहे."

"तर मग असें होण्याचा संभव आहे कीं तुम्हांस त्यांचेच म्हणणे खरें वाटेल. तुमची त्यांची बऱ्याच दिवसांची ओळख असून ते सद्गुणी आहेत अशीच तुमची त्यांच्याविषयी समजूत राहिली आहे."

नंदिकेला नुकताच झालेला देखावा आठवला आणि उत्तर काय द्यावे याची तिच्या मनांत थोडीशी पंचाईत उत्पन्न झाली. तथापि ती धैर्य सांवरून म्हणाली 'जरी तुमच्या म्हणण्यावरून मी त्यांच्या विरुद्ध एकदम निकाल देणार नाहीं तरी तुमचे म्हणणे खोटे आहे; असें चौकशी किंवा विचार केल्याशिवाय मानण्याचेंहि कारण नाहीं."

"तुम्हांस चौकशी करावयाची असेल तर त्यानां एवढेंच कळवा कीं पद्मावती हिरवे तुमच्याकडे आली आहे; व तुम्ही त्यांस बोलवा आणि ते येतील कां पहा."

"बरें, तेंहि करूं. तुमचा एकंदर काय वृत्तांत आहे तो तर सांगा."

"डॉ. परमानंद हे प्रथमत: मला अनेक ठिकाणीं काम देऊन मदत करीत. त्यांच्या शिफारशीमुळे मला अनेक ठिकाणी बोलावणीं आलीं व फी देखील चांगली मिळाली. डॉ. परमानंद यांचे साहाय्य मला पुष्कळ होई. त्यामुळे मला त्याच्याविषयीं अत्यंत कृतज्ञता वाटे आणि त्यांच्या उपकाराचें उतराई आपण कसे होऊं असें वाटे. त्यांतल्या-त्यांत असें होऊं लागलें कीं आपण मोठे दु:खी-प्राणी आहोंत, आपलें लग्नहि होत नाही. आमच्या जातींत मोठया मुली नाहींतच म्हणून त्यांनीं गोष्टी सांगण्यास सुरवात केली आणि त्यामुळें त्यांच्याविषयीं माझ्या मनांत बराच कळवळा उत्पन्न झाला. त्यांनीं आपल्या दु:खी आयुष्यक्रमाचीं चित्रे रगवावींत आणि "मला माझे आयुष्य व्यर्थ वाटते" याप्रकारचीं वाक्यें वारंवार बोलावींत. हे आपल्या अविवाहित स्थितीबद्दल वारंवार दु:ख प्रदर्शित करीत. त्यावेळीं मला असें वाटू लागले कीं हे आपली माझ्याशी लग्न करण्याची इच्छाच मला कळवीत आहेत. तथापि यामुळे मला प्रथम आनद झाला नाही. थोडेसे संकटच वाटले. दुसऱ्यांदा लग्न व्हावें अशी माझी इच्छा नव्हती असे नाही. पण ब्राह्मणाबरोबरच माझा पुनर्विवाह व्हावा अशी इच्छा होती. पण कांहीं दिवसांनी पुन्हां लग्न व्हावयाचे ते ब्राह्मणाशींच व्हावें ही माझी इच्छा देखील कमी झाली. ब्राह्मण स्त्रियांचीं ब्राह्मणेतरांशी कितीं लग्नें झालीं याची परमानंदांनीं मला बरीच उदाहरणे दिलीं व त्याचा त्यानां उपयोगहि झाला. डॉ. परमानद ब्राह्मण नाहींत एवढ्याच करतां ते मजबरोबर लग्न करण्यास अपात्र आहेत असे मला वाटेनासे झालें. निरनिराळ्या जातींत लग्नें झाली म्हणजे देशांत एकमेकांविषयी प्रेम कसे वाढतें याचे डॉ. परमानंद वर्णन करीत, तथापि जातिभेद जावा म्हणून अकांडतांडवं करणारे लोक कसे केवळ बोलके सुधारक असतात हेंहि त्यांनीं मला सांगितले; आणि नागपूरच्या एका प्रभु वकीलाचें त्यांनीं उदाहरणहि दिले. या प्रभु वकीलाची एक मुलगी चांगली शिकलेली आहे. तिचें व एका तरुण ब्राह्मणाचें एकमेकांवर प्रेम जडले. तो ब्राह्मण चांगला सुशिक्षित आहे, उमरावतीला वकीली करतो तरी देखील निरनिराळ्या जातींत लग्न-व्यवहार वाढावे म्हणून म्हणणारा बाप हें लग्न होऊं देत नाहीं, अशा तऱ्हेच्या बोलक्या सुधारकांच्याहि गोष्टी त्यांनीं सांगितल्या."

"आहेत ते प्रभु वकील मला माहीत! त्यांची मुलगीहि माझ्या ओळखीचीच आहे; बरं पुढें?" नंदिकेनें म्हटले.

"ती गोष्ट सांगण्याचा त्यांचा दुसरा एक उद्देश असा होता कीं, ब्राह्मण लोक ब्राह्मणेतराशीं लग्न लावावयास तयार नाहींत आणि ब्राह्मणेतर मात्र ब्राह्मणाशी लग्न लावण्यास हपापले आहेत अशी गोष्ट नाहीं आणि जो ब्राह्मणेतर ब्राह्मणांशी लग्न लावावयास तयार होतो त्यास त्याच्या आप्तांकडून पुष्कळच त्रास होता."

"हें अगदी खरे आहे. जातीबाहेर लोक लग्न लावतात ते प्रेमासाठीं लावतील किंवा तशी गरज पडली म्हणून लावतील. बरें, मग काय झालें?"

"परमानंदांशी लग्न करण्यास माझ्या मनाची हळू हळू तयारी होऊ लागली."

"परमानंदांनीं तुमच्यापाशी प्रत्यक्ष लग्नाची कधीं गोष्ट काढली काय?"

"प्रत्यक्ष तोंडाने त्यांनीं प्रपोझल केले नाही. जणुं काय नकार मिळण्याचा टाळावा म्हणून प्रपोझ करणे ते लांबणीवर टाकू पहात आहेत असा त्यांच्या एकंदर वागणुकीवरून माझा ग्रह झाला."

"तुम्ही त्यांनां मुद्यावर आणायची खटपट केली काय?"

"मी केली नाहीं; मला तसें करावयास नको होतें. मला तसें करण्यास संकोच वाटत होता. माझ्या मनांत चोरून असे वाटत होते कीं विधवा स्त्रीनें लग्न करणें हा गौण पक्षच आहे. आणि पुन्हां लग्न करण्याचा दिवस आपणच जवळ ओढणे अयोग्य आहे. केवळ दुसऱ्याच्या आग्रहानें आपण पुन्हां लग्न करण्यास संमति दिली अशी आपल्या मनाची समजूत करून घेतां यावी अशी माझ्या मतांत गुप्त इच्छा होती."

"तुम्ही म्हणता तें मात्र अगदी स्वाभाविक वाटते. बरें, मग?"

"एके संध्याकाळी त्यानी मला घरीं जेवावयास बोलावलें. त्या जेवणाच्या वेळेस त्यांनीं शांपेनची बाटली काढली. शापेन चागली गोड असते वगैरे त्यांनीं मला सांगितलें. शापेनसंबंधीं मी ऐकलें होतें पण ती मी कधीं घेतली नसल्यामुळे एक तऱ्हेची जिज्ञासा जागृत होऊन मला ती घ्यावीशी वाटली आणि मीं घेतली. आणि तेव्हां त्यानीं मला आग्रह करून पुष्कळच पाजली, तेव्हां माझ्या मनाचा माझ्यावर ताबा राहिला नाहीं आणि नंतर त्यानीं जेव्हां माझ्याशीं लगट केली तेव्हां त्यांनां प्रतिकार करण्यास मी असमर्थ झालें. व पुढें त्यांनी आपल्या मोटारींतूनच मला सकाळीं उजाडण्यापूर्वी घरीं पोंचविलें."

डॉ. नंदिकाबाईचे या संभाषणांतील शापेनच्या उल्लेखाकडे लक्ष वेधले आणि त्यानीं विचारलें "शांपेन तुम्ही पूर्वी कधीं घेतली होती काय?"

"कधींच नव्हती."

"मग या वेळेस तुम्ही कशी घेतली?"

"कशी घेतली म्हणून काय सांगूं? दुर्दैव आडवें आलें म्हणून घ्यावयाची बुद्धि झाली! पण त्यावेळची एक गोष्ट आठवते की, मी प्रथम नको म्हटलें. पण त्यांनीं सांगितले कीं, "ही शांपेन गोड आहे, मादक नाही. ही स्त्रियांसाठीं मुद्दाम केलेली आहे. स्त्रिया स्वतःच्या खर्चाने शांपेन घेत नाहींत पण जेव्हां कधीं पुरुषांनीं त्यांचें आदरातिथ्य करावयाचें असेल तेव्हां पुरुषांनीं स्त्रियांस शांपेनयुक्त जेवण द्यावें असा इंग्लंडांत आणि त्याचप्रमाणे इंग्लंडांत जाऊन आलेल्या येथील शिष्टवर्गात प्रघात आहे. तुम्हांस जेव्हां यूरोपीयन "आय्. एम्. एस्." मधल्या मंडळीबरोबर जेवावे लागेल तेव्हां शांपेन घ्यावयाची नाहीं असें म्हणून कसें चालणार? यूरोपीयन मेहूण जेवावयाला बोलावले म्हणजे शांपेन द्यावीच लागते." येणेप्रमाणे बोलून आम्हां दोघांचीं आयुष्ये जणूं काय एक होत आहेत आणि त्यांची गृहिणी म्हणून मला यूरोपियन लोकांशी मिसळावें लागेल इत्यादि चित्रे त्यांनीं माझ्या त्यावेळेस मनांत उत्पन्न केली, व पुढे म्हणाले "तुम्ही एक घोटभरच घेऊन पहा!" हें त्यांचें बोलणें ऐकून मी एक घोटभर शांपेन घेतली, ती गोड लागली, व मी तेव्हां ताबडतोब सर्व ग्लास रिकामा केला! माझा ग्लास रिकामा झाल्याबरोबर त्यांनीं तो ताबडतोब भरला. व कांहीं वेळानें तोहि मी रिकामा केला पुढे तिसरा का चवथा ग्लास ओतल्यानंतर त्यांनीं दुसऱ्या एका बाटलींतील दारू त्यांत मिसळली आणि म्हणाले कीं, "मद्ये एकत्र मिसळावीं कशी हें एक शास्त्र आहे. त्यावर सुशिक्षित अभिरुचीच्या लोकांकडून पुस्तकेंहि लिहिलीं गेलीं आहेत." मी ते मिश्रण प्याले पण मला तें गोड मुळींच लागले नाहीं. तेव्हां परमानंद मला म्हणू लागले कीं, "तुमची जीभ अजून सुशिक्षित झाली नाही, आणि म्हणून तुम्हाला या मिश्रणाची लज्जत समजत नाही." ते मिश्रण मी प्याल्याबरोबर त्याचा परिणाम मला जाणवूं लागला. आणि वृत्ति आनंदी बनूं लागली. आणि त्यांनी जी टीका केली त्या टीकेंतील "जीभ सुशिक्षित झाली नाहीं" हे शब्द ऐकल्याबरोबर मला हंसें कोसळले; आणि हळू हळू मद्याचा परिणाम माझ्या अंगावर होत आहे, असें वाटलें.

कारंजातील पाणी ज्याप्रमाणें उसळी मारतें त्याप्रमाणें माझें रक्त उसळी मारीत आहे काय असें मला वाटत होतें."

"त्याचा अर्थ असा कीं, दारू तुमच्या अंगांत चांगलीच चढली होती."

"चांगली चढली होती असें मला वाटत नाहीं. कारण मी काय करीत आहें याची मला चांगलीच जाणीव होती."

हे शांपेनचे खेळ ऐकून आपण कोणत्या कचाटींतून निसटलों असें नंदिकेस वाटल्याशिवाय राहिलें असेल काय? नंदिका पुढें म्हणाली,

"या गोष्टीला किती दिवस झाले?"

"आतां साडे नऊ महिने झाले हें तर सहज सांगतां येईल."

"म्हणजे डॉ. परमानंद तेथे आल्यानंतर दोन तीन महिन्यांतलीच ही गोष्ट आहे!"

"होय, डॉ. परमानंद आल्यानंतर दोनचार दिवसांतच त्यांची व माझी ओळख झाली "

"बरें, या जेवणानंतर पुढें त्यांची वागणूक कशी होती?"

"त्यांनीं पुढें दोन तीन दिवसांनीं पुन्हां रात्रीं जेवायला येण्यासाठीं मोटार पाठविली, पण मी गेलें नाहीं. त्यांनींच मजकडे यावें म्हणून मी त्यांस निरोप पाठविला पण ते आले नाहींत. अर्थात् त्यांनीं लग्नाची गोष्ट त्यानंतर काढलीच नाही त्यांचें जाणें नागपुरास तुमच्याकडे जास्त होऊं लागलें व तुम्हांस प्रॅक्टिसमध्ये मदत करण्याची इच्छा त्यांनां होऊं लागली."

"कामठीला कोणी नर्सेस आहेत काय म्हणून मी एकदां चौकशी केली होती पण त्यांनीं कोणी नाहींत म्हणून सांगितले होते."

"अर्थात् त्यांच्या मनांत माझी व तुमची गांठ पडूं द्यावयाची नव्हती. पण खरोखर त्यांनीं भेट होऊं दिली असती तरी त्यांच्या दृष्टीने मोठें बिघडलें नसतें. पण मी गर्भार आहें हे त्यांस ठाऊक नव्हतें. मी गर्भार नसतें. तर मी त्यांची किती जरी निंदा केली असती तरी त्यांचा वाईटपणा केवळ मला कर्णोपकर्णींच कळला आहे असें भासविलें असतें आणि अशा कर्णोपकर्णीं आलेल्या माहितीवर विश्वास ठेवूं नये असें ऐकणारानें उलट मला सांगितलें असतें. परमानदांनीं केलेली माझी फसवणूक मी केव्हांच सांगितली नसती. हेंच तर काय पण दुसऱ्या स्त्रीच्या संरक्षणासाठीं देखील सांगण्याचा माझा धीर झाला नसता."

"पण खाई त्याला खवखवे असे असतेंच कीं नाहीं?"

"त्यांनीं त्या दिवसापासून माझी विचारपूस देखील केली नाहीं. आतां पुढे काय करावें याविषयीं मला प्रश्न पडला आहे. मला असें वाटतें कीं आतां परत कामठीला न जातां दुसरे कोठे तरी निघून जावें; पण कोठे जावें हें समजत नाहीं. शिवाय या मुलीसाठीं काय करावें हेहि समजत नाहीं."

"तुम्ही मुलीच्या पोषणासाठीं खर्च त्यांच्यापासून मागून घेतला पाहिजे."

"असेंहि करण्यास अडचण वाटते कां की, मुलगी पोसण्याचा खर्च त्यांनी १०।१५ रुपये दिला तरी त्याने काय होणार आहे? त्याच्या चौपट पांचपट रुपये मी सहज मिळवीन. त्या दहा पंधरा रुपये महिन्याने मी श्रीमंत होईन असे नाही. आणि मला त्यांच्यापासून मुलगी झाली असे जर लोकांत प्रसिद्ध झाले, तर मला कोणतेंहि चांगले घर आपला उंबरठा देखील चढूं देणार नाहीं. माझी नुकसानभरपाई कधींच होणार नाहीं. माझी तृप्ति सूडानेच होईल. परमानदांनां गोळी घालून ठार मारावें अशीच मला बुद्धि होऊं लागली आहे. किंवा त्यांनां ठार मारण्यासाठीं जें कौटिल्य करावें लागेल ते करावें. त्यांनां आतां मुद्दाम

नादाला लावावें आणि एक दिवशीं त्यांनां वीष घालून मारून टाकावे असेहि विचार माझ्या मनांत येत आहेत. ज्या मनुष्याने माझ्या आयुष्याचा नाश केला आहे, त्याने भरपाई करणे शक्य नाही. त्याचा नाश केल्यानतर मी फांशी गेले तर मी माझ्या आयुष्याचा शेवट गोड झाला असें समजेन. माझ्या मुलीचें कांहींहि होवो, मी मुलीस कोणा तरी खिस्ती मिशनच्या हवाली करून सुखाने मरेन!"

"पण परमानंदांनीं तुमच्याशी लग्न लावलें तर?"

"ते शक्यच नाही. कां की, असल्या नरपशूपाशी जन्म घालविण्याची तयारी करणे यासारखी नीचत्वाची दुसरी गोष्टच नाही."

"पद्मावतीबाई, तुम्ही जितके डॉ. परमानंदांस दोषी समजतां तितके जग समजावयास तयार नाही. फार काय तर ज्याने अनेक स्त्रियांच्या नीतिमत्तेचा खराबा केला आहे, असा पुरुष श्रीमत किंवा अधिकारी असला तर त्याला मुलगी देण्यासाठीं पुष्कळ लोक धडपडतील. परमानदांच्या ज्ञातीत मोठयाशा वयाची मुलगीच नाही म्हणून तर त्यांचें लग्न अजून झालें नाही. तथापि ते जर ब्राह्मण असते आणि त्यांनी अनेक नर्सेसनां दगे दिले असते तरी त्यांनां अनेक प्रौढ व सुशिक्षित मुली सांगून आल्या असत्या एवढेच नव्हे तर त्यांच्या पाठीमागच्या वर्तनाकडे कानाडोळा करून काही सुशिक्षित मुली आपण होऊन लग्नाला तयार झाल्या असत्या. त्या म्हणाल्या असत्या की पुरुष म्हणजे शुद्धाचरणाचे क्वचितच असणार! एवढेंच नव्हे तर आपले पुरुष शुद्धाचरणी असतील ही अपेक्षाच फार थोडया स्त्रियांना असते. तर मग पुरुषाचें वर्णन उकरून कशास काढा आणि आपला चांगल्या लग्नाचा फायदा उगाच कशास गमवावा असेंच त्यांनां वाटते.

तुम्ही आपल्या जिवावर उदार झाला आहां पण तुम्ही सूड कोणावर घेत आहांत. परमानंदांचा खून झाला आणि तुम्ही फांशी गेलां तर तुम्हीं दोघेहि सुटून जाल. आणि तुम्हां दोघांनां या मुलीचा छळ करण्याचें पाप मात्र लागेल."

"पण मला जगांतून जावेंसे वाटत आहे आणि मला जर जगांतून जावयाचें आहे तर जातां जातां आयुष्याचा सत्यनाश करणाऱ्या परमानंदांनां ठार मारून जावें असें वाटत आहे."

"पद्मावतीबाई, तुम्हांस डॉ. परमानंदांचा जो राग येतो त्याबद्दल तुम्हांस मी दोष देत नाहीं. तो स्वाभाविक आहे. पण जर तुम्हीं गर्भार नसतां तर तुम्हीं त्यांचा इतका राग केला नसता असे वाटते. तेव्हां आतांचा जो तुम्हांस राग येत आहे तो केवळ नीतीच्या बलवान् भावनांमुळें उत्पन्न झालेला राग नाहीं. तर आतां आपण पकडीत सांपडलो गेलो त्यामुळे संताप होऊन त्यानतर उत्पन्न झालेला राग आहे, परमानदानी केवळ आपल्या दौर्बल्याचा फायदा घेऊन आपणांस भ्रष्ट केलें ही तुमची भावना असती तर तुम्हीं परमानदांचा अगोदरच सूड घेतला असतां, पण तुम्हीं पकडल्या गेल्यानतर त्यांस दोष लावीत आहां आणि सूडाची भाषा बोलत आहांत."

"भ्रष्ट झाल्याच्या दु:खापेक्षां भ्रष्ट झाल्याच्या प्रसिद्धीचें दु:ख मला जास्त वाटते हे तुम्ही मला दाखवीत आहां, आणि हे खरेंहि आहे; व हे माझें दौर्बल्य असेल कदाचित; पण मी तुम्हांस असें विचारतें कीं, डॉक्टरीणबाई, ज्या परिस्थितींत मी पडल्ये त्या परिस्थितीत तुम्हीं असतां तर तुम्हीं कांहीं निराळे केलें असतें काय?"

"बाई गे, मी तुला मुळींच दोष देत नाहीं. पण सूडाची कल्पना सोडून दे. परमानंदांचा आज जो तुला इतका राग आला आहे तो केवळ परमानंदांच्या कृत्यामुळे नव्हे तर एखादी विधवा

स्त्री आई झाली असतां समाज त्या स्त्रीला वाईट रीतीनें वागवितो त्यामुळें आहे. व यासाठीं, आतां आपली स्थिति कशी सुधारावी इकडे लक्ष दे. मुलीच्या कल्याणाच्या दृष्टीने विचार कर."

"त्यासबंधाने देखील माझा विचार ठरलेला आहे. कोण्यातरी ख्रिस्ती मिशनच्या हवालीं मुलगी करून मग मी वाटेल तिकडे जाईन. मी मुलगी आतां तुमच्या हवालीं करतें, तुम्हीं तिला वाटेल तिकडे पाठवावें!"

"सध्यांच्या शुद्धिसंघटनेच्या चळवळीच्या दिवसांत मुलीला ख्रिस्त्यांच्याकडे कसे पाठवावे." असे डॉ. नंदिका म्हणाली. आणि पुढे म्हणाली "येथील शुद्धिसंघटनेसबंधाने खटपट करणारे जे लोक आहेत त्यांच्याकडे चौकशी करते. शुद्धीचे पुरस्कर्ते कोण बरें ते वकील?" असे तिनें शेजारच्या खोलीत बसलेल्या नर्सला विचारले. "दादासाहेब गेगणे" असे त्या नर्सने उत्तर दिले. पुढे नंदिका म्हणाली कीं, "याबद्दल स्वामी ब्रह्मगिरींसहि कळवावे; तेहि कांहीं योग्य मार्ग सुचवितील."

---

## प्रकरण २४ वें.

## विहंगमेच्या वृत्तींत पालट.

विहंगमेला आपल्या नवऱ्याच्या वारवार दिसून येणाऱ्या वृत्तीमुळे आपल्या भवितव्यासंबधाने बरीच निराशा झाली होती, व आपली बहीण ज्याप्रमाणें सुखाने व डौलाने आयुष्यक्रम चालवीत आहे तशा डौलाने आपणांस चालवितां येणार नाहीं, हे ती समजून चुकली. तथापि स्पष्ट दिसणारे भवितव्य टाळण्यासाठीं धडपड करावी कीं, भवितव्यालाच गोड समजण्याचा प्रयत्न करावा याविषयीं तिचा अनिश्चय होता. आपणांस केवळ शहरांतल्या इतर स्त्रियांप्रमाणेच वागावे लागणार याबद्दल तिला वाईट वाटत होते. आपण आपल्या रुसण्याफुगण्यानें नवऱ्यास सरकारी नोकरीसाठीं खटपट करावयास लावूं शकणार नाहीं. नवरा नोकरींत न शिरण्याचा हट्ट धरून बसला आहे. या गोष्टी लक्षांत येऊन तिला बरेंच दुःख झाले होतें, व तिने आपल्या बहिणीस नुकतेच एक पत्र लिहिलें होते, त्यांत नवऱ्यास महत्त्वाकांक्षा नाहीं याबद्दल आपलें दुःख प्रदर्शित केले होतें. तिच्या पत्राचे एका आठवडयांत उत्तर आले. त्या पत्रानें तिची दृष्टि एकदम पालटून गेली व ती आपल्या बहिणीचीं अनेक पत्रे पहिल्यापासून वाचूं लागली. अलकनंदा पत्रे क्वचितच लिही. ती पत्रातून कांहीं घरगुती गोष्टी लिहीत असे. पण स्वतःच्या आयुष्यक्रमावर विचार व्यक्त करणारीं पत्रें क्वचितच लिही. एक दोन पत्रें तशा प्रकारचीं होतीं. तीं तिने जपून ठेवलीं होती. विहंगमा आतां पूर्वीपासूनचीं पत्रे पाहूं लागली आणि ज्या बहिणीला मी मत्सरस्थान समजत होते त्या बहिणीपेक्षां मी किती तरी बरी आहे असे तिला वाटूं लागले असावे असे तिच्या वृत्तीवरून दिसूं लागले होतें.

अलकनंदेचीं पत्रें.

(१)

ता. १।१०।२०

चि. वि. माझ्या लाडके विहगमाताई, बऱ्याच दिवसात मी पत्र लिहिले नाहीं म्हणून तू माझ्यावर रागावली असशील. आणि मी रागावण्यासारखे वर्तन केले असे तुला वाटले तर त्यात नवलहि नाही. परतु कलेक्टरच्या अधिकारावर असलेल्या पुरुषाच्या बायकोला करावी लागणारी कर्तव्ये थोडीथोडकी नाहीत. यांची कलेक्टरच्या जागेवर आतां कायमची नेमणूक झाली आहे. इतके दिवस ते मधून मधून कलेक्टर होते, त्यामुळे मी ते कलेक्टर असतां उटकमंडलाच राहिले होते. आतां कलेक्टरीणबाई म्हणून या गांवांत प्रथमच येऊन राहिलें आहे. एक जिल्हा म्हणजे सुमारे दहा लाख लोकसंख्येचा मुलूख, म्हणजे कोल्हापूरच्या

राज्याएवढें राज्य म्हणेनास कां, एवढ्या मुलु-खाचा कारभार त्यांनां पहावा लागतो, म्हणजे बादशहाचे प्रतिनिधि म्हणून राज्य करावें लागते. तर अशा प्रसगीं कलेक्टरच्या बायकोचे काम म्हणजे सोपें नाही. त्यांनां सकाळी दररोज काम करावयाला सर्व प्रकारें सोपें जावें म्हणून मला गृहकृत्याकडे पहावें लागतें. कित्येकदा मलाच भेटण्यासाठीं लोक येतात, आणि अमक्या शाळेचा बक्षिससमारंभ आहे तर तिकडे आपण बक्षिसें वांटायला या म्हणून विनंति करतात. पुष्कळ मतलबी लोक आमच्याशीं ओळख आहे एवढ्याच गोष्टीचा फायदा घेतात आणि तसा त्यांनीं घेऊं नये म्हणून आम्हांस तर फारच जपावें लागते, कां कीं, कांहीं मंडळी तर आमच्याशीं ओळख करण्याकरतां मुद्दाम समारंभ उकरून काढतात, आणि त्या निमित्ताने आम्हांस भेटावयास येतात. माझी मैत्रीण मिसेस लिटलटन (मच्छलीपट्टणच्या कलेक्टरची बायको) हिचाहि अनुभव तोच आहे. पुष्कळदां कोठे लायब्ररी किंवा वाचनालय उघडण्याचे निमित्त करावें, त्यासाठीं कलेक्टरसाहेबाच्या "मेमसाब"ला गांठावें आणि त्यांनीं चांगलें काम आहे असे समजून त्याला पांच रुपये वर्गणी द्यावी आणि मागाहून कळावें कीं, त्या वाचनालयांत राजद्रोही वर्तमानपत्रें घेतलीं जातात. या सगळ्या गोष्टी मिसेस लिटलटनने सांगून ठेवल्या होत्या व मला अनुभवहि तसाच आला.व यासाठीं गांवांतलें राजकारण कसें काय आहे, सरकारचे मित्र कोण आहेत, शत्रू कोण आहेत, इत्यादि गोष्टींकडे आमच्यासारख्या स्त्रियांनांहि लक्ष द्यावें लागतें. कलेक्टरचे काम राज्यसरक्षणाचें आहे. तसेंच राजनिष्ठ प्रजेचे कल्याण पहाण्याचेहि आहे; आणि त्या कामाचा बोजा कांहीं मानाने स्त्रियांवर देखील पडतो आणि आम्हांला जे लोक कोठे तरी अध्यक्ष होण्यास बोलावतात त्यांच्याविषयीं आम्हांस दक्ष रहावें लागतें.

मला आपला संसार मोठ्या दक्षतेनें चालवावा लागतो. कां कीं आमच्या पदवीच्या माणसाला जेवढे पैसे येतील तेवढे अपुरेच पडतात. त्यांनीं मला सांगितलें कीं पेन्शन घेतल्यानंतर आमचें उत्पन्न एकदम कमी होते, आणि आज त्यांनां अठराशें रुपये महिना पगार आहे तरी पेन्शन घेतल्यानतर साडेचारशें रुपये देखील महिना हातीं लागणार नाहींत आणि खर्च मात्र वाढलेला असणार. त्यावेळेस मुलें इग्लडांत शिकावयास असतील त्यांचा खर्चच दरमहा पांचसहाशे रुपये येईल. यासाठीं आमचा सर्व खर्च ज्या रकमेच्या व्याजांतून निघेल इतकी रक्कम शिल्लक टाकलीच पाहिजे. नाहीं तर आम्हाला कायमचें इंग्लंडमध्यें जाऊन राहिलें पाहिजे. इंग्लडमध्ये जाऊन राहिलें म्हणजे पेन्शन दुप्पट मिळतें व मुलें घरूनच शाळेंत जाऊं शकतात; व त्यामुळें त्यांच्या रहाणीचा खर्चहि कमी येतो. पण तेंहि नेहमीं शक्य नाहीं. यासाठीं आमच्या गरीबीने रहाणीचा व मुलांचे शिक्षण करविण्याचा म्हणजे दरमहा दीडदोन हजाराचा खर्च भागण्यासाठीं पेन्शनीच्या मदतीस निदान दोन लाख रुपये तरी कमींत कमी शिल्लक पडली पाहिजे हे उघड आहे. यासाठीं सबंध पगार शिल्लक कसा पडेल या विवंचनेंत मी आहे. आम्हाला रहावयाला बंगला आहे त्याचें भाडेच दीडशें रुपये जातें. हें भाडें घरवाल्यास पूर्णपणे मिळत नाहीं हे खरें, कां कीं, घराभोंवतीं असलेल्या बागेच्या जोपासनेचा सुमारें १२५ रुपये खर्च कलेक्टरनें कापून घ्यावा आणि उरलेले २५ रुपये डागडुजीसाठीं आपल्यापाशीं अनागत ठेवावे असा येथला रिवाज आहे, तो आम्हाला तसाच चालविला पाहिजे. आमचा घरवाला एक जमीनदार आहे. आमचा सर्व रहाणीचा खर्च त्यांनां पगाराशिवाय जो प्रवासाबद्दलचा वगैरे भत्ता मिळतो त्या भत्त्यांतून व जी "वर मिळकत" असते तींतून काढला पाहिजे. "वर

मिळकत" अलीकडे कमी होऊं लागली आहे. सरकारी अधिकाऱ्यांनां मान देण्याची जुन्या घरंदाज लोकांची जितकी प्रवृत्ति होती तितकी अलीकडे राहिली नाहीं. इकडील कित्येक भिकारडया आणि पाजी लोकांनीं बिगार बंद करावी म्हणून खटपट चालविली आहे. यांत ज्यांची प्राक्टिस चालत नाही असल्या वकीलांचाच भरणा आहे. हे लोक मोठया देशहिताच्या गप्पा बोलतात, पण हे लोक फारच मत्सरी आहेत. बिगारीविरुद्ध मोहीम करण्यात त्याचा हेतु असा कीं कलेक्टरला जीं माणसें फुकट काम करावयाला मिळतात तीं मिळूं नयेत. कलेक्टर दौऱ्यावर निघाला म्हणजे त्यास भत्ता आकारतां येतो, व ज्या गांवाला तो जाईल त्या गांवची मंडळी त्याच्या इतर गरजा भागवितात. कलेक्टरचा तंबू गांवातली मंडळी ठोकून देतात. त्याच्याकरतां गांवांतला कोणी सद्गृहस्थ अगदीं चांगलें दूध देणारी गाय आणून दूध काढून देण्याची व्यवस्था करतो, भाजीपाला, धान्य व लोणी हीं देणगीच्या रूपाने मिळतात. या सर्व गोष्टी गांवकरी कलेक्टरसारख्या मोटया पदवीच्या माणसाचा मान रहावा म्हणून करतात. म्हणजे प्रवास करीत असतां आम्हांस भत्ता मिळतो, रहाणीचा खर्चहि पडत नाहीं. प्रवासामुळें आमची किफायत होते ही गोष्ट खरी पण कलेक्टर जास्त दिवस फिरतीवर असल्यामुळे प्रजेचें काम लौकर आणि चांगलें होतें. पण या सर्व गोष्टींकडे अलीकडे मत्सरी आणि बदमाष लोकांनीं लक्ष दिलें आहे. ते बिगार बंद व्हावी म्हणून खटपट करतात, तर कित्येकांस वाटते कीं कलेक्टर फार दिवस फिरून जिल्ह्याला लुटून खातो. आम्ही दक्षता ठेवीत नाहीं असे नाहीं. जी मंडळी आमच्या स्वागतासाठीं पैसे खर्च करतात त्या मंडळीकडून आम्हीं दिलेल्या मालाचा मोबदला मिळाला अशा पावत्याहि लिहून घेतों. हें आम्हांस देणगी देणारी मंडळी केवळ आपखुशीनें करतात. पण हे राजकीय चळवळ करणारे लोक, आम्हीं सक्तीनें त्यांच्यापासून पावत्या लिहून घेतों अशी अफवा उठवितात, तें बहुधा खरें नसते; कारण तसें असतें तर कित्येक ठिकाणीं कलेक्टरचें, सर्व खाद्यें पुरवून स्वागत करण्यासाठीं उलट गांवांतल्या शिष्ट मंडळींत जी चुरस लागते ती लागती ना. लोक खोटया गप्पा कशा उठवितात व खासगी गोष्टीस वाईट स्वरूप कसे देतात याचा मला स्वतःला अनुभव आहे. गेल्या दिवाळीच्या प्रसंगी मला सुमारे २५०० रुपयांची प्राप्ती झाली. मला कांहीं गांवांतल्या मंडळींनी दिवाळीच्या प्रसगीं देणग्या दिल्या. व मला भाऊ नसल्यामुळें भाऊबीज साजरी करतां येणार नाही म्हणून मी दु:खी आहे असे कळल्याबरोबर भाऊ म्हणून देणगी देण्यासाठी अनेक मंडळी मुद्दाम आमच्या बंगल्यावर आली. तेव्हां कांहीं मंडळीच्या पोटांत दुखलें. गांवांतला एक टारगट वर्तमानपत्रकार या सहानुभूति दाखविणारांची यादी छापून काढणार होता. हे त्यांनां कळल्याबरोबर त्या लेखकाला बोलावणे पाठवून त्यानी तुझ्या राजकीय लेखांत राजद्रोही मजकूर येतो, तूं आपले वर्तन सुधारलें पाहिजे, नाहीं तर तुझ्यावर खटला करण्यात येईल अशी त्यास तंबी दिली. तेव्हां तो वर्तमानपत्रकार भ्याडासारखा चूप बसला. आम्ही त्याचा पुढचा अंक पाहिला त्यात माझ्या भाऊबीजेसंबंधाने उल्लेखच नव्हता. तेव्हां त्यांनी त्या वर्तमानपत्रकाराच्या अंगचें पाणी जोखले. ते म्हणाले, वर्तमानपत्रकार पक्का गाढव आहे. त्यानें ही संधि साधून भाऊबीजेचा उल्लेख करावयास हवा होता, म्हणजे त्याच्यावर पुढे खटला करणे उलटें कठीण गेलें असतें. याचें आणि कलेक्टरचे वैयक्तिक भांडण आहे आणि यामुळे कलेक्टर या मनुष्यावर खटला करण्याची शिफारस करीत आहे असें याला बोलतां आले असतें. पण हे त्या मूर्खाच्या लक्षांत आलें नाहीं.

अलीकडे लोकांची वृत्ति पालटत चालली आहे. आणि आम्हां अधिकारी वर्गास सरकारचे गुलाम म्हणून लोक वर्तमानपत्रांतून बोलूं लागले आहेत. स्वाभिमानी हिंदी नोकरांनीं नोकऱ्या सोडून द्याव्यात असेहि मत प्रतिपादूं लागले आहेत. मौज मात्र अशी की, मुनसफी किंवा सबजज्जची जागा मिळविण्यांत अपयश आलेले वकीलच असल्या प्रकारचीं मते पुढे मांडतात. असल्या वकीलाची, वकीलानी वकीली करणे सोडून द्यावे असे मत निघाल्यापासून फार त्रेधा उडाली आहे. कांहीं असो, पुढचे दिवस पूर्वीप्रमाणें सुखाने जाणार नाहीत असे पुष्कळ सरकारी नोकरांस वाटू लागले आहे. पुढे कशी स्थिति होणार आहे हे कळत नाही. ते म्हणतात की, लोकांच्या बरळण्याकडे लक्ष देण्याइतका अधिकारी वर्ग दुर्बल खास नाही, पण आपल्या कुल्यास कायद्याचे पांघरूण कसे घालावे यासबंधाने चर्चा अधिक चालते. आणि आपणांस पूर्वीप्रमाणें पगार जरी चालू राहिले तरी " वर मिळकत " कमी होईल अशी आम्हांस भीति वाटू लागली आहे. आम्ही सिव्हिल सर्व्हिसच्या मंडळीनीं पगार पुरत नाही म्हणून बोभाटा सुरू ठेवलाच आहे.

तुझी
अक्का

(२)

लाडके ताई, ३।६।२६

माझा एकंदर आयुष्यक्रम मोठा सुखाचा आणि इतर स्त्रियांस मत्सर वाटण्याजोगा असेल अशी तुझी समजूत झाली आहे असें दिसतें; पण काय सागू तायडे, मला वाटते कीं, माझ्यासारखी अभागिनी कोणीहि नसेल. नवऱ्याला मोठा अधिकार असेल पण बायकोला काय त्याचें! आपल्यासारख्या हिंदु बायकाचा नवरा कितीहि मोठा असला तरी त्याचा हिंदुपणा जात नाहीं. मला नवरा मारीत नाहीं एवढ्या बाबतींत तो यूरोपीयन बनला असेल पण मला किती दुष्टपणानें वागवितो याची तुला कल्पना देखील नसेल. मी माझ्या घरची स्थिति मोठी चांगली आहे असे दाखविते, आणि कोणी यूरोपीयन मडळी भेटावयास आली म्हणजे आम्ही मोठ्या स्मितपूर्वक मुद्रेनें त्यांचें स्वागत करतो पण आतली खरी गोष्ट कोणास ठाऊक असेल बरे?

आज असें वाटते कीं, माझे लग्न जर कोणा गरीबाबरोबर बाबानीं करून दिले असतें तर ती फार चागली गोष्ट झाली असती. त्याचें माझे लग्न झाले तेव्हा पहिले काहीं दिवस सुखाचे गेले पण पुढे त्याचा राग मला वारंवार दिसून येऊ लागला. आपल्याला सासऱ्याने ठकविले असे त्यास वाटते. आमचे लग्न ज्या वेळेस झाले त्यावेळेस लग्नाच्या बाजारांत आय्. सी. एस्. क्वचितच येत असत;त्यावेळेस त्यांचा बाजारभाव देखील ठरला गेला नव्हता, आणि त्यामुळें त्या दिवसांत पुष्कळ वाटणारा पण अलीकडे फारच थोडा वाटणारा फक्त ३००० रुपये हुंडा त्यांस मिळाला. पण त्यावेळीं तो हुडा सुद्धां बाबांनी जांवयाची योग्यता पाहून आपखुषीनें दिला. जांवयांनां हुडा मुळींच मागतां आला नसता. कां कीं, त्यांनां बायको मिळाली ती देखील त्यावेळेस तितकीच दुर्मिळ होती.त्यावेळेस पंधरा सोळा वर्षांपर्यंत वयानें वाढलेल्या आणि म्याट्रिकपर्यंत शिक्षण झालेल्या मुली नव्हत्याच, त्यामुळें आय्. सी. एस्. वर जेवढ्यांच्या उड्या पडत त्यापेक्षांहि जास्त मागणी सुशिक्षित, उपवर, एखाददुसरीच असलेल्या मुलीला होती; व त्यावेळेस अशा मुलीला मागणी घालण्याचा प्रसंग पुरुषावरच येई. मागणी जर पुरुष घालणार तर त्यास हुंड्याची गोष्ट कशी काढतां येईल, अशी तेव्हां स्थिति होती म्हणून त्यांनां हुंडा मागतांहि आला नाहीं आणि जसजशी शिकलेली उपवर मुलींची संख्या वाढूं

लागली तसतशी त्यांनां आपण होऊन पुरुषांनीं मागणी करणें कमी होऊं लागलें. आय्. सी. एस्. झालेले लोक थोडेच वाढले आणि त्यांवर अधिक उडया पडूं लागल्या! त्यामुळे हुंड्यांचे दर वाढत आहेत. अलीकडे सिव्हिल सर्व्हिस पास झालेल्यांनां २५ पासून ५० हजारांपर्यंत हुंडे मिळाले आहेत. जेव्हां एखाद्या आय्. सी. एस्. ला पंचवीस किंवा पन्नास हजार रुपये हुंडा मिळाल्याचें ऐकिवांत येई तेव्हां आपणांस सासऱ्याने तितक्या रकमेने बुडविले असे त्यांनां वाटूं लागे. आणि नुकतीच अशी एक गोष्ट ऐकली कीं एका सासऱ्याने ५०००० रुपये देऊन एक जांवई मिळविला आणि पुढे त्या जांवयाचें इंग्लंडमध्यें एका मुलीशी लग्न झाले होते असे दिसून आलें. तेव्हां त्या इंग्रज मुलीला नुकसनभरपाई म्हणून पंचवीस तीस हजार रुपये द्यावे लागले आणि सोडचिठ्ठी मिळवावी लागली. ती रक्कम देखील सासऱ्यासच भरावी लागली. तेव्हां तो मुलीचा बाप माझ्या नवऱ्याच्या दृष्टीनें अनुकंपेचे स्थान न होतां मोठी अनुकरणीय व्यक्ति झाला, आणि त्या सासऱ्याचे उदाहरण मला दाखविण्यांत येई.

बाबांच्या मृत्यूपासून त्यांची वृत्ति तर अगदीच पालटून गेली आहे. बाबांनी आपली सर्व इस्टेट धर्मादायाकडे लावली हे तर त्यांस अगदींच आवडले नाही. ते बाबांनां सडकून शिव्या देतात. बाबा आणि गोदावरी मिडवाईफ यांच्या संबधाविषयींचा वारवार उल्लेख करतात. आणि बाबा जेव्हां बुलढाण्याला राहिले होते, व पुण्यांतल्या सस्था त्यांच्या इस्टेटीकडे लक्ष देत होत्या तेव्हां मला मुद्दाम बाबांची समजूत करण्यासाठीं पाठविलें होतें. मी बुलढाण्यास गेले तेव्हां मला जी कामगिरी सांगितली होती ती ही कीं बाबांची सर्व इस्टेट त्यांनीं मलाच द्यावी. तुझ्या नवऱ्याला सर दामोदररावांची मोठी इस्टेट मिळणारच आहे, तेव्हां तूं कांहीं गरीब नाहींस आणि मी थोरली बहीणच गरीब ठिकाणीं पडलें आहे असे बाबांस दाखवून ती सर्व इस्टेट मी मिळवावी या हेतूनेच माझी रवानगी करण्यांत आली होती. मी केवळ पैशाच्या लोभामुळेच गेले असे नाहीं. मी उलट बाबांच्यापाशीं रहाण्याचा सुयोग अनेक वर्षांनी येणार म्हणूनच गेले. बाबासाहेबांचा त्यांनीं लग्नाच्यावेळेस अपमान केला ही गोष्ट बाबासाहेब विसरले नाहींत. मी थोरल्या जांवयांनां एक दिडकी देखील देणार नाहीं म्हणून बाबा उघडपणे अनेकांपाशीं बोलले होते, आणि मिळेल तर सर्व तुलाच मिळेल किंवा धर्मादायाकडेच सर्व रकम जाईल ही गोष्ट आम्हांस स्पष्ट झाली होती; व यासाठी मला सर्व इस्टेट मिळावी आणि ते न जुळल्यास अर्धी मिळावी यासाठीं मी खटपट करावी म्हणून त्यांनीं मला पढवून पाठविले होते. पण बाबांचाहि त्यांच्यावर जो राग होता तो नाहींसा झाला नाही. अनकॉव्हेनंटेड सर्व्हिसच्या मनुष्याच्या इस्टेटीवर काव्हेनंटेड सर्व्हिसच्या मनुष्याने डोळा कशास ठेवायला पाहिजे इत्यादि गोष्टी बाबा बोलूं लागले. बाबांच्या कडून स्वतःला इस्टेट मिळविण्यासाठीं नवरा फार दुष्ट आहे, मला केव्हा घरांतून हाकलून देईल याचा कांहीं नेम नाही, त्यांनीं तसे केले तर माझी स्थिति काय होईल या गोष्टी सांगून नवऱ्यासाठीं मला इस्टेट नको तर नवरा वाईट असल्यामुळे संरक्षण म्हणून तरी मला पाहिजे असेंहि मी बोलावें म्हणून त्यांनीं मला सांगून ठेवले होते. व मी त्याप्रमाणे बोललेहि. तेव्हां बाबांनीं मला फार निराळे उत्तर दिलें. ते म्हणाले कीं नवरा फार दुष्ट आहेना, तर तूं त्याचीं दुष्टपणाचीं उदाहरणे बाहेर काढ, मी त्याच्या अनीतीच्या वर्तनाचा पुरावा तुला लागेल तितका देतो, तर तूं आतांच्या आतां डायव्होर्ससाठी नवऱ्यावर खटला कर. नवऱ्यापासून पूर्णपणे वियुक्त हो. नवरा मेला असें

म्हणून कुकु पुसटून टाक म्हणजे मी तुला दीड-लाख रुपये देतों. तुला आजच रुपये दिले तर काय होणार आहे हें मला ठाऊकच आहे. ती इस्टेट तुला मिळाली म्हणजे तुझा नवराच तिचा फायदा घेत जाईल; आणि मला दररोज गाढव म्हणत जाईल. तेव्हां नवऱ्याविरुद्ध गाऱ्हाणीं करून पैसे मिळविण्याचा सल्ला देखील लागू पडला नाहीं. बाबांनीं दीड लाख रुपये कोणत्या अटीवर देण्याचे कबूल केलें ही गोष्ट मी त्यांनां कळविली नाहीं. मला असे वाटले कीं बाबा मुद्दाम कांहीं तरी अभद्र बोलत आहेत किंवा अशक्य अशा अटी घालीत आहेत. बाबा वारल्यानंतर मात्र बाबांनी कोणत्या अटीवर दीड लाख रुपये द्यावयाचे कबूल केले ते त्यांनां मी सांगितलें. तेव्हां मी जणूं काय त्यांचे दीड-लाख रुपये बुडविले अशा तऱ्हेची त्यांनी आपली समजूत करून घेऊन वागणूक ठेवण्यास सुरवात केली. त्यांनीं मला म्हटले. "बाबा काय म्हणतात तें मला कळवायचें तुझें काम होतें. तू हे लपवून कशासाठीं ठेवलेंस; मजवर डायव्होर्ससाठीं खटला तुझ्याकडून उपस्थित होऊं द्यावा किंवा नाहीं हे मीं ठरविले असतें. तूं बाबांनां आपल्या शब्दांत पकडावयाचे होतेस. डायव्होर्ससाठीं तूं माझ्यावर खटला केला असतास तर त्यांत तुझें काय बिघडलें असतें. तूं व्यभिचारी आहेस हे सिद्ध होत नव्हतें, आणि मजवर जरी व्यभिचाराचा आरोप तुला करावा लागला असता तरी तो खटला मी न लढतांच तुझ्या तर्फेचा होऊं दिला असता; आणि तुला दीड लाख रुपये मिळण्यासाठीं आपण हा खटला उपस्थित होऊं दिला आणि पैसे मिळविले आणि पैसे मिळाल्यानंतर पुन्हां लग्न केलें हें देखील लौकरच जगजाहीर करतां आलें असतें, व जगानें आपणां दोघांनां शहाणेच म्हटलें असतें."

बाबा वारले आणि त्यांनीं सर्व इस्टेट धर्मादायासाठीं ठेवली याचें मला मुळींच दुःख झालें नाहीं. मला असें खात्रीनें वाटतें कीं, तो पैसा माझा म्हणून माझी समजूत असती व माझ्या पैशाचा उपयोग वाटेल तसा करण्याचा त्यांनां अधिकार आहे अशी त्यांची समजूत असती व आमच्या घरांत दररोज भांडणें चालू रहातीं. आमच्या हाती पैसा आला नाहीं, त्यामुळें भांडणें मिटलीं अशांतला भाग मुळींच नाहीं. पण त्या भांडणास कायमचे स्वरूप येत नाहीं. आपले सर्व पैसे धर्मादाय केले यात बाबांनीं आपण किती मूर्ख आहोंत ते जगाला दाखविलें आहे असें ते म्हणाले; "बाबानीं तीन लाख रुपये धर्मकार्यास दिले म्हणजे त्यांचा मोठा लौकिक होईल असें त्यांस वाटते पण त्यांचा हा सारा भ्रम आहे. जो मनुष्य ई. ए. सी. पलीकडे जाऊं शकला नाहीं, त्याने तीन लाख रुपये कसे मिळविले असणार हे सर्व जगाला समजतच आहे. मला एवढा पगार असून मी अजून दोन लाख रुपये देखील शिल्लक टाकूं शकलो नाहीं. त्या धर्मदायासाठीं दिलेल्या रकमेचा उद्देश धर्मादाय नसून जांवयाचा सूड घ्यावयाचा होता, दुसरे कांहीं नाही. आम्ही तरुणपणाच्या जोरांत एखादे कांहीं बोललो असलो तर ते जन्मभर लक्षांत ठेवून जांवयाला बुचाडण्यासाठीं जे धर्मादाय करतात त्यांनां चांगले कोण म्हणणार आहे? त्यांनीं आपल्या मुलींनां बुचाडलें दुसरे काहीं केले नाहीं," असे ते वारवार बोलूं लागले. तेव्हां मलाहि राग आला. मी म्हटलें कीं, "बाबांनीं पैसा अन्यायानें मिळविला नाहीं. त्यांनीं पूर्वी जमीनी खरेदी केल्या त्यांची किमत पुष्कळ वाढली, म्हणून त्यांच्यापाशीं तीन लाख रुपये जमले. तुमच्या बाबांनीं आपल्या अमदानींत कसे पैसे मिळविले याची मला पूर्ण माहिती आहे. मला बाबांनीं पैसा ठेवला नाहीं, याबद्दल तुम्ही कां रागावतां? मला त्याबद्दल दुःख मुळींच होत नाहीं." तेव्हां ते आणखी चिडले आणि म्हणाले कीं,

"तुझ्या बाबांनीं तीन लाख रुपये धर्मादायासाठीं ठेवले याचें कारण तुम्हीं त्यांच्या मुली नाहींत अशी त्यांची समजूत असली पाहिजे." जेव्हां आईच्याच आचरणावर शिंतोडे टाकण्यापर्यंत त्यांची मजल आली तेव्हां मी अगदीं शांतपणें म्हटलें कीं, "तुम्हीं म्हणतां कीं, मी वेडी तें खरेंच. बाबांनीं मला डायव्होर्ससंबंधाचा जो सल्ला दिला तोच मी ऐकावयाचा होता; म्हणजे आज तुम्हीं जे बोललां तें ऐकावयाचा प्रसंग आला नसता;" ते हां ते हंसावयास लागले, आणि म्हणाले कीं, "तूं रागावलीससें दिसते. तुला थट्टेतलें भाषण समजत नाहीं." मी पुढें कांहीएक बोललें नाहीं; तथापि पैशाची हाव कोठपर्यंत जाईल याची मला कल्पना आली आहे. विहंगमे, तूं माझ्यापेक्षां किती तरी सुखी आहेस असे मनाला वाटल्याशिवाय रहात नाहीं. आतां माझे धिंडवडे यापेक्षां आणखी किती होणार याची मला आज कल्पनाहि येत नाहीं.

तुझ्या सुस्थितीबद्दल तुझा मत्सर करणारी, तरी देखील तुझें आयुष्य माझ्या आयुष्यासारखें होऊं नये म्हणून ईश्वरापाशीं प्रार्थना करणारी,

अक्का.

हीं पत्रें वाचून विहंगमेच्या मनांत अनेक विचार आले. आपण अत्यंत अभागी आहोंत आणि आपली बहीण फार सुस्थितीत आहे असा विचार तिच्या मनांत आला. पण तिच्या मनांत आपल्या नवऱ्यावर त्यामुळें अधिक प्रेम उत्पन्न झालें कीं काय हें सांगतां येत नाहीं.

---

## प्रकरण २५ वें.

## छाटी जाळून टाकली.

एके दिवशीं स्वामी ब्रह्मगिरि यांनीं आपली छाटी घेऊन जाळून टाकली. त्या दिवसाची हकीगत जराशी मौजेची आहे. संन्यासधर्मांत आतां कांहीं उरलें नाहीं, संन्याशाचे कपडे अंगावर ठेवण्यांत आपण काय करीत आहों तर केवळ लफंगेगिरीस उत्तेजन देत आहों अशी त्यांची समजूत झाली असावी. आणि ती समजूत होण्याचें कारण काय तें नक्की समजत नाही. त्यांच्या छाटी जाळण्याच्या पूर्वीची एक दोन दिवसाची हकीगत अधिक सूक्ष्मपणे पाहिली पाहिजे.

अस्सल कट्टर पुढारी चारघोडे हे स्वराज्यपक्षाशीं आपण संबद्ध आहोत म्हणून खूष नव्हते. त्यांच्या मनांत एकसारखी चलबिचल चालू होती. यांच्यापुढे प्रश्न पडला होता तो हा कीं, प्रतिसहकारपक्ष म्हणून जी टोळी स्थापन झाली तिला मिळावे कीं आपला कट्टरपक्ष स्वतंत्रपणें चालवावा. हे कट्टर म्हणून ठाऊक होते पण ते स्वराज्यपक्षाशीं संबद्ध झाले होते, पण हे त्यांचे करणे देखील थोडेबहुत नाखुशीचें होते. महात्मा गांधींनीं स्वराजिस्ट पक्षाला लोटांगण घातल्यामुळें कट्टरांची स्थिति विलक्षण झाली होती आणि त्यामुळें गांधींवर जीं नागपुरचीं माणसें फार रुसलीं त्यांत चारघोडे होते. स्वराज्यपक्ष व प्रतिसहकारपक्ष यांची जेव्हां गट्टी तुटली तेव्हां प्रतिसहकारपक्षास "नोकरीपक्ष" इत्यादि विशेषणे लावून त्याचें नांव बदनाम करण्याची स्वराजिस्टांची खटपट सुरू झाली होती व. स्वराज्यपक्षीयाना पूर्वीं कट्टरांनीं विशेषणे दिलीं होतीं आणि कट्टरांविषयीं स्वराजिस्ट अविश्वास दाखवीत होते. आपलीं सर्व तत्त्वें फसलीं तरी राजकारणांत रहाण्याचा मोह असलेल्या गांधीजींनीं स्वराज्यपक्षीयांस बेळगांवीं पाठिंबा दिल्यामुळें कट्टरहि जेव्हां स्वराज्यपक्षाला मिळाले तेव्हांपासून कट्टरांच्या भाषेतलीं विशेषणें अधिष्ठान नाहीं म्हणून रिकामीं पडलीं होतीं. हीं विशेषणें कोणाला लावावीं ही पंचाईत पडली होती. प्रतिसहकारितावादी निघून गेले तेव्हां हीं विशेषणे लावण्यासाठीं एक वर्ग तयार झाला म्हणून कांहीं कट्टरांना आनंद झाला

होता तर स्वराजिस्टांनां बलवान ठेवून त्यांच्या आश्रयानें आपलें प्रामुख्य ठेवण्याचा महात्माजींचा डाव फसला म्हणून चारघोड्यांना आनद झाला होता.

नोकरशाहीला दम कसा देतां येईल म्हणून नोकरशाहीविरुद्ध असलेले पक्ष आपापसांत भांडणे भांडत आहेत आणि नोकरशाही नामानिराळीच राहिली आहे आणि दोन्ही पक्ष एकमेकांनां शिव्या कशा देतात याची मजा पहात आहे; व आपली जनतेची संघटना करण्याची कल्पना बाजूस कशी पडत आहे हें चारघोडे वकील आपल्या व्याख्यानांत सागत असत.

चारघोडयांच्या मनांतून प्रतिसहकारवाले किंवा स्वराजिस्ट या दोघांपैकी कोणासच मदत करावयाची नव्हती, तर राजकारण पुन्हां असहकारितेच्या मार्गावर न्यावे असें त्यांस वाटत होते. चारघोडे वकील आपली मुख्य अडचण अशी दाखवीत होते कीं आपल्याला पक्षाचे तुणतुणें वाजवावयास वर्तमानपत्र नाहीं; वर्तमानपत्रे खरोखर नसावीतच असेंहि मत त्यांनी व्यक्त केले होते. तें खरे मत होते कीं थट्टेचे बोलणे होते, तें सांगतां येत नाहीं. ते म्हणाले होते कीं, इलेक्शनच्या वेळेस वर्तमानपत्रांचा परिणाम खोट्या बातम्या उठवावयास जितका किफायतवार व्हावा तितका होत नाहीं असे त्यांचे मत होते. खोट्या बातम्या उठविण्याची हुशारी ठेवणे हे निवडणुकीच्या राजनीतींत पहिले काम आहे, असे त्यांचे मत होतें. वर्तमानपत्रांत अजीबाद खोटी बातमी देतां येत नाही, व आपल्या पक्षाचे पत्र असताना आपण जर एखादी खोटी अफवा उठविली तर आपल्याच पक्षाचे लोक ती बातमी वर्तमानपत्रांत कां आली नाहीं म्हणून चौकशी करतात आणि ती चौकशी फार गैरसोईची होते असें चारघोड्यांस वाटत होतें.

चारघोडे वकील हे प्रसिद्ध घराण्यांतले पण कमी महत्त्व असलेले गृहस्थ होते. चारघोडे हे नागपुरास मालगुजार घराणें म्हणून प्रसिद्ध होते. तथापि चारघोडयांच्या घराण्यांतील एका धाकटया शाखेंतील एका पुरुषाला बरींच इस्टेट मिळाली होती आणि चारघोडे वकीलांच्या वडिलांनां चार भाऊ असल्यामुळें व वकीलांनां सहा भाऊ असल्यामुळें वकीलसाहेबांच्या वांटणीला तिसावा हिस्सा म्हणजे सालीना पांचसहाशें रुपये काय ते आले आणि दुसरें घराणें म्हणजे वकीलांच्या आजोबांच्या धाकट्या भावाचे घराणे धाकटे असतां देखील त्याला जास्त मान मिळत असे याबद्दलहि त्यांना राग येत असे. चारघोडे राजकारणांत पडले ते मवाळ जहाल एवढेच पक्ष असतांना पडले, आणि ज्याअर्थी धाकटया चारघोडे घराण्यांतील श्रीमान पुरुष रावबहादुर असून मवाळपक्षांतले होते त्याअर्थी चारघोडे वकीलांना जहालांत जाणे अवश्य होते. पक्ष जितका जास्त कडक तितका त्यांस हवा होता. जहालपक्षांतून ते पक्के असहकारी बनले आणि पुढें कट्टर झाले.

चारघोडे आपल्या राजकीय पक्षाची मडळी घेऊन ब्रह्मगिरीकडे आले आणि म्हणाले कीं आपण आमचे पुढारी व्हा तेव्हां ब्रह्मगिरि म्हणाले की मी अजून राजकारणांत कार्य करावयाचे असे ठरविलेहि नाहीं तर मी तुमचा पुढारी कसा होऊं. तेव्हां चारघोडे म्हणाले कीं "पुढारी व अनुयायी यांची सांगड कांहीं तरी एका तत्त्वामुळेच पडावी लागते असे नाही. तर जेव्हां दोन माणसें सारख्याच अडचणींत असतील तेव्हां त्यांनीं एकत्र व्हावे. आणि जी जोड झाली असेल तिचे समर्थन करण्यासाटीं तत्त्वे शोधावींत असे मला वाटते."

"आपण कोणत्या अडचणींत आहांत हे आम्हांस माहीत नाही; पण असाल कोणत्यातरी अडचणींत. पण मी कोणत्या अडचणींत आहे अशी आपली कल्पना आहे?"

"आपणाला टिकाऊ असे पाठिराखे नाहींत आणि आम्हाला पुढारी नाहींत; तेव्हां म्हटलें तुमचें आमचें जुळेल!"

"मला पाठिराखे नाहींत म्हणून कोणी सांगितलें? आणि हवेत म्हणून कोणीं सांगितले?"

"आपले आणि स्वराज्यपक्षाच्या पुढाऱ्यांचें जुळलें नाही असे कळतें. प्रतिसहकारपक्ष आपल्या विरुद्ध आहे आणि आपण दुसऱ्या कोणत्या तरी पक्षास मिळाला तर आपल्या पक्षास कोणी तरी संन्यासी हवा म्हणून त्यांनी एका शंकराचार्यांनां बोलाविले आहे. आपण आपला उपयोग कोणत्याहि पक्षास निवडणुकीच्या युद्धात होऊं देणार नाही हे देखील आपण स्वराज्यपक्षाच्या पुढाऱ्यांस स्पष्ट सांगितले. तेव्हां आपला उपयोग ज्या कार्याचा निवडणुकीशी कांहीं संबध नसेल अशा दुसऱ्या कोणत्या तरी कार्याला व्हावयाचा आहे हें उघड आहे."

"होय, मला जें कार्य करावयाचे आहे त्यांत निवडणुकीचा सबंध येत नाही."

"तर मग तुमचे आमचे जुळेल असेंच आम्हांस वाटतें. आमच्या मते देखील मुख्य कार्य निवडणुकी जिंकणे हे नसून लोकसेवा आणि लोकजागृति करणें हें आहे. आम्हांस महात्मा गांधींची तत्त्वें पहिलीं मान्य आहेत पण आमचा खादीवर विश्वास नाही!"

"तुम्हांस काय कार्य करावयाचें आहे?"

"आमची दिशाच आम्हांस कळली नाहीं. आम्ही किंकर्तव्यतामूढ झालें आहोंत. जो कार्यक्रम लोकांनां आवडेल व ज्या कार्यक्रमाला पैसा मिळेल असा कार्यक्रम आम्हांस आतां शोधून काढला पाहिजे. आम्ही आपलें आयुष्य सार्वजनिक कार्यांत खर्च करावयास तयार आहों पण आम्ही आपला देह कोणत्या कार्यासाठीं खर्च करावा हेंच आम्हांस कळेनासें झालें आहे. अनत्याचारी असहकारितेचा महामंत्र आम्ही शिकलों व लोकांस शिकविला. पण त्या मंत्रावर धंदा कित दिवस चालावयाचा."

"आपला असहकारितेवरचा विश्वास गेला काय?"

"असहकारिता अनेकांनीं एकदम केली तर कांहीं उपयोग पण आतां महात्माजींनीं रणांगणांतून पलायन केल्यामुळें आम्ही आतां उघडे पडलों आहों. आतां आम्हांस असें वाटू लागलें आहे की, महात्माजीचें अवतारकार्य संपले; ज्या लोकांनां त्यानीं आपल्याकडे खेंचलें आणि ज्यांच्या आयुष्यांतील सरळ रस्ता महात्माजींनीं बिघडवला त्यांनां आतां सोडून देऊन गांधीजी सर्व पक्षाची स्तुति मिळवूं पहात आहेत; आणि आपल्या प्रामाणिकतेबद्दल आपली वाहवा चोहोंकडे व्हावी आणि आपलें आत्मचरित्र वाचले जावे म्हणून घाणेरडया घाणेरड्या गोष्टींचा कबुलीजबाब देत आहेत. त्यांनां हे एक कळले आहे कीं, आपण गुन्हा कबूल करीत जाणे हे लोकांची तारीफ मिळविण्याचे सोपें साधन झालें आहे. त्यामुळे महात्माजी आपला गुन्हा मोठ्या उल्हासाने कबूल करतात, आणि तो जरी त्यांचा गुन्हा नसला तरी कबूल करतात, व त्यामुळे अनुयायांस पंचाईत पडते. आपण गुन्हा कबूल करावयाच्या प्रसंगीं प्रतिपक्षाचे म्हणणें कबूल करावयाचे, तसे त्यांनी केले म्हणजे लोकांनीं महात्माजींची तारीफ करावी; आणि वाईट लोकांच्या हातीं महात्माजी आहेत असे लोकांनीं म्हणावे आणि अनुयायांस दोष द्यावा. पुढाऱ्यानें आपला गुन्हा चटकन कबूल करण्यांत केवळ औदार्य नाहीं. मी म्हणतो कीं, तो निव्वळ स्वार्थ आहे. आपल्या अनुयायांनां फशीं पाडून आपण स्तुति मिळविण्याची ती योजना आहे."

"पुढारी आपला दोष कबूल करतो तो स्वार्थासाठीं करतो काय?"

"पुढाऱ्यानें आपल्या खऱ्या किंवा काल्पनिक चुका कबूल करण्यांत फायदा असा असतो कीं, दोष

अनुयायांवर येतो व पुढारी बेटा निसटून जातो. हिंदुमुसुलमानांचें भांडण झालें तर महात्माजी हिंदूंनांच दोष देणार एवढेंच नव्हे तर त्यांच्यातर्फे गुन्हेगारीचा कबुलीजबाब देणार. म्हणजे मुसुलमानानीं व इतर जगानें गांधींस प्रामाणिक म्हणावें व हिंदूंस वाईट म्हणावें. हे सर्व पुढारीपणाचे नखरे आमचे गुरुमहाराज पूर्ण शिकले आहेत. जे पुढारी आपले मोठेंपण रहाण्यासाठीं आपल्या अनुयायांचे बळी देतात तसल्या पुढाऱ्याविषयीं आम्हीहि सावध रहाण्यास नको काय? आम्हालाहि सावध झालें पाहिजे आणि विश्वासघातकी पुढाऱ्यास काढून टाकून नवा पुढारी मिळविण्याची खटपट आम्हांसहि केली पाहिजे. आमच्या गुरुमहाराजांपासून एक गोष्ट आम्ही शिकलों ती ही कीं, प्रामाणिकपणानें आणि साधुत्वानें वागून केवळ उपयोगी नाहीं. तर प्रामाणिकपणाचे प्रदर्शन झाले पाहिजे."

"तुम्हास जर महात्माजींचा एवढा कंटाळा आला आहे तर तुम्ही त्यांचा धिक्कार करून त्याग कां करीत नाहीं? महात्माजींवर विश्वास ठेवा म्हणून सांगणारे तुमचें व्याख्यान कालच झालें."

"अहो, ज्याच्या नावानें कुंकू लावावयाचे त्याचा सार्वजनिकपणे धिक्कार आणि त्याग तरी कसा करावयाचा? आम्हाला जर मनाजोगा गुरु मिळाला तर आम्हीं महात्माजींस तेव्हांच सोडून देऊं. आमचा धंदा पुजाऱ्याचा आहे."

"तुमच्या म्हणण्याचा अर्थ मी समजलो नाहीं" ब्रह्मगिरि म्हणाले.

"अर्थ एवढाच कीं, देवासाठीं पुजारी असतो हे खरें पण पुजारी देखील दैवत हे आपल्यासाठीं आहे हें समजतो त्याप्रमाणे देवापुढें जो नैवेद्य येतो त्याचे आम्ही सेवक आहोंत. तथापि केवळ नैवेद्यासाठीं आम्ही देशभक्तीचा गोळा होणार नाहीं. आमचा देवावर विश्वासहि असावा लागतो. आज आमचा असहकारितेवरील विश्वास उडला नाहीं. करबंदीवरील उडाला नाहीं. लोकजागृति करणें हें आमचें कर्तव्य आहे, असें आम्ही समजतों पण महात्माजींवरील विश्वास साफ उडाला आहे."

"तर मग तुम्ही मला करबंदीच्या चळवळीकडे ओढूं पहातां!"

"असेंच केवळ नव्हे तर आम्ही आज किंकर्तव्यतामूढ झाल्यामुळें आपल्यासारख्या निर्भय आणि अनेक देश हिंडलेल्या संन्याशानें आमचे पुढारीपण पत्करले तर तें आम्हांस हवें आहे. आम्हीं एकत्र झालों आहोंत याचें कारण आमचा एकाकाळीं महात्मा गांधींवर विश्वास होता; तेव्हां त्या विश्वासाच्या जोरावर आम्ही स्वराजिस्टांशीं व प्रतिसहकारवाद्यांशीं भांडलो. महात्मा गांधींच्या नांवानें पैसे मिळत होते, तेव्हां ते पैसे खर्च करून स्वदेशाभिमानी म्हणून मिरवणे आम्हांस शक्य होते पण आतां स्वदेशाभिमानी रहाण्यांत पैसेच मिळत नाहींत व आमची स्थिति कांहीं अगदीं विचित्र झाली आहे. मवाळ वर्ग नागपुरांत तर मृतप्राय झाला आहे. त्या वर्गास ज्याप्रमाणें राष्ट्रीय लोक देशद्रोही म्हणत त्याप्रमाणे आम्ही प्रतिसहकार पक्षाला शिव्या देत आहोंत पण आतां आम्ही पुढच्या कार्याला पैसा उत्पन्न कसा करावा या विवंचनेत पडलों आहो."

"पण मी तुम्हांस पैसे द्यावयास असमर्थ आहें!"

"पण आपण आमचे पुढारी असलां म्हणजे आम्हांस पैशास वाण पडणार नाहीं. महात्माजींनां पैसे मिळत याचे कारण ते गृहस्थाश्रमी असून संन्याशाचा आव आणतात म्हणून. तर प्रत्यक्ष संन्याशालाच आम्ही पुढें केलें तर आमच्यावर पैशाचा पाऊस पडेल असें आम्हांला वाटतें."

"पण मी पुढें झालों तरी तुमच्या कार्याला पैसे कसे मिळतील? आपलें अजून कार्य काय

आहे याची मला माहिती नाही. जे कार्य चांगलें असेल त्या कार्यात मी नसलो तरी पैसे मिळतीलच."

"लोक कार्याला पैसे देत नाहीत; व्यक्तीला पैसे देतात."

"छे! मला असे वाटत नाही. लोक व्यक्तीला पैसे न देतां कार्यालाच देतात, असा माझा दृढ विश्वास आहे."

"अहो, टिळक आणि विजापूरकर हे एकत्र झाले आणि त्यानी शिक्षणासाठी पैसे मागितले तर ते फारसे मिळाले नाहीत. टिळकांनी पैसाफंडासाठीं केसरीतून धडपड केली पण लाख रुपये जमायला किती वर्षे लागली. पण जेव्हा त्याच्यासाठीं पर्स फंड निघाला तेव्हां तो लाख रुपयांच्या वर झाला! तसेच त्यानी चिरोल केस गमावल्यानंतर त्यांच्यासाठीं याहूनहि मोठा फंड झाला! यावरून काय दिसतें? लोकांची श्रद्धा तत्त्वावर नसून व्यक्तींवर आहे हे उघड आहे." चारघोडे म्हणाले.

"पण मी यावरून अगदीं निराळा निर्णय काढतो. मला वाटते की, पैसे देणाऱ्या जनतेनें योग्य हुशारी दाखविली. शिक्षणाची सस्था स्थापणारा टिळक, किंवा उद्योगधंद्याच्या वाढीसाठी खटपटणारा टिळक याची किंमत बेताचीच आहे. पण सरकारपाशी भांडणारी व्यक्ति या नात्यानें त्यांची किंमत लाखो रुपये आहे हेच बाजारांत सिद्ध झालें; म्हणजे लोक कार्यालाच पैसे देतात असें यावरून दिसते!"

"कार्यासाठींच लोकांकडून पैसे मिळतात हें खरें आहे, तथापि कोणत्या व्यक्तीकडून कितपत कार्य होईल याविषयीं विचार करूनच लोक पैसे देतात. आमची अशी खात्री आहे की, कार्याचें कर्तृत्व जर एखाद्या संन्याशाकडे असेल तर लोकांचा त्या कार्यावर विश्वास जडेल एवढेच नाहीं तर त्यांनीं दिलेला पैसा चांगल्या कार्याकडेसच लागेल अशी लोकांस खात्री वाटेल. मग लोक त्या पैशाचें काय झाले याची चौकशी सुद्धां करणार नाहींत. संन्याशाचा समाजांत दर्जाच असा विलक्षण आहे?" चारघोडे वकीलांनीं स्मितयुक्त होऊन म्हटले.

"अजून छाटीवर श्रद्धा कितपत आहे?" ब्रह्मगिरींनीं विचारले.

"छाटीवर श्रद्धा पुष्कळच आहे."

"कां बरें?"

"लोकांस असे वाटतें कीं हा मनुष्य लग्न केलेला नाहीं तर पैसा मिळवून तो आपल्या मुलाला द्यावा ही दृष्टि याला नाहीं. आणि म्हणून याला दिलेला पैसा सार्वजनिक कामालाच लागेल. शिवाय संन्याशाला पैसा देणें म्हणजे लोक पुण्य समजतात. जें खाण्यापिण्यास लागत नाहीं तें सत्कार्यालाच लागत असले पाहिजे, असेंच पुष्कळांना वाटते. महात्मा गांधी कपडे सुद्धां थोडे वापरतात, व जेवण सुद्धां भाकरीचे जेवतात, यामुळें ते गृहस्थाश्रमी असले तरी त्यांनां लोक संन्यासी समजून पैसे देतात. त्यांनां मोटार हवी असते, त्यांना गावाबाहेर मोकळया जागेत रहावे लागतें व इतर सर्व खर्च मोठया मनुष्याला लागेल इतका लागतो. मोठया मनुष्याच्या एकंदर खर्चात जेवण्याकपडयाचा खर्च कितपत असतो? अर्धवस्त्राने महात्माजी रहातात यांत आम्हाला नवल मुळींच वाटत नाहीं. तो केवळ महात्मागिरीचा किंवा साधूच्या धंद्याचा युनिफार्म आहे. पण तिकडे लोकाचे लक्ष थोडेच जाते. जो मनुष्य देहदंडन करण्याची जाहिरात करतो त्याच्याकडे पैसा वहातो!"

"तर मग मी जर तुम्हाला मिळालो तर लोकांच्याकडून पैसा जमा होईल."

"अलबत होईल!"

"तर मग मला माझी छाटी जाळून टाकली पाहिजे!"

"कां बरें? जें तुमचे फायद्याचें अग आहे त्याचा तुम्ही मुद्दाम नाश कां करतां?"

"कार्याच्या महत्त्वापेक्षां जर जास्त पैसे मिळाले तर ते मला नको आहेत. पैसे केवळ जे कार्य मी हातीं घेईन त्यालाच मिळणार असतील तर ते संन्याशाच्या पोषाखाशिवाय मिळतील. माझे कार्य-ध्येय अनिश्चित असता जर सन्याशान्या पोषाखा-मुळेच पैसे गोळा होऊ लागले तर ते पैसे मलाच बिघडवतील. पैसा जमला म्हणजे मनुष्य आळशी बनतो, आणि त्या पैशाचा दुरुपयोग करू लागतो. हजारों मठांचे मालक पैसेवाले झाले आहेत ना. ते सार्वजनिक हिताच्या कामाला कोठें पैसे लावतात?"

"तर मग लोकांनीं सार्वजानिक कार्याकडे पैसे दिले पाहिजेत ही गोष्ट कशी घडवून आणणार?"

"माझा लोकांवर विश्वास आहे. जर चांगले कार्य लोकांच्या पुढे मांडलें तर त्या कामाला पैसे मिळतील अशी माझी समजूत आहे. तेवढ्या कार्यापुरती संस्था करावी आणि काम करणाऱ्यानें तें काम उत्साहानें करावें म्हणजे पैसा जमेल. त्याला माझ्या छाटीची गरज नाहीं. एखादे चागले कार्य कोणी काढले, आणि त्या कार्याकडे तो एकनिष्ठपणें लक्ष देऊं लागला तर त्याची उपजीविका चालेल व त्याच्या कार्याला पैसे मिळतील. तुम्हाला जर काही चांगले सामाजिक कार्य करावयाचे झाले आणि त्या कार्याची लोकांस गरज असली आणि तुम्ही ते कार्य आपला नित्य व्यवसाय म्हणून पत्करले तर तुम्हाला त्या कामासाठीं पैशाचा तोटा कधीं पडणार नाहीं."

"तुम्ही स्वत: कोणते तरी कार्य लोकांपुढें मांडून त्यासाठीं निधि गोळा करण्याचे योजले आहे काय?"

" मला आज कोणतेंहि, पैसे विशेष लागणारें विशिष्ट कार्य करावयाचेच नाही. मला लोकांत आशामय आनंदी वृत्ति उत्पन्न करावयाची आहे. मला जो उपदेश करावयाचा आहे तो मी एकटाच करीत राहीन. तो उपदेश मोठ्या प्रमाणावर करून त्याचा देशभर प्रसार देखील करावयाचा आहे. पण त्यासाठीं मी - संस्था काढणार नाहीं. जर माझा उपदेश कांहीं लोकांत स्फूर्ति उत्पन्न करील तर तो उपदेश आपोआपच प्रसार पावेल. ज्याच्या मनांत भरेल तो त्याचा आपल्याआपणच प्रसार करील. मोठें कार्य केल्याचे श्रेयहि मला नको आहे. मी मनांत योजिलेले कार्य झाले व त्याचे श्रेय दुसऱ्याला मिळालें तर त्यांत बिघडलें काय? मी तर असे म्हणतो कीं, त्याचे श्रेय दुसऱ्यासच मिळत जावे. तें श्रेय जर दुसऱ्यास मिळेल तर त्यास उलटे उत्तेजन मिळून त्याचा प्रयत्न अधिक होऊन कार्य अधिकच प्रसृत होईल. माझा माझ्या तत्त्वांवर इतका विश्वास आहे कीं, तीं तत्त्वें आपोआप पसरूं लागतील असें मला वाटते. मला कोण याहि सामाजिक किंवा राजकीय स्वरूपाच्या विशिष्ट कार्यात गुतावयास नको आहे. मला कर्तृत्व नको आहे. केवळ विचार करीत रहाणें, तो व्यक्त करणें एवढेंच मला कार्य करावयाचे आहे, आणि त्या विचाराचा व्यापक प्रसार करण्याचाहि बोजा मला दुसऱ्यावर टाकावयाचा आहे. राजकीय चळवळ मला हवी आहे, पण ती दुसऱ्यानें करावयास हवी आहे. आपला पक्ष करून त्या पक्षाची जोपासना करण्याचे कार्य नको आहे. मी तें कार्य हातीं घेतले म्हणजे पक्षाची जोपासनाच करण्यांत माझा वेळ जाईल. व जी तत्त्वे पुढे सारावयाची तीं मागे पडत जातील व पक्षविषयक भांडाभांड करण्यांत माझा वेळ जाईल; शिवाय एखादें चांगले लोकांनां पटेलसें तत्त्व मी उत्पन्न केलेल्या किंवा हाताशी धरलेल्या पक्षाने पुढें मांडलें म्हणजे दुसऱ्या पक्षाला केवळ आम्हाला विरोध करण्यासाठीं त्या तत्त्वास विरोध करावा लागेल. कदाचित दुसरा पक्ष असेंहि म्हणूं

लागेल कीं यांत आम्ही नवीन काय सांगितलें? हे आम्ही पूर्वीपासूनच बोलत आलों आहोंत व ते असें बोलू लागले म्हणजे मग आम्ही हे सिद्ध करावयाचे की ते तसें बोलत नव्हते.''

"तुम्हाला जे शिकवावयाचे ते असे काय आहे?''

"मला सांगावयाचे पुष्कळच आहे. जे विचार लोकांपुढे मांडावयाचे ते प्रसंगानुरूप मांडाव-याचे आहेत. आपल्या पक्षाचा बडेजाव व्हावा, आपणांस पुढारीपण यावे यासाठीं जे लोक प्रयत्न करतात त्यांस पुढारीपण मिळविण्यासाठी मला प्रत्यक्ष कोणतीच मदत द्यावयाची नाही. पण त्यांस उत्तेजनार्थ चार शब्द बोलावयास कोणतीच हरकत नाही.''

"तुम्हांला हिंदुस्थानच्या राजकीय स्थिती-विषयी कांही कळकळ नाही काय? आपण केवळ लोकांमध्ये आत्मविश्वास उत्पन्न करणे, लोकांना आशावादी करणे याचेच महत्त्व सांगत आलां आहांत?''

"मला हिंदुस्थानची जी मुख्य गरज दिसते ती लोकांमध्ये असलेल्या मनोवृत्तींत पालट होण्याची दिसते, आणि ती मनोवृत्ति पालटण्याचें काम आपले आहे असे मला वाटू लागले आहे. आणि मी आपणांपुढे लोकांच्या मनांत बदल करण्याचे काम घेतले आहे. त्यामुळे दुसऱ्या कामांवर दुर्लक्ष करणें मला प्राप्त झालें आहे.''

चारघोडे यांनीं आपला इष्ट हेतु साध्य होत नाहीं म्हणून स्वामीजींचा निरोप घेतला.

दुसऱ्या दिवशीं सकाळी स्वामी ब्रह्मगिरींनी उठून जाऊन आपली छाटी जाळून टाकली. छाटी जाळून टाकण्यासाठी ते बाहेर पडले तेव्हां त्यांच्या-पाशीं दुसरा पोषाख नसल्यामुळे यूरोपीयन पोषाख घालूनच ते बाहेर पडले. नागपूरच्या मंड-ळींनीं स्वामींस यूरोपीयन पोषाखांत प्रथमच पाहिल्यामुळें सर्व लोक त्यांच्याकडे पाहूं लागले.

त्यांनीं बर्डीवरील पोष्टआफीस जवळच्या पटां-गणांत कांहीं विद्यार्थी बरोबर घेऊन एक गोंव-ऱ्याची चिता रचली, आणि तीवर आपल्या सन्याशाची छाटी मृताप्रमाणे पसरून ठेवली आणि वर आणखी गोंवऱ्या रचून ती चिता पेटवून दिली!

ही जून महिन्यांतली सकाळची वेळ होती. चिता रचीत असतां काय चमत्कार आहे म्हणून तो पहाण्यास बरेच लोक जमले होते. लोक विचारूं लागले कीं हे काय चालले आहे? तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं "सन्यासधर्मांतील प्राण शेंकडों वर्षांपूर्वीच गेलेला आहे. कुडी तेवढी उरली आहे. तर त्या कुडीचें दहन करण्याचे काम अजून कोणी केलेंच नाही. तर तें काम मी आज करीत आहे.''

त्यांच्या छाटी जाळण्याची जाहिरात ताबड-तोब नागपूरभर पसरली. त्या दिवशीं दुपारींच शुद्धि आणि संघटना यांसाठीं एक शंकराचार्य येणार होते, तेव्हां कांहीं लोकांनां असें वाटलें कीं आम्ही संन्यासधर्माची किमन कांहीं एक समजत नाहीं असें शंकराचार्य येण्यापूर्वी लोकांस दाखविण्यासाठीं म्हणजे त्यांस अपशकून कर-ण्यासाठीं त्यांनी छाटी जाळून टाकली. निदान बर्डीवरच्या भोगळवारांनीं हाच हेतु लोकांपुढें मांडला.

---

## प्रकरण २६ वें.

## पद्मावतीचे विचार.

पद्मावतीच्या मनांतील सूडाची कल्पना कमी होऊन अपत्यसंरक्षणसंगोपनाची कल्पना वाढ-ण्यास नदिकेबरोबर झालेले संभाषण कारण झालें आणि पद्मावती आपल्या अपत्याच्या भवितव्या-संबधानेंच विचार करूं लागली. आपण आपल्या

कन्येचा त्याग केला नाहीं तर तिला पुढें गति काय आहे. याचा विचार करतां तिला त्याचे चित्र मोठे भेसूर दिसू लागले. जरी आपण मुलीचें संगोपन करण्यास तयार असलो व तिच्यासाठीं जन्मभर लोकनिंदा सहन करावयास तयार असलों तरी समाज आपल्या मुलीला सुखाने राहूं देईल काय? असा विचार करतां "नाहीं" हेच उत्तर तिच्या मनांत आले. आपल्या मुलीचे भवितव्य काय? जर ती लग्न करूं इच्छील तर सर्व कुळ-कथा समजल्याखेरीज आपल्या देशांत कोणीहि लग्न करणार नाहीं हे तिला पक्के ठाऊक होते. कुळकथा विचारली म्हणजे तिने उत्तर काय द्यावयाचे? आपण कांही बनावट कथा तयार करून ही मुलगी आपण केवळ बाळगली असे सांगावयास लागलो म्हणजे मंडळी तिचा पत्ता काढीत जाणार आणि ही आपलीच मुलगी आहे म्हणून बातमी सर्व लोकांत प्रसिद्ध होणार! मुलीच्यासाठीं आपण कोठे तरी निघून गेले पाहिजे. जेथे आपल्या ओळखीचे कोणी नाहीं अशा ठिकाणी किंवा समाजांत आपण गेले पाहिजे असे तिला वाटत होते. एकदोन दिवसांतच आपण येथून कोठे तरी दूर गेले पाहिजे असा विचार तिच्या मनांत उत्पन्न झाला. पण या बाबतीत डॉ. नंदिका तिला विरुद्ध सल्ला देत होती. डॉ. नंदिकेची अशी इच्छा होती की मुलीचे संगोपन करण्याचें कोणीं पत्करले तर पहावे. जर मूल नसलेले एखादें कुटुंब या मुलीचा स्वीकार करावयास तयार असेल तर पहावे. त्याचप्रमाणे जर डॉ. परमानंदांनी या मुलीला फसविले तर त्यांच्याबरोबरच तिचें लग्न लावून देणे अशक्य होईल काय हाहि विचार तिच्या मनांत होता.

पद्मावतीच्या मनांत सहजपणें एक दोन गोष्टी आल्या. एक तर आपण ही मुलगी आतांच हाता-वेगळी करून तिच्याच हितासाठीं खिस्ती या नात्यानें वाढू द्यावी. तसें आपण केले तरच मुलीस चांगलें भवितव्य आहे. पंढरपुरास मुलगी पाठविणें हा विचार देखील तिच्या मनांत आला. पण मुलीला तिकडे पाठविणें म्हणजे मुलीला आपण होऊन ठार मारणें आहे हेहि तिच्या मनांत आलें. पंढर-पूरच्या मुलांत जिवत रहाणारांची संख्या फार थोडी असे डॉ. नंदिका एकदां बोलून गेली होती. व त्यामुळे तोहि मार्ग बंद झाला. ज्या समाजांत मुलगी वावरत असतां तिच्या जन्माची कुळकथा लोकांस समजेल अशा भीतींत जन्म काढावा लागणार नाही अशा समाजांतच तिला जाऊं द्यावे असें तिने ठरविले. मुलगी व आपण अशीं दोघेजणहि खिस्ती झाल्यास काय हरकत आहे? हे विचार देखील तिच्या मनांत आले. व आपला खिस्ती समाजांत जाण्याचा विचार ती अधिक गंभीरपणे करूं लागली. आपण केवळ खिस्ती होऊं नये तर जोगीण देखील व्हावें व कोठे तरी लपावे हेच विचार तिच्या मनांत प्राधान्याने येऊं लागले.

---

## प्रकरण २७ वें.

## नवी आशा कीं निराशा.

संध्याकाळचे जेवण आटपून मिसेस आडेलीन हटर आपल्या मज्जातंतूंचा शीण घालविण्यासाठीं सिगारेट ओढीत बसल्या होत्या; व एल्मा संस्थेचा हिशोब लिहीत बसली होती. इतक्यांत शेवटची डांक आली व त्या डांकेने एक पत्र आले. तें पत्र वाचल्याबरोबर मिसेस हटरची मुद्रा मोठी आनंदी झाली, आणि "एल्मा, तुला फारच आनंद होईल अशी बातमी आली आहे" असे ती म्हणाली. नुकतेच आलेलें पत्र बाबासाहेब देशपांडे याचे होते. पत्र वाचून व "आपण हाती घेतलेली चौकशी अगदी लौकर फलद्रूप झाली" असें म्हणून तिने एल्माला तें पत्र दाखविले. त्या पत्रां-तील मजकूर येणेंप्रमाणें होता—

"देवीदास अत्रे यांची पुढची हकीकत पूर्णपणें कळली आहे आणि आज ते अनेक देश हिंडून हिंदुस्थानांत परत आले आहेत, ते सन्यासी झाले आहेत व त्यांची व माझी भेटहि झाली आहे. सध्यां ते स्वामी ब्रह्मगिरि या नांवानें प्रसिद्ध आहेत. हे नुकतेच हिंदुस्थानांत आले, तीन चार महिनेहि झाले नाहींत. आपलें पूर्वाश्रमीचे नांव सांगण्यास जरी ते सहज प्रवृत्त झाले नाहीत तरी तें नांव लपवून ठेवण्याचा त्यांनीं यत्किंचितहि प्रयत्न केला नाहीं. मी त्यांस त्यांचें पूर्वाश्रमीचे नांव विचारलें तेव्हां त्यांनी मला तें सांगितले नाहीं, पण दोन चार दिवसांनी विद्यार्थीदशेंत त्यांच्या-बरोबरच हायस्कुलांत असलेला एक गृहस्थ भेटावयास आला तेव्हां त्यांनीं त्यांचें नाव ऐकल्या-नंतर आपली चटकन ओळख दिली आणि "मला तुम्ही ओळखतां काय? पूर्वी आपण बरोबर शिकत होतो, आणि रामविलासच्या बगीचांत चिंचा पाडायला आणि आंबे चोरायला बरोबरच जात होतों" असे सांगितले आणि "ते दिवस आठवतात काय?" म्हणून पृच्छा केली व तेव्हा त्या गृहस्थांनीं "आपण देवीदास अत्रे काय?" म्हणून विचारलें. तेव्हां त्यांनी "होय" म्हणून चटकन जबाब दिला.

नागपूरला ते आल्याला अजून महिनाहि झाला नाहीं पण आज ते सर्व नागपूरभर प्रसिद्ध झाले आहेत एवढेच नव्हे तर त्याच्या एक तऱ्हेच्या धृष्टतेच्या तंनाने त्यानी लोकांवर बरीच छाप पाडली आहे. यांच्या मनांत सर्व हिंदुस्थानांत नव्या आशेची प्रेरणा करून सर्व लोकांत कार्योत्साह उत्पन्न करावयाचा आहे. येथील धार्मिक गोष्टीविषयीं आस्था बाळगणाऱ्या मंडळीचें व त्याचें फारसें जुळत नाहीं. स्वामी ब्रह्मगिरींची काहीं मते दाखविण्यासाठीं आणि त्यांच्यासंबंधाने येथील एका पक्षाची वृत्ति दाखविण्यासाठीं येथील एका स्थानिक वर्तमानपत्रांतील कांही तुकडे पाठवीत आहे.

यांचा रोजचा कार्यक्रम जी अनेक मंडळी भेटावयास येतील त्यांनां आशा उत्पन्न करण्याचा असतो. आपली म्हणजे हिंदुस्थानची मंडळी वाईट आहेत असें कोणी बोललें तर तें यांस खपत नाही. ते म्हणतात की, बाहेरची मंडळी तुम्हांस कितपत ठाऊक आहेत?

यांचीं अनेक मतें येथील लोकांस चकित करीत आहेत."

एल्मा हंटरनें ते पत्र पुन्हां पुन्हां वाचलें. जणूं काय आपण एखादी अविश्वसनीय गोष्टच वाचीत आहो की काय असे तिला वाटले. प्रथम या एकंदर पत्रावर तिचा विश्वासच बसेना. तथापि बाबासाहेब देशपांडयांनी पूर्वीच्या पत्रांत आपल्या नवऱ्याच्या कांही गोष्टी अगदी बरोबर सांगितल्या आहेत अशी खूण पटल्यासारखे तिला झाले असल्यामुळे तिला या पत्राविषयीं थोडासा विचार केल्यानंतर विश्वास पटूं लागला. आपला नवरा जिवत आहे व तो नागपुरास आहे पण त्यानें संन्यास घेतला असून ब्रह्मगिरि या नांवाने वावरत आहे व हिंदुस्थानाचा किंबहुना जगाचा उद्धार करण्याच्या गोष्टी बोलत आहे हे ऐकून एल्मा हंटरला काय वाटले ते स्पष्ट शब्दांनी सांगतां येणे कठिण आहे. नवरा जिवंत असून सुखी आहे म्हणून तिला आनंद झाला; पण त्या आनंदामुळे हर्षवायु होऊ नये म्हणूनच की काय दुसरे अनेक विचार आणि अनेक भावना त्या आनंदात मिश्रित झाल्या होत्या. तिच्या मनांत निरनिराळ्या भावनांची कालवाकालव झाली होती. नवऱ्यानें आपली विचारपूस देखील केली नाहीं, आणि जगाला आनंद देण्याच्या गोष्टी करतो आहे हें पाहून तिला राग येऊन ही भोदूपणाची कमाल असें वाटले की नाहीं हे सांगतां येत नाही. तिच्या मनांत जो पहिला विचार आला तो हा कीं, आपण नागपूरला जावे आणि ब्रह्मगिरि आपला नवराच आहे काय हें पाहून घ्यावें आणि तो आपला नवरा

असल्यासच त्याला सरळपणें बायकोकडे दुर्लक्ष करणारा म्हणून दोष द्यावा पण पुन्हां कांहीं वेळानें तिच्या मनात असा विचार आला कीं, "नवऱ्यानें आपली चौकशी केल्यानंतर बायको वाईट मार्गाला लागली म्हणून ससाराचा वीट येऊन संन्यास घेतला असे झाले नाही कशावरून?" तिच्या मनांत असेंहि आले कीं, "आपण नागपूरला जाऊन काय करणार ? नवऱ्यानें संन्यास घेतला तर त्याला पुन्हां गृहस्थाश्रमांत रहावयास आपणांस भाग पाडतां येणार नाहीं. सामान्य हिंदु स्त्री तरी नवऱ्यानें संन्यास घेतला असेल तर काय करणार? त्यातल्या त्यांत आपण ख्रिस्ती झालेल्या आहोंत अशा प्रसंगीं नवऱ्यानें जरी संन्यास घेतला नसता तरी ख्रिस्ती बायकोचा स्वीकार करावयास त्याला थोडेच भाग पाडतां येईल! कोर्ट काय करणार? फार तर माझा पोटगीचा हक्क कबूल करणार व त्याची जबाबदारी नवऱ्यावर टाकणार, किंवा मला डायव्होर्स पाहिजे असेल तर तो मजूर करणार!" एल्मा हटरला या दोन्ही गोष्टी नको होत्या. तिला खाण्यापिण्याची ददात नव्हती आणि संन्याशापासून आपण घेणार तरी काय हाहि विचार मनांत येऊन तिला थोडे हास्य उत्पन्न झाले. डायव्होर्स मिळविण्याची तिची इच्छा नव्हती. डायव्होर्स मिळवून आपण करणार काय? पुन्हां दुसरे लग्न करावयाचे झाले तरच डायव्होर्सची किंमत, एरव्ही नाहीं. आज आपण दुसऱ्या कोणावर आसक्त झालो नाही किंवा आपल्या प्रेमाची याचना करण्यासाठीं कोणी तरुण धडपडत नाहीत. तर आपण आतां फारशी चौकशी न करतां हे स्वामी आतां काय करतात हे दुरून पहातच आपला काळ घालवावा हे उत्तम.

एकदरींत पहातां एल्मा हटर हिला आपल्या अंतःकरणांत काय भावना उत्पन्न झाली हे समजेना. नवीन आशा उत्पन्न झाली असे एकदां वाटलें तर एकदां असें वाटे कीं पुढें आपल्या आयुष्यांत कांहीं तरी आशेची बाजू आहे ही आपली समजूत कायमची फोल ठरली आहे.

एल्माच्या मनांत दुसरे अनेक विचार आले. मनुष्य संन्यासी झाला म्हणजे पुन्हां गृहस्थाश्रमी होऊ शकत नाही काय? आपण सौभद्र नाटक लहानपणीच पाहिले होतें. त्यांत अर्जुनानें त्रिदंडी संन्यास घेतला होता. तसाच संन्यास आपल्या पतीनीं घेतला नसेल कशावरून? ज्ञानेश्वराच्या बापानें सन्यास घेतल्यानंतर पुन्हां तो गुरूच्या आज्ञेनें गृहस्थाश्रमाकडे वळला. त्याप्रमाणें आपल्या नवऱ्याला गृहस्थाश्रम पुन्हां स्वीकारावयास काय अडचण आहे? ज्ञानेश्वरादिकांना त्यापासून थोडा बहुत उपद्रव झाला. सन्याशाची मुले म्हणून त्यांनां ब्राह्मण मंडळी त्यावेळेस जरा दूर ठेवीत एवढेच. आज एवढ्यावरच मुलांनां बहिष्कार पडेल काय? पडेल असें वाटत नाहीं. जर त्यांच्या मनांत पुन्हां बायकोला घरांत घ्यावी असे वाटलेच तर त्यांच्या सन्यासदीक्षेची मोठी अडचण येईलच असें नाही. तर मग अगदींच निराश होण्याचें कारण नाही. पण पुनर्मीलन व्हावयाचें म्हणजे मला शुद्धि वगैरे कांहीं तरी संस्कार करावा लागेल. पण शुद्धि म्हणजे तरी काय? मी ख्रिस्ती झाल्ये म्हणजे अशुद्ध झाल्ये हे मला कबूल करावें लागेल. पण मला तसे वाटत आहे काय? मुळीच नाहीं. ख्रिस्ताचा उपदेश आज माझ्या हृदयांत सत्कर्माबद्दल स्फूर्तीच देत आहे, तर ख्रिस्ती झाल्ये म्हणजे मी अशुद्ध झाल्ये असे कसे म्हणू. ख्रिस्ती मडळीमध्ये मी राहिल्ये, त्यांच्या हातचें खाल्लें म्हणून मी अशुद्ध झाल्यें, केवळ उपदेशामुळें मी अशुद्ध झाले नाही अशी मनाची समजूत करून जर मी आपली "शुद्धि" करून घेतली तर इग्लंडमध्ये अनेक वर्षे राहिलेल्या स्वामी ब्रह्मगिरींनीं तरी काय केले आहे? त्यांनीं ख्रिस्ती मडळीच्या हातचें अन्न सेवन केलें असे होणार नाहीं काय? तर मी परत हिंदु तरी कसें व्हावयाचें,

हिंदु होण्यास शुद्धिची अट आज ठेवली गेली आहे आणि आपण आपळी शुद्धि करून घ्याव-याची म्हणजे मी अशुद्ध झाल्यें होतें असा खोटा कबुली जबाब द्यावा लागेल. आणि तो कां तर ज्या मनुष्याची माझी आज फारशी ओळखहि नाहीं, पण जो माझा नवरा म्हणून ठरला गेला त्याच्याशीं पुनर्मीलन होण्यासाठीं. म्हणजे नवऱ्या-साठीं धर्मत्याग करावयाचा. काय हा जुलूम!

बरें, पण आपणांस पुनर्मीलन तरी हवें कशाला? माझ्या मनाला जी एकसारखी चुटपुट लागली होती ती आपल्या नवऱ्याच्या दुःखकालांत आपण मदत केली नाहीं म्हणून होती. जो मनुष्य जगांतून उठून जातो, लोकांपासून तोंड लपवतो तो या गोष्टी संकटांमुळें करतो. तर नवरा संक-टात असतां त्याच्याकडे लक्ष देण्याचें कर्तव्य आपण केलें नाहीं म्हणून आपणांस दुःख होत होतें. आपण जी चौकशी करीत होतों ती मुख्यतः नवऱ्यास दुःख प्राप्त झालें असेल तर त्यापासून बचाव करण्यासाठी अवश्य होणारें कर्तव्य आपण केलें नाही म्हणून होती. आज आपल्या मनाला ती चुटपुट वाटेनाशी झाली आहे. नवरा दुःखांत नाहीं. तर तो जगालाच सुखी करण्याची खटपट करीत आहे व त्यासाठीं उपदेश करीत आहे, तर आपल्या नवऱ्यास आपल्या मदतीची जरूर नाहीं हें खास. तेव्हां आपण आपलें कर्तव्य केलें नाहीं असें मनास वाटावयास नको.

हे सर्व विचार मनांत आणून आपल्या पुन-र्मीलनाच्या अशक्यतेमुळे आपलें कांहीं एक नुक-सान होणार नाहीं, आपणांस ख्रिस्तगुरूशीं बेमान होण्याचें कारण नाहीं इत्यादि विचार मनांत आणून ती मन खंबीर करीत होती. पण त्या-बरोबरच आपण हें मुद्दाम ओढून ताणून चंद्र-बळ आणीत आहोंत याचीहि जाणीव तिच्या मनाला होत होती. आपण ज्याअर्थी, आपल्या नवऱ्याशीं पुनर्मीलन झालें नाहीं तर आपलें कांहीं नुकसान होणार नाहीं अशीं मनाची समजूत करून घेत आहोंत त्याअर्थी अंतःकर-णाची स्वयंसिद्ध भावना कांहीं निराळीच आहे हें देखील त्याबरोबरच स्पष्ट होत नाही काय? हा प्रश्न देखील ती आपल्या मनास विचारीत होती. तिला आपल्या आयुष्यांत आपलें कर्तव्य तरी काय म्हणून विचार पडला. आपल्या आयुष्यांत आपली सर्वांत प्रबल इच्छा मातृत्वाची आहे. आपण केवळ पवित्राचरणाने दिवस घालविण्यापेक्षां मुद्दाम वाट चुकून आपणांस अपत्यप्राप्ती करून घ्यावी असे जे विचार आपल्या मनांत वारंवार उत्पन्न झाले त्याचीहि तिला आठवण झाली. आणि स्वाभाविक कौटुंबिक आयुष्यक्रमासहि आपण मुकल्या आहोत याची तिला जाणीव झाली. नवरा दुःखांत असतां त्याच्या सोडवणुकीस किंवा त्यास धीर द्यावयास आपण गेलो नाहीं म्हणून आपल्या मनांत बोचणी होती ती आतां दूर झाली आहे. पण तेवढ्यामुळें आपलें कांही समाधान झालें नाहीं हेंहि तिला स्पष्ट समजू लागलें.

हे तिचे विचार चालू असतां मिसेस हंटर आणखी सिगारेटस ओढीत होत्या आणि एल्माच्या तोंडावर होणारे फेरबदल एकसारख्या पहात होत्या. त्यांनी एल्माला विचारलें "आतां पुढें काय करावयाचें"

"या पत्राबरोबर ज्या वर्तमानपत्राचे तुकडे आले आहेत ते पत्र ताबडतोब सुरू करावयाचें, आणि नागपूरचीं आणखी पत्रे देखील मागवाव-याची—नागपूरास जावे किंवा नाही याविषयीं अजून निश्चय झाला नाही पण जावें असेच मनाचे उत्तर येतें."

---

## प्रकरण २८ वें.

## देवीदासपंतांस दिलेली कामगिरी.

देवीदासपंत डॉ. नंदिकेकडे गेले होते तेव्हां नंदिकेने एकदम त्यांस ओळखलेंच नाहीं. पण

जरा लक्षपूर्वक पाहिले तेव्हां त्या एकदम हंसल्या. तेव्हां देवीदासपंत म्हणाले. "आपण स्वामी ब्रह्मगिरींना बोलावणे पाठविले. पण स्वामी ब्रह्मगिरीचा अवतार संपला. आतां त्यांच्या ऐवजीं मी देवीदास अत्रे आलो आहे."

डॉ. नंदिकेचे आणि देवीदासपंतांचें थोडेसे बोलणे झाले. त्यात तुम्ही आतां मला अगदी पूर्वीच्या दिवसाची आठवण करून देत आहांत. तुम्ही जेव्हां आमच्या वडिलांच्याकडे येत होतां त्यावेळेच्या दिवसाची आठवण तुमच्या उत्साहाच्या बोलण्यामुळे मला तुम्ही सन्याशाच्या वस्त्रात असता होत असेच. पण आता पूर्वीचे देवीदासपंत परत आले असेच मला वाटते. आणि तुम्ही जुने मित्र असल्यामुळे तुमच्यावर एखादे काम सोपविण्यास देखील हरकत नाही असे वाटते इत्यादि गोष्टी बोलून शेवटीं मुद्द्याच्या बोलण्याकडे डॉ. नंदिकाबाईंनी आणले.

डॉ. नंदिकाबाईंनी देवीदासपंतांना एवढेच सांगितलें की, माझ्या इस्पितळांत एक ब्राह्मण विधवा स्त्री आली आहे. ती बाळंतीण झाली आहे. ती आपल्याबरोबर मूल नेऊ इच्छीत नाही आणि यामुळें जर दुसरी कांहीं सोय झाली नाही तर मला हे मूल कोणत्या तरी मिशनच्या हवालीं करावें लागेल. माझ्या मनांत होतां होईतों हे मूल मिशनच्या हवाली करावयाचे नाही. हिंदु डॉक्टरणीकडे असल्या केसेस येतात व त्यांस मोठया नाखुशीनें मुलांनां मिशनरी मंडळीच्या हवालीं करावे लागतें. पण माझ्या मनांत यावेळीं असे आले आहे कीं असल्या बेवारस होणाऱ्या अर्भकांचें रक्षण करण्याची जबाबदारी हिंदु समाजानेंच घ्यावी यासाठीं शक्य ती खटपट आपण करावी आणि या मुलीला कोणत्या तरी हिंदु संस्थेच्या ताब्यांत द्यावें; किंवा जर कोणी हिंदूने ही मुलगी पाळावयास घेतली तर त्या हिंदु कुटुंबास मुलगी द्यावा. तर आपण या बाबतींत कांहीं खटपट कराल काय?"

देवीदासपंतांनीं सांगितलें की "तुमची इच्छा असेल तर मी खटपट करतोच. यश येईल ही खात्री नाही; पण यश आले पाहिजे असे वाटतें. सामाजिक प्रश्न तात्त्विकदृष्टया चर्चेसाठीं घेण्यामुळे फारशी सुधारणा होत नाही पण एक एक विशिष्ट अडचण उत्पन्न झाली म्हणजे ती दूर करण्याकरता प्रयत्न करतां करतांच सामाजिक सुधारण झाली पाहिजे असे माझे मत आहे. तर मी हे काम हातीं घेतो. मुलीसबंधाने लोकांस काय माहिती द्यावयाची?"

"मुलीसबंधानें लोकांस एवढीच माहिती द्यावयाची कीं ही मुलगी एका ब्राह्मण स्त्रीचे अपत्य आहे. हिचा बाप कोण आहे यासबंधाने आज आपण निश्चयात्मक माहिती कांहींच सांगत नाही."

देवीदासपंतांस हे काम बरें वाटलें. त्यांनां असे वाटले की, हे कार्य हाती घेऊन पार पाडतांना हिंदु समाजाविषयी आपल्या आशावादीपणास क्षेत्र आहे किंवा नाही हे तावडतोब समजेल.

तसेंच आजच्या शुद्धिसघटनेविषयीं लोकांमध्ये कितपत आस्था आहे हेहि कळेल.

देवीदासपंतांनी अनेक ठिकाणी जाऊन पद्मावतीच्या अर्भकाची काळजी घेण्यास कोणी तयार आहे काय म्हणून चौकशी केली. पण व्यभिचाराचे अपत्य कोणी घ्यावे? त्याची प्रत्येक व्यक्तीस घाण येत होती, असें दिसून आलें. प्रत्येक हिंदूस आपापल्या पावित्र्याची इतकी जाणीव दिसली की, प्रत्येकास वाटलें कीं या मुलीचा आपण जर स्वीकार केला तर आपली जात बिघडेल. मुलीचा अपराध कांहीं नाहीं; अपराध असेल तर आईचा, असे लोक कबूल करीत पण त्या मुलीला पत्करावयास कोणी तयार होईना! प्रत्येकाला आपले सोंवळें बिघडेल ही भीति इतकी जबर होती की, त्या मुलीच्या संरक्षणासाठीं आपण

लागल्यास वर्गणी देऊं पण असल्या मुलीचें संगोपन करण्याची जबाबदारी आपल्यावर नको असें लोक म्हणत. कित्येक तर असें म्हणूं लागले कीं, मुलीला संभाळणें हें आईसच लाजिरवाणें कां व्हावें? आईचें कर्तव्य मुलीला संभाळणें हेंच आहे. जर आम्ही व्यभिचाराच्या मुली संभाळूं तर आम्ही व्यभिचारास संमति देत आहों असेंच होईल व आमच्या स्त्रियांनीं व्यभिचार करावा व अपत्याची जबाबदारी दुसऱ्या कुटुंबावर टाकावी यास आमची संमतीच नाहीं. ही गोष्टच मोठया आवेशानें बोलणारांमध्यें दादासाहेब गेगणे होते. पण बापू भोंगळवार वगैरे तरुण मंडळी वर्गणी देण्याची खुशी व्यक्त करीत होती हेंहि देवीदासपंतांच्या नजरेस आले.

एक दोन दिवसांनीं आपल्या चौकशीचें फल देवीदासपंतांनीं नंदिकेस सांगितलें तें असें— "आपल्या ज्ञातींतील एक अर्भक ख्रिस्ती होणार याबद्दल जरी लोकांनां फार वाईट वाटतें तरी तें ख्रिस्ती संप्रदायामध्यें जाऊं नये म्हणून खटपट करण्यास कोणीहि तयार नाहीं."

तें ऐकून नंदिका म्हणाली कीं, "आतां पुढे काय करणार?"

"काय करणार तें कांहीं अंशी मनांत ठरविलें आहे पण आज मी बोलत नाहीं. अजून थोडी आणखी चौकशी करणार आहे. हिंदु जनतेस सत्कार्याची संधि अधिक द्यावयाची आहे. म्हणून या कार्याकडे लक्ष देणारा कोणी असेल तर तो शोधण्यासाठीं आणखी थोडासा प्रयत्न करतों."

तें ऐकून नंदिकाबाई थोडा वेळ स्तब्ध बसल्या आणि म्हणाल्या, "आपल्या हिंदु लोकांमध्यें भोंदूपणा फार भरला आहे. बोलण्याप्रमाणें कृति होत नाहीं. मुसलमान आणि ख्रिस्ती समाजांनां शिव्या; द्यावयाच्या त्यांनां पतित म्हणावयाचें आणि त्यांचा उद्धार आपण करतों म्हणून म्हणावयाचें पण एखादें मूल ख्रिस्ती होत असेल तर त्याच्या संरक्षणासाठीं हातपाय हलवायला कोणीहि तयार नाहीं! आपले लोक इतके दुष्ट असतां तें मूल ख्रिस्ती झालें तर काय बिघडलें असेंच वाटायला लागतें. जर तें हिंदु राहील तर त्याची जन्मकथा प्रत्येक मनुष्य दुसऱ्याच्या कानांत सांगेल आणि त्या मुलीस जन्मभर बहिष्कृतासारखेच वागावें लागेल; तर तिनें ख्रिस्ती व्हावें हेंच मलाहि आतां मनांतून बरें वाटत आहे."

"नंदिकाबाई, तुम्ही या प्रश्नाकडे योग्य रीतीनें पहात नाहीं. दया, वगैरे गुण आपल्या लोकांत इतर लोकांपेक्षां कमी आहेत अशी तुमची समजूत झाली आहे काय? माझी तर अशी समजूत आहे कीं, हे गुण हिंदूंत इतर लोकांच्या मानानें कमी नाहींत."

"तर मग आपण इतर लोकांपेक्षां आपल्याच लोकांचे संरक्षण करण्यास असमर्थ कां होतो?"

"आपण असमर्थ होतों याचें कारण प्रत्येक व्यक्तीस आपल्याला अमुक एक चांगली गोष्ट केल्यानें काय वाईट परिणाम भोगावे लागतील याची जाणीव आहे."

"तुमच्या मतें या मुलीनें हिंदूच रहावें असें आहे काय?"

"होय, असेंच आहे. ख्रिस्ती झाल्यानें विशेष फायदा होईल असें वाटत नाहीं. हिंदु समाजामध्यें राहिल्यानें अनेक अडचणी भोगाव्या लागतील पण ख्रिस्ती झाल्यानें त्या मुलीची अनेक अडचणीपासून मुक्तता होईल हें अगदीं खरें नाहीं. ख्रिस्ती समाजामध्यें खानदानीचीं घराणीं कमीं आहेत. तीं वाढलीं म्हणजे व्यभिचाराच्या संततीस चांगल्या ख्रिस्ती घराण्यांशीं देखील शरीरसंबंध करण्यास अडचण उत्पन्न होईल. इंग्लंडमधली मंडळी लग्नाच्या प्रसंगीं घराण्याकडे लक्ष देत नाहींत काय?"

"देतातच!"

"याशिवाय आपल्यापुढें जो प्रश्न आहे तो हा कीं, खिस्ती समाजांत शिरल्यानें एखाद्या मुलीची जरी तात्पुरती त्रासापासून सुटका होणार असली तरी एकंदर हिंदु समाजांत राहू इच्छिणाराची सोय काय? हिंदुजनतेइतक्या मोठ्या समाजांतील अड-चणींतल्या लोकांपुढे निराशाच ठेवावयाची काय? लोकांत दया वगैरे गुण असून देखील समाजाच्या विशिष्ट यांत्रिक स्थितीमुळें अशा अपत्याचें संगोपन करणें कठिण जातें. मी यावर एकदोन दिवसांनीं कांहीं बोलणार आहें. तुम्हांला देखील काय करतां येईल याविषयी तुम्ही विचार करून ठेवा."

देवीदासपंत निघून गेल्यावर डॉ. नंदिका आपल्याशींच विचार करूं लागली. आपल्याला मूल नाहीं, आपणांस जर एखादे मूल बाळगावयास मिळेल तर ते हवे आहे असें पुष्कळदां तिला वाटत असे असें असतांना हे मूल आपण बाळगावे असे मनाला कां बरें वाटत नाही? असें ती आपल्या मनाला विचारूं लागली. आपण जातीच्या विचाराकडे लक्ष देत नाही असा बाणा पूर्वीपासूनच बाळगीत आहो; आपण ब्राह्मण पण पुनर्विवाहाचें अपत्य आहोत आणि आपला नवरा तर सारस्वत ब्राह्मण आहे आणि महाराष्ट्रीय आणि सारस्वत ब्राह्मण यांच्यांतला पहिला विवाह आपला म्हणून आपली प्रसिद्धि दोन्ही समाजांत झाली. असें असून हें मूल घेण्यास आपल्याला किंतु कां वाटतो. तिला असें वाटू लागलें कीं, जर मुलगी अधर्मसतति नसून एखाद्या मराठ्याची असती तर विशेष हरकत वाटली नसती.कारण ही मुलगी कोणाची;तुमच्याकडे कशी आली, म्हणून लोक खोदून खोदून चौकशी करणारच. तशी चौकशी सुरू झाल्यावर आपणांस ती मुलगी मराठ्याची आहे एवढे सांगून भागले असतें. ती मराठ्याची मुलगी बाळगली असे आपण सांगितल्यानंतर ब्राह्मणवर्गाकडून जास्त चौकशीहि झाली नसती. पण या मुलीला बाळगणें म्हणजे मोठी पंचाईत आहे. पण ही मुलगी अशी अधर्मसंतति असल्यामुळें मुलीच्या हितासाठीं तरी आपल्याला हिचा खोटा इतिहास तयार करावा लागेल; आणि त्या इतिहासास चिकटून रहावे लागेल. आणि जन्मभर ही लबाडी उघडकीस येईल अशा भीतींत मन राहील. लोकांनीं चौकशी करूं नये असें म्हणून बिलकुल चालावयाचें नाहीं. आपण या मुलीला घेण्यानें आपणांस व मुलीस जन्मभर लबाडी करीत रहावे लागणार, आणि जन्मभर लबाडी चालवीत रहाणें सोपे नाही. तेव्हां तिच्या मनांत असे आलें कीं ही मुलगी व्यभिचाराची आहे म्हणून आपणांस खरोखर घाण येत नसून केवळ आपण लोकांच्या चौकशीला भिऊनच ही मुलगी नाकारीत आहो. ही जर आपली कथा आहे तर इतर हिंदु मंडळी हिला बाळगावयास तयार नाहींत म्हणून त्यांनां दोष काय म्हणून द्यावा.

या मुलीला आपण बाळगावे असेंहि तिच्या मनांत येई. आपणांस देशस्थ किंवा सारस्वत यांपैकी कोणीहि आपल्यांतले समजत नाहींत. आपल्याला मुले झालीं तरी त्यांशीं जे जातीकडे लक्ष देत नाहीत अशीच मंडळी लग्न लावणार. तर आपण लोकांच्या चौकशीला कां भ्यावे? हाहि विचार तिच्या मनांत आला. पण त्यापुढे दुसराहि विचार मनांत आला; आपण बाळगलेल्या मुलीचा बाप कोण होता हे मला ठाऊक आहे. डॉ. परमानंद जर मुलीला भेटण्याची परवानगी मागूं लागले तर ती मला त्यांस नाकारतां येणार नाहीं. आणि आपण मुलीची मानलेली आई आणि ते खरे बाप असा संबंध उत्पन्न झाल्यानंतर डॉ. परमानंद यांस आणखी लगट लावावयास साधन होईल असें वाटू लागल. डॉ. परमानंदांस मुलीविषयीं प्रेम उत्पन्न झाल्यास त्या मुलीच्या आईबापांनां लग्न लावून एकत्र आणतां

येईल ही कल्पना देखील नंदिकेस आल्याशिवाय राहिली नाहीं. पण नंदिका परमानंदांस भेटण्यासच भीत होती. परमानंदांची भेट झाली असतां आपणांस मनाचें स्थैर्य राखतां येईल असा विश्वास तिला वाटत नव्हता. ती परमानंदांच्या मोहक गुणांना आणि त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या संकटपरंपरांना भीत होती.

सध्याकाळीं नंदिकाबाईची आणि पद्मावतीची भेट झाली तेव्हां स्त्रियांच्या संस्थांविषयीं बोलणें निघालें. आपल्यामध्ये कानव्हेटसारख्या संस्था नाहीत; त्या असत्या तर फार बरें झाले असते असे पद्मावती म्हणाली. त्यावेळेस नंदिकाबाईस मुंबईच्या उपनगरांत असलेल्या "स्त्रियांचे उद्योगमंदिर'' या संस्थेची आठवण झाली. आपण ही सस्था पहाण्यास एकदां गेलो होतो हेंहि तिला आठवले. त्या संस्थेसबधानें कांहीं माहिती नंदिकाबाईनी दिली. पण शेवटीं हेंहि सांगितले कीं, मराठी किंवा संस्कृत नांव संस्थेला द्यावयाचें, हेतु लोककल्याणाचा दाखवावयाचा पण खरा हेतु ख्रिस्ती धर्मप्रसाराचा ठेवावयाचा असा प्रघात अलीकडे मिशनरी मंडळींत वाढू लागला आहे. आणि म्हणून या सस्थेने १५ वर्षांच्यावर काम केले आहे तरी तीविषयीं माझ्या मनांतील संशय गेला नाहीं. तथापि पद्मावतीने त्या संस्थेची एकदर माहिती नंदिकाबाईस खोदखोदून विचारली. आणि शेवटीं म्हणाली कीं, आपण यांस पत्र लिहावे हे बरे. त्यांनां विचारा कीं, "तुम्ही माझी सोय करतां का?'' नंदिकाबाईनी शेवटीं पद्मावतीच्या इच्छेप्रमाणे मिसेस् हंटर यांस पत्र लिहिलें.

---

## प्रकरण २९ वें.

## विश्वमित्राची कौन्सिल उमेदवारी.

विश्वमित्राची स्थिति जराशी विलक्षण होती. बुद्धिमान म्हणून त्याची त्याच्या मित्रांत प्रसिद्धि होती तर त्याची घरीं कांहीं विशेष किंमत नव्हती. सर दामोदररावांनां तर हा केवळ अनिश्चयी हॅम्लेट आहे असे वाटे, किंवा फ्याडिस्ट आहे असें वाटे. ज्या गोष्टींची अभिरुचि द्रव्योत्पादक होत नाहीं, त्याला म्हणायचें "फयाड'' व त्या गोष्टीकडे एकसारखें जो लक्ष देतो तो फ्याडिस्ट. कधीं कधीं आपल्या हातीं अधिकार आला तर आपण कोणत्या चांगल्या गोष्टी करून दाखवूं इत्यादि गोष्टी तो जेवतांना बोले. पण सर दामोदररावांस एक तर ती आपल्यावर टीका आहे असें वाटे, किंवा हा केवळ मनोराज्य करणारा आहे असें वाटे. विश्वमित्राने, व्यापार वाढविण्याविषयीं सरकारनें काय केले पाहिजे आणि व्यापार वाढविण्यासाठीं प्रजेचें शिक्षण किती व्यापक केलें पाहिजे आणि लोकांच्या गरजा अधिक वाढाव्यात यासाठीं सरकारनें कोणते माठमोठे कारभार हातीं घेतले पाहिजेत इत्यादि विषयांवर व्याख्यानें दिली होतीं. आणि गांवांतल्या तरुण मंडळीनां तीं आवडलींहि होतीं. पण त्यांचा उपयोग काय असे सर दामोदरराव विचारीत असत. अलीकडे सर दामोदरराव नागपूर सोडून उमरावतीला जाऊन राहिले होते.

विश्वमित्राला विहंगमेचें व नंदिकेचें संभाषण झाल्यानंतर दोन तीन दिवसांनीं म्हणजे जूनच्या एका दिवशीं सकाळीं कांहीं मंडळी भेटावयास आली होती. विश्वमित्राने इलेक्शनसाठीं उमेदवार म्हणून उभे रहावे अशी इच्छा त्या मंडळींनीं व्यक्त केली. ती मंडळी स्वराजिस्टांपैकीं होती व त्यांत फटकळ म्हणून समजले जाणारे स्वराजिस्टांचे पुढारी ब्यारिस्टर म्हसकर हे प्रमुख होते. त्या मडळीचे आणि विश्वमित्राचें बोलणें चालू असतां विहंगमा आंतल्या बाजूस एक इंग्रजी कादवरी वाचीत बसली होती. ती कादंबरी वाचीत असतांना बाहेरचें बोलणें जेव्हां आवेशाचें होऊं लागलें तेव्हां तिचें लक्ष तिकडे सहजच वेधलें. तिच्या कानांवर आलेले बोलणें येणेप्रमाणे होतें—

"देतातच!"

"याशिवाय आपल्यापुढें जो प्रश्न आहे तो हा कीं, ख्रिस्ती समाजांत शिरल्याने एखाद्या मुलीची जरी तात्पुरती त्रासापासून सुटका होणार असली तरी एकंदर हिंदु समाजांत राहूं इच्छिणाराची सोय काय? हिंदुजनतेइतक्या मोठ्या समाजांतील अडचणींतल्या लोकांपुढे निराशाच ठेवावयाची काय? लोकांत दया वगैरे गुण असून देखील समाजाच्या विशिष्ट यांत्रिक स्थितीमुळें अशा अपत्याचें संगोपन करणें कठिण जातें. मी यावर एकदोन दिवसांनीं कांहीं बोलणार आहे. तुम्हांला देखील काय करतां येईल याविषयीं तुम्ही विचार करून ठेवा."

देवीदासपंत निघून गेल्यावर डॉ. नंदिका आपल्याशींच विचार करूं लागली. अपल्याला मूल नाहीं, आपणांस जर एखादे मूल बाळगावयास मिळेल तर ते हवे आहे असे पुष्कळदां तिला वाटत असे असें असतांना हे मूल आपण बाळगावे असे मनाला कां बरें वाटत नाहीं? असें ती आपल्या मनाला विचारूं लागली. आपण जातीच्या विचाराकडे लक्ष देत नाहीं असा बा( )( ) पूर्वीपासूनच बाळगीत आहो; आपण ब्राह्मण पण पुनर्विवाहाचें अपत्य आहोत आणि आपला नवरा तर सारस्वत ब्राह्मण आहे आणि महाराष्ट्रीय आणि सारस्वत ब्राह्मण यांच्यांतला पहिला विवाह आपला म्हणून आपली प्रसिद्धि दोन्ही समाजांत झाली. असें असून हे मूल घेण्यास आपल्याला किंतु कां वाटतो. तिला असें वाटूं लागलें कीं, जर मुलगी अधर्मसंतति नसून एखाद्या मराठ्याची असती तर विशेष हरकत वाटली नसती. कारण ही मुलगी कोणाची; तुमच्याकडे कशी आली, म्हणून लोक खोदून खोदून चौकशी करणारच. तशी चौकशी सुरू झाल्यावर आपणांस ती मुलगी मराठ्याची आहे एवढे सांगून भागलें असतें. ती मराठ्याची मुलगी बाळगली असे आपण सांगितल्यानंतर ब्राह्मणवर्गाकडून जास्त चौकशीहि झाली नसती. पण या मुलीला बाळगणें म्हणजे मोठी पंचाईत आहे. पण ही मुलगी अशी अधर्मसंतति असल्यामुळे मुलीच्या हितासाठीं तरी आपल्याला हिचा खोटा इतिहास तयार करावा लागेल; आणि त्या इतिहासास चिकटून रहावे लागेल. आणि जन्मभर ही लबाडी उघडकीस येईल अशा भीतींत मन राहील. लोकांनीं चौकशी करूं नये असें म्हणून बिलकुल चालावयाचें नाहीं. आपण या मुलीला घेण्यानें आपणांस व मुलीस जन्मभर लबाडी करीत रहावे लागणार, आणि जन्मभर लबाडी चालवीत रहाणें सोपे नाही. तेव्हां तिच्या मनांत असे आलें कीं ही मुलगी व्यभिचाराची आहे म्हणून आपणांस खरोखर घाण येत नसून केवळ आपण लोकांच्या चौकशीला भिऊनच ही मुलगी नाकारीत आहों. ही जर आपली कथा आहे तर इतर हिंदु मंडळी हिला बाळगावयास तयार नाहींत म्हणून त्यांनां दोष काय म्हणून द्यावा.

या मुलीला आपण बाळगावें असेंहि तिच्या मनांत येई. आपणांस देशस्थ किंवा सारस्वत यांपैकीं कोणीहि आपल्यांतले समजत नाहींत. आपल्याला मुले झालीं तरी त्यांशीं जे जातीकडे लक्ष देत नाहीत अशीच मंडळी लग्न लावणार. तर आपण लोकांच्या चौकशीला कां भ्यावे? हाहि विचार तिच्या मनांत आला. पण त्यापुढे दुसराहि विचार मनांत आला; आपण बाळगलेल्या मुलीचा बाप कोण होता हे मला ठाऊक आहे. डॉ. परमानंद जर मुलीला भेटण्याची परवानगी मागूं लागले तर ती मला त्यांस नाकारतां येणार नाहीं. आणि आपण मुलीची मानलेली आई आणि ते खरे बाप असा संबंध उत्पन्न झाल्यानंतर डॉ. परमानंद यांस आणखी लगट लावावयास साधन होईल असें वाटूं लागलें. डॉ. परमानंदांस मुलीविषयीं प्रेम उत्पन्न झाल्यास त्या मुलीच्या आईबापांनां लग्न लावून एकत्र आणतां

येईल ही कल्पना देखील नंदिकेस आल्याशिवाय राहिली नाही. पण नंदिका परमानंदांस भेटण्यासच भीत होती. परमानंदांची भेट झाली असतां आपणांस मनाचें स्थैर्य राखतां येईल असा विश्वास तिला वाटत नव्हता. ती परमानंदांच्या मोहक गुणांनां आणि त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या संकटपरपरांनां भीत होती.

संध्याकाळीं नंदिकाबाईची आणि पद्मावतीची भेट झाली तेव्हां स्त्रियांच्या संस्थांविषयीं बोलणे निघालें. आपल्यामध्ये कानव्हेटसारख्या संस्था नाहीत; त्या असत्या तर फार बरे झाले असते असें पद्मावती म्हणाली. त्यावेळेस नंदिकाबाईस मुंबईच्या उपनगरांत असलेल्या "स्त्रियांचे उद्योगमदिर" या सस्थेची आठवण झाली. आपण ही संस्था पहाण्यास एकदां गेलों होतो हेंहि तिला आठवलें. त्या संस्थेसंबंधानें कांहीं माहिती नंदिकाबाईनी दिली. पण शेवटीं हेहि सांगितले कीं, मराठी किंवा संस्कृत नांव संस्थेला द्यावयाचें, हेतु लोककल्याणाचा दाखवावयाचा पण खरा हेतु ख्रिस्ती धर्मप्रसाराचा ठेवावयाचा असा प्रघात अलीकडे मिशनरी मंडळींत वाढूं लागला आहे. आणि म्हणून या सस्थेने १५ वर्षांच्यावर काम केले आहे तरी तीविषयीं माझ्या मनांतील संशय गेला नाहीं. तथापि पद्मावतीनें त्या संस्थेची एकंदर माहिती नंदिकाबाईस खोदखोदून विचारली. आणि शेवटीं म्हणाली कीं, आपण यांस पत्र लिहावे हे बरे. त्यांनां विचारा कीं, "तुम्ही माझी सोय करतां का?" नंदिकाबाईनी शेवटीं पद्मावतीच्या इच्छेप्रमाणे मिसेस् हंटर यांस पत्र लिहिले.

---

### प्रकरण २९ वें.

## विश्वमित्राची कौन्सिल उमेदवारी.

विश्वमित्राची स्थिति जराशी विलक्षण होती. बुद्धिमान म्हणून त्याची त्याच्या मित्रांत प्रसिद्धि होती तर त्याची घरीं कांहीं विशेष किंमत नव्हती. सर दामोदररावांनां तर हा केवळ अनिश्चयी हॅम्लेट आहे असे वाटे, किंवा फ्याडिस्ट आहे असें वाटे. ज्या गोष्टींची अभिरुचि द्रव्योत्पादक होत नाहीं, त्याला म्हणायचें "फ्याड" व त्या गोष्टीकडे एकसारखें जो लक्ष देतो तो फ्याडिस्ट. कधीं कधीं आपल्या हातीं अधिकार आला तर आपण कोणत्या चांगल्या गोष्टी करून दाखवूं इत्यादि गोष्टी तो जेवतांना बोले. पण सर दामोदररावांस एक तर ती आपल्यावर टीका आहे असें वाटे, किंवा हा केवळ मनोराज्य करणारा आहे असें वाटे. विश्वमित्रानें, व्यापार वाढविण्याविषयीं सरकारनें काय केले पाहिजे आणि व्यापार वाढविण्यासाठीं प्रजेचें शिक्षण किती व्यापक केलें पाहिजे आणि लोकांच्या गरजा अधिक वाढाव्यात यासाठीं सरकारनें कोणते माठमोठे कारभार हातीं घेतले पाहिजेत इत्यादि विषयांवर व्याख्यानें दिली होतीं. आणि गांवांतल्या तरुण मंडळींनां तीं आवडलींहि होतीं. पण त्यांचा उपयोग काय असे सर दामोदरराव विचारीत असत. अलीकडे सर दामोदरराव नागपूर सोडून उमरावतीला जाऊन राहिले होते.

विश्वमित्राला विहंगमेचें व नंदिकेचें सभाषण झाल्यानंतर दोन तीन दिवसांनीं म्हणजे जूनच्या एका दिवशीं सकाळीं कांहीं मंडळी भेटावयास आली होती. विश्वमित्राने इलेक्शनसाठीं उमेदवार म्हणून उभे रहावे अशी इच्छा त्या मंडळींनीं व्यक्त केली. ती मंडळी स्वराजिस्टांपैकीं होती व त्यांत फटकळ म्हणून समजले जाणारे स्वराजिस्टांचे पुढारी ब्यारिस्टर म्हसकर हे प्रमुख होते. त्या मंडळीचे आणि विश्वमित्राचें बोलणें चालू असतां विहंगमा आंतल्या बाजूस एक इंग्रजी कादबरी वाचीत बसली होती. ती कादंबरी वाचीत असतांना बाहेरचें बोलणें जेव्हां आवेशाचें होऊं लागलें तेव्हां तिचें लक्ष तिकडे सहजच वेधलें. तिच्या कानांवर आलेले बोलणें येणेप्रमाणे होतें—

"मी तुम्हांला सरळ सांगतों, तुमच्या डोक्यांत शेंकडों कल्पना आहेत. पण तुम्ही मोठे झाल्याशिवाय त्यांचा उपयोग काय? माझ्या मतें कांहीं नाहीं. तुम्ही मोठ्यांचे चिरंजीव म्हणून वशील्याने एखादी लट्ठ पगाराची जागा पटकावूं शकाल पण तुमच्या कल्पना तुम्ही या राजकारणाच्या बाजारांत पटवूं शकणार नाहीं. राजकारणाच्या बाजारांत त्या आणायच्या झाल्या म्हणजे तुम्हांला आखाड्यांत उतरलेंच पाहिजे." म्हसकर म्हणाले.

"तुम्ही म्हणतां तें कबूल आहे. पण तुमच्या पक्षामार्फत माझें उद्दिष्ट कसे साध्य होणार हा प्रश्न माझ्या मनांत उत्पन्न होत आहे."

"मग तुम्ही कोणत्या पक्षाला मिळणार? प्रतिसहकारपक्षाच्या मंडळीशीं जुळेल असे वाटत नाहीं!"

"तुमच्या पक्षाची वृत्ति दिवाणगिऱ्या स्वीकारूं नयेत अशी आहे. जो पक्ष जबाबदारी पत्करावयास तयार नाहीं तो पक्ष माझ्या उद्दिष्ट सुधारणांनां कशी मदत करणार?"

"मला असे वाटते कीं, आर्थिक सुधारणा व्हावी, शिक्षण चांगलें वाढावें या गोष्टींनां आम्हीच तुम्हांला मदत जास्त करूं. तुम्ही स्वराजिस्ट पक्षाला मिळण्यात खरोखर फायदा आहे. आज तुम्ही तरुण आहांत, तुमच्या मनांत जरी दिवाणगिरी आपल्याला मिळावी असे आले तरी ती मिळणार नाहीं. तर तुम्हाला दिवाणगिऱ्यांचा स्वीकार कोणी करूं नये या मताला मिळण्यास कोणतीच हरकत नाहीं. तुम्हाला दोन चार वर्षांनीं दिवाणगिरी मिळाली तर मिळेल. तेव्हां आमचा दिवाणगिऱ्या घेऊं नये इत्यादि गोष्टींबद्दलचा आग्रह देखील कमी होईल. पण दिवाणगिरी मिळण्याच्या अगोदर तुम्हांला कौन्सिलांत अनुयायी मिळवावे लागतील. ते मिळवण्यासाठीं तुम्ही प्रयत्न केला पाहिजे. मंडळींनां आज असें वाटलें पाहिजे कीं, तुम्ही त्यांच्यांतले आहांत व तुम्ही जें काय करूं इच्छितां तें दहा मंडळी बरोबर घेऊन करूं इच्छितां!"

"मला कोणत्याहि पक्षाला मिळण्यापूर्वी असा विचार केला पाहिजे कीं, माझ्या मनांत ज्या सुधारणा घडवून आणावयाच्या आहेत त्या सुधारणा घडवून आणण्यास कोणता पक्ष अनुकूल आहे. मला विधायक कामगिरी पाहिजे आहे व दिवाणगिऱ्या आपण पत्करल्या नाहींत तर आपणांस कोणतीच विधायक कामगिरी करतां येणार नाहीं."

"मला असें वाटत नाहीं. दिवाणगिऱ्या मिळवूं इच्छिणाऱ्या पक्षाला तुम्ही मिळाला म्हणजे तुमच्या मनांतली योजना पार पाडायला दिवस लागायचे ते लागतीलच. तुमच्या सुधारणा दिवाणांनां पटल्या तरी त्या गोष्टी एकदम त्यांस अमलांत आणतां येणार नाहींतच. त्या कौन्सिलांत प्रविष्ट होतील व त्यांवर लोकमत अजून निश्चित झाले नाही म्हणून त्या योजना लांबणीवर ढकलण्यांत येतील. या गोष्टी तुमच्या पक्षाचा दिवाण देखील करील. योजना पार पडण्याच्या पूर्वी ती जाहिरातीच्या स्थितींत कांहीं दिवस असावी लागते. आणि तुम्ही एखादी चांगली योजना करून ती स्वतः पुढे मांडली व त्यावेळेस तुम्ही जर नोकरीपक्षांतले असला तर ही योजना खरोखर सरकारनें आपल्या फायद्यासाठीं तयार करविली आहे असा आम्हाला बोभाटा करवून जनता त्या योजनेच्या विरुद्ध नेतां येईल. पण जर तुम्ही नोकरीपक्षाच्या बाहेर असला व तुमची एखादी योजना सरकारने ताबडतोब स्वीकारली नाहीं तर सध्यांचे सरकार लोकहिताची कोणतीहि चांगली गोष्ट पार पडूं देत नाहीं असा आम्हाला कांगावा करतां येईल. व तुमच्या योजनेकडे लोक अधिक सहानुभूतीच्या दृष्टीनें पाहूं लागतील. आजचें इलेक्शन जिंकण्यासाठीं दिवाणगिऱ्या न स्वीकारण्याची आरोळी आपणांस उपयोगी

पडत आहे. आजचें इलेक्शन आम्ही त्या आरोळीनें जिंकूं असें वाटतें. तुमच्यापुढें प्रश्न आहे तो हा कीं, तुम्हीं आम्हाला मिळायचें कीं त्या भुक्कड प्रतिसहकारवाद्यांस मिळायचें. तुम्हांला निश्चय करणें कठिण आहे असें वाटत नाहीं. तुम्ही प्रतिसहकारवादीपक्षांत राहूं इच्छीत असला तरी तुम्हांला उमेदवार म्हणून ते निवडतील किंवा नाहीं याची शंका आहे. समजा, त्यांनीं तुम्हांला उमेदवार निवडलेंच तरी तुम्ही निवडून याल किंवा नाहीं याची शंका आहे. समजा, तुम्ही स्वतःच्याच जोरावर निवडून आला तर तुम्हांस सरकारपक्षाला मिळून योजना पुढें ढकलतां येतील कीं, आमच्या पक्षाचे म्हणूनच आपल्या योजनांनां पुढे ढकलणें सोपें जाईल?''

''तुमचे म्हणणे मला पटले. तुमच्या पक्षातर्फे उमेदवार रहाण्याचें मी पत्करितों. पण मी तुम्हांला विचारतों, मला उमेदवार करण्यांत तुमचा फायदा काय?''

''फायदा पुष्कळच आहे. आज मी एक मोठी केस जिकली असें मला वाटूं लागलें आहे. ध्येयवाद्यांनां देखील आमचा पक्ष आवडूं शकतो हें सहजच सिद्ध होईल'' स्वराजिस्ट पुढारी बोलले. स्वराजिस्टांचे पुढारी आपला आज मोठा जय झाला असें समजूं लागले. त्यांनां असें वाटलें कीं, सर दामोदररावासारख्या नोकरशाहीच्या पक्क्या पक्षपाती गृहस्थाच्या मुलाला आपण आपल्या पक्षांत आणले ही कामगिरी थोडी थोडकी नाहीं. शिवाय विश्वमित्राची तारीफ करणारा नागपुरास अगोदरच एक वर्ग निर्माण होत होता. श्रीमंत घराण्यांतला मुलगा जर सामान्य वर्गाबरोबर मिळूं मिसळूं लागला तर त्याला लोकांकडून जी वाहवा मिळूं लागते ती विश्वमित्रासहि मिळूं लागली होती, आणि सरकारनें लोकांसाठीं काय करावे याविषयीं त्याचीं मधून मधून संभाषणे व व्याख्यानें होत होतीं त्यामुळें सुशिक्षित वर्गामध्ये त्याची चहा वाढत चालली होती. तथापि लोकांनां नेहमीं असें वाटत होतें कीं, हा मनुष्य कोणत्याहि पक्षाला मिळावयाचा नाहीं. दोघेहि पक्ष कांहीं क्षुल्लक तात्त्विक वाद काढून भांडत बसणार आणि याच्या योजनानां कोठेंच स्थान मिळणार नाहीं. आणि हा मनुष्य त्याच्या प्रामाणिकपणाच्या कल्पना आत्यंतिक वाढल्यामुळें दुसऱ्या कोणाबरोबर जुळते करून घेणार नाहीं. राजकारण म्हणजे काय तर माणसें एकत्र जुळविणें, त्यांचा पाठिंबा मिळविणे आणि त्यांच्या पाठिंब्याच्या जोरावर कामे करून घेणें, किंवा निदान लठ्ठ पगाराच्या व अधिकाराच्या जागा मिळविणें. दहा माणसे एकत्र जुळवावयाचीं म्हणजे त्यांचे स्वार्थ लक्षांत घ्यावयाचे किंवा त्यांचे संयुक्त मत्सर लक्षांत घ्यावयाचे आणि त्याच्या योगाने एकी राखावयाची; म्हणजे हें काम सुशिक्षितास चिळसवाणे होते व त्या प्रकारच्या कामाची घाण येऊन विश्वमित्र हा कायमचा मागें राहील असे लोक बोलत होते. अशा प्रसंगीं विश्वमित्राविषयीं ज्या लोकांस सहानुभूति वाटत होती तिचा फायदा घेऊन त्यालाच आपल्या पक्षांत ओढून घ्यावयाचे काम ब्यारिस्टर म्हसकरांनीं केले तर त्याबद्दल त्यांस अभिमान कां वाटूं नये? ब्यारिस्टर म्हसकर जाण्यास निघणार होते तर आतां चहा घेऊन जा म्हणून विश्वमित्र बोलला. आणि विश्वमित्र आंतल्या खोलीत गेला तों विहंगमा आनंदित झालेली त्याला दिसली. ती म्हणाली '' मी ऐकलें आहे, आपणाला चहा पाहिजे तो मी ताबडतोब आणवितें.''

आपला नवरा कांहीं तरी मोठेपणा मिळविण्याच्या कार्याला लागला असे विहंगमेस वाटूं लागलें असावे. एक दोन दिवसांनीं सर दामोदरावांकडून देखील स्वराजिस्टांकडून विश्वमित्रास नामिनेशन मिळाले याबद्दल अभिनंदनाचें पत्र आलें.

---

## प्रकरण ३० वें.

## पद्मावतीचें प्रयाण.

मिस् एल्मा हंटर या नागपुरास आल्या, आणि डॉ. नंदिकाबाईस भेटल्या. डॉ. नंदिकाबाईंनीं पद्मावतीसंबंधाने एवढेंच कळविलें होतें कीं, स्त्रियांच्या उद्योगमंदिरांत कांहीं दिवस आपल्या मुलीसह रहावें अशी पद्मावतीबाईची इच्छा आहे. तर रहाण्याच्या अटी वगैरे नंदिकाबाईंनी विचारल्या होत्या. आणि नंदिकाबाई उत्तराची वाट पहात होत्या. पण उत्तर यावयाच्या ऐवजी मिस् हंटर या पद्मावतीबाईस घेऊन जाण्यासाठी स्वतःच आल्या.

मिस् हंटर या एका कानव्हेंटमध्यें उतरल्या होत्या. त्या पद्मावतीबाईस भेटल्या आणि ताबडतोब त्यास मोटारींत बसवून कानव्हेंटमध्ये घेऊन गेल्या. इतकी ताबडतोब सहकारिता मिस् हंटर यांनी केली याबद्दल डॉ. नंदिकाबाईस आश्चर्य वाटलें. देवीदासपंत इकडे पद्मावतीच्या मुलीचा कोणी स्वीकार करील किंवा नाहीं यासंबधानें चौकशी करीत आहेत, त्यांची चौकशी अजून चालूच आहे इतक्यांत ख्रिस्ती स्त्रियांनी चालविलेली संस्था चटकन येऊन त्या स्त्रीस आपल्याबरोबर घेऊन जात आहे हे पाहून डॉ. नंदिकाबाईस काय वाटले असेल बरें? डॉ. नंदिकाबाईनीं पद्मावतीने स्त्रियांच्या उद्योगमंदिरात जावें याबद्दल संमति दर्शविली होती अशांतला भाग नाहीं. कां की, त्यांनां सुद्धां या संस्थेबद्दल पुरेशी माहिती नसल्यानें केवळ परोपकाराचें मिष करून धर्मांतर करविणारी ही संस्था असावी असें त्यांसहि वाटत असे. डॉ. नंदिकाबाईनीं लहानपणी—

**"सुशिक्षित रमा अम्हां प्रथम ती बरी वाटली**
**परंतु परबुद्धिनें अशि कशी अहो बाटली"**

हा कोकिलकारांचा श्लोकार्ध पाठ केला होता. आणि यासाठी त्यांनीं पद्मावतीस, मिसेस् हंटर यांच्या उद्योगमंदिरांत जावयास उत्तेजन दिलें नाहीं. पण पद्मावती म्हणाली कीं त्यांचा केवळ परोपकार करण्याचा उद्देश नसून ख्रिस्ती करण्याचा जरी उद्देश असला तरी मी त्यांच्याकडे जाईन. मला हिंदुसमाजांत रहाण्याचीच फारशी इच्छा नाही!

पद्मावतीने मिस् हंटरबरोबर जावयाचें ठरविल्यावर डॉ. नंदिकाबाईस त्याला मोडता घालतां येईना. त्यांतल्या त्यांत तिचें मिस् हंटर यांच्याशीं जे बोलणे झाले त्यामुळे तिच्या मनांत मिस् हंटरविषयीं थोडाबहुत आपलेपणा उत्पन्न झाला.

मिस् हंटर या पोषाखावरूनच कोणी तरी उच्च जातीच्या एतद्देशीय ख्रिस्ती आहेत असे नंदिकेस दिसून आलेंच होते व त्यांची वृत्ति देखील एखाद्या धर्मवेड असलेल्या बाईसारखी दिसली नाहीं. "तुम्हां हिंदु लोकांविषयीं" असें ती न बोलतां "आपल्या विधवा स्त्रियांच्या स्थितीविषयी" असे शब्द वापरीत होती हे डॉ. नंदिकेने पाहिले तेव्हां तिच्या ठिकाणीं मिस् हंटरविषयीं अधिक स्नेहभाव उत्पन्न झाला. डॉ. नंदिकाबाईनीं उद्योगमंदिर किती वाढलें आहे वगैरे प्रश्न केले. व त्यास योग्य उत्तरें मिस् हंटर यांनीं दिली तेव्हां शेवटी डॉ. नंदिकाबाईनी विचारलें की, "जर तुमचा संप्रदायप्रसाराचा हेतु नाही तर तुम्हांस इतकी खटपट करण्याची प्रेरणा तरी कशी होते?"

मिस् हंटर यांनी उत्तर दिलें कीं, "उद्योगाच्या पवित्रतेची जाणीव आम्हांस झाली असल्यामुळे ही प्रेरणा होते. आमचे असे मत झाले आहे कीं, स्त्रीचा अधःपात होण्यास कारण तिची औद्योगिक असमर्थता होय. तसेंच पुरुषांनीं फसविलेल्या स्त्रियांशीं समाज सहानुभूति दाखवीत नाहीं. पुरुष सुटून जातो, अशा दुर्दैवी स्त्रीवरच समाज गहजब करतो. आपला स्त्रीवर्गहि स्त्रियांसच दोष देऊं लागतो आणि दुर्दैवी स्त्रियांस

सहानुभूति न दाखवितां त्यांच्या दुर्दैवाची कथा मोठया मौजेनें एकमेकामध्यें सांगतो अशा प्रसंगीं, अशा फसलेल्या स्त्रियांनीं संघीभूत झाले पाहिजे आणि आपल्या उपजीविकेसाठीं आणि स्वतःचा आयुष्यक्रम सुखकर व्हावा यासाठी उद्योग चाल विला पाहिजे. यांत हिंदु, मुसुलमान, ख्रिस्ती हा भेदच उत्पन्न होऊं शकत नाहीं. सर्वच समाज फसलेल्या स्त्रियांनां दुष्टतेनें वागवितात. ''

डॉ. नंदिकाबाईंनां ते म्हणणें अगदीं अक्षरशः पटलें. आणि पद्मावतीस तिकडे नेण्याचा हेतु तिला ख्रिस्ती करण्याचा नसावा अशी थोडथोडी खात्रीहि वाटूं लागली. दोघींचे बोलणे चालू असतां डॉ. नंदिकाबाईंनी कुतुहलबुद्धीने प्रश्न करावे आणि मिस् हटर यांनी उत्तरें द्यावीत एवढेच चालू नव्हते. मिस् हटर याहि प्रश्न करीत होत्याच. त्यांनीं प्रथम सहज प्रश्न केला की, आमच्या संस्थेची मदत मागण्यापूर्वी तुम्ही येथे कांहीं खटपट केली होती काय ? डॉ. नंदिकाबाईनीं जरा थांबून उत्तर दिलें. '' होय, केली होती, किंबहुना चालूच आहे असे म्हटलें तरी चालेल. पद्मावतीबाईच्या अर्भकाची सोय करावयास हिंदुसमाज तयार आहे काय हे पहाण्यासाठीं आणि नसल्यास समाजाच्या त्या वृत्तीवर उपाय शोधून काढण्यासाठीं आमचे एक देवीदासपंत नावाचे स्नेही खटपट करीत आहेत. तथापि तुम्ही मध्येंच आलां आणि पद्मावतीबाईनीं तुमच्याबरोबर जाण्याची इच्छा दर्शविली तर आतां मुलीबद्दल कांहीं यशस्वी खटपट देवीदासपंतांनीं केली असल्यास त्यांनां उत्तर काय द्यावें याविषयीं मला विचारच पडणार आहे. ''

'' हे देवीदासपंत कोण आहेत ? ''

"पांच सहा दिवसांपूर्वी हे "स्वामी ब्रह्मगिरि" म्हणून प्रसिद्ध होते. आतां त्यांनीं संन्यास टाकून दिला आहे. हे वीस वर्षे बाहेरदेशीं होते, आणि आतां संन्यासीवृत्तीचे कट्टे शत्रु बनले आहेत. किंबहुना ते असें म्हणतात कीं, खरा संन्यासधर्म मरूनच गेला आहे. आणि संन्याशाच्या कपड्यांत जे लोक आहेत त्यांच्याशीं आपली तुलना होऊं नये असें तरी त्यांस वाटत असावें. त्यांनीं संन्याशाचे कपडे नुकतेच जाळून टाकले आणि आतां देवीदास अत्रे हे आपले जुनें नांव त्यांनीं पुन्हां धारण केलें आहे."

मिस् हटर यांनीं ही बातमी ऐकल्याबरोबर त्यांच्या तोंडावर आनंदाची छटा चमकूं लागली व हास्यहि उत्पन्न झालें. तेव्हां डॉ. नंदिकाबाईंस असें वाटले की, हिंदूच्या संन्यासधर्माचा असा बोजवारा उडाला म्हणून या ख्रिस्ती बाईस मोठा आनंद झाला असला पाहिजे.

कांहीं वेळानें मिस् हंटर म्हणाल्या "या देवीदासपंतांस परदेशप्रवासामुळे बराच अनुभव मिळाला असेल; याशिवाय आज संन्यास घेणें, उद्यां संन्यास सोडणे वगैरे गोष्टींच्या पाठीमागें अनुभव बराच असेल; अशा गृहस्थांशीं बोलणें मनोरंजक व बोधप्रद होईल असे वाटते."

"होय,त्यांचे बोलणे फारच मौजेचे होतें.त्यांच्या अनुभवाच्या एकेक गोष्टी ऐकून त्यांचे भाषण अगदीं ऐकत रहावेसें वाटते, शिवाय ते वादविवाद करूं लागले म्हणजे ते देखील बरेच रंगांत येतात. आज मी त्यांनां अनेक वर्षे म्हणजे त्यांनीं हिंदुस्थान सोडण्यापूर्वीपासून ओळखीत आहे."

"मी त्यांच्या व्याख्यानांचे सारांश वर्तमान पत्रांतून वाचले. त्यांच्या व्याख्यानामुळें नागपुरास बरीच गडबड झाली असे ऐकले पण त्यांनीं संन्याशाचे कपडे जाळले हें ऐकलें नव्हतें."

"तें अजून वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध व्हावयाचें आहे. कदाचित् प्रसिद्ध होणारहि नाहीं, कां कीं प्रतिसहकारपक्षाच्या पत्राला येथे आलेल्या शंकराचार्यांचा बडेजाव करावयाचा आहे; आणि त्याच पत्रांत संन्यासधर्म कधींच मेला म्हणून ब्रह्मगिरींनी कपडे जाळले अशी बातमी प्रसिद्ध

करणें म्हणजे शंकराचार्यांनां थप्पड देण्यांत आपण साहाय्यक झालों असें त्या पत्रकारांस वाटेल म्हणून ही बातमी कदाचित प्रसिद्ध होणारहि नाहीं."

"ब्रह्मगिरींनां एकदां पाहिलें पाहिजे असें वाटतें."

"कदाचित ते तुम्हालाच भेटावयाला येऊं इच्छितील; कारण ते पद्मावतीबाईसाठीं खटपट करीत आहेत. आणि ते यासाठीं पद्मावतीबाईंनां भेटून आपल्याकडे त्यांनीं राहूं नये म्हणून कदाचित खटपटहि करतील."

"त्यांनां ती खुशाल करूं द्या. पद्मावतीबाईंनां वाटेल तेव्हां परत जातां येईल. आमच्या संस्थेकडे संशयी दृष्टीनें पहाण्याचें कारण नाहीं, तथापि स्वामी ब्रह्मगिरींसारख्या म्हणजे देवीदासपंतांसारख्या अनुभवी विद्वानाची गांठ पडल्यास मलाहि आनंद होईल."

कांहीं वेळ आणखी बोलणें होऊन मिस् हंटर निघून गेल्या, त्या संध्याकाळीं देवीदासपंत पुन्हां भेटावयास आले.

---

## प्रकरण ३१ वें.

## देवीदासपंतांचें समाजसंशोधन.

देवीदासपंत यांनां पद्मावतीच्या मुलीसाठीं खटपट करण्याचें कार्य मोठें महत्त्वाचे वाटत होतें, आणि या मुलीच्या संवर्धनासाठीं तरतूद करतांना आपण एक मोठाच प्रश्न सोडवूं अशी त्यांस आशा वाटत होती. समाजाची सुधारणा तात्त्विक चर्चेनें होणार नाहीं तर कार्य करायला लागतांनां एखादें काम हातीं घेऊन ते करायला लागणें व जे उपाय वापरावे लागतील, ते वापरणें आणि त्यांत दिवसानुदिवस सुधारणा करीत जाणें हाच समाजसुधारणेचा अनुक्रम आहे असें देवीदासपंत समजत होते. ते म्हणाले कीं, ब्राह्मणादि मध्यम वर्गांतलें कोणतेंहि कुटुंब असली मुलगी बाळगायला तयार होत नाही. तर आतां जातबीत न पहातां प्रत्येक घरांत जाऊन कोणत्या स्थितींतली मंडळी मुलगी पत्करावयास तयार आहेत हें पहावें व त्यांतल्यात्यांत चांगलें घर पाहून मुलगी ठेवण्याची व्यवस्था करावी. त्यांनां फिरण्यास वेळहि थोडा जास्त मिळूं लागला. त्यांच्याकडे जी मंडळी संध्याकाळीं जमत होती त्यांपैकीं बरीच मंडळी येईनाशी झाली होती. संन्याशाच्या कपडयामुळें जी एक आकर्षकता देवीदासपंतामध्यें उत्पन्न झाली होती ती कांहीं मंडळीच्या बाबतींत सपूर्ण नष्ट झाली होती. व्यक्ति जोंपर्यंत संन्याशाचे कपडे वापरीत आहे तोपर्यंत अधिकारानें उपदेश करण्यास लायख आहे पण तीच व्यक्ति साधारण गोपाळराव गोविंदराव यांसारखी दिसूं लागली म्हणजे उपदेश करावयास लायख नाहीं अशी बऱ्याच लोकांची समजूत होती असें दिसे. लोकांनां संन्यासधर्माची चेष्टा करणारा हवा होता पण तो संन्यासीच हवा होता. जगांतील आयुष्यक्रमणाचा हेतु आत्मनिर्मूलन हा नसून आत्मसंवर्धन हा आहे असें सांगणाराहि गुरु पाहिजे होता पण तसें सांगणारा गुरु देखील भगव्या कपडयांचाच हवा होता. मताप्रमाणे आचरण करणारी व्यक्ति लोकांस नको असेंच दिसतें. लोकांनां मते आणि आचार यांची सुसंगति फारशी आवडत नाहीं, उलट लोकांनां विसंगततेचीच अभिरुचि अधिक आहे असे देवीदासपंतांस चांगलें दिसून आलें असावें.

देवीदासपंतांच्याकडे जरी बऱ्याच लोकांनीं येण्याचे सोडले तरी संध्याकाळीं त्यांच्याकडे ४।५ मंडळी जमत होती. त्यांच्याविषयीं आदर कायम राहिलेली मंडळी त्यांत होती. त्यांच्याकडे येणाऱ्या मंडळींपैकीं जी कांहीं केवळ कुतूहलबुद्धीची मंडळी होती ती मंडळी शंकराचार्य आल्यापासून त्यांच्याकडे जाऊं लागली. जेव्हां संन्याशाचे कपडे जाळून टाकल्यानंतर चारपांच मंडळी तेवढी

आपल्याकडे निष्ठेनें अजून येत आहेत असें देवीदासपंतांनी पाहिले तेव्हां त्यांस वाटलें कीं कार्यार्थी मडळी कांहीं तरी आहेत. तथापि ही देखील कितपत आपल्याला उपयोगी पडतील याची देखील देवीदासपतांस शकाच होती.पण ती शंका त्यांनी व्यक्त केली नाही. ते आपल्या मनाशीं म्हणाले की खरा व योग्य अनुयायी मिळणें नेहेमीच कठिण आहे. प्रत्यक्ष येशू ख्रिस्ताच्या अनुयायांपैकीं आणीबाणीच्या प्रसंगी त्याच्याशीं कोण प्रामाणिक राहिले! त्याच्या अनुयायांपैकी एकाने तर ३० रुपयांसाठी त्याला शत्रूच्या स्वाधीन केले. आणि येशूच्या निधनानंतर जेव्हां त्याच्या नांवावर धर्मप्रचारकाचा धदा करतां येईल असे वाटले तेव्हां ते पुन्हा त्याचे अनुयायी म्हणून पुढें आलेच! सामाजिक स्थिति अशीच आहे. अनुयायांच्या खोटया अनुयायित्वाने आपण आपणांस कधीहि फसवून घेऊं नये. आपण आपल्या आयुष्यात जितके उपयुक्त काम होईल तेवढे करून जावे. तें उदाहरण जितक्यांस खरोखर बोधप्रद होईल तेच आपले खरे अनुयायी आहेत, मग त्यांची व आपली ओळख असो किंवा नसो. हा हिंदुसमाज जो मृतकल्प झाला आहे त्या समाजाची आपल्याला जितकी सेवा करतां येईल तितकी आपण करू आणि कार्य मार्गाला लागले म्हणजे ते चालविणारे लोक आपोआपच पुढे निघतील. याप्रकारचे विचार मनांत आल्यामुळे आपल्याकडची गर्दी कमी झाल्यामुळें आशावादी देवीदासपंतांस दुःख न होतां आनदच झाला.

सकाळी अनेक घरे हिंडून त्या मुलीचे सरक्षण करण्यास कोण तयार होतो याची चौकशी ते प्रत्येक घरीं जाऊन करूं लागले. त्यांनां चौकशी करतांना प्रत्येक घर कोणत्या प्रकारचे आहे याची चांगली माहिती नसल्यामुळे त्यांनीं कांहीं वेश्यांच्या घरांत देखील प्रवेश केला. तेव्हां एक दोन श्रीमंत वेश्या त्यांनां भेटल्या. पहिल्या प्रथम एका श्रीमान वेश्येची गांठ पडली त्यावेळेस झालेला संवाद त्यांनीं पुष्कळांस पुढें सांगितला. तो सवाद येथें देण्याजोगा आहे. प्रथम त्यांनां मोठा प्रश्नच पडला कीं, या मुलीसबधाने आपण कांहीं गोष्ट काढावी किंवा नाहीं. देवीदासपंत प्रथम आले आणि वेश्येला पाहिल्याबरोबर ते एकदम मुग्ध झाल्यासारखे झाले. वेश्येनें प्रथम जेव्हां त्यांनां पाहिले तेव्हां तिला असें वाटले की कोणी ब्यारिस्टर आपल्याकडे आले आहेत. तेव्हां ती स्मितमुद्रेने त्याच्याकडे गेली. पण त्या वेश्येने स्वामी ब्रह्मगिरीनां पाहिले होतें. आणि त्यानीं छाटी जाळून टाकल्याची हकीगतहि तीस कळली होती; व तिनें जवळ आल्यानतर स्वामी ब्रह्मगिरि म्हणून त्यांस ओळखले आणि बसावयास सांगितले आणि आपला सत्कार आम्ही कसा करावा म्हणून पृच्छा केली ही वेश्या पन्नाशी उलटलेली होती आणि तिच्या संरक्षणाखालीं कांहीं देखण्या तरुण मुली होत्या त्याहि घरांत इकडे तिकडे हिंडतांना तर कोचावर बसून गोष्टींची पुस्तके वाचतांना त्यांस दिसल्या

देवीदासपंतांच्या मनांत कांहीं घोंटाळा झालेला पाहून त्या नायकिणीने विचारले—

"आपल्या मनांत कांहीं बोलावयाचें होतें असे वाटतें, पण आपणांस ते बोलण्यास संकोच वाटत असावा असे दिसते. स्वामी मंडळीनीं देखील आमच्याशीं बोलायला लाजूं नये. मी आपल्यापेक्षां वडील आहे. स्वामींनां लोकांच्या हितासाठीं संन्यास घ्यावा लागतोच; पण काम हा ब्रह्मदेवादिकांनां किंवा ऋषींनां देखील सुटला नाही."

या प्रकारची प्रस्तावना सुरू झाल्यानंतर देवीदासपंतांस आपल्या सद्वेतूचा विपर्यास झाल्यामुळे थोडेसें वाईट वाटले. पण त्याचा एक चांगला परिणामहि झाला. पद्मावतीच्या मुलीला नायकिणीच्या घरीं वाढवायला मुळींच द्यावयाची

नाहीं तर त्या मुलीची कथा या नायकिणीस कशाला सांगावी असा त्यांच्या मनांत किंतु येऊन ते स्तब्ध बसले होते व आपले हाती घेतलेलें काम सांगणारच नव्हते. पण या घरांत येण्यांत आपल्या मनांत अन्य हेतु आहे अशी कल्पना त्या बाईला येऊं नये म्हणून ती कथा त्यांस सांगावी लागली. त्यांनां असें वाटलें कीं आपण प्रथम वेश्येकडे गेलो व पहिल्याप्रथमच गेलो असल्या-मुळे कांही न करतां परत आलो असे कबुली जबाब मोठमोठे महात्मे देत आहेत व या बाईला असलीं उदाहरणे पुष्कळच ठाऊक असतील. व आपण जर आतां स्पष्टीकरण केल्याशिवाय गेलों तर ही बाई आपणांस अशा मडळींपैकीच सम-जेल, आणि आपण प्रथमत: कसे आलो आणि प्रत्यक्ष प्रसग आला तेव्हां फजीत होऊन परत कसे गेलों याचा बोभाटा ही आपल्या अनेक गिऱ्हाइकात करील आणि ते गिऱ्हाईक त्या कथेची प्रसिद्धि सर्व गांवभर थोडक्याच वेळांत करतील. हे सर्व विचार वेगाने देवीदासपंतांच्या मनांत आले आणि त्यांनी त्या नायकिणीस आपला हेतु स्पष्ट केला ते म्हणाले—

"मी एका ब्राह्मण विधवेच्या नुकत्याच जन्म-लेल्या मुलीला बाळगायला कोणी तयार आहे काय म्हणून चौकशी करण्यासाठी बाहेर पडलों. मी प्रत्येक घर हिंडत आहे आणि या मुलीची जबाबदारी घ्यावयास कोणी तयार आहे काय म्हणून विचारीत आहें. येथें मी आलो तेव्हां हें नायकिणीचे घर आहे हे मला ठाऊक नव्हते."

"नायकिणीचें घर असले म्हणून काय झाले! आम्हालाहि विचारायला हरकत नाहीं. नायकिणी देखील मुली बाळगायला घेतात."

"तें खरें आहे. पण त्या मुलीला नायकि-णीच्या धंद्याला आम्हाला लावायचें नाहीं. आणि आपल्यासारख्यांच्याकडे आपल्या मुलीला ठेवावें अशी तिच्या आईचीहि इच्छा असेलसें वाटत नाहीं."

"मुलगी ब्राह्मण विधवेची आहे, आणि ती लग्नाच्या नवऱ्याची नाहीं. असें जर आहे तर ती मुलगी आमच्यासारख्यांच्या घरीं वाढूं द्यावयास काय हरकत आहे?"

"याचे मुख्य कारण एवढेंच कीं, त्या मुलीस नायकिणीचा धंदा करावयाचा नाहीं. शिवाय नायकिणींनां मुली वाढवायला देणे हा कायद्याने गुन्हाहि आहे."

"कायद्याबियद्याची गोष्ट तुम्ही बाजूला ठेवा. त्याविषयी आज बोलण्यांत अर्थ नाहीं. कायद्या-चाच प्रश्न असेल तर आपणांस जें करावयाचे तें वकीलाचा सल्ला घेऊन करूं; आणि जी कांहीं गोष्ट करावयाची असेल ती कायद्याखाली कशी आणायची ते पाहू. पण तुम्ही मला हे खरे सागा की, मुलीला आमच्यासारख्या बायकांच्या घरी वाढू द्यावे यांत तुम्हाला कांहीं गैर वाटतें काय? तुम्ही सरळ बोलणारे म्हणून गांवांत तुमचा लौकिक आहे, तर तुम्ही तुमच्या मनांत जो किंतु असेल तो सरळ सांगा."

"त्या मुलीने नायकिणीच्या धंद्यांत जाऊं नये यासाठीं तर सगळा प्रयत्न करावयाचा!"

"नायकिणींच्या सर्व मुली नायकिणीच कोठें होतात? त्यांतल्या कांही तर राजांच्या राण्या झालेल्या आहेत, कांहीं शिकून मास्तरणी व डाक्टरणी झाल्या आहेत. पण डाक्टरीण होईपर्यंत शिकणे सर्वच मुलींनां शक्य नसतें; सर्वच मुलीच्या घरीं तशी ऐपत नसते. त्यामुळे बऱ्याच मुलींनां नाय-किणीच्याच धंद्यांत रहावे लागते."

"पण कायद्याचा प्रश्न आहेना? शिवाय त्या मुलीच्या डोळ्यासमोर नेहेमीं वाईट उदाहरण रहाणार याची वाट काय?"

"कायद्याचा प्रश्न बाजूला ठेवा. मी उलट असें म्हणेन कीं, कायदा कागदावरच राहिला आहे. सरकारचें काय; कागदावर सुंदर दिसणारे

कायदे ते करणार. तुपांत चरबी घालण्यास कायद्यानें प्रतिबंध असेल पण सरकार बाजार कोठें तपाशीत आहे. संमतिवयाचा कायदा केला तो कागदावरच राहिला आहेना? आम्हां नायकिणीनां त्या कायद्याची मुळींच भीति वाटत नाहीं. आणि तो कायदा आम्ही मोडतों हे वाईट करतो असेहि वाटत नाहीं. ज्या मुलींचा बाप त्यांनां कबूल करीत नाहीं त्या मुलीनां संभाळणाऱ्या आया किती आहेत बरे? त्यांनां संभाळणारा जर कोणी नाही तर त्या मुलामुलींचे काय होते हे तुम्हाला ठाऊक नाहीं काय? तीं रस्त्यावर सोडून दिलीं जातात किंवा ठार मारलीं जातात. तर मीं तुम्हाला विचारतें कीं एखाद्या मुलीला नायकिणीनें संभाळणें बरे, कीं त्या मुलीला मारून टाकणे बरे याचे मला सरळ उत्तर द्या."

"त्या मुलीने मरणे किंवा तिला नायकिणीने सभाळणे या दोहोमध्ये त्या मुलीला नायकिणीने संभाळणे हेच जास्त योग्य आहे असे मी म्हणेन. मुलगी नायकिणीने संभाळली तरी ती नऊ दहा वर्षाची किंबहुना १५ वर्षाची होईपर्यंत ती नायकिणीच्या धंद्याला लागत नाहीं."

"स्वामी, तुम्ही आतां बोललां तें पूर्णपणें मन मोकळें करून बोललां असे वाटत नाहीं. तुम्ही आपले खरे मत सांगावयाचे चुकवीत आहांत. माझा प्रश्न हा आहे कीं, एखादी मुलगी जगली तर तिला फक्त वेश्यावृत्तीचे भवितव्य आहे दुसरें नाहीं असे जर असलें तर त्या मुलीला जगूं द्यावें की, मरू द्यावे हा माझा तुम्हाला सरळ प्रश्न आहे. मुलगी वेश्यावृत्तीत जाण्यापेक्षां मेलेली बरी असेहि तुम्ही नीतीच्या मोठ्या डौलांत बोलाल पण हे तुमचे खरें मत आहे काय? हेंच मी तुम्हांस विचारते! तुम्ही नीतीच्या प्रश्नावर स्वतंत्रपणे व निर्भयपणाने बोलणारे आहांत अशी तुमची प्रसिद्धि आहे तर मला उत्तर द्या! वेश्यावृत्तीच्या स्वीकारापेक्षां मृत्यु बरा असेंच जर तुमचें मत असेल तर त्याचें तुम्हाला समर्थन केले पाहिजे."

"वेश्यावृत्तीपेक्षां मृत्यु बरा वगैरे गोष्टी बोलणे लोकांनां त्या आयुष्यापासून परावृत्त करण्यासाठीं आहे. जर एखादी वेश्या आत्महत्त्या करूं लागली तर कोणीहि तिला परावृत्तच करील. यावरून मृत्यूपेक्षां वेश्यावृत्तीत रहावें लागले तरी हरकत नाहीं पण जिवंत रहाणें चांगलें हेच लोकमत आहे."

"असे जर आहे तर लग्नाशिवाय झालेल्या मुलींचें पोषण करण्यास लोक तयार नाहींत, सरकार तयार नाहीं तोपर्यंत आम्ही त्या मुलींचे सगोपन करतों तें बरे की, वाईट करतो?"

"तुमच्याशिवाय संगोपन करण्यास दुसरे कोणी पुढे येऊ नये हीच गोष्ट वाईट आहे. पण तुम्ही मुलीनां पोसावयास तयार होतां ते मुलींच्या कल्याणासाठी नव्हे तर आपल्या स्वार्थासाठीं होता, आणि त्यांस पुढे वाईट मार्गाला लावता."

"आम्ही निराश्रित मुलींस आश्रय देतों, आणि आईने सोडून दिलेल्या मुली बाळगतों हें स्वार्थासाठीं असेल; पण बाप मुलाला शिक्षण देतो ते देखील मुलाचा आधार आपल्याला म्हातारपणी व्हावा एवढ्यासाठींच देतोना. आम्ही मुली बाळगतो त्या वेश्यावृत्तींत घालण्यासाठीं म्हणूनच बाळगीत नाहीं तर आपल्यालाहि कोणाचा आधार असावा म्हणून बाळगतों; त्यांस शिकवायला दुसरा धदा आमच्यापाशी नसल्यामुळे त्यांनां नायकिणीच्या धंद्यांत घालतो. स्वार्थासाठी आम्हीं मुलीनां बाळगावयाला तयार होतो याबद्दल तुम्ही तरी दोष देऊं नये, तुमचा उपदेशच स्वार्थाला विरोधक नाहीं."

"तुम्हीं माझा दोष बरोबर दाखविला. तुम्ही लहान मुलाचें आणि निराश्रित स्त्रियांचे संगोपन करतां त्यावर आक्षेप घेतांना तुम्हीं हें स्वार्थासाठीं करतां हा आक्षेप घेतां येणार नाहीं. तरी देखील

तुमचें मुलींनां संभाळावयाला पुढे येणे हें योग्य आहे असे माझ्या मनाला अजून पटत नाहीं."

इतकें बोलणे ऐकल्यानंतर त्या वृद्ध वेश्येने जरासे हास्य केलें. आणि म्हणाली कीं, "नायकिणीच्या जन्मावर आमच्यांतच पुष्कळ वाद होतो. मला वादवीद करण्याइतकी हुशारी नाहीं. आणि आमचा धदा नायकिणीचा असल्यामुळे पुरुषांबरोबर वादविवाद करण्यापेक्षां त्यांचे मन आपल्याकडे ओढून कसे घ्यावे या गोष्टीकडेसच जास्त लक्ष द्या असें मी मुलीनां सांगत असतें; पण तुमचे बोलणे जरासे उडवाउडवीचे आहे असे वाटतें.लग्नाशिवाय झालेल्या मुलीना नायकिणीनी घेऊ नये असें म्हणून तुम्ही आई जेवायला घालीना व बाप भिकेला धाडीना अशी त्या मुलीची स्थिति करीत आहांत. आमचा धदा सगळ्या लोकांना हवा आहे, पण तो हवा आहे असे कोणी सागत नाही. उलट आमच्या धद्याची नेहमी निंदाच होत असते. पण यांतच आमचे कल्याण आहे असे वाटते. जर आमच्या धंद्याची स्तुति झाली असती तर आमच्या धंद्यामध्ये फार गर्दी झाली असती. मला बाकी आमच्या दरजावर जरा सरळ, मोकळ्या मनाने व निर्भीडपणे बोलणाऱ्या मनुष्याचे मत पाहिजे आहे. म्हणून मी तुम्हांस विचारले. आमची कपिला मुबईला कॉलेजांत शिकत आहे आणि ती सुट्टीच्या दिवसांत म्हणून येथे आली आहे ती बोलायला लागली म्हणजे आम्हाला उत्तर देतां येत नाही. ती मला असे सांगते की, नायकिणीचा धंदा डॉक्टर, वकील यांच्याइतका प्रतिष्ठित आहे, व तो तसा समजला गेला पाहिजे, व त्यासाठी त्या धद्यात, व धंद्यांत पडलेल्या स्त्रियांत सुधारणा करीत गेले पाहिजे. व जेव्हां स्त्रियांनां त्या कुंवार असतांना किंवा विधवा असतांना मुले होतात, तेव्हां त्या मुलांचा सांभाळ करण्याचे काम आपण करीत गेले पाहिजे. मी तुमच्याशी जास्त बोलू शकणार नाही पण आमच्या कपिलेच्या शंकांचें तुम्ही समाधान कराल तर फार चांगलं होईल. तुम्ही जीं व्याख्यानें दिलीं तीं कपिलेनें ऐकली आहेत. व तुमच्या व्याख्यानावर आमच्या घरी बोलणेहि झाले आहे, तर तुम्ही तिच्याशींच दोन शब्द बोला. ती तुमच्या निर्भयपणाची फारच तारीफ करीत असते."

हे सर्व संभाषण देवीदासपंतांस फार चकित करीत होतें. आपली इतकी माहिती या नायकिणीच्या घरी देखील आहे आणि आपल्या बोलण्यावर या देखील विचार करतात हे पाहून देवीदासपतांनां आनंद झाला, आणि आपली तारीफ करणारी कपिला कोण म्हणून थोडीशी उत्सुकता उत्पन्न झाली. इतक्यांत कपिला पुढे आली. कपिला ही साधारणपणे गौर वर्णाची, केंसांची रचना जरा झोकबाज केलेली, गुलाबी पातळ नेसलेली व उन्हाळ्यासाठी रंगाचा चष्मा वापरणारी, तरुण वीस–बावीस वर्षाची मुलगी होती. तिच्या चेहेऱ्यावर रांठपणा मुळीच दिसत नसून तिचा चेहरा अगदीं कोवळा पण थोडासा सलज्ज व भिडस्त असा दिसत होता. आणि त्यामुळे ही अजून वेश्यावृत्तीला न लागलेली स्त्री असेल काय असे त्यांच्या मनांत आले. इतक्यांत तिने स्मितयुक्त होऊन चष्मा काढला तेव्हां तिचा चेहरा अधिक खुलून दिसू लागला. तिला पाहिल्याबरोबर देवीदासपतांनां पूर्वी पाहिल्याची आठवण झाली. त्यांच्या दुसऱ्या व्याख्यानाच्या वेळेस दादासाहेब गेंगणे वगैरे मंडळी निघून गेल्यानंतर जी मंडळी व्याख्यान ऐकावयासाठी उरलीं होती. त्यांत एकच स्त्री होती. आणि ती पहिल्याच ओळीत बसली होती. आणि ते व्याख्यान चालू असतां आपल्या स्मिताने ते आपणांस आवडतें आहे असे ती दाखवीत होती. व त्यामुळे तो चेहेरा देवीदासपंतांच्या लक्षांत राहिला होता. ती स्त्री कपिला आहे हे देवीदासपंतांनीं तिला पाहिल्याबरोबर ओळखले.

कपिला म्हणाली की, "माझ्या मनांत जे येते ते मी सरळ सांगते, ब्राह्मण विधवेची

लग्नाशिवाय झालेली मुलगी, ती जर ब्राह्मणांतच राहिली तर तिची स्थिति चांगली न होतां वाईटच होत जाईल असें मला वाटतें. तिच्या शेजारच्या सर्व मुली तिच्याकडे बोट दाखवितील. आमच्यासारख्या स्त्रियांनां तुम्ही खालच्या वर्गांतल्या समजतां तरी देखील तशी मुलगी आमच्यांतच राहिली तर तिला आपण अभागी आहोंत म्हणून नेहमीं जाणीव रहाणार नाहीं. तिचे नेहमींचे आयुष्य अधिक सुखांत जाईल असेंच मला वाटते."

"तुमचे असे म्हणणे आहे काय कीं, समाजातल्या ज्या अभागी जन्माच्या स्त्रिया असतील, त्यांनीं तुमच्यांतच येऊन रहावें." देवीदासपंतांनी विचारलें.

"होय, अगदीं अक्षरशः माझे म्हणणें तसेच आहे."

हें कापिलेचें बोलणे बरेंचसे निश्चयपूर्वक झालेले दिसत होते.

देवीदासपंतांस हे निश्चयाचे म्हणणें ऐकून जरासे कौतुक वाटले. त्यांनां या घरांत शिरल्यापासून आपल्या मनात कांहीं नवीन विचार दांडगाई करून प्रवेश करीत आहेत असे वाटावयास लागलें आणि आतां आपण पुढे आणखी आश्चर्यकारक मते प्रतिपादिलीं जातील असेंहि वाटावयास लागले; त्यानी कपिलेला म्हटले की, "इतर लोकांनीं आपल्या संस्थेत येऊन मिळावें किंवा आपल्या वर्गात येऊन मिळावे असें लोकांनां त्या संस्थेविषयीं किंवा वर्गाविषयीं अभिमान वाटल्याशिवाय वाटत नाहीं तर नायकीणींच्या वर्गाला आपल्या वर्गाविषयी अभिमान वाटतो काय?"

"कांही अंशीं आम्हांस अभिमान वाटतो आणि तो आम्ही लपवून ठेवीत नाहीं. आम्हाला जो अभिमान वाटतो तो वेश्यावृत्तीबद्दल मुळींच वाटत नाही, तर समाजाच्या अनिष्ट स्थितीमुळे म्हणजे पुरुषवर्गाच्या स्त्रियांचे पोषण करण्यास असमर्थतेमुळे पुरुषांनी सोडून दिलेल्या स्त्रियांनां वेश्यावृत्ति जरी आचरावी लागली तरी आम्ही त्यांतून डोकें वर काढण्यासाठीं जो प्रयत्न करीत आहो त्याबद्दल आम्हांस अभिमान वाटत आहे. वेश्यावृत्ति पुरुषांच्या दोनप्रकारच्या दोषांमुळे निर्माण होते. स्त्रीच्या पोटापाण्याची जबाबदारी तिचा आप्त पुरुषवर्ग टाकून देतो ही पुरुषांची स्त्रियांनां वेश्या बनविण्यासाठीं पहिली कृति होय. पुरुषांची त्यांस वेश्या बनविण्याची दुसरी खटपट म्हटली म्हणजे स्त्रिया जेव्हां नैतिक बधनें टाकून आपले शरीर त्यास अर्पण करावयास तयार होतील तेव्हांच त्यांस पैसे द्यावयाचे. या दोन तऱ्हेच्या पुरुषाच्या प्रवृत्तीमुळे हा वेश्यावर्ग तयार झाला आहे. आतां स्त्रिया या वर्गात दाखल झाल्यानतर जो प्रयत्न करतात, तो वेश्यावृत्तीतून सुटण्यासाठीच असतो. आणि या बाबतींत आम्हांस जें यश येऊ लागलें आहे त्याबद्दल आम्हांस अभिमान वाटतो"

"नायकिणींनां वर्ग सुधारत जाणारच अशी तुमची खात्री आहे काय?"

"आमची सुधारणा व्हावी यासाठीं प्रयत्न पाहिजे पण तो प्रयत्न कसा पाहिजे याची तुम्हांस कल्पनाच नाहीं. नायकिणींनां पुरुषांचे नियम लावले पाहिजेत. उपजीविकेसाठीं पैसे मिळविण्याची जबाबदारी आमच्यावर पडते तशी नवऱ्याबरोबर नांदणाऱ्या स्त्रियांवर पडत नाहीं. आमची तुलना केलीच तर ती उपजीविकेसाठीं स्वतः श्रम करणाऱ्या स्त्रियाशीं केली तर चालेल कामकरी स्त्रियापैकी स्वैपाकणी, मजूरणी, मास्तरणी, नर्सेस डॉक्टरणी यांच्याशीं तुलना केली तर ती कांहीं अंशी बरोबर होईल. ज्या गोष्टी आम्हाला कराव्या लागतात त्यांसंबंधाचा विचार करतांनां आमची तुलना कोणाशी योग्य होईल हें पहाण्याचे लोक विसरतात. आमची तुलना पुरुषांशीं न करतां पुरुषांनीं पोसलेल्या बायकांशीं करून लोक आमची योग्यायोग्यता ठरवितात. ती तुलना बरोबर नाही, वेश्यांनां लोभी समजतात.

डॉक्टरणी लोभी कमी आहेत काय? अनेक पुरुषांशीं संबंध ठेवणारी स्त्री मेली तर बरी असे आज लोक डौलानें बोलून आपल्या नीतिमत्तेची जाणीव दाखवितील, पण अनेक स्त्रियांशी संबंध ठेवणारा पुरुष जिवत रहाण्यापेक्षा मेला तर बरा असे म्हणण्यास आज लोक तयार आहेत काय?''

''तसे लोक कधीच म्हणणार नाहीत. कां की जगांतले बरेच मोठे पुरुष बायकांच्या बाबतींत निराळ्या कल्पनांचे होते. त्यांनां असे वाटे कीं, श्रीमंताने आंबे जसे जास्त खावेत तशा त्याला बायकाहि जास्त हव्यात.''

''जेव्हां स्त्रिया वेश्यावृत्तीकडे जातात तेव्हां त्याचे कारण केवळ त्यांस त्या प्रकारच्या आयुष्याची आवड होय असे म्हणतां येणार नाही. पुष्कळ स्त्रिया या प्रकारच्या आयुष्यक्रमाकडे जातात याचें खरे कारण पोटापुरतेंहि पैसे मिळविण्या साठीं त्यांनां दुसरा मार्ग नाही हे असते. जर मुलींने किंवा घरांतील स्त्रियांनी वेश्या होऊं नये अशी इच्छा असेल तर त्याला योग्य मार्ग म्हणजे स्त्रियांनां पैसे मिळविण्यास अधिक समर्थ करणे हा आहे.''

''म्हणजे नीतीच्या शिक्षणापेक्षा आर्थिक दृष्टीने ज्याचे महत्त्व अ हे अशा शिक्षणाला तुम्ही महत्त्व देतां.''

''होय, आमच्या वर्गाच्या अस्तित्वाचे कारण पुरुषच होत, आमच्या वर्गावर रागावणे हे पुरुषांनां योग्य नाही. मी अर्थशास्त्र शिकत आहे आणि मी अर्थशास्त्राच्या दृष्टीने विचार करू लागले आहे. आणि आमच्या वर्गाच्या सुधारणेचा विचार करतांना एकंदर स्त्रीजातीच्या आर्थिक सुधार णेचाच प्रश्न माझ्या डोळ्यापुढें जास्त येतो. आमच्या वर्गाची सुधारणा करावयास पाहिजे आहे व ती आमच्या वर्गातील स्त्रीपुरुषांकडूनच झाली पाहिजे. तुम्ही विचार एवढाच करावयाचा की आमच्या धंद्याकडे प्रवृत्ति होऊं नये म्हणून स्त्रियांची आर्थिक समर्थता कशी वाढवावी! जेव्हां तुमच्या कुटुंबव्यवस्थेचे दिवाळें वाजते आणि कुटुंब कांहीं तरी कारणाने स्त्रीचा त्याग करते तेव्हां त्या स्त्रिया आमच्या आश्रयास येतात. स्त्री आपले पोट भरण्यास समर्थ असेल तर तिला तिच्या नवऱ्याने किंवा आप्तांनीं टाकून दिले नाही तर ती वेश्येच्या धंद्याकडे वळणार नाही. वेश्या वर्गामध्ये देखील वेश्यांच्याच धंद्याविषयी अभिरुचि असलेल्या थोड्या. आतां आपण या धंद्यांत पडलो आतां आपणांस बाहेर जावयास तोंड नाही म्हणून बऱ्याच वेश्या या धंद्यांत रहातात. त्या जरी त्या धंद्यांत पडल्या तरी त्या आपल्या मुलींनां गाणे बजावणे शिकवून उच्च दर्जा मिळवून देण्याचा प्रयत्न करतात. कित्येक आपल्या मुलींनां मास्तरणी, डॉक्टरणी वगैरे करतात पण ते सर्वांनांच साधत नाही. सर्वच मुली त्या लायकीच्या नसतात. दररोज या धंद्याकडे निराश्रित बायका ढकलल्या जातात, व त्यांनां त्या स्थितींतून वर यावयाचें असते. आम्हाला वर येण्यांत कोणी मदत करील ही शक्यताच नाही. आम्हाला आमच्याच प्रयत्नाने वर आलें पाहिजे या प्रयत्नाचे अनेक प्रकार दिसून येतात. कांही स्वतः गायन वादन मागाहून शिकतात आणि गाणारणी बनतात. काही तर आपली स्वतंत्र वृत्ति सोडून देऊन पुन्हां कोणातरी पुरुषाची उपपत्नी म्हणून रहातात. त्यांचा प्रयत्न नेहेमी इतर स्त्रियांच्या आयुष्यक्रमाकडे जाण्याचा असतो, व त्यांनां त्या आयुष्यक्रमाकडे आपल्या हयातीत जरी जातां आले नाही तरी पुढच्या पिढीला तरी तो आयुष्यक्रम मिळावा म्हणून बऱ्याच जणींचा प्रयत्न असतो.

''एखादी स्त्री वेश्या बनली म्हणजे ती त्या धंद्याला वंशपरंपरेने दिली जात नाही काय? त्यांनां स्वाभाविक आयुष्यक्रमाकडे परत फिरणे कितपत शक्य होतें?'' देवीदासपंतांनीं विचारलें.

"आमच्या समाजांतून स्त्रियांनीं सामान्य समाजांत मिसळण्याची क्रिया एकसारखी चालूच आहे, महाराष्ट्रांत असली मंडळी आपणांस मराठे म्हणवून घेतात पण ते कडूमध्ये मोडतात, आणि कडूंमध्ये कांही पिढया गेल्या म्हणजे कडूंची घराणीं गोड होऊं लागतात. ही क्रिया मंदगतीने चालू आहे. पण त्या क्रियेला बाहेरचा खटपटी सुधारक अधिक वेग देऊ शकेल असे वाटत नाहीं. जेव्हां सुधारकांनीं कांही प्रयत्न केले तेव्हां ते आमच्या उन्नतीस अपकर्षच झाले. नायकीणींना गाण्याला बोलावण्याविरुद्ध जी चळवळ झाली. तिचा परिणाम आमच्या वर्गातल्या स्त्रियांनां केवळ वेश्याव्यवसाय टाकून देऊन गाणे बजावणे हा धंदा करावा हें जे आमच्यांतील अनेक स्त्रियांचे ध्येय आहे ते ध्येय चुरडून टाकण्याकडे थोडासा झाला. वेश्याव्यवसाय बंद झाला नाही पण वेश्येने कळवतीण बनणे कठीण होऊ लागले. जेव्हां आमच्या घराण्यांतल्या मुलींची आम्हीं दत्ताबरोबर लग्नें वगैरे केलीं तेव्हां आमच्यावर खटले करण्यांत आले कीं मुलीचें लग्न देवाबरोबर लावून तिला वाईट मार्गाला लावण्याची पूर्व तयारी आम्ही करीत आहोत. याचा परिणाम असा झाला की, आमच्या वर्गातील स्त्रियांच्या मनांत ज्या काही धार्मिक भावना होत्या त्या मारून टाकण्यास हे प्रयत्न कारण झाले. ज्या मुलीचे लग्न देवापाशीं लावले जाई ती आमच्या सारख्यांच्याच घराण्यांतली असल्यामुळे त्यांनां दुसरे भवितव्यच नसे. असे असतांना देवापाशीं लग्न लावण्याचा धार्मिक विधी करून हा धंदा करावयाचा एवढीच आवडनिवड रहात असे. अशा वेळेस आमच्या धार्मिक विधीला सुधारकानीं अडथळा केला तो वेश्याव्यवसायास नियंत्रक मुळीच झाला नाहीं. धार्मिक भावना असलेल्या वेश्यांच्या ऐवजीं कोणतीच उच्च भावना न ठेवणाऱ्या वेश्या मात्र त्यामुळे निर्माण झाल्या"

"आपण आतांच म्हणाला ना कीं, वेश्यांच्या मुलींना सामान्य समाजांत शिरणे शक्य असतें तर दत्ताबरोबर लग्ने लावण्यास मनाई केल्यामुळें कांहीं स्त्रियांनां तरी लग्ने लावणें भाग पडले असतें."

"लग्ने लावण्याची क्रिया फारशी जोराने होत नाही आमच्याशीं आमच्या सारख्यांच्या घराण्यांत जन्मलेल्या पुरुषांखेरिज इतर पुरुष लग्न लावणार नाहीत. त्यामुळे आम्हाला जर कांहीं कुटुंबसदृश आयुष्यक्रम आचरावा असे मनांत आलें तर आमच्यापुढे एकदोनच मार्ग खुले असतात. एकतर आमच्या सारख्याच कुलांत उत्पन्न झालेल्या पुरुषांशीं लग्ने लावणे किंवा कोणातरी सुखवस्तु पुरुषाच्या आश्रयाने रहाणें. याखेरीज तिसरा मार्ग या स्थितीत नाही. कोणत्याहि जातीचा पुरुष असला तरी तो आम्हास हलक्याच समजणार. तो आमच्याशीं लग्न लावण्यास तयार होत नाही. कांही बऱ्या जातीतल्या लोकांबरोबर नायकिणीच्या मुलींची लग्ने झालीं आहेत पण ती सर्व अपवादाची उदाहरणे समजावीत. अन्य जातींतल्या पुरुषाच्या केवळ आश्रयानेच रहाणे आम्हांस शक्य होते. आमच्या सारख्या कुलांत असे पुष्कळदां होते कीं पुरुष उनाड निघतात व त्यामुळे नायकिणीच्या मुलीनीं लग्न लावावयाचे म्हटले तर नायकीण जातीत लायख पुरुपच नाहीत उनाड मुलाशी लग्न झालेल्या मुलीची लग्ने देखील झालेली आहेत पण त्याचा परिणाम चांगला झालेला नाही. ज्या उनाड पुरुषाशीं नायिकीणींच्या मुलीनी लग्ने लावली त्यांच्या बाबतीत मला असे आढळून आले कीं, त्या मुलींना पुन्हां वेश्येच्या धंद्याकडे जावे लागले आणि त्यांच्या वेश्यावृत्तीच्या उत्पन्नावर ते पुरुष राहूं लागले."

"तर मग तुमच्या वर्गातील स्त्रियानां वर येणें ही गोष्ट अशक्य आहे असे तुम्हांस वाटते काय?" आशावादी देवीदासपंतांनीं विचाले.

"मुळीच नाही. आमच्यामध्येंच सुधारणेचा क्रम चालू आहे हे आपल्याला मी सांगितलेंच

आहे पण माझ्या मतें आमचा वर्ग जर अधिक सुशिक्षित झाला तर तो केवळ आपलीच सुधारणा करील एवढेंच नव्हे तर इतर लोकांचीहि सुधारणा करील."

"सामान्यत: मराठ्यांच्यापेक्षां आमच्यांतील कांहीं घराण्यांत शिक्षण वाढले आहे, व आमच्या मंडळींची कुटुबे स्थापन झालीं आहेत. व एकंदरींत एक निराळीच जात तयार होत आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. नायकिणीच्या मुलापैकी कोणी सुशिक्षित होऊन पुढे आला तर त्यास ज्याचें घराणे एक दोन पिढया स्थापन झाले आहे अशांतल्या मुली मिळावयास हरकत होत नाही. पण नायकिणीच्या मुलीची गोष्ट मात्र निराळी आहे, त्याचा एकदोन पिढया झालेल्या अकरमाशांच्या घराण्यांत सहज प्रवेश होत नाही. जर तिचें शिक्षण चांगलेच झाले असले तर, किंवा एखाद्या कानव्हेंटमध्यें ती वाढली असली तरच सुशिक्षित किंवा सुखवस्तु घराण्यांतली मंडळी त्याच्याशी लग्नें करतात."

"आम्हांस या वर्गाचे भवितव्य वाईट दिसत नाहीं. उलट या वर्गाची स्थिति ब्राह्मणापेक्षांहि चांगली राहील असे मला वाटते. या मंडळींत एक समज झाला आहे तो हा कीं, प्रत्येक मुलीचे लग्न होईलच ही खात्री नाही. कां कीं, चागले सुशिक्षित पुरुष वाटेवर पडले नाहीत. व यासाठीं आमच्यामध्ये जीं घराणी स्थापन झाली आहेत, त्यांमध्ये स्त्रीशिक्षणाची जी आस्था उत्पन्न झाली आहे ती ब्राह्मण जातींतहि दिसत नाहीं. व यामुळे आमच्यांतून जी घराणीं निघून कुलीनपणाच्या मार्गास लागलीं आहेत, ती देशांतल्या अत्यंत सुशिक्षित घराण्यात मोडतील. एवढेच नव्हे तर तीं कालांतराने देशांतील अत्यंत प्रगमनशील घराणीं म्हणून लोकांस ठाऊक होतील.

"आम्ही लग्ने करूं लागल्याकारणानें समाजामध्ये आम्ही मोठीच कामगिरी करीत आहोंत सर्व हिंदुस्थानामध्यें जातीकडे लक्ष न देणारी जात आमचीच होय. आम्हांला कोणत्याहि जातीविषयीं द्वेषबुद्धि नाहीं आम्ही आमच्या आमच्यांत लग्ने करण्यास जितक्या तयार असतो तितक्याच इतर जातीशीहि लग्ने करावयास तयार असतो आम्हांला ब्राह्मण सारखाच आणि कायस्थ प्रभु सारखाच, आणि पांचकळशी किंवा सोनार सारखाच, सर्व प्रकारच्या वरच्या जातीशी आमची लग्न करण्याची तयारी असल्यामुळे आमचीं निरनिराळ्या जातीशीं लग्ने होत आहेत. गेल्या पिढीत आमच्या वर्गातल्या बायका निरनिराळया जातीच्या पुरुषांबरोबर रहात असत. आतां रजिस्टर लग्नेहि झाली आहेत. तेव्हां सर्व जातीचा एकमेकांशी संबंध घडवून आणणे हे जे अर्वाचीन सामाजिक सुधारणेचे ध्येय आहे ते आम्हीच पार पाडीत आहो जेव्हा पुरुष कांही अडचणीत सापडला जातो, तेव्हा तो आमच्याकडे वळतो. सुखासुखी वळत नाही. कांहीं लग्ने प्रेमामुळेहि होतात. जी पुरुषांची अडचण ती आमची संधि होय.

"आमच्या स्त्रियांना स्वत:चे स्वरूप आकर्षक करणे गैर वाटत नाही. व पोषाखांतील सौंदर्य मग ते मुंबईच्या शेणव्यांत सांपडो की कोळ्यांत सांपडो ते आम्ही उचलतो. आमचें अनुकरण अनेक स्त्रीपार्टी नट करतात आणि त्या नटांचे अनुकरण पुण्यामुंबईतल्या बायका करतात."

संभाषण अधिकाधिक चित्ताकर्षक होत चाललें आहे आणि आपण ते अधिक ऐकण्याचा मोह आंवरला नाहीं तर ते अधिकच वाढत जाईल आणि आपण हातीं घेतलेले कर्तव्य बाजूस सारल्यासारखे जरी झाले नाही तरी तिकडे दुर्लक्ष केल्यासारखें होईल म्हणून इतक्यांत भाषण आटपते घ्यावें असें देवीदासपंतांस वाटले. तथापि तें संभाषण ते नाखुशीने संपवीत होते. ते आपल्या मनाशी म्हणाले या मुलीचें सर्व बोलणें आपण आताच ऐकून घेतलें तर चांगले. कारण

आपण पहिल्याप्रथम चुकून आलो म्हणून आलों पण या घरांत आपल्याच्याने जाणून बुजून पाऊल घाळवणार नाहीं. तर या कपिलेचे सभाषण ऐकण्याची संधि आपणांस पुन्हां मिळणार नाही, असेहि त्यांच्या मनांत आले आणि संभाषण आटपतें घेऊं नये असें वाटले. पण ही आपल्या मनाची चलबिचल झाल्याची शका त्यांच्या मनांत येतांच त्यांच्या तोंडावर पुन्हां निश्चयी मुद्रा दिसूं लागली. संभाषणसौख्याच्या मोहाने आपले कर्तव्य लांबणीवर टाकावयाचे नाहीं, वाटले तर आपण पुन्हां या घरांत केवळ कपिलेस भेटावयासाठीं येऊं असें ते मनात म्हणाले. आणि पुढे कपिलेस म्हणाले "कपिलाबाई, तुमच्याशी सभाषण मला जितके नवीन माहिती देणारे आणि बोधप्रद वाटले तितकें नागपुरांत आल्यापासून दुसरें बोधप्रद संभाषण मी ऐकलेंच नाही. आणि आणखी बोलत रहावे असें जरी मनाला वाटलें तरी मी जें काम हातीं घेतलें आहे ते तडीस नेण्यासाठीं मला चौकशी करावयाची आहे."

"तर मी तुम्हाला अशी सूचना करते कीं, त्या मुलीच्या आईची इच्छा असेल तर त्या मुलीला बाळगायला मी तयार आहे. त्या मुलीला मी चांगले शिक्षण देऊन पुढे आणीन. माझे लग्न झाले तरी मी ती मुलगी बाळगीनच. आणि ती मुलगी माझ्या आप्तांतली म्हणून वाढली तर तिला दिवस सुखाचे जातील अशी माझी समजूत आहे."

देवीदासपंतांनां कपिलेचें बोलणें बरेंचसें पटले. आणि आपल्या मनांत जी कल्पना होती त्या कल्पनेपेक्षां ही कल्पना वाईट आहे असेहि त्यांच्याने म्हणवेना. त्यांना असे वाटलें कीं ही मुलगी लग्नाची झालेली आहे अशी बतावणी करीत राहून कोणा तरी तरुणाला ठकविण्यापेक्षां चक्क वेश्याकुलांतून वर येऊं पहाणाऱ्या तरुणीला ही मुलगी पालनपोषण करण्यासाठीं द्यावयास बिलकुल हरकत नाहीं. तथापि निश्चयात्मक आश्वासन त्यांस देतां येईना. त्यानीं कपिलेस एवढें सांगितलें की, "तुमच्यासारख्या शिकलेल्या मुलीच्या स्वाधीन त्या मुलीला करावें हें मला स्वतःला मुळींच गैर वाटत नाहीं. तथापि याविषयींचा निर्णय तिच्या आईवरच सोंपविला पाहिजे."

देवीदासपंत निघणार इतक्यात चांदीच्या तबकांत ठेवलेल्या एका चांदीच्या कटोऱ्यांत विडे पुढे आले. आणि कपिलेने त्यांतील एक विडा घेऊन देविदासपतास दिला. देवीदासपंतांनां तो विडा घेताना कांहीं अंशीं मनांतून सकोच वाटत होता तरी त्यांनीं विडा घेतला.

देवीदासपंतांस जातां जातां कपिलेने एक विनंति केली कीं "आपल्याकडे सभाषण ऐकायला इतर मंडळी जमतात तर जोपर्यंत मीं नागपुरासच आहें तोंपर्यंत मीहि आल्ये तर चालेल काय?"

देवीदासपंतांनी "आपण खुशाल यावे" असें उत्तर दिलें.

देवीदासपंत निघून गेल्यानंतर जी घरांतील प्रौढ बाई देवीदासपंताशी अगोदर बोलली होती ती म्हणाली कीं, "कपिले, तूं बोलण्यांत हुशार आहेस. तुझा आज मोठा विजय झाला असें मी म्हणेन."

---

## प्रकरण ३२ वें.

## शुद्धि व संघटन.

देवीदासपत त्या वेश्येच्या घरांतुन निघून गेल्यानंतर त्यांना असे वाटले की, आपण या तरुण स्त्रीच्या बोलण्याने मोहून जाऊन भलतीच गोष्ट कबूल केली नाही काय? त्यांच्या मनांत एक तऱ्हेची पराभवाची भावना उत्पन्न झालेली होती. ज्या वेळेस आपण या घरांत शिरलो त्यावेळेस वेश्येस मुलगी संभाळावयास द्यावयाची नाहीं या निर्धाराने शिरलों होतो ना! पण आतां कपिलेस या मुलीस देण्यास हरकत नाही हें कबूल कसें

केलें! पण त्यांनीं आपल्या मनांत त्या प्रश्नाचें उत्तरहि दिले. कपिलेला मुलीचें पालकत्व द्याव-यास हरकत नाहीं असे जे आपणांस वाटूं लागलें यांत आपली चुकी मुळीच नाहीं. कपिला कांहीं वेश्या नाही. ती वेश्येच्या कुळांत जन्मली आहे, व वेश्येच्या घरी ती आपणांस दिसली एवढेच. ती शिक्षण होऊन बाहेर पडली म्हणजे कांहीं इतर वेश्याबरोबर रहाणार नाहीं. तर मग तिला मुलगी द्यावी अशी शिफारस करण्यामध्ये आपण जात-कुळीकडे लक्ष देत नाही एवढाच आरोप आप-ल्यावर येईल. आणि त्या आरोपास आपण पात्रच आहो. कारण जातकुळीस आपण कमीच महत्त्व देत आहो.

देवीदासपंतांनीं समाजसंशोधन आणखी चाल-विलें होते. एका स्त्रीनें त्यांच्यापाशीं द्यावयास मुलगी नसून जर मुलगा असता तर तो घ्यावयाची इच्छा प्रदर्शित केली आणि मुलगा नाहीं असे कळल्या-नतर एखादा मुलगा अशा कोणा बाईला झाला तर मला अगदी गुप्तपणे कळवा अशी विनति केली. तेथे देवीदासपंतांना आढळून आले कीं, त्या बाईला मुलगा हवा आहे याचे कारण असे आहे कीं त्या बाईच्या नवऱ्याची इस्टेट मोठी आहे.

पण नवऱ्याला एक भाऊ आहे आणि इस्टेट अजून अविभक्त आहे. या स्त्रीला असे दिसून येत आहे येई कीं आपला नवरा वारला तर आपल्या वांट्याला हिंदु विधवेचे अन्नवस्त्र काय ते येणार. तिचा नवरा दत्तकास विरुद्ध होता. तो म्हणत असे कीं दत्तक घेणे म्हणजे घरांत भांडण आणणे आहे. दत्तक कायदेशीर व्हावयास दत्तक देणारा व घेणारा असे दोघेहि पाहिजेत. तर दत्तक द्यावयास जर कोणी असेल तर तो मुलास आपल्याकडे वळवून घेईल आणि आपली सर्व इस्टेट तो दत्तकाचा खरा बाप बळकावून बसेल आणि आपल्या बायकोचे हालच होतील. यासाठीं दत्तविधान करून घ्यावयास तो मुळींच खूश नव्हता. तेव्हां त्या बाईच्या मनांत कोठून तरी मुलगा पैदा करावा आणि तो आपलाच म्हणून सांगावें असे होतें. तेव्हां या प्रका-रच्या खटपटीसाठी त्या बाईला मुलगा पाहिजे होता. देवीदासपतांनीं त्या बाईला सरळ सांगि-तले कीं, मुलगा नाहीं; तथापि असता तरी या प्रकारच्या खटपटींत मी सामील झालों असतो असे आज तरी मला वाटत नाही. देवीदासपंतांनी मनांत म्हटले की "दत्तक घ्यावयास देणारे आई किंवा बाप पाहिजे असल्या कायद्याच्या मूर्ख हट्टामुळे लोकांना किती बरे लटपटी कराव्या लागतात?"

देवीदासपंतांनी आणखी चौकशी पुष्कळ केली पण विशेष फलश्रुति झाली नाही. इतक्यांत त्यांच्या मनांत असें आलें कीं बाईस ज्या मनुष्या-पासून मूल झाले आहे त्या मनुष्याचें आणि तिचें लग्न लावून देण्याची खटपट करतां येणार नाहीं काय? डॉ. नंदिकाबाईनीं ही खटपट कशी वगळली. त्या मनुष्याचें मन वळविण्यासाठीं किंवा त्याला तसे करणे भाग पाडण्यासाठीं आपले साहाय्य कां मागितले नाहीं? इत्यादि विचार त्यांच्या मनांत आले आणि त्यासंबंधीं नंदिका-बाईस प्रश्न विचारण्याचे त्यांनीं ठरविलें.

त्याच दिवशीं संध्याकाळीं श्री शंकराचा-र्यांच्या अध्यक्षतेखालीं शुद्धिसंघटनावर नारायण-राव अलंकारांचे व्याख्यान होते. व्याख्यान जोराचें झाले; आणि त्यावेळेस शुद्धिसंघटनेचे महत्त्व श्रींनीं देखील सांगितले. श्रींच्या उदार मनाची श्रोत्यांत वाहवा झाली. त्यावेळस एक सत्यशोधक वक्ता पुढे येऊन बोलूं लागणार तो त्यास बोलूं देऊ नये म्हणून थोडीशी गडबड झाली. तेव्हां तो सत्यशोधक वक्ता म्हणाला "मी स्वामींची निंदा करण्यास उभा राहिलो नाही. त्यांचें अभिनंदन करण्यास उभा राहिलो आहे." हें शब्द गडबड करूं इच्छिणाऱ्या व्यक्तींस ऐकूं आले तेव्हां शांतता होऊ लागली. कारण स्तुति

असेल तर चालू द्या. हेंच त्या जमलेल्या मंडळीस पाहिजे होतें. त्यानें स्वामींचें अभिनंदन करण्याचे मुख्य कारण हेच सांगितले कीं "सत्यशोधक धर्माचीं तत्त्वे स्वामींनीं मान्य केली म्हणजे जुन्या हिंदु धर्माचे आणि आमचे भांडणच उरले नाही." असें त्याने म्हणतांच लोकांनी टाळ्या वाजविल्या. तेव्हां त्या सत्यशोधकाने पुन्हां म्हटले कीं "सत्यशोधक धर्माचीं तत्त्वे स्वामींनीं स्वीकारलीं म्हणजे तुम्हीं स्वीकारलीं असें जर असेल तर जुन्या पीठांचा मोठा उपयोग आहे हें कोणताहि सत्यशोधक मोठया आनंदानें कबूल करील. जुन्या लोकांनां हा आणखी एक गौरव वाटला आणि टाळ्या पुन्हां झडल्या. पण शेवटीं आणखी एक वाक्य तो पुढे बोलला तेव्हां मात्र "त्याला खालीं ओढा" वगैरे मडळी म्हणू लागली. आणि त्याला इतर मंडळी मारतील या भयाने काही मंडळींनीं त्याला उचलून नेले. लोकांत त्वेष उत्पन्न करणारे वाक्य होतें तें येणेप्रमाणे—जे स्वामी कांहीं वर्षांपूर्वी कोल्हापूरचे महाराज महारांच्या हातचे पाणी प्याले म्हणून मराठयांनां त्यांच्याविरुद्ध उठवीत होते तेच स्वामी आज संघटनेच्या तर्फेचें बोलत आहेत, म्हणजे आज स्वामी श्री. छत्रपतीचे शिष्य झाले आहेत तर याबद्दल त्याचे मी अभिनदन करतो." सत्यशोधकास इतर मडळींनीं उचलून नेल्यानंतर हे बोलणारा मनुष्य मार खाल्ल्याशिवाय परत कसा गेला असेहि कित्येक बोलूं लागले.

सत्यशोधकाने उत्पन्न केलेली गडबड संपल्यानतर दुसरा एक मनुष्य उठून उभा राहिला आणि म्हणाला "शुद्धिसंघटनासारख्या चळवळीचा हेतु आपल्यांतील मंडळी परधर्मांत जाऊ नयेत असा असेल तर फार स्तुत्य आहे व आपणांस याबद्दल आस्था आहे म्हणून मला आनंद होत आहे पण तुमच्या परीक्षेची वेळ आली आहे. एका ब्राह्मण विधवेला मुलगी झाली आहे. तिची सोय हिंदुसमाजानें केली नाहीं तर ती मुलगी मिशनरी मंडळीच्या हवालीं करावयाची आहे तर आपण मंडळींनीं काय करावयाचे असेल ते करावे. ज्या मंडळींना या बाबतींत मदत करावयाची असेल त्यांनीं देवीदासपंतांस म्हणजे स्वामी ब्रह्मगिरींस भेटावे."

व्याख्यानाच्या शेवटीं हें भाषण झाल्याचा परीणाम झाला. हिंदुधर्मसंरक्षणाची चळवळ म्हणजे केवळ व्याख्यानें नाहीं, तर प्रत्यक्ष काम हातीं घेणें आहे आणि त्या कामाचें स्वरूप बरेंच गंभीर आहे. ते काम म्हणजे वेदव्यासांचें किंवा भगवान् श्रीकृष्णाचे नांव पन्नास वेळ घेतल्याने होणार नाही इत्यादि गोष्टी लोकांच्या मनावर ठसण्यास तेवढे शेवटचे आव्हान उपयोगी पडलें असावें. दुसऱ्या दिवशीं देवीदासपत दिवसभर घरीं राहिले पण या व्याख्यानाच्या जाहिरातीस उत्तर म्हणून त्यांस भेटावयास कोणीच आलें नाहीं; तेव्हां त्यांनीं तिसऱ्या दिवशीं डॉ. नदिकेकडे जाऊन आपल्यास एकंदर अनुभव काय आला हें कळविण्याचे ठरविलें.

---

## प्रकरण ३३ वें.

## तिनें काय सांगितलें.

देवीदासपत दुसऱ्या दिवशीं सबध दिवस घरींच होते. त्यांच्या मनांत आधल्या दिवशीं नायकिणीच्या घरांत जें संभाषण झाले त्यावर विचार चालू होते. वेश्याव्यवसायाविषयी त्यांच्या मनांत एक निराळी विचारमालिका सुरू झाली होती व ती विचारमालिका चालू असतां कपिलेचे स्मित वदन एकसारखे त्याच्या डोळ्यासमोर येत होते. आपल्या बोलण्यावर विचार करणाऱ्या स्त्रिया वेश्यावर्गांत देखील आहेत हे पाहून त्यांनां केवळ मौजच वाटली नाहीं तर आनदहि झाला. कपिलेनें त्यांचें संभाषण ऐकावयास येण्यासाठी जी परवानगी मागितली व जी त्यांनीं दिली तीविषयीं देखील त्यांचे विचार सुरू झाले; व आज जर

कपिला संध्याकाळीं संभाषण ऐकावयास येईल तर बरें होईल असें देखील त्यांच्या मनांत आल्याशिवाय राहिले नाहीं.

त्यांनीं प्रथमतः कपिलेने आपणांस काय सांगितलें याचा मनांत आढावा घेतला तो असा, स्त्रिया जेव्हां आप्तांकडून त्यागिल्या जातात तेव्हां त्या सांपत्तिक निरुपायामुळे वेश्याव्यवसायांत पडतात, त्या वेश्याव्यवसायांत जेव्हां पडतात तेव्हां त्यांची स्थिति अगदीं निकृष्ट झाली असते. वेश्याव्यवसायांत पडल्यानंतर त्या निकृष्ट स्थितींतून उठण्याचा प्रयत्न करतात. तो प्रयत्न म्हटला म्हणजे गाणेंबजावणे शिकणे आणि नायकीण बनणे, किंवा सिनेमानटी होणे हा होय. त्यांना ज्या मुली होतात त्यांनां देखील गाणेबजावणे शिकविणे किंवा त्या जास्त हुशार असल्या तर त्यांस मास्तरीण, सुईण किंवा डॉक्टरीण करू पहाणें हा सर्व त्यांचा आपल्या वर्गाच्या आर्थिक सुधारणेचा कार्यक्रम दिसतो. आपणास सुधारणा करावयाची झाली तर आज ज्या आत्मसुधारणेच्या क्रिया त्यांच्याकडून स्वयस्फूर्तीनें चालू आहेत त्यांनांच अधिक गति देणे अवश्य आहे. आर्थिक सुधारणेखेरीज सामाजिक सुधारणा देखील कांहीं विशिष्ट रस्त्यानें चालू आहे असेहि त्यांस दिसून आले. ज्या स्त्रियानां लहानपणापासून स्वावलंबनार्थ अधिक चांगले शिक्षण मिळाले आहे व ज्या वेश्याव्यवसायाकडे मुळींच लागल्या नाहीत असा वर्ग वेश्यावर्गातच तयार होत आहे. त्याचें सामाजिक भवितव्य होतें तें असें – एक तर त्यांचीं सदृश पुरुषांशीं लग्नें होऊन ही मंडळी सामान्य स्त्रीपुरुषाचा मार्ग स्वीकारतात. कित्येक स्त्रिया लग्न होणें शक्य झालें नाहीं तर एकाच पुरुषाच्या आश्रयानें रहातात, आणि यांचीं जीं मुलें होतात तीं प्रथमतः कडू समजलीं जातात आणि मग पुढून म्हणजे एक दोन पिढ्या उलटल्यानंतर असली मंडळी सर्वसामान्य समाजांत मिसळून जातात. एवंच या वर्गामध्यें आर्थिक सुधारणेचा आणि सामाजिक सुधारणेचा एक स्वाभाविक क्रम आहे, जर यांच्यांत आणखी सुधारणा करावयाची झाली तर त्याच क्रमास अधिक गति दिल्याने ती सामाजिक सुधारणा साध्य होणार आहे.

एकंदर समाजावर देखील हा वर्ग परिणाम घडवीत आहे. जातिभेद न मानणारा आणि अस्पृश्यांखेरीज वाटेल त्या जातीशीं लग्न लावावयास तयार असा सुशिक्षित स्त्रियांचा वर्ग यांच्यातूनच तयार होत आहे. तर हा वर्ग मोठी सामाजिक सुधारणा करण्यास उपयुक्त असा होणार आहे. हे सर्व विचार जेव्हां देवीदासपंतांनीं पुन्हां मनांत आणले तेव्हां कपिलेनें "पुरुषांनीं उपेक्षा केलेल्या स्त्रीवर्गाचा आत्मसुधारणेचा प्रयत्न आणि त्या वर्गाचें सामाजिक कार्य" याविषयीं एक " थिअरी " आपल्यापुढें मांडली आहे असे देवीदासपंतांस वाटले.

देवीदासपंतांच्या मनांत हे सर्व तात्त्विक विचारच येत होते असें नाहीं, तर कपिलेची मूर्ति देखील त्यांच्या डोळ्यांसमोर वारवार येत होती, आणि ती मूर्ति " मीहि तुमच्यासारखीच आशावादिनी आहे" असे बोलत आहे कीं काय असे त्यास भासत होते. ती असें बोलत आहे अशी त्यांच्या मनांत आलेली कल्पना त्यांच्या मनांत इतकी दृढ झाली कीं "होय. तू मजप्रमाणेच आशावादिनी आहेस " असे उत्तर देवीदासपंतहि देते झाले.

तूंहि मजप्रमाणेच आशावादिनी आहेस हे शब्द देवीदासपंतांनीं इतक्या मोठ्यानें उच्चारले कीं ते त्यांचे त्यांनांच ऐकू आले, व ऐकूं आल्याबरोबर आपण मनोराज्यांत शिरलो आहों याची त्यांस जाणीव झाली. आपण इकडे आजच्या शंकराचार्यांच्या पीठावर असलेल्या मंडळीसारख्या व्यक्तींविषयीं तिरस्कार बाळगतों, तेच आपण

कपिलेसारख्या वेश्येच्या मुलीस ती आपल्यासारखीच आहे हें समजायला लागलों आहोंत ही कल्पना मनांत येतांच त्यांनीं जरासें बिकट हास्य केले.

संध्याकाळचे ९ वाजले होते, मंडळी जमण्याची वेळ होती. नेहेमीची येणारी तीन चार मंडळी होती त्यांपैकीं दोघेजण आज देवीदासपंतांच्या सूचनेवरून मुद्दाम नारायणराव अलंकारांच्या शुद्धिसंघटनासंबंधींच्या व्याख्यानाला गेले होते. उरलेले दोघेजण आले नाहीत म्हणून देवीदासपंतांस चुटपुट लागली होती. देवीदासपतांच्या मनांत कपिलेनें त्यांचें संभाषण ऐकावयाला यावे असे होतें, पण तिने ते एकटे असतांच येऊं नये असें कांहीं तरी कारणानें वाटू लागलें होतें. संभाषण साडेपांचला सुरू होत असे आणि मंडळी साडेसात—आठाच्या सुमाराला बाहेर पडत असत. कांही मंडळी संभाषण संपण्यासपण्याच्या वेळेला येत असत. कपिला आपल्याकडे आली असतांना खोलींत कोणी नसावें आणि कपिला कांहीं वेळाने बाहेर जावयास निघाली म्हणजे जिन्यांतच तिची व नवीन येणाराची गांठ पडावी हे देवीदासपंतांनां नको होते. आपण आणि कपिला अशीं दोघेजण कांहीं वेळ एकत्र होतो आणि त्यावेळेस तेथें दुसरें कोणी नव्हते असा बोभाटा करण्यास कोणाला सवड मिळू नये असें देवीदासपतांस वाटत होतें.

देवीदासपंतांच्या मनांतील इच्छेप्रमाणें झालें. ते आपल्या मठीमध्यें बसले होते आणि संध्याकाळीं काही मंडळी संभाषण करण्यास आणि ऐकण्यास आली होती; आणि देवीदासपंतांनीं कांही निश्चित कार्य हातीं घेतलें आहे काय हें जाणण्यासाठीं आज आलेली नवी मंडळी उत्सुक झाली होती. ही मंडळी गांवांतल्या खटपटी मडळींपैकी होती. यांनां निश्चित उद्योग कांहीं नसे पण जर कोठें कांहीं काम चालू झालें तर त्यांत आपण आपला हात कसा तरी गुंतवावा या पद्धतीची होती. ते म्हणाले कीं "केवळ विचारप्रसाराचे कार्य करणें, व जगाला आनंदी करण्याचा प्रयत्न करणें हीं कार्यें मोठीं खरीं पण तीं जर मोठया प्रमाणावर होतील तरच उपयोग आहे. आतां आपण कांहीं तरी नेटानें कार्य हातीं घ्यावें आणि कांहीं हस्तक मंडळीस काम द्यावें म्हणून आम्ही मंडळी आलों आहोत." या मंडळीच्या आगमनामुळें जी मंडळी देवीदासपंतांनीं बाहेर पाठविली होती त्यांची उणीव भरून आली होती. ती मंडळी आल्यानंतर त्यांचें संभाषण सुरू झालें असतां कपिलाबाई तेथें आल्या. त्या आल्या त्यावेळेस त्यांनीं आपले शरीरमंडनाचे कौशल्य पूर्णपणें वापरलें आहे असें कोणाहि मार्मिकास वाटल्याखेरीज राहिलें नसते. एकीकडे अत्यत साधेपणा दाखवावा आणि दुसरीकडे आपले सौंदर्य चांगलें खुलून दिसेल अशा तऱ्हेने नटावे. या दोन्ही गोष्टींची सांगड ज्या स्त्रियांनां चांगल्या तऱ्हेन घालतां येईल त्या स्त्रियांपैकी कपिला आहे हें कोणीहि त्यावेळेस कबूल केलें असतें. शरीर अत्यंत आकर्षक करणे हें आपल्या सुशिक्षिततेशीं विसंगत आहे असें समजणाऱ्या कॉलेजांतील मुलींपैकी कपिला खास नव्हती. भरजरीचें पण साधें पांढरें पातळ, नुकतीच वेणीफणी केलेली आणि अगावर घेतलेला अगदीं थोडे जरीचे काम असलेला शेला असा तिचा थाट होता आणि ती एका मोटारमधून आली होती. या सर्व गोष्टींमुळे तिच्याकडे अनेकांचें लक्ष वेधलें. ती स्वामींच्याकडे आली तेव्हां कोणी तरी मोठया मनुष्याची बायको आहे असें समजून लोकांनीं उत्थापनहि दिलें. देवीदासपंतांनीं देखील स्मितमुद्रेनें तिचें स्वागत केलें. देवीदासपंतांचे या वेळेस बोलणें चाललें होतें तें "विचारप्रवर्तकाचें काम करणारानें दुसरें कोणतेंहि काम हातीं कां घेऊं नये" या विषयावर चाललें

होतें. इतक्यांत जमलेल्या मंडळीपैकीं एकानें म्हटले कीं "तुम्ही एखादें काम हातीं घेऊन ते तडीस कसें न्यावे याविषयी विचार करूं लागला तरच तुम्हांस त्या विषयावर योग्य विचार करतां येईल. ज्या सामाजिक विचारास अनुभवाची जोड नाहीं तो सामाजिक विचार देखील फारसा उपयुक्त होणार नाहीं. उदाहरणार्थ तुम्ही आपल्या स्त्रीवर्गाला तुमचे भवितव्य उज्वल आहे म्हणून सांगावयाला लागला तर आम्हीं तुम्हांस असा प्रश्न करूं की तुम्हांला येथील स्त्रियांच्या आजच्या स्थितीची प्रत्यक्ष माहिती काय आहे? तुम्ही सर्व प्रदेश स्वतः पाहू शकणार नाहीं. तुमच्यापाशीं अनेक कार्यकर्ते असतील तरच त्यांचे अनुभव तुम्ही एकत्र करून त्यावर विचार करून त्यांचे भवितव्य उज्वल कसें आहे तें सांगू शकाल."

हे त्या गृहस्थाचे बोलणे ऐकल्यानतर कपिलेने अत्यंत मोहक असे स्मित केले आणि त्या मोहक स्मिताचा परिणाम झाला. त्या गृहस्थास आपण जे बोलले ते या सुदर स्त्रीस पटलें असें वाटून मोठी धन्यता वाटली.

या विषयावर चर्चा करण्याच्या मनःस्थितींत देवीदासपंत नव्हते. ते म्हणाले कीं "विचारप्रवर्तकाचें काम सोडून देऊन कार्यप्रवर्तक बनावें ही आपली सूचना आहे तिचा मी योग्य विचार करीन. कदाचित मी कार्यप्रवर्तक होण्याच्या मार्गाला लागलोहि असेन माझ्यापुढे सध्यां एक प्रश्न येऊन पडला आहे तो एका ब्राह्मण विधवेच्या मुलीसंबंधानें आहे. या मुलीला संभाळण्याचें जर कोणी हिंदु पत्करावयास तयार नसेल तर त्या मुलीला कोणा तरी ख्रिस्ती संस्थेच्या हवालीं करावयाचे तिच्या आईच्या मनांत आहे. तर त्या मुलीसाठीं कोणी तरी पालक मी शोधीत आहें. तुम्हांला जर मी कांहीं काम हाती घ्यावें असें वाटत असेल तर हें काम मी हातीं घेतलें आहे म्हणून सांगतों. याला आपण काय मदत करूं शकाल तें सांगा?"

एक मनुष्य म्हणाला मी "कारस्पांडेन्स"चें काम करीन, आपण नावें सांगाल त्यांनां पत्रें पाठवीन."

दुसरा म्हणाला कीं, "आपणाला यासंबंधाची कांहीं प्रसिद्धिपत्रकें छापावयाचीं असल्यास तीं तयार करणे किंवा त्यांचीं प्रुफें तपासून छापण्यासंबंधाने छापण्याला आर्डर देण्याचे काम मी करीन."

तिसरा मनुष्य म्हणाला कीं, "आपण जमवून आणलेल्या पैशाचा मी हिशोब ठेवीन."

हीं तिन्ही उत्तरें ऐकून देवीदासपंतांच्या मनांत काही विचार आला व ते हंसले आणि पुढे म्हणाले "बरे तर, मला एखादी संस्था काढावयाची झाली तर तुम्हाला मदतीला घेण्याचा अवश्य विचार करीन." देवीदासपतांनी सर्वास उत्तर दिले.

ही मंडळी साधारणपणे थप्पड बसल्यासारखी झाली, व एकमेकांकडे पाहून उठली व निघून गेली. ही जरी खालीं गेली तरी ती बराच वेळ एका समोरच्या दुकानांत बसली होती. त्याचा हेतु हा होता कीं, ही आलेली बाई देवीदासपताच्यापाशीं किती वेळ बोलत बसते व देवीदासपंत दार लावून घेतात कीं काय ते पहावें. पण कपिला बराच वेळ खालीं उतरली नाहीं व ते होते तोंपर्यंत त्या खोलीचें दारहि लावलेले दिसले नाहीं तेव्हां मडळी कंटाळून परत गेली.

ही मडळी खालीं उतरल्यानंतर कपिलेस आपलें योजलेले बोलणें बोलण्यास संधि मिळाली.

---

## प्रकरण ३४ वें.

## कपिलेचे विचार.

"आपण माझ्या म्हणण्याचा कांहीं विचार केला आहे काय?"

"मी विचार केला आहे पण तुम्हाला त्या मुलीचे पालकत्व देणें ही माझ्या इच्छेची गोष्ट नाहीं."

"आपण त्या मुलीला माझ्याकडे द्या किंवा देऊं नका, त्या मुलीची पालक होण्यास तयार होणे माझें कर्तव्य आहे असे मला वाटत आहे आणि त्याप्रमाणे माझें काम मी केले असें मला वाटत आहे."

"तुम्हाला ते कर्तव्य कां वाटतें?"

"याचें कारण एवढेच कीं, माझे आईबाप कोण हे मला नक्की ठाऊक नाहीं. मला एका नायकिणीने वाढविलें. मी नायकिणीची मुलगी नाहीं. पण माझी अशी समजूत आहे कीं मी देखील एखाद्या ब्राह्मण विधवेची मुलगी असेन."

"ही तुमची समजूत कशाने झाली?"

"ही समजूत होण्याचें मुख्य कारण हें की माझ्या पालक आईचीच तशी कल्पना होती. त्या आईच्या कल्पनेखेरीज दुसरा पुरावा मजपाशीं नाही. हें मी साधारण १० वर्षांची असतां मला कळले. आईनें मी नायकिणीच्या धंद्यांत पडू नये म्हणून मला शिक्षण देऊन तयार केले. मी खरोखर वेश्येची मुलगी नाही या ज्ञानाचा माझ्या मनावर जितका इष्ट परिणाम झाला, तितकाच माझी जी कोणी खरी आई असेल तिला एखाद्या पुरुषाने फसविल्यामुळे मी ब्राह्मण मुलगी म्हणून जगांत वावरावयाच्या ऐवजीं नायकिणीची मुलगी म्हणून वावरूं लागलें आहे, अशा कल्पनेचा माझ्या मनावर मोठा परिणाम झाला."

"तुम्हांला याबद्दल नेहेमी दुःख होते काय"?

"आपल्या स्थितीवर विचार उत्पन्न केल्यामुळें जीं दुःखें उत्पन्न होतात तसल्या दुःखांत कोणतीहि व्यक्ति नेहमीं कशी राहूं शकेल? मी त्यांत दैववादी आहें. मला असें वाटते कीं, ब्राह्मण आईबापांपासून जन्म पण वेश्यागृहांत वाढणें या गोष्टी माझ्या हातून कांहीं विशिष्ट क्रिया घडण्यासाठीं घडून आल्या आहेत. मी दैववादी आहे पण आजचे दुर्दैव उद्यांच्या मोठ्या कार्यासाठीं लागणाऱ्या तयारीकरतां आहे असे मला वाटतें"

"तुम्हांला शिक्षण मिळाले आणि तुम्हीं वेश्या कुलांतील नाहीं हें तुम्हाला कळलें याचा तुमच्या मनावर काय परिणाम झाला आहे? तुम्हाला कोणत्या कर्तव्याची जाणीव झाली आहे?"

"ब्राह्मण विधवांच्या मुलींचें संगोपन करण्याचें आपण पतकरावे असे मला वाटूं लागले. मला असे वाटते कीं चांगल्या जातींतल्या व चांगल्या आईबापांच्या पण केवळ लग्नाशिवाय झालेल्या अनेक मुली गोळा कराव्या, त्यांना शिक्षण द्यावें व तें माझ्या इच्छेप्रमाणे द्यावे म्हणजे मोठी समाजक्रांति घडून येईल."

"तुम्हांला कोणती समाजक्रांति घडवून आणावयाची आहे?"

"मला पुष्कळच गोष्टी कराव्याशा वाटतात. आजकालच्या या शिक्षणमंत्र्यांपेक्षां मी शिक्षणमंत्री अधिक चांगली होईन असे मला वाटतें."

"माझ्या प्रश्नाचे हे उत्तर नाहीं."

"नाहीच, मी उच्चारलेलें वाक्य त्या उत्तराची प्रस्तावना आहे. मला जी खटपट करावयाची आहे ती स्त्रियांचे व्यवहारक्षेत्र अधिक विस्तृत करण्यासाठीं करावयाची आहे. आमच्या स्त्रियांच्या अंगीं धैर्यादि गुणांचा विकास करावयाचा आहे, आणि आपल्या स्त्रिया अनेक उद्योगधंद्यांत पडलेल्या पहाण्याची आपल्या लोकांस संवय लावावयाची आहे. आज मास्तरीण व नर्स हीं दोनच कामें अल्पशिक्षित स्त्रियांस शक्य आहेत. स्त्रियांचा औद्योगिक आयुष्यक्रम यापेक्षां अधिक व्यापक करावयाचा झाला तर लोकांचा कुलीनपणा नेहमीं आडवा येतो असें दिसूं लागलें आहे. टेलीफोनची नोकरी असली म्हणजे

स्त्रियांचा कुलीनपणा आडवा आलाच. दुकानदारणीची नोकरी असली म्हणजे ती देखील आमच्या "कुलीन आर्य स्त्रियांनां" न पत्करण्याजोगी ठरलीच. जेथें जगामध्यें अहमहमिका करून पोटाला मिळवावयाचें असते तेथे आपल्या "हिंदु" स्त्रिया मागेंच रहाणार. जणु काय पारशिणी आणि गोवानिज बायका कुलीन नाहींतच. गोवानीज डॉक्टरला किंवा वकीलाला आपल्या मुलीला टाइपिस्टचें किंवा प्रसंगीं दुकानावरील काम करावयास जाऊं देण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं. आमचा पन्नास रुपयांचा हिंदु कारकून मात्र मुलींनां कामाला कधींच पाठविणार नाहीं. तो इकडे अर्ध्या पोटीं रहातो. घरीं मुलांनां दूध देखील नाहीं आणि कुलीनपणा कशांत तर मुलींना कामाला न पाठविण्यांत. निरनिराळ्या आयुष्यक्रमासाठीं शिक्षण देऊन मुलींनां निरनिराळ्या उद्योगांकडे पाठविणे आणि स्त्रियानां धंद्याचे अनेक मार्ग खुले करून देणे हे एक मोठें सामाजिक कार्य आहे. ते कार्य धट्टपणानें कांहीं तरी प्रयत्न केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. प्रत्येक मनुष्य स्त्रियांनीं जीवनकलहांत पडावें या गोष्टीस भीत आहे. ही स्थिति समाजास अत्यंत अनिष्ट आहे. जो बाप आपल्या मुलीस जीवनकलहास समर्थ करणारे शिक्षण व जीवनकलहामध्यें प्रविष्ट होण्याचे धैर्य उत्पन्न होण्याची संधि देत नाही तोच बाप आपल्या मुलीच्या अधःपातास मदत करतो असा माझा समज झाला आहे. तर कांही शिकलेल्या पण आगापिछाच्या नियमांनीं बद्ध नसलेल्या स्त्रिया उद्योगांत पडल्या तरच त्यांनां स्त्रियांना आपले पोट भरणें सोपे व्हावे यासाठीं उद्योगांत प्रवेश करून देणें सोपें होईल आणि आज हिंदु स्त्रियांनां जी असहाय स्थिति उत्पन्न झाली आहे. ती नाहींशी होण्यास मदत होईल. मुलींनां शिक्षण द्यावयाचें ते त्यांनां पुढे सर्व प्रकारच्या जीवन कलहांत घातलें पाहिजे हें लक्षांत ठेवून दिलें पाहिजे; आज तसें दिलें जात नाही."

"स्त्रियांच्या शिक्षणाविषयीं आज जे लोक विचार करीत आहेत त्यांनां तुम्ही बोलतां या गोष्टींविषयीं चांगला विचार करतां येत नाहीं असे तुमचे म्हणणे आहे काय?"

"स्त्रियांचे औद्योगिक क्षेत्र आकुंचित करणारी व आजच्या स्थितीस कारण असलेली पुरुषांची जी पडदा संरक्षण आणि मोठया वर्गास विसरणारी वृत्ति आहे तीपासून स्त्रीशिक्षणावर विचार करणारे लोक अलिप्त आहेत काय? मला असे वाटते कीं त्यांची दृष्टि आकुंचित आहे, व ती त्यांची आकुंचित दृष्टि त्यांचे शिक्षणविषयक विचार देखील आकुंचित करीत आहे. ते जेव्हा स्त्रीवर्गाविषयीं विचार करूं लागतात तेव्हां त्यांच्या मनांत अगदी लहान वर्ग येतो."

"तो कसा?"

"स्त्रियांच्या शिक्षणाविषयी विचार करणाऱ्यांमध्ये केवळ मध्यम वर्गाचे लोक आहेत. स्त्रियांचा प्रश्न जितक्या व्यापक दृष्टीने विचार करावयास लोकांनीं घेतला पाहिजे तितक्या व्यापक दृष्टीने ते घेत नाहींत. समाजांत एकंदर स्त्रीवर्ग लक्षांत घेऊन त्यांनीं विचार करावयास हवा आहे. केवळ मध्यम वर्गातल्या मुलींची सोय कशी करावी एवढाच प्रश्न ते आपल्यासमोर ठेवतात. माझ्या मताने स्त्रियांच्या शिक्षणाविषयीं विचार करतांना नायकिणींचा देखील सल्ला घेतला पाहिजे."

"मीच तुमचा सल्ला घेतों तुमच्या हातीं जर शभर मुलींचें पालकत्व दिलें तर तुम्हीं काय कराल?"

"मी पुष्कळच गोष्टींत स्त्रियांचा प्रवेश करवीन. छापखाने, दुकाने, खासगी आफिसें इत्यादि कामांमध्ये स्त्रियांचा शिरकाव करून घेईनच, पण ज्या अनेक धंद्यांविषयीं आज लोकांची वृत्ति संशयास्पद झालेली आहे त्या धंद्यांत स्त्रियांनां घालीन.

आपल्याकडे अजून नाट्यमंदिर स्त्रीनटींनीं सुशोभित झालें नाहीं. सामान्य घराण्यांतील स्त्रिया नाट्यमंदिराकडे इतक्यांत वळतील असें मला मुळींच वाटत नाहीं. माझे मत असे झालें आहे कीं, स्त्रियांनीं आपला नाट्यमंदिराकडे प्रवेश करून घ्यावा. गायनवादन कुलस्त्रियांनां थोडी करमणूक म्हणून शिकविले जातें पण गायनवादन आणि नर्तन हे धंदे प्रतिष्ठित का समजूं नये. या धंद्याचे व सामान्य शिक्षण मिळालेल्या नायकिणींच्या वर्गातील स्त्रियांनीं गायननर्तनाकडे दुर्लक्ष न करतां ते धंदे करूनहि अब्रूदारपणानें रहातां येते असें दाखवावें. जसजशी स्त्रियांची सांपत्तिक स्थिति सुधारत जाईल तसतशी त्यांची नैतिक दुर्गति कमी होत जाईल. स्त्रियांनीं पुरुषांशीं संबंध चुकवीत रहाणे हें हितावह रहाणार नाहीं. स्त्रियांचा पुरुषांशीं संबंध आला तरी स्त्रियांनां आपला मान आणि अब्रू यांचा सांभाळ करण्याचें शिक्षण आपल्या स्त्रियांस द्यावयास नको काय? स्त्रिया हिंदु आहेत तोपर्यंत स्वसंरक्षणास असमर्थ आहेत आणि त्या ख्रिस्ती झाल्यानेच या बाबतींत आपले संरक्षण करून घेण्याची पात्रता उत्पन्न होते असें कांहीं आहे काय? स्त्रियांनां मी असेहि म्हणेन कीं, तुम्ही झगे घातले असतां पुरुष तुमच्याशीं फाजीलपणा करणार नाहींत. पण तुम्ही लुगडीं नेसून काम करूं लागल्यास ते तुमच्याशीं फाजीलपणा करतील अशी स्थिति असेल तर शेजारचा काम करणारा पुरुषवर्ग सुशिक्षित होईपर्यंत तुम्ही यूरोपीअन पोषाख घालून काम करीत जा. माझें तर मत असें आहे कीं, आपले पुरुष शेजारीं काम करणाऱ्या स्त्रियांचा अपमान करणार नाहींत; उलट त्यांच्याशीं सन्मानानें वागण्याची संवय थोडक्या दिवसांतच त्यांच्याहि अंगांत जडेल.''

"पण ही संवय जडेपर्यंत तुम्हीं काय करणार?''

"मी प्रत्येक स्त्रीला औद्योगिक क्षेत्रांत आपला पाय शिरकवावयाचा आहे याचें महत्त्व समजावून देईन. एकजुटीनें वागा म्हणून सांगेन आणि त्या काम करणाऱ्या स्त्रीशीं कोणी फाजीलपणा करूं लागेल तर प्रतिकार काय करावा याविषयीं त्यांनां सल्ला देत राहीन.''

देवीदासपंतांच्या मनांत कपिलेविषयीं आदर उत्पन्न झाल्याशिवाय राहिला नाहीं. ते तिला म्हणाले "तुमच्यासारख्या स्त्रिया महाराष्ट्रांत इतक्या लवकर दिसू लागतील ही मी कधीं अपेक्षा केली नव्हती. आतां मला स्त्रियांच्या उज्वल भवितव्याविषयीं आणखी विश्वास वाटूं लागला आहे. स्त्रिया आज ना उद्यां आपलें उपजीविकेचें क्षेत्र अधिक व्यापक करतील अशी मला खात्री वाटूं लागली आहे.''

"तर मग माझ्या म्हणण्याचा आपण विचार करणार ना?''

"मी तर या मुलीला तुमच्याच स्वाधीन करावें या विचाराचा होऊं लागलो आहें. पण या बाबतीतला शेवटचा निर्णय देणें माझ्या हातीं नाहीं.''

इतक्यांत देवीदासपंतांनीं घड्याळ काढून पाहिलें तों त्यांत ८ वाजले होते. तेव्हां ते म्हणाले "माझी आतां बाहेर जेवावयास जावयाची वेळ झाली.'' तेव्हां कपिलेनें म्हटले कीं, "मी आपल्याबरोबर आपणांकरतां कांहीं फराळाचें आणलें आहे त्याचा आपण स्वीकार कराल काय?''

देवीदासपंतांनां काय वाटले असेल कोण जाणें थोडेसे भीतीचे तर थोडेसे हर्षाचे धक्के त्यांच्या अंतःकरणास मिळत होते. त्यांनीं म्हटलें कीं, "आपण माझ्याकरितां इतकी तसदी घेतली असतां आपण आणलेलें न स्वीकारणें मला बरें वाटत नाहीं. जे कांहीं आणलें आहे तें मी आभारपूर्वक स्वीकारतों.''

कपिलेनें आपल्या शेल्यांतून डबा काढला. त्यांत कांहीं रव्याचे, बदामपिस्ते घातलेले केशरी लाडू

व कांहीं करंज्या वगैरे फराळाचे सामान होते. तें देऊन कपिलाबाईनी निरोप घेतला.

कपिलाबाई गेल्यानतर देवीदासपंतांच्या मनांत काय विचार चालू झाले असतील याची कांहीं कल्पना वाचकांस झाली असेलच.

---

## प्रकरण ३१ वें.

## आत्मपरीक्षणास सुरवात.

कपिला गेली पण उपद्व्याप करून गेली. देवीदासपंतानी मनाचे स्थैर्य ठेवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण कपिला त्यांच्या डोळ्यांपुढे वारवार येत होती. जेव्हां कोणी सामाजिक कार्याकडे दृष्टि ठेवणारा भेटे तेव्हां तो देवीदासपंतांचे चित्त आकर्षण करीत असे. आपल्या लहानशा समाजासाठीं काम करणाऱ्या लोकांचे दर्शनहि देवीदासपंतांस आनद देत असे. कोणी आपल्या जातीच्या हितासाठीं काम करू लागला म्हणजे तू "सेक्टेरीयन" चळवळींत पडलेला आहेस म्हणून नाक मुरडणारे जे लोक असत त्याविषयीं देवीदासपंतास सताप येत असे, व त्या काम करणाऱ्यास उत्तेजनाच्या गोष्टी बोलाव्यात असे देवीदासपतांस ते टेक्निकल इन्स्टिटयूटमध्य होते तेव्हापासून वाटत होते. कपिला स्त्रियांच्या उन्नतीविषयी विचार करीत आहे व कांहीं कार्य करू इच्छीत आहे हे पाहून त्यांस इतका आनद झाला कीं, आपण हिला याबद्दल प्रेमानें घट्ट आलिंगन द्यावें असे वाटूं लागलें.

कपिला निघून गेली तेव्हां देवीदासपंतानी जेवावयास न जातां तेथेच चहा बनविला आणि कपिलेनें आणलेले केशरी लाडू व करंज्या यावर यथेष्ट ताव दिला.

आपण कपिलेशीं लग्न करावयास काय हरकत आहे असेहि त्यांच्या मनांत आले. तसे झाले तर आपल्यावर टीका सपादून होईल हीहि कल्पना त्यांच्या मनांत आली. "पण आपण लोकांच्या टीकेला कितपत भितो" असेहि ते आपल्या मनाशीं म्हणाले. त्यांचा विचारप्रवाह पुढे वाहू लागला. आपण स्वामी असून कपिलेसारखी शिष्यीण जवळ बाळगली असती तर लोकांनां त्यांत कांहीं वाटले नसते. साधु आणि वेश्यावर्ग यांचे कांहीं तरी नाते असावें, असे भोवतालच्या परिस्थितीकडे लक्ष देतां त्यांनां वाटले. साधूने वेश्येच्याच घरी रहावे याला आधार फार जुना देतात. बुद्ध देखील श्रीमंत वेश्येच्याकडे पाहुणा होता. तो परिपाठ अजून कित्येक गावठी महाराज चालवीतच आहेत. कधीं कधीं वेश्येच्या घरी साधूनें उतरणे हे वेश्येलाच हितकर होतें. कारण कांहीं सभ्य लोकांनां वेश्येच्या घरीं जाण्याची व तिच्याशीं ओळख करण्याची इच्छा असते पण त्यांनां धैर्याभावामुळे तसें एकाएकी करतां येत नाहीं. आणि वेश्यांनां सभ्य लोकांशी आपण होऊन ओळख करतां येत नाही. पण कोणी साधु वेश्येच्या घरी पाहुणा म्हणून उतरला तर त्या साधूला भेटण्याच्या निमित्तानें नायकिणीच्या घरी वाटेल त्याला जातां येते, व तिला कांहीं देखण्या मुली असल्या तर त्यांचीहि ओळख त्याना करून घेतां येते. अर्थात वेश्येने साधूचा सत्कार करावा ही गोष्ट तिच्या धंद्याला अवश्यच आहे. साधूचे आपल्या घरी रहाणे हें दुसऱ्या कोणत्या बरे धंद्याला उपयोगी पडते? वेश्येच्या धंद्याइतकें दुसऱ्या कोणत्याच धंद्याला साधु महाराजांचा संग्रह किफायतवार पडत नाहीं. अर्थात एखाद्या साधूचा सग्रह करणें हा वेश्या व्यवसायांतील स्वाभाविक भाग तर नसेलना! अर्थात असावा; पण कपिलेची ही खटपट त्या दृष्टीने होत असेल काय? छे, छे! कपिला ही उच्च दर्जाची स्त्री आहे. तिनें जे विचार व्यक्त केले ते सहजस्फूर्तीनें खास उत्पन्न झाले नाहींत. ते अनेक दिवस जो विचार स्वतःशीं केला असेल

त्याचा परिणाम आहे. आणि आतां तर मी भगवे कपडे टाकूनच दिले आहेत आणि आतां माझ्याकडे येणारी गर्दी कमी होऊं लागली आहे अशा प्रसंगीं ती आपल्याशीं अधिक स्नेह वाढविण्याचा प्रयत्न करीत आहे. आपण कपिलेस शिष्यीण म्हणून जवळ बाळगली तर लोकांत मौज उत्पन्न होईल आणि त्या शिष्यिणीशीं ओळख करण्यासाठीं शिष्यमंडळहि वाढेल आणि आपली लोकप्रियता पुन्हां वाढू लागेल. पण जर आपण कपिलेशीं लग्न लावले तर लोक अगदीं चकित होतील. आणि आपण संन्याशाचे जे कपडे जाळले ते संन्यासधर्म केव्हांच मेला आणि सन्याशाच्या कपड्यांचा लोकांस ठकविण्यासाठी उपयोग करण्याचा मोह आपणांस पडूं नये म्हणून जाळले. पण कपिलेशीं जर आपण लग्न केलें तर मात्र लोक म्हणतील की, या गृहस्थाला नायकिणीच्या पोरीबरोबर लग्न करावयाचे होतें म्हणून याने संन्याशाचे कपडे जाळले, आपण संन्यासी परदेशी असतां झालो. संन्यासी केव्हां झालो हे लोकांस मुळींच ठाऊक नाहीं. केवळ बायकोशीं ओळख करण्याकरतां आपण तात्पुरते बुवाजी होतो असे म्हणण्यास लोक कमी करणार नाहींत.

देवीदासपंतांच्या मनांत हे विचार चालू होते तेव्हां त्यांच्या मनांत आणखी एक विचार आला. आपले आयुष्य विचित्र झाले आहे तर तें पुरें विचित्र कां होऊं देऊं नये. आपण निरनिराळ्या जातींच्या बायका कराव्यात, निरनिराळ्या जातींची मुले दत्तक घ्यावींत आणि ती एकत्र वाढवावींत; आणि या तऱ्हेने एक अगदीं निराळे अत्यंत संग्राहक असे कुटुंब तयार करावें असेंहि त्यांच्या मनांत आले. कश्यपाच्या पत्न्या तेरा होत्या, त्यांत राक्षस, देव, नाग, पक्षी या सर्वांच्या माता होत्या. कश्यपाने एवढा मोठा संसार केला तर आपणांस निरनिराळ्या जातींच्या स्त्रिया एकत्र करून संसार करण्यास काय हरकत आहे. हे विचार देखील त्यांच्या मनांत आले? हे विचार जेव्हां त्यांच्या मनांत आले तेव्हां ते अगदीं हास्यवदन होऊन गेले.

ते आपल्या खोलीतील कापडी खुर्चीवर सिगार ओढीत बसले होते. विचार करतां करतां बारा वाजले आणि दिव्यांतील तेलहि संपत आल्यामुळे "दीपतेज मंद होत"ही स्थिति उत्पन्न झाली. यावेळेस त्यास एकदम प्रकाश पडून एक बालिका प्रवेश करीत आहे असे वाटलें. ही बालिका १२ वर्षांची होती व ही आल्याबरोबर देवीदासपंत चपापले. ही बालिका त्यांच्या ओळखीची दिसत होती.

ती बालिका स्मितयुक्त होऊन म्हणाली "तुम्ही गृहस्थाश्रमी व्हावयाचा विचार केला आहे काय? तुमची मी परत यावे अशी इच्छा आहे काय?"

"तूं परत कशी येणार" देवीदासपंतांनीं म्हटले.

"जर अवश्य झाले तर मी परतहि येईन" ती बालिका म्हणाली.

या मुलीचे दर्शन आपणांस कांहीं तरी नैतिक आपत्तीतून टाळण्यासाठींच होत आहे अशी देवीदासपंतांची समजूत होती. ही मूर्ति दुसरी कोणी नसून देवीदासपंतांच्या बायकोच्या अल्पवयातील स्वरूप होतें. देवीदासपंतांनी आपल्या बायकोला तिच्या अगदीं लहानपणीं म्हणजे ती बारा तेरा वर्षांची असतां पाहिले होते. त्यांचें तिचे ते शेवटचे दर्शन होते. देवीदासपंतांना जेव्हा ती भेटावयास येत असे तेव्हां त्यांच्या समोर त्यांच्या बायकोचे बाल्यांतीलच तेच रूप येत असे. त्याचप्रमाणे ते चाळीस वर्षांचे झाले तेव्हां देखील तेच रूप त्यांच्या डोळ्यासमोर येत होतें. या मूर्तीने देवीदासपंतांनां मोहाच्या किती तरी प्रसंगांतून वांचविलें होते.

ती स्त्री त्यांनां पुन्हां म्हणाली कीं, "तुम्ही आपल्या एकंदर आयुष्यावर विचार केला आहे काय? आशावाद म्हणजे आयुष्याचे तारूं जिकडे जाईल तिकडे जाऊं देणें नव्हे. जे कांहीं होणार तें चांगल्यासाठींच होते ही वृत्ति देखील पूर्ण पणें निराशा झालेल्या मनुष्याच्या आयुष्यक्रमा-प्रमाणेंच आयुष्यक्रम बनविते."

देवीदासपंत प्रत्युत्तर देणार तो ती मूर्ति अंतर्धान पावली. व ती मूर्ति गेल्यानंतर देवीदासपंत एका महानिद्रेतून जागे झाल्याप्रमाणे खडबडून उठले. होय. मी आपले आयुष्याचें तारू जाईल तिकडे जाऊं देत आहे. आशावाद म्हणजे जे कांहीं प्रसंग येतील त्याप्रमाणें वहावत जाणें नव्हे. गोदावरी ही गेली पण ती आपल्या भोवती एखाद्या विद्याधरीप्रमाणें आपले संरक्षण करण्यासाठीं हिंडत आहे. ती आपणांस अनेक मोहांपासून सोडवीत आहे आणि संदेह पडेल तेव्हां मार्ग दाखवीत आहे. ही आली म्हणजे आपण आपल्या आयुष्याविषयी पहिल्यापासून विचार करूं लागतों; आज आपणांस तसाच केला पाहिजे." देवीदासपंतांची आत्मपरीक्षणास सुरवात झाली, त्यांनीं आपला आयुष्यक्रम पुन्हां आठवला आणि आतां पुढे आपले कर्तव्य काय याविषयीं गंभीरपणानें विचार करूं लागले.

---

## प्रकरण ३६ वें.

## आठवणी.

देवीदासपंतांच्या मनांत आपल्या आयुष्यांतील अनेक प्रसंग पुन्हां आठवले. त्यांतील अनेक प्रसंग त्यांनां आपल्या अंतःकरणाची ओळख पटविणारे होते.

आपली बोट मोंबासा येथे पोचली तेव्हां आपल्या बोटीवरील अनेक मंडळी बायका पाहिजेत म्हणून अधीर झाली होती. तेव्हां तेथील निग्रो स्त्रियांचे जे एजंट होते ते अनेक तरुण पोरी घेऊन आपल्या बोटीवरच आले होते. आणि त्यावेळेस त्यांच्यामध्यें ज्या देखण्या पोरी होत्या त्यांनां बोटीवरचा एकेक ऑफीसर आपल्या केबिनमध्यें घेऊन गेला. तेव्हां बोटीवरचा कप्तान तरुण ऑफिसरांस इशारा देण्यासाठीं काय बरें म्हणाला? तो म्हणाला "अरे पोरानों, तुम्ही संभाळून वागा बदरांत तुम्ही पाऊल टाकल्याबरोबर ज्या पोरी तुम्हांला मिळतात त्या तुम्हांला कायमचा पश्चात्ताप करायला लावतील. माझे म्हाताऱ्याचे शब्द ऐका." पण त्या बोटीवरच्या इग्रज लोकांनीं त्याचें कांहींच ऐकले नाहीं. आपणहि त्यावेळेस त्या इग्रज पोराचेच अनुकरण करणार नव्हतो काय? अशा वेळेस जो इतरांसारखे करणार नाहीं तो गाढव; व आपल्यावर तोच दोष येत होता. पण त्यावेळेस आपण मोठ्या निकराने आत्मसंयमन केले.

जेव्हां आपण बोटीवरील काम सोडून देऊन एका प्लांटेशनवर नोकरी धरली होती तेव्हां आपला स्वैपाक करण्यासाठी जो मनुष्य ठेवला होता तो देखील उनाड आफ्रिकन पोरींचाच दलाल आहे असा आपणांस अनुभव आला. आज ही तर उद्यां ती अशी मुलगी आणून तो आपणांस दाखवायास शिकला होता. आणि रोज काम केल्यानंतर एखाद्या पोरीला घेऊन आपण आपल्या कोठडीमध्यें जावे असा तेथे मळ्यावरील बड्या पगाराच्या प्रत्येक मनुष्याचा रिवाज होता हें आपणांस दाखवून माझ्या वर्तनाबद्दल आश्चर्य दाखवीत होता. तरी आपण त्याच्या खटपटींना देखील यश येऊं दिले नाहीं. आपण आपल्या बायकोशीं बेमानपणा करूं नये आपण आपल्या बायकोला होतां होईल तितके लवकर अफ्रिकेंतच आणावे हीच इच्छा आपल्या हृदयामध्यें जोपासवली. आणि त्या इच्छेच्या जोरामुळें त्या मळ्यावर काम करीत

असतां तेथील नैतिक विचारांच्या अघळपघळ-पणापासून आपण बचावलों; ते आपल्या बायकोच्या आठवणीमुळेच नव्हे काय? जेव्हां ती जिवंत होती तेव्हां तिची व आपली गांठ पडेल व आपले सर्व वैवाहिक मनोरथ पूर्ण होतील या अपेक्षेनें आपण आपल्या स्वैर वर्तनासाठीं वारंवार होणाऱ्या इच्छेला निकरानें आळा घातला नाहीं कांय?

ज्या पवित्र प्रेमयुक्त स्त्रीसुखाची आशा बाळगून होतों ती आशा मात्र एकाएकीं दग्ध झाली. आफ्रिका सोडण्यापूर्वीच आपली बायको वारली. बायको वारल्यामुळें मनाचा निर्बंध सुटून आपण आपलें दुःख केवळ कामाच्या डोहांत खूब बुडया मारून विसरावें अशी आपली वृत्ति होण्याचा संभव होता. पण त्यावेळीं कामेच्छेचा घोडा सैल सोडण्याऐवजीं आपण संन्यासवृत्ति घेतली. कांहीं तरी उच्च कार्य करण्यासाठीं आपण मोकळे झालों आहोत असे आपणांस वाटलें. आपण देवधर्माच्या वेडया नियमानें आपलें आयुष्य बांधून न घेतां आपले सर्व बळ आफ्रिकेंतील हिंदुस्थानी समाजाच्या हितासाठीं खर्च करावें, आपण द्रव्यार्जनाच्या मोहापासून आपली सोडवणूक करून घेऊन सत्य बोलण्यास, निःपक्षपाती रहाण्यास व कर्तव्य करण्यास निर्भय आणि तत्पर रहावें यासाठीं आपण तो संन्यास घेतला. संन्यास घेतल्यामुळे एक तऱ्हेची स्वतंत्र वृत्ति आपल्या मनांत हळु हळु उत्पन्न होऊं लागली. पण संपूर्ण निर्भयवृत्ति एकाएकीं आपल्या मनांत स्थापन झाली नाहीं, ती फारच हळू हळू उत्पन्न झाली. आपल्या मनांत त्यागाची वृत्ति झाली. जगामधील स्पर्धामत्सराच्या क्षेत्रांतून बाहेर पडून सर्व समाजाच्या कल्याणासाठीं झटणें ही वृत्ति झाली, पण त्यामुळें शरीरधर्म सुटले काय? पैसा व मान यांची भूक जरी बरीच नाहींशी झाली तरी इतर सर्व तृष्णा कोठें नष्ट झाल्या. आपण संन्यास घेतल्यामुळें आपणांस लोक जो मान देऊं लागले त्या मानामुळें आपल्या मनावर अनिष्ट परिणाम होईल काय? अशी आपणांसच भीति उत्पन्न झाली. आफ्रिकेंत असतां जेव्हां आपण संन्यास घेऊन हिंदु मंडळीच्या नैतिक उन्नतीसाठीं खटपट करूं लागलों तेव्हां तेथें असलेल्या अनेक हिंदु स्त्रियांशीं देखील आपला संबंध आला. मोंबासा येथील प्रसिद्ध रेल्वे कॉंट्राक्टर बूटासिंग याची विधवा बहीण प्रेमकुंवर ही आपल्यावर आसक्त होऊन आपली सेवा करण्यांत आपणांस धन्य मानूं लागली. प्रथमतः ही केवळ सात्विक गुरुभक्तीच आपणांस वाटत होती. पण त्या विधवेच्या गुरुभक्तीच्या पाठीमागें काय तीव्र भावना होत्या त्यांची कदाचित जाणीव तिलाहि नसेल. आपल्यालाहि नव्हतीच. पण दैवयोगामुळें जो एकांत उत्पन्न झाला त्यामुळे शरीरधर्म निश्चयाचा अपमान कसा करतात हें पुरें कळलें आपण जेव्हां एकदां संध्याकाळीं बूटासिंगकडे गेलों तेव्हां तो नैरोबी येथे गेला होता. आपण बुटासिंगाकडे गेलों म्हणजे फराळ करण्यासाठीं तो आग्रह करी. यावेळेस बूटासिंग जरी घरीं नसले तरी आपण तेथें अल्पहार करून जावें म्हणून प्रेमकुंवर हिनें आपणांस फारच आग्रह केला. आणि आपण, तें आमंत्रण स्वीकारलें आणि तिनें प्रेमानें आणलेल्या जिनसांचा मोठया आनंदानें स्वीकार केला. त्यानतर प्रेमकुवरनें आपल्याला बोलण्यांत गुंतविलें आणि मी आपल्या प्रकृतीकडे फार न पहातां काम करीत असतों जेवणाखाण्याकडे देखील माझें लक्ष नाहीं म्हणून प्रेमकुंवरने स्नेहयुक्त खरडपट्टी काढली, आणि माझ्याबद्दल तिला किती काळजी वाटत होती तें सांगितलें आणि तेव्हां बोलतां बोलतां रात्रीचे नऊ वाजले, पुढें मी घरीं जावयास निघालो तों रात्रीचें आपण बाहेर जाऊं नये सिंह गांवांत देखील येतात. तुम्ही येथें रहावयास हरकत नाहीं इत्यादि गोष्टी बोलू

लागली तरी मी जाण्याचा आग्रह धरला होता. तेव्हां तिनें स्वामींनां माझें दुःख समजत नाहीं असें म्हटलें आणि ती रडावयास लागली तेव्हां आपण तुला दुःख काय होतें असें विचारलें तेव्हां ती मूर्च्छित होऊन पडल्यासारखी झाली. आणि त्या प्रसंगीं आपण तिच्या तोंडावर पाणी शिंपडलें व तिला आपण उठवावयास लागलों तेव्हां तिनें आपणांस कसें घट्ट धरिलें; त्यावरून आपण तिचा आशय समजलों; त्यावेळेस आपलें मनहि निश्चयापासून चळलें नव्हतें काय? आपलें मन तर अगदीं चळलें होते व आपण आपल्या व प्रेमकुंवर या दोघांच्या आत्मगौरवाची व आत्मविश्वासाची राखरांगोळी करण्यास प्रवृत्त झालों नव्हतों काय? पण सुदैवानें त्या प्रसंगांतून आपण बचावलों. त्या प्रसंगीं गोदावरी आली, तिने येऊन आपणांस काय सांगितलें बरें? तिने सांगितलें कीं, तुम्ही दुर्बल मनाचे होऊं नका, तुम्हाला तुमच्या आत्मसंयमनाचें मोठें फल मिळणार आहे. तें प्रेमकुंवरबरोबर झालेलें एकांतांत संभाषण खरोखर दोघांसहि भयप्रद होतें. प्रेमकुंवर बोलली ते खरेंच होतें त्या रात्रीं सिंह गांवांत आलेच होते. आणि बाहेर जाणें धोक्याचेंच होतें.

आपण जेव्हां आफ्रिका सोडली आणि इंग्लंडला जात होतों तेव्हां आपल्यापाशीं पैसे खुळखुळत होते आणि जेव्हां आपण पोर्ट सय्यदला पोंचलों तेव्हां अरब आणि ग्रीक स्त्रियांचें नग्न नृत्य पहावयास चला म्हणून त्या स्त्रियांचे एजंट आपल्याकडे आले; आपल्याला त्यावेळेस मोह चांगलाच पडला होता. आपण ज्या गांवांत कायमची वसती करतों त्या गांवांतील लोकांचें आपल्याविषयीं मत वाईट होऊं नये म्हणून आपण खटपटत असतों. आपलें मन, नीतीची वेसण जरा सैल करावी आणि कामवृषभाला यथेच्छ संचार करूं द्यावा या भावनेचें झालें तरी लोक आपणांस काय म्हणतील या एका भावनेचेंच दडपण आपल्यावर रहातें. पण जेव्हां एक देश सोडून दुसऱ्या देशांत आपण जातो तेव्हां मधल्या बंदरांत असतांना मनोवारूचा लगाम जरा सैल सुटतो. जेथें आपणांस पहावयास कोणी नाहीं तेथें आपण लागेल ती गडबड करावी आणि जो अनुभव आपण अजून मिळविला नाहीं तो मिळवावा असें आपल्या मनास वाटूं लागते. आपण मोठे निग्रही असे आपणांस समजतो व आपण निग्रहीहि असूं कदाचित पण निग्रही म्हणजे दुर्विचारास थारा न देणारे असा अर्थ खास होत नाहीं. आपल्या मनांत दुर्विचार आले आणि त्याप्रमाणें आचरण करावेसे वाटलेंच. दुर्विचारांस आपण झिडकारीतहि नव्हतों पण उलट त्याचे मनांतल्यामनांत समर्थन करीत होतों पण गोदावरीनें या प्रसंगीं देखील आपलें संरक्षण केलें. त्यावेळेस आपला स्वामीपणा देखील आपणांस सयामक होऊं शकला नाहीं. आपण तपापासून भ्रष्ट झालेल्या कित्येक ऋषींचीं उदाहरणें डोळ्यांपुढें आणीत होतों; प्रत्यक्ष आद्य शंकराचार्यांचीच गोष्ट आपणांस आठवली. कामदेवाचे सर्व खेळ आपण अनुभवानें समजल्याखेरीज आपल्या सुशिक्षितेंत कमीपणा आहे अशी आपली आपण समजूत करून घेतली श्री शंकराचार्यांनीं परकायाप्रवेश करून आपली शृंगारलालसा तृप्त करून घेतली. कोठे तरी गिरिकंदरी जावें, तेथें कोणी तरी मत्स्यगंधा गांठावी, आपल्या वासना तृप्त करून घ्याव्यात व पुन्हां जनतेंत येऊन ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी कराव्यात असाच आपल्या साधूंच्या वर्गाचा संप्रदाय नाहीं काय? याप्रकारच्या आपल्या मनांत उत्पन्न झालेल्या वासनांचें आपण समर्थन करीत होतों.

पोर्ट सय्यदच्या नगरींत आपल्या मनाला या प्रकारचे विचार चंचल करीत होते, व आपण जरी योगभ्रष्ट झालों तरी मोठेसें बिघडलें काय? असेंहि म्हणूं लागलों होतों आणि आपल्या मनांतील किंतु घालविण्यासाठीं "शुचीनाम् श्रीमतां

गेहे योगभ्रष्टोऽभिजायते." असा बोध आपणांस भगवान् श्रीकृष्ण करीत नाहीं काय? असा प्रश्न आपल्याच मनाला विचारीत होतों. जेव्हां मनुष्य त्यास जेथें कोणी ओळखत नाहीं अशा ठिकाणीं जातो तेव्हां परिस्थितीचा संरोध उडून जाऊन त्याच्या सर्व वासना जागृत होतात, आणि तेथें त्याचा संन्यासधर्म देखील त्याचें संरक्षण करू शकत नाहीं; पण गोदावरी, अशा ठिकाणीं तूं अवतीर्ण होऊन त्या पोर्टसेदच्या पापनगरींत माझें संरक्षण केले आहेस तुझे उपकार मानावे तितके थोडेच आहेत!

तूं मला त्यानंतर केव्हां बरें भेटलीस? होय, मी नेपल्समध्ये होतो आणि त्या वाटाड्याबरोबर फिरायला गेलों होतों, त्यावेळेस मला फराळासाठीं तो एका उपाहारगृहांत घेऊन गेला; त्यावेळेस आम्हीं उपाहार केल्यानतर पोहावयाचा पोषाक केलेली एक तरुणी माझ्यापाशीं येऊन बसली, व तिनें माझ्या गळ्यांत हात घातला; तेव्हां आपण बिचकलों; ती दिवसाची वेळ होती, आणि त्यावेळेस आपण आपल्याच आत्मसंयमनानें तें उपाहारगृह सोडून बाहेर पडलों; त्या रात्रीं गोदावरी आली तेव्हां तिची मुद्रा किती तरी आनंदित झालेली दिसत होती? आणि आपल्या संयमी वृत्तीबद्दल तिनें आपलें अभिनंदन किती तरी प्रेमयुक्त नेत्रांनीं केलें? गोदावरी, तू मला त्यावेळेस जी आपली सद्गुणाभिज्ञता व्यक्त केलीस तिनें माझ्या अगीं विलक्षण शक्ति उत्पन्न झाली. आपण त्यावेळेस फक्त पंचवीस वर्षांचे होतों व ते आपले ऐन तारुण्याचे दिवस होते. आपली संन्यासवृत्ति म्हणजे आपण आपली सर्व शक्ति समाजाला अर्पण केली असें मानीत होतों, पण सर्व अंतःकरण व कार्यकर्तृत्व समाजाला अर्पण करण्याचें जरी आपण ठरविलें होतें तरी स्त्रीसौख्य लागेल तेव्हां आपण मिळविलें तर काय बिघडलें! त्यामुळें आपल्या समाजसेवेंत अंतर कोठें पडतें असे प्रश्न आपण आपल्या मनाला विचारूं लागलों होतों. म्हणजे केवळ मनोनिग्रहास दुर्बल करणाऱ्या सर्व कांहीं गोष्टी जागृत होत्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण अशा प्रसंगीं गोदावरी, तुझी मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर उभी राही, त्यामुळेंच माझा संन्यासधर्म टिकला. आपण इंग्लंडांत आलो, अनेक स्त्रीपुरुषांशीं ओळखी केल्या, अनेक चरित्रांचें अवलोकन केलें तेव्हां जगांतील स्त्रीपुरुष संबंधाविषयींचे सर्व नीतिनियम चुकलेले आहेत असे आपणांस वाटूं लागलें होतें. नैतिक नियम हे सामाजिक आहेत, ईश्वराज्ञा नव्हत हें तत्त्व आपण मनांत नेहेमीं ठेवलें होतें व आपलें तें मत अजूनहि ढळलें नाहीं. आपण त्यावेळेस काय बरें म्हणत होतों. आपण असें म्हणत होतों कीं, पुरुषांनीं लग्न केव्हां करावे हें त्यांच्या सांपत्तिक स्थितीमुळें ठरतें. आणि काम मनुष्याच्या मनांत जागृत होणें हें त्याच्या शारीरिक वाढीवर अवलंबून असते. त्याअर्थीं लग्नाची वयोमर्यादा स्वाभाविक नाहीं, तसेंच अनिश्चित कालापर्यंत केवळ शरीरधर्माचें संयमनहि स्वाभाविक नाहीं, असेंहि आपले मत झालें नव्हतें काय? आपण आत्मसंयमन करण्यांत शरीराच्या स्वाभाविक धर्माप्रमाणे आचरण करण्याचे सोडून देत आहों असें आपणांस वाटूं लागलें नाही काय? इकडे आपण ब्रह्मचर्याचा नियम करून बसलों व उलटपक्षीं आपल्या सर्व भावना, आणि त्या भावनांमुळे उत्पन्न झालेले विचार हीं ब्रह्मचार्याचा नियम मूर्खपणाचा आहे असेंच सांगत नव्हतीं काय? छी छी संन्यासधर्म मनास संयामक होत नाही त्याप्रमाणें तात्त्विक विचारहि संयामक झाले नाहींत. तत्त्वज्ञानानें मनुष्याची नीतिमत्ता कितपत चांगली राहील याविषयीं आपला काय बरें अनुभव आहे! आपली पापापुण्याची भावना गेली. समाजाला जें उपयुक्त तें चांगलें आणि अनुपयुक्त तें वाईट असा विचार आपल्या हृदयांत राहिला. इंद्रियांचा

निरोध केल्यानें स्वर्गाचें द्वार खुलें होतें अशा तऱ्हेच्या समजुतींनां आपलें अंतःकरण थारा देईना. त्यांतल्या त्यांत असेंहि झालें कीं आपली कांहीं विचित्र अर्थशास्त्रज्ञांशीं गांठ पडली. लग्नाची बायको आणि रखेली यांत फरक लोक ठेवतात याचे कारण एवढेंच कीं, आपल्या निरानिराळ्या स्त्रियांपासून झालेल्या मुलांपैकीं कोणत्या मुलाला पैसा मिळूं द्यावयाचा याविषयीं मनुष्य फरक ठेवतो हें होय. पैसा नसला तर औरस व दासीपुत्र असा फरकच रहाणार नाहीं आणि धर्मोपाध्यायांच्या साहाय्यानें जें पुरुषांचें ऐक्य होतें, त्याची मुख्य किंमत त्या स्त्रीच्या मुलांनां अधिक वारसाहक्क मिळतो म्हणून आहे. आणि येणेंप्रमाणे आपल्या एजन्सीमार्फत होणाऱ्या लग्नांचें गौरव वाढवीत आहेत व त्याबरोबर आपल्या धर्मसंप्रदायाचें गौरव वाढवीत आहेत, नाहीं तर धर्मसंप्रदायाला कोणी विचारणार नाहीं इत्यादि मते आपणांस तो रशियन अर्थशास्त्री सांगत सुटला. जी गोष्ट आपल्याला हवी आहे ती समाजाला देखील चांगली आहे अशी आपली समजूत आपण करून घेत नव्हतों काय?

आपल्याला जेव्हां अनेक मोहाचे प्रसंग आले तेव्हां आपले विचारच त्या मोहांस अत्यंत अनुकूल असे झाले त्या विचारांनीं व आपण मनाचें समाधान करून घेऊं लागलो होतों. सर्व शरीरधर्मांनां आपण क्षेत्र दिलें नाहीं तर आपण शरीराचें नुकसान करीत आहों असे आपणांस वाटूं लागलें. तसेंच जी मुलगी अगोदरच बिघडली आहे तिच्याशीं चोरटा व्यवहार करण्यास कांहीं हरकत नाहीं, असेंहि वाटूं लागलें. स्त्रियांनां नीतीचें बंधन कां पाहिजे तर याचें कारण त्यांचा पोशिंदा पुरुष असतो म्हणून. पण पुरुषांनां नीतीचें बंधन कां पाहिजे तर बायका जळफळतील म्हणून किंवा उपदंश होईल म्हणून. एरव्हीं पुरुषांनां स्त्रियांपासून अलिप्त रहाण्याचें कारण कांहीं एक नाहीं; ही मतें आपण जरी संन्याशाचा पोषाख घातल्यामुळें बोलावयास भीत होतों तरी दुसरा कोणी तीं मतें बोलल्यास तें मनांतून आवडत होतें.

आपल्या भावना अनेक वेळां प्रज्वलित झाल्या आहेत आणि त्यावेळेस आपणांस अनुकूल कोणीहि स्त्री नसल्यामुळें त्या आपल्या भावना जागच्याजागीं जिरल्याहि आहेत. पण तेवढ्यावरून आपणांस आपल्या नीतिमत्तेचा टेंभा मुळींच मिरवितां येणार नाहीं.

कोणी तरुण मनुष्य एखाद्या तरुण स्त्रीबरोबर रात्री फिरावयास जाई आणि काळोखांत तिच्याबरोबर वेळ घालवी हें जेव्हां आपल्या नजरेस येई तेव्हां आपल्या भावना प्रज्वलित होत नव्हत्या काय? जी स्त्री जरा अघळपघळ वर्तनाची असेल तिच्याशींच ओळख करण्याची वृत्ति आपल्या ठायीं उत्पन्न होत नव्हती काय?

म्यानचेस्टरच्या गिरणीमध्ये आपण काम करीत असतां जे दिवस आपण घालविले त्यांचीहि देवीदासपंतांस आठवण झाली. तेथें गिरणींत काम करणाऱ्या मुली आपल्या पुष्कळच ओळखीच्या झाल्या आणि तेथें दुसऱ्या कामकरी तरुणांशी ओळख झाली. त्या तरुणांच्या बरोबर आपण फिरवयास जात होतों आणि ते तरुण जेव्हां आपण कांहीं मुलींनां कसें वश केलें, आणि एकेक मुलींला वश करून तिचा उपभोग घेतल्या नंतर आपण दुसऱ्या मुली शोधीत होतों इत्यादि कथा सांगत तेव्हां आपण या कथा उत्सुकतेनें ऐकत नव्हतों काय? या सर्व गोष्टी आठवल्या म्हणजे आपणांस जे संन्यासी किंवा गुरु आपल्या शिष्यिणींच्या ठायीं प्रजोत्पत्ति करते झाले त्यांच्या वर्तनावर कठोर टीका करण्याऐवजीं आपल्या मनांत त्यांच्याविषयीं अनुकंपाच उत्पन्न होऊं लागली.

आपलें कर्तव्य ठरविण्यासाठीं आत्मपरीक्षण अवश्य हवें असतें. आपली शक्ति व त्याप्रमाणेंच

आपलें दौर्बल्य यांची जाणीव आपणास व्हावी लागते तर या दोन्ही गोष्टी आपण पाहून मी स्वतःला विचारतो की आपल्या हातून कांहीं तरी मोठी कामगिरी होणार आहे अशी समजूत आपण कां बरे करून घेत आहोत? आपण कडक ब्रह्मचर्य पाळलें ही गोष्टहि आपल्या मनामध्यें अभिमान उत्पन्न करीत आहे. पण आपण खरोखर विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, आपलें ब्रह्मचर्य जे टिकले ते केवळ आगतुक कारणामुळे टिकलें आहे;आपल्या चित्तशुद्धीमुळे नव्हे. बायको जिवंत असता ब्रह्मचर्य टिकले ते आपण जे भावी आयुष्यासंबधानें सुंदर गृहचित्र तयार करीत होतों त्यामुळे टिकले, आणि नतर आपल्या ठायीं जी आत्मसयमनाची शक्ति उत्पन्न झाली ती संन्यासधर्माच्या कर्तव्यामुळे किंवा तत्त्वज्ञानामुळे उत्पन्न झाली नसून मृतपत्नीचे जे दिव्यदेही प्रकटीकरण आपल्यापुढे मधून मधून होई त्यामुळे उत्पन्न झाली; असे असून देखील आपल्या ब्रह्मचर्याबद्दल आपल्या मनांत आपण जो चोरून अभिमान बाळगीत आहो तो बाळगणे आपला मूढ पणा नव्हे काय? हा वेडा अहकार नव्हे काय? आपण मोठ्या मनोबलाचे आहोत काय? हा विचार आपण आपल्या मनाशींच केला असता आपणास नाहीच म्हणावे लागेल.

आपलें मन आपण तपासले असतां काय दिसते? पवित्रतेचे रक्षण वैराग्यानें केले नसून प्रेमानेच केले आहे; जरी त्या प्रेमरसास प्रसगी अद्भुतरसाचे स्वरूप आलें तरी सरक्षणाचे श्रेय प्रेमासच दिले पाहिजे. जगाविषयीं किंवा भोगांविषयीं आपल्या मनांत वैराग्य कधींच उत्पन्न झालें नाहीं.

---

## प्रकरण ३७ वें.

## वीस वर्षांचा हिशोब.

आपल्या विदेशनिवासाचीं पहिलीं चार वर्षे आफ्रिकेंत घालविलीं त्यांपैकीं पहिली २ वर्षे आपण मळयावर काम केलें; पुढें चौथें वर्ष संन्यासी म्हणून घालविलें. मळयावर काम करण्यांत आपणांस काय बरें अनुभव आला? ज्या आफ्रिकन लोकांच्या गरजा वाढल्या नाहींत त्या लोकांना कामकरी लोक बनविणे फारच कठीण आहे ही गोष्ट आपणास कळू लागली. जेव्हां लोकांनां आपल्या अर्धनग्नत्वाची लाज वाटेल तेव्हांच त्यांनां कपडे वापरावयाची बुद्धि होईल, आणि कपडे विकत घेण्यासाठीं पैसे मिळविणें आणि ते मिळविण्यासाठी काम करणे या क्रिया आवडू लागतील. पण जेव्हां कपडे घालणे किंवा चांगल्या प्रकारच्या घरांत रहाणें ही जेव्हां गरजच उत्पन्न होण्याइतकी एखाद्या जातीची संस्कृति वाढली नसेल तेव्हां त्या जातीच्या लोकांस स्वाभाविकपणे असे वाटणार कीं आपणांस पैसे नकोत आणि त्यासाठीं कामहि नको. अशाच मानसिक स्थितींत हे आफ्रिकन राहिले तर सस्कृतीच्या मार्गात त्याचीं दोन पावले पुढे कशीं पडावींत? यूरोपीय लोक आले त्यामुळे आफ्रिकन लोकांचे बरे झाले किंवा वाईट झाले असा विचार करता त्यांचे बरे झाले असेंच म्हणावेंसे आपणांस वाटलें. आफ्रिकन स्त्रिया यूरोपीयन स्त्रियांच्या रखेल्या होतात यामुळें त्यांच्या नीतीची राखरांगोळी करण्यास यूरोपीअन कारण झाले असें आपणांस दिसे आणि त्यामुळें यूरोपीअन लोक येथे आले ही गोष्ट आपणांस मोठी दुःखाची वाटे, आणि त्या गोष्टीबद्दल आपल्या मनाला अजूनहि बरे वाटत नाहीं. तथापि आपल्या मनावर एक संस्कार कायम राहिला तो हा कीं जर भोंवतालीं आफ्रिकन लोकांस काम देण्यास आणि त्यांस माल विकण्यास यूरोपीअन आणि हिंदुस्थानी लोक नसते तर आफ्रिकन लोकांमध्यें आज जी आर्थिक प्रगति झाली आहे तीहि झाली नसती; आणि बरेच लोक काम करण्यामुळें जें द्रव्य उत्पन्न होतें त्या द्रव्याच्या अभावीं मरून गेले असते. गोऱ्या

लोकांस आपण पांढऱ्या पायांचे लोक समजत होतों आणि त्यांचें आगमन हिंदुस्थानास अपकर्षक झालें या दृष्टीनेंच त्यांच्याकडे आपण पहात होतों पण आफ्रिकन लोकांविषयीं आपण त्रयस्थपणें विचार करूं लागलो तेव्हां संस्कृतीच्या दोन निरनिराळ्या पायऱ्यांवरील लोक एका ठिकाणीं आले तर परिणाम एकंदर जनतेस इष्टच होतो असे वाटूं लागलें. हिंदुस्थानांतील लोकांचा स्वातंत्र्यनाश हा देखील डोळ्यासमोर आला, पण स्वातंत्र्यनाश म्हणजे अधिक प्रगत लोकांच्या हातीं राज्यव्यवस्था सोंपविली जाणें असा अर्थ आपण करूं लागलो आणि आपला कांहीं काळ स्वातंत्र्यनाश हा देखील शेवटीं राष्ट्रास हितावह होईल असेच वाटूं लागलें.

आपण संन्यासी म्हणून आपला आयुष्यक्रम आचरीत असतां आपणांस आशावादी होण्यास दुसरींहि कांहीं कारणें झालीं. संन्यासी मंडळीच्या ठायीं लोकांची भक्ति उत्पन्न होते हे आपणांस आपल्याच अनुभवानें स्पष्ट दिसतच होतें व ही लोकांची भक्ति जर आपण चांगल्या कामाला लावली तर आपणांस मोठें कार्य करतां येईल अशी जाणीव झाली. पण आपणांस आपले कर्तव्य काय हेच निश्चितपणें समजेना. प्रत्येक मनुष्य आपला धंदा करीत असतां समाजांत स्वतः निःसंग राहून सर्व लोकांचें कल्याण पहाणारा जर कोणी असला तर तो लोकांनां हवा आहे असें दिसून आले आणि यामुळें हिंदु जनतेंत धर्मग्लानि खरोखर झाली नाहीं, लोकानां धर्मप्रचारकहि हवे आहेत असें वाटावयास लागलें. एकमेकांनां मदत करा आणि बारीक सारीक मत्सर आणि द्वेषभाव तुम्ही विसरून जा म्हणून लोकांनां सांगणें हीं कामें खरोखर मोठीं आहेत याची जाणीव आपणांस झाली. तथापि त्याबरोबरच आपली धार्मिक म्हणजे समाजधारणेसाठीं खटपट करण्यास लागणारी विद्या अपुरी पडते असेंहि वाटावयास लागलें. समाजामध्यें जर लोककल्याणाचें काम करावयाचें झालें तर यूरोपीय लोकांच्या अर्वाचीन पद्धतीच्या दानसंस्था आपण चांगल्या तऱ्हेनें अवलोकन केल्या पाहिजेत, त्या जर आपण अवलोकिल्या नाहींत, त्यांची कार्यपद्धति समजून घेतली नाहीं तर लोकांच्या सद्‌बुद्धीचा आपण दुरुपयोग करूं असें वाटूं लागलें. "धर्मज्ञ" शब्दाची व्याख्या आपण

**लोकशर्मपरा बुद्धिः**
**इतिहासविचक्षणः**
**वृद्धिनाशविधौ ज्ञानी**
**धर्मज्ञो गण्यते बुधैः**

अशी केली होती. आणि त्याचवेळेस आपणांस समाजाच्या उन्नतीसाठीं होणाऱ्या प्रयत्नांच्या पद्धतीचें ज्ञान वाढण्यासाठीं आपलें अवलोकन वाढावें म्हणून आपणांस इंग्लंडला जाण्याची इच्छा झाली. त्यावेळेस आपणांस मोंबासा येथील व्यापारी मंडळींनीं चांगली मदत केली. आपण त्यावेळेस सर्व लोकांसाठीं सामाजिक कार्य करीत होतों. जो हिंदुस्थानी मनुष्य आपली मदत मागेल त्याला विचार करून मदत करूं लागलों होतों, तेव्हां आपलें काम तेथलि मुसुलमान मंडळींस देखील पसंत पडलें होतें. कोणीहि सत्कर्म करूं लागला म्हणजे त्याच्याबद्दल सहानुभूति अन्य समाजांतहि होते असें यावरून उघड आहे.

आपण जेव्हां इंग्लंडमध्यें गेलों तेव्हां आपणांस असें दिसूं लागलें कीं, सत्कर्म करणें हा धंदा झाला आहे. आणि या सत्कर्मांत गुंतलेली मंडळी अगदीं सामान्य आहे. म्हणजे ज्या प्रकारची मंडळी शाळाखात्यांत आणि वर्तमानपत्राच्या धंद्यांत नोकरी करतात त्या प्रकारचीच मंडळी सत्कर्म करणाऱ्या संस्थांत नोकरीसाठीं जातात. आणि तेथें समाजांतील व्यंग शोधून काढून त्यावर उपाय करणें इत्यादि क्रिया ते नोकरी म्हणून करतात. या कार्यांत असलेल्या

मंडळीनीं आपल्या बुद्धिप्रमाणें काम करावें, व पगार फुकटचा खाऊं नये एवढीच भावना ठेवावी म्हणजे त्यांच्याकडून देखील मोठें काम होतें. सत्कर्म व्यवस्थेशीर करणारी मंडळी इतर लोकांप्रमाणेंच पगार घेऊन इमानानें काम करणारे नोकर आहेत असें दिसून आलें, त्यामुळें आपल्या मनाला तर फारच हुरूप आली. जी मंडळी देशकल्याणासाठीं तयार होतात ती सर्वगुणसंपन्न असली पाहिजेत असेच लोकांनां वाटत असतें आणि मलाहि तसेंच वाटे पण लोककल्याणाचें कार्य साध्या प्रामाणिक नोकरी करण्याच्या हेतूनें काम करणाऱ्या मंडळीकडूनहि चांगल्या तऱ्हेनें होत आहे असें दिसून आलें तेव्हां मला संन्यासधर्माची कांहीं अंशीं अनवश्यकता वाटूं लागली.

आपण इंग्लंडमध्यें असतांना साध्या इंग्रजाप्रमाणें पोषाक करून हिंडत होतों तें संन्यास धर्मास उचित नाहीं असें एक बंगाली संन्यासी बोलला त्यावेळेस जें आपण थट्टेनें तात्पुरतें म्हणून उत्तर दिलें तें आपल्या मनावर कायम परिणाम करितें झालें. आपण त्यास तेव्हां जे उत्तर दिलें तें असें—

"लोकांनीं आपणास मान द्यावा, आपली बढती व्हावी, आपल्याकडे लोकांचें लक्ष जावें म्हणून संन्याशाचा पोशाख फार उपयुक्त आहे, पण जर त्या अपेक्षा आपण बाळगीत नसलों तर तो संन्याशाचा पोशाख अनवश्य आहे. आपण त्यास तेव्हां

तरी कवणेंहि विषयांचें
साम्य होणें न रुचे ।
संभावितपणाचें
वोझें जया ॥
पार्था तेणें पाडें
सन्मानें जो सांकडे।
गरिमेतें अंगाकडे
येवोंचि नेदी ॥

या ज्ञानेश्वरींल ओव्यांचे भाषांतर करून सांगितलें तेव्हां तें ऐकून ते बंगाली स्वामी थोबाडीत मारल्यासारखें होऊन गप्प बसले.

स्वामीच्या कपड्यांनीं अहंकाराचा त्याग न होतां जोपासना होते आणि संभावितपणाचें आपणांस ओझें वाटलें पाहिजे इत्यादि वाक्यें आपण त्या वेळेस जरी केवळ बंगाली स्वामीस गप्प बसविण्यासाठीं बोललों, तरी तीं वाक्ये बोलल्यानंतर आपल्या मनावर मोठाच परिणाम झाला. स्वामीचे कपडे घातल्यानें स्वामीपणा येत नाहीं असेच वाटूं लागलें. जे संन्यासधर्माचे कपडे असतील ते हळू हळू बदलत जाऊन लोकांवर छाप पाडणाऱ्या कपड्यांत त्याचें रुपांतर होऊं लागतें आणि केवळ धंद्याच्या जाहिरातीचें साधन एवढेंच त्यास स्वरूप येतें असें वाटून ते कपडे आपणांस ठकबाजास पोषक असे वाटले, आणि आपण ते कपडे कांहीं दिवस टाकूनहि दिले. पण पुढें तो बंगाली स्वामीच शहाणा आपणच वेडे होतों असेंच वाटावयास लागलें व त्या सन्याशाच्या कपड्यांचा आश्रय केला. आतां तर आपण ते कपडे जाळून टाकले आहेत पण आतां संन्यासी कपड्याकडे पुन्हां वळणार नाहीं ना? कोण जाणे, आपलेंच मन आपणांस पुरे कोठें समजलें काहे? आपण त्या वेळेस ते संन्याशाचे कपडे पुन्हां कां पांघुरले?

आपण पुन्हां विचार करूं लागलो कीं, लीनता, सन्मानभीरुता इत्यादि गुणांनां चांगलें का म्हणावें आणि गर्व, अभिमान, आपण पुढें यावे, आपल्याला मान मिळावा इत्यादि इच्छानां वाईट कां म्हणावें, गुणांचा चांगूलपणा किंवा वाईटपणा त्या गुणांनीं व्यक्तीचा फायदा होतो कीं, तोटा होतो यावरच अवलंबून नाहीं काय? विशिष्ट गुणांच्या चांगुलपपणाची किंवा वाईटपणाची कसोटी फायदा किंवा तोटा हीच असेल तर विशिष्ट प्रकारच्या वागणुकीस सद्गुण म्हणतांन

फार जपावयास नको काय? लीनता दाखविली म्हणजे लोक चांगलें म्हणतात म्हणून लीनता दाखवावी असें म्हणणें म्हणजे लोकांनीं आपणांस चांगलें म्हणावें हें मोठें लोभ करण्याजोगें साध्य आहे असें कबूल करण्यासारखें आहे. म्हणजे लीनतेची जोपासना करणें हें लोकांनीं आपणांस चांगलें म्हणावे या क्षुद्र लोभासाठीं आपण आपला आचार बिघडविणेच झालें नाहीं काय? अर्थात लीनतेची जोपासना करीतजाण्यानें लोकांच्याकडून होणाऱ्या मानासाठी आपण आपणांस दुष्ट संवय जडवून घेत आहोंत असेच कां म्हणूं नये. येणेंप्रमाणें आपण जीं नीतीचीं तत्त्वें म्हणून उरीं बाळगली होतीं त्यांविषयीं देखील संभ्रम उत्पन्न होऊं लागला. जर लीनता हा गुण आहे किंवा दोष आहे हें जर त्या लीनतेपासून फायदा होणार कि तोटा होणार याच्यावर अवलंबून आहे तर एखादी गोष्ट लीनतेशीं विसंगत आहे म्हणून त्या गोष्टीची निंदा करण्याचे कारण नाहीं. लीनतेची उपयुक्तता ही या फायद्यातोट्याच्या कसोटीनें तपासावयाची. संन्याशाच्या कपड्यांच्या योगानें आपला फायदा होतो कीं तोटा होतो हाच विचार आपण कां करूं नये? असा प्रश्न मनांत उपस्थित होऊन संन्याशी हा एक धदा आहे व त्या धंद्याच्या जाहिरातीचें साधन आपण बाळगले पाहिजे असेच वाटावयास लागलें.

अमेरिकेत असतांनां मी दुसरा एक चमत्कार पाहिला आणि त्यामुळे माझ्या आशावादी वृत्तींत भर पडली. मी पाहिले की हिंदुस्थानी मंडळीपैकीं जी मंडळी तेथेंच शिकून तयार होतात त्या मंडळीपैकीं कांहींचा तेथें युनिव्हर्सिट्यांत शिक्षक म्हणून प्रवेश होतो तर कांहींचा व्यापारी मंडळींच्या कंपन्यांत महत्त्वाच्या जागांवर प्रवेश होतो, तर कित्येकांचा कारखान्यांत एनाजिनीअर आणि शास्त्रज्ञ म्हणून प्रवेश होतो. तेथें देखील कांहीं हिंदुस्थानी मंडळींनी भांडवल मिळविण्याचीं कामें केलीं आहेत, गिऱ्हाईकी मिळविण्याचीं कामें केलीं आहेत, कारखान्यांमध्यें शिस्त लावण्यासाठीं आपल्या मंडळींनीं नियम केले आहेत. पण त्याच शिक्षणाची मंडळी हिंदुस्थानांत गेली म्हणजे पुष्कळदां फुकटच जातात. यांस भांडवल मिळत नाहीं, भांडवलवाल्याला नवीन धंद्यांविषयी विश्वास येत नाहीं. भांडवलवाल्याला १२ टक्के १५ टक्के व्याज सावकारीवरच मिळते; तर कंपनीच्या शेअरमध्ये पैसे कशास घालावे असा विचार त्याला पडतो. हिंदुस्थानांत जाणारा मनुष्य एकाकी असतो. त्याला त्याच्या बरोबर काम करण्यास योग्य माणसे मिळत नाहींत, व या सर्व गोष्टी आपण पाहिल्या म्हणजे हिंदुस्थानांतील माणसांच्यामध्ये कांहीं लायकी उत्पन्न होत नाही असे लोकांस वाटूं लागतें आणि बाहेर शिकून आलेले लोक कुच कामाचे आहेत असे आपणहि म्हणत होतों. ज्यांचे शिक्षण झालें त्यांच्या कर्तृत्वाविषयीं आपली समजूत अगदीं फोल ठरली अ णि आपणांस नवी दृष्टि उत्पन्न झाली. विदेशी शिक्षण घेऊन आलेली मडळी हिंदुस्थानांत पराभूत झालेली का दिसतात. याची कारणे आपणांस अधिक स्पष्टपणें कळू लागलीं.हिंदुस्थानांतील उत्पादनास कांहीं तरी स्वाभाविक विकासक्रम आहे. तो विकासक्रम लक्षांत न घेतां धदा सुरू झाला म्हणजे तो मरावयाचाच. पण तो विकासक्रम लक्षांत घेऊन उद्योग सुरू झाले तरच ते चालतील असे वाटूं लागले. सर्व धंद्यांचा मोड व्हावयास सरकारचें धोरणच अनिष्ट आहे, दुसरे कांही एक कारण नाही असे वाटावयाचे बद झाले. आणि सर्व जग आपल्या विरुद्ध आहे ही कल्पना कमी कमी होऊ लागली. आपला औद्योगिक उन्नतीसाठीं प्रयत्न योग्य प्रमाणांत झालाच नाहीं. नवे धंदे आणण्याचे काम सोपे नाहीं. एखादा धंदा यशस्वी करण्यास लागणारे ज्ञान ३।४ वर्षांच्या

प्रायोगिक शिक्षणानें मिळणारें नाहीं. हिंदुस्थानांतल्या लोकांनीं अधिक प्रगमनशील देशांत दहा दहा किंवा पंधरा वीस वर्षे राहिलें पाहिजे, त्या प्रकारच्या धंद्यांत नोकरी केली पाहिजे म्हणजेच त्यांच्या अगीं यूरोपीय धंद्यांशीं स्पर्धा करण्याचें कौशल्य येऊं लागेल एरव्हीं येणार नाहीं; हें आपण पुरें समजलों. उद्योगाच्या स्वाभाविक विकासक्रमानें वाढलेल्या आपण पुष्कळ गोष्टी स्वदेशीं आल्यावर पाहिल्या. कापसांच्या गिरण्या वाढल्या, दळणाचे कारखाने वाढले, छापखाने वाढले, आणि या गोष्टी आपण पाहिल्या म्हणजे गरजेप्रमाणें धंदा कसा वाढत जातो ते कळतें. फसलेल्या धंद्यांची पूर्वपीठिका आपण पाहूं लागलों म्हणजे आपणांस काय बरें दिसतें? ज्या लोकांनां उद्योगाचें कांहीं एक समजत नाहीं ज्याचा जन्म वकीलींत गेला आहे, असा एखादा वकील पुढें येतो आणि औद्योगिक उन्नतीसाठीं बोलूं लागतो. त्याने पुस्तकांत वाचलेलें असतें कीं कोळशापासून रंग उत्पन्न होतो. आणि तो एखाद्या तरुणास म्हणतो कीं तुम्ही कांहीं तरी नवीन उद्योगाचें शिक्षण घेऊन या. चालू आहेत तेच धंदे शिकून काय करावयाचे आहे, असें बोलून तो तरुणास जन्माच्या सार्थकतेवर व्याख्यानें देतो.

जेव्हां कोणी तरुण उद्योग विषयक विचार करूं लागतो तेव्हां त्यास औद्योगिक विषयांवर व्याख्यानें देणारांकडून उपदेश काय होऊं लागतो? जी कला हिंदुस्थानांत नाहीं तिचें शिक्षण घेऊन देशांत नवीन उद्योग सुरू करणें हें तरुणांचें कर्तव्य आहे तो विचार तरुण आपणास जिवावर काय होईल हे न पहातां देशास हितावह काय होईल हें पाहूं लागतो. त्याला त्यावेळीं धंदा कोणताच ठाऊक नसतो व त्यामुळें तो कांहीं तरी शास्त्रीय ज्ञान मिळवून परत येतो. तेवढ्या पुंजीवर यशस्वी धंदा कसा चालवावयाचा?

जेव्हां आपल्याकडून काय कसूर होतो हें लक्षांत येतें तेव्हां म्हणजे देशाच्या दुर्भाग्याची कहाणी सांगण्याची संधि कमी होत जाते, आणि त्यामुळें राजकारणी मनुष्यांनां सरकारवर घसरण्याची संधि कमी होते हेहि खरें आहे, पण आपल्याच लोकांच्या चुका जेव्हां आपण लोकांसमोर मांडूं तेव्हां जो कोणी योजक किंवा कार्यकर्ता आहे त्याच्या मनांत आशावाद उत्पन्न झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

इंग्लडमध्यें असतां आपण मोठ्या प्रमाणावर कारखाने व घरगुती उद्योगधंदे यांवर विचार करूं लागलों. उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें सामान्य मजूरवर्गाची फार वाईट स्थिति होत चालली आहे. अशा अर्थाचीहि ओरड आपण पूर्वी ऐकिलीच होती, आणि त्यासाठीं हिंदुस्थानामध्ये "कॉटेज इंडस्ट्रीज" व्हाव्यात असें लोक म्हणत आणि ते हिंदुस्थानात कितपत स्थापन होऊं शकतील याविषयीं आपला विचार चालू होता. इंग्लंडांत घरगुती धंदे काय काय चालले आहेत हें आपण पाहिलें तेव्हां असें आढळून आले कीं जेथें घरगुती धंदे चालू आहेत तेथेच उलट अधिक शोचनीय स्थिति आहे. लंडनमधलि मोठाले दुकानदार घरीं काम करणाऱ्या स्त्रियांस जेव्हां काम देतात तेव्हां त्या स्त्रियांस फारसा फायदा होत नाहीं. बायकांनीं रात्रभर घरीं जागणें, रात्रीं घरांत मुलें निजली असतांच शिवण्याच्या मशीनची कटकट चालू ठेवणे वगैरे परिणाम त्यापासून होत आहेत. व असें करण्यांत स्त्रियांनां उपजीविकेपुरती प्राप्तीहि होत नाहीं. ज्या लोकांनां कामकरी वर्गांत आपण आहोंत असें म्हणून घेण्याचीच लाज वाटते अशीच मंडळी घरच्याघरीं फारच थोड्या पैशांत काम करून देतात, आणि पोटाला कसेंबसें मिळवितात. त्यामंडळींच्या घरांत रोगराई ठेवलेलीच. अशा मंडळींच्या घरांत पुष्कळदां लहान मुलांनां किंवा काम करणाऱ्या बाईलाच क्षय झालेला असतो आणि त्या क्षयाचे जंतू त्यांनीं

उत्पन्न केलेल्या मालाबरोबरच दुकानांत येतात व तेथून चोहोंकडे पसरतात. कारखान्यांत जाऊन काम करण्यामध्ये जो नियमितपणा उत्पन्न होतो त्यामुळेच जे काम होत असतें तें घरीं होत नाहीं. यामुळें मोठया प्रमाणावर उत्पादन आणि मोठया प्रमाणावर मालाचा फैलाव या गोष्टी उत्पन्न झाल्या आहेत व त्या समाजाच्या हितासाठींच आहेत. समाजाच्या अकल्याणासाठीं नाहींत. जो घरगुती माल तयार होतो त्यावर देखरेख नसते त्यामुळें तो माल अधिक हलक्या प्रकारचा असतो, आणि त्याच्यांतील बराचसा माल दुकानदाराकडून नाकारला जातो. आपण जेव्हां हिंदुस्तानासंबंधीं विचार करूं लागलों तेव्हां आपल्याहि लक्षांत आलें कीं हिंदुस्थानामध्ये घरगुती उद्योगधंदे अधिकच वाईट तऱ्हेने चालतील; तर मोठयाप्रमाणांवर उद्योगधंदे सुरू होणें हा जो जगाचा क्रम झाला आहे त्याकडे हिंदुस्थानास पाठमोरें होण्याचे मुळींच कारण नाहीं. हिंदुस्थानामध्ये घरगुती उद्योगधंदे वाढविण्याच्या चळवळीपेक्षां पांढरपेशा स्त्रियांनीं देखील घराबाहेर पडून काम करणें हलकें नाहीं ही भावना प्रसृत करण्याची चळवळ अधिक उपयोगी पडेल. इंडस्ट्रियालिझम विरुद्ध जी मंडळी बोलूं लागतात त्यांचें समाजाचे ज्ञान किती कोतें असतें याचीहि प्रत्यक्ष माहिती तसल्या मंडळीशी गांठ पडल्यामुळे झाली. आणि यामुळें आपला आशावाद जरासा वाढला. यूरोप ज्या रस्त्याने गेलें त्या रस्त्यानें जाण्यास आपणांस मुळींच हरकत नाहीं असें वाटूं लागलें आहे. व जेव्हां हिंदुस्थानांत चरख्याची चळवळ सुरू झाली तेव्हां ही चळवळ खास लवकर मरणार असे आपण जें भाकीत केलें होतें तेच शेवटीं खरें झालें. हिंदुस्थानांतील चरख्याच्या चळवळीस सुरुवात झाली हे जेव्हां आपणांस इंग्लंडमध्यें असतांना कळलें तेव्हां ती चळवळ खास लवकर मरणार असे आपणांस स्वाभाविकपणें वाटलें आणि जेव्हां ती मेल्यासारखी झाली तेव्हां आपणांस बिल्कुल वाईट वाटलें नाहीं तर जें स्वाभाविक होतें तेच झाले असेंच वाटलें आणि स्वराज्याचा जो थोतांडी संबंध गांधींनीं उत्पन्न केला त्यामुळें औद्योगिक विकासक्रम आणि राजकारण हीं दोन्हीं तात्पुरतीं बिघडलीं तरी त्या वेळेपासून हिंदुस्थान लवकरच जागें झालें असें वाटून आपल्या आशावादांत आणखी भर पडली. महात्मा गांधींच्या खुळया कार्यक्रमाचा फजीतवाडा उडाल्यामुळें आपला आशावाद अधिक बळकट होत गेला.

आपण जेव्हां शिकत होतो तेव्हां तरुण मंडळींची नोकरीकडे जाण्याची प्रवृत्ति फार वाईट आहे; कोणी स्वतंत्रपणें उद्योग करीत नाहीं; नोकरी वकीली आणि डॉक्टरी इकडेसच लोक जातात म्हणून तरुण मडळींनां प्रत्येक जण दोष देत होता. आपल्या तरुण मंडळींत धमक नाहीं म्हणून प्रत्येक पुढारी बोलत असे, आणि तोच पुढारी आपल्या मुलाला धंदेशिक्षणाकडे पाठवीत नसेच, तर मुलाला सामान्य शिक्षण देऊन त्याला त्याच्या शिक्षणामुळें उत्पन्न होणाऱ्या लायकीपेक्षां जरा वरच्या दर्जाची नोकरीच मिळावी म्हणून खटपट करीत असे. नवीन धंदा उत्पन्न करण्याची जबाबदारी त्यांनीं तरुणांवर टाकल्यामुळें आणि आपणहि ही जबाबदारी आपलीच आहे अशी खोटी कल्पना करून घेतल्यामुळें आणि तरुणांस नवीन उद्योग काढतां येत नाहीं हेहि आपणांस दिसत असल्यामुळे तेव्हां आपणांला शंका उपस्थित झाली की, हिंदुस्थानांतील तरुण मडळी बिघडली आहेत काय? पुन्हां विचार आला कीं देशभर सर्व तरुण कसे बिघडतील पण त्यावेळेस त्या प्रश्नाचें उत्तर स्वतःस देतां येईना. बहुतेक सर्व पुढारी "तरुण मंडळींनीं काय करावें" या विषयावर कांहीं एक विचार केल्याशिवाय किंवा विचार करण्याची लायकी असल्याशिवाय बोलत बसणारे आहेत हें आपल्याला त्यावेळेस

कोठें ठाऊक होते? आपल्याला त्यामुळें असें वाटूं लागलें कीं, आपल्या लोकांतला "स्टामिना"च बिघडला आहे. त्यांची स्वतंत्र कार्यशक्ति नष्ट झाली आहे. पण आपण इंग्लंडमध्यें गेल्यानंतर आपणांस काय दिसले? प्रत्येक तरुण मनुष्य नोकरीच्याच मार्गे आहे. कोणीहि तरुण मनुष्य कांहीं वर्षे नोकरी केल्याशिवाय धंद्यांत पडत नाही, एवढेच नव्हे तर त्यानें कांहीं वर्षे तरी विशिष्ट धंद्यांत नोकरी केल्याशिवाय म्हणजे दुसऱ्याच्या खर्चाने धंदा शिकल्याशिवाय स्वतंत्र धंद्यांत पडला तर त्यास कोणीच शहाणा म्हणणार नाहीं. एवढेंच नव्हे तर त्याची धंदेवाईकांच्या बाजारांत किंमत रहाणार नाही. हा मनुष्य धंदा वाईट करील अशीच लोकांची समजूत रहाणार. धंदा चालविणें म्हणजे त्यास किती विविध तऱ्हेचें ज्ञान व अनुभव लागतात आणि मनुष्य धंद्यांत तरबेज व्हावयास त्याने किती वर्षे धंद्यांत घालवावी लागतात हे आपणांस धंद्यांत पडलेल्या अनेकांची ओळख होऊन आणि त्यांची चरित्रे वाचून समजलेच आहे. व त्यावरून तरुणांनीं नोकरीकडे वळणे हेच स्वाभाविक आणि योग्य आहे असे दिसूं लागले आहे. आपली सुशिक्षित मंडळी जर सरकारी नोकरींत शिरली नाहींत तरच व्यापारी नोकरींत शिरतात, पण इंग्लंडमध्यें देखील हीच कथा नाहीं काय? तेथें कमी शिक्षणाची मंडळीच व्यापारी नोकरींत जातात व जास्त शिक्षणाची मंडळी सरकारी नोकरीमध्यें शिरतात. जेव्हां व्यापारी कंपन्या मोठमोठे पगार देऊं शकतात तेव्हांच त्या कंपन्या अधिक सुशिक्षित वर्ग आपल्याकडे नोकरीस ठेवूं लागतात.

अर्थात आपण सर्व मंडळी नोकरीच्या पाठीमागें आहोंत असा आपल्यामध्यें जो पुढारी मंडळी दोष काढीत यावरून तरुण बिघडले नसून त्यांचा दोष काढणें हें केवळ त्यापुढऱ्यांच्या अज्ञानाचा भाग होता, व त्यांचीं व्याख्यानें ऐकून आपल्या सामर्थ्याविषयीं निराश झालेल्या आम्हांस निराशावादाचें खरोखरच कारण नव्हतें. आपणांस इंग्लंडांतील अनेक तरुणांच्या आयुष्यक्रमाचें चित्र डोळ्यासमोर दिसल्यानतर निराशावादास जागा कशी रहाणार?

आपण लंडन आणि म्यांचेस्टर येथें दोन वर्षें घालविल्यानतर १९१२ सालीं अमेरिकेस गेलों. तेथें आपणांस असें दिसले कीं यूरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांतील अत्यंत निकृष्ट स्थितींतील लोक अमेरिकेस येत आहेत. त्यापैकीं कित्येकांची सांपत्तिक आणि रहाणीसंबंधाची स्थिति यूरोपीयन समाजाच्या मानानें येथल्या महार मांगासारखच्चि असे. पण तेथे राहून त्यांची सांपत्तिक स्थिति त्यांच्या परिश्रमाने सुधारत जाई, आणि त्यांच्या मुलांस सक्तीने शिक्षणहि मिळे. ते मिळाल्यानतर ती मुलें सुशिक्षित होऊन चांगल्या नागरिकांमध्ये मोडत. कोणी चांगले पैसेवाले व्यापारी व कारखानदार होत, तर कोणी विद्वान म्हणूनहि पुढे येत, या सुशिक्षित झालेल्या अपत्यांचे लग्नव्यवहारहि पुढे चांगल्या प्रतीच्या स्त्री पुरुषांबरोबर होत. या सर्व अवलोकनामुळें शिक्षणाने मनुष्यांत केवढा फरक होऊ शकतो हे आपल्या नजरेस आले, आणि त्यामुळें मनांत हिंदुस्थानच्या भावी स्थितीविषयीं चांगलीच आशा उत्पन्न झाली. हिंदुस्थानामध्यें शिक्षण सार्वत्रिक करणे आणि कनिष्ठ स्थितींतील लोकांची रहाणी सुधारणे या क्रिया जोरानें सुरू झाल्यावर अस्पृश्य म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांचा सामाजिक दर्जा खात्रीनें सुधारत जाईल आणि त्यांच्यांतून देखील मध्यमवर्गसदृश घराणीं उत्पन्न होतील अशी आपणांस खात्री वाटू लागली. जेव्हां कनिष्ठ वर्गाचें शिक्षण आणि त्यांच्या रहाणीची सुधारणा या बाबतींत आपल्या लोकांकडून परिश्रम होईल तेव्हा त्यांच्या विषयींच्या

विटाळाच्या कल्पना देखील लोकांच्या मनांतून नाहींशा होतील आणि आपल्या समाजांत उच्चवर्गाचें अनुकरण होत जाऊन समाजामध्यें एकरूपता स्थापन होऊन आपल्या समाजास एकराष्ट्राचे स्वरूप येईल अशी देखील खात्री वाटू लागली.

महायुद्धाचे आपले दिवस अमेरिकेंत गेले त्यावेळेस तेथील उत्कृष्ट सांपत्तिक स्थितीचा आपणांसहि फायदा मिळाला. आपण त्यावेळेस वेस्टिंग हाऊसच्या कंपनींत यांत्रिकाचें काम करीत होतों आणि पगार चांगला मिळवीत होतो आणि मजूरवर्गामध्यें धर्मोपदेशहि करीत होतो. त्यावेळेस आपल्याला धर्मोपदेशाबद्दल पैसेहि चांगले मिळाले आणि युद्धकालाच्या दिवसांत युद्धाविरुद्ध आपण बोलत असल्यामुळे आपणांला प्रसिद्धिहि मिळाली. त्यावेळेस आपणांस अमेरिकेसारख्या पुढे गेलेल्या राष्ट्राच्या मनोवृत्तीचा परिचय झाला. शांततेच्या वाढीस आणि रक्षणास अनकूल अशी मंडळी आपल्या भोंवतीं गोळा झाली आणि मजूरवर्गाचें तत्त्वज्ञान, ख्रिस्ताचा धर्म व वेदांत या सर्व विचारांचें एकीकरण करून ते मांडण्याचा प्रयत्न केला. अमेरिकेला युद्धें होतात ती कोत्याहि राष्ट्रास कांहीं तरी आपणांस फुकटांत मिळावें या बुद्धीमुळें होतात. जमीनीस योग्य किंमत देण्यापेक्षां ती कुरापत काढून लढून हिसकावून घेणे ही केवळ लुटारूची वृत्ति आहे पण ती खरोखर शेवटीं किफायतवार होत नाहीं, असे आपण सांगू लागलों तेव्हां हीच गोष्ट अर्थशास्त्र सांगणारे जे उपवक्ते होते त्यांनीं आपल्या ज्ञानाच्या साहाय्याने अधिक विशद करून दाखवीली त्याच्या व्याख्यानांच्या योगानें आपल्या मनामध्ये नवे विचार उत्पन्न झाले, आणि आयुष्यविषयक निराळी वृत्ति उत्पन्न झाली. मनुष्याचे कर्तव्य मेहेनत करणें आहे. मेहेनत करण्यास साहित्य म्हणून जमीनीचा आणि भांडवलाचा उपयोग आहे जर मेहेनत करणारा वर्गच नसेल तर भांडवल किंवा जमीन हीं दोन्हीं निरुपयोगी होत. आणि यासाठीं लढाया करीत बसणें मूर्खपणा आहे असें ते उपवक्ते बोलत, याशिवाय संपत्ति ही सर्व मनुष्यश्रमावरच अवलंबून आहे, श्रम करण्यास साधन म्हणून जेव्हा आपल्याला जास्त प्राप्ती व्हावी म्हणून मनुष्य प्रामाणिक धंदा करूं इच्छितो तेव्हां तो आपल्या बरोबर दुसऱ्या इतर लोकांचाहि फायदा करून देतो, हे तत्त्व देखील आपल्या पक्कें मनांत ठसलें तर जसजशी अमेरिकेसारख्या देशाची सांस्कृतिक वाढ होत जाणार तसतसें जगांतले दारिद्र्य कमी होत जाणार. एका देशांतील संपत्तीची आणि संस्कृतीची वाढ दुसऱ्या देशांतहि संपत्तीची वाढ करण्यास कारण होते, हे तत्त्व मला पटू लागले. यानें आपल्या मनांत कांही काळ आशावाद उत्पन्न केला. पण तो आशावाद चिरस्थायी नव्हता.

आपण अमेरिकेस असतां त्या इंडियन सेटलर्स असोसिएशनचे विद्वान अध्यक्ष प्रो. शंकरराव गोगटे यांच्याशीं आपला सहवास झाला. त्यांनी आपल्या परागदा तत्त्वज्ञानाचे डोझ आपणांस पाजले. त्यावेळेस आपण ते त्यांचे तत्त्वज्ञान ऐकून खूप हंसलो. लढाई बंद झाली तेव्हां आपण इंग्लंडला आलों, तेव्हां विश्वमित्र, डॉ. नंदिका, डॉ. परमानंद, मि. सुतार ही मंडळी इंग्लंडला आली होतीच आपण यूरोप व अमेरिकेंत जे दिवस घालविले त्या दिवसांत आपलाच स्वभाव मोठा कामकरी बनला. आपणांस काम करण्यास इतका हुरूप हिंदुस्थानांत किंवा आफ्रिकेत कधींच वाटला नाहीं. ज्याअर्थी थंड हवेतल्या प्रदेशांत जेवढे काम होतें तेवढे उष्ण हवेंत होणार नाहीं त्याअर्थी हिंदुस्थानांत काम करण्याची चहाच रहाणार नाहीं ज्या देशांतील लोक आळशी त्या देशांतील लोक स्वातंत्र्यास नालायक होत. हिंदुस्थानची हवा बदलणार नाहीं आणि त्यामुळें त्यांनां काम करण्याची स्वयंस्फूर्ति कधींच उत्पन्न होणार नाहीं. तेव्हां

हिंदुस्थान हा देश कायमचाच पारतंत्र्यांत व विपत्तींत राहील. या देशाला शाप जन्माचाच लागलेला आहे, असें वाटून कांहीं दिवस तर आपण अगदीं निराशेनें व्याप्त होऊन गेलो. हिंदुस्थानास स्वातंत्र्य दिलें तर हिंदुस्थानाच्या हवेंत कांहीं एक प्रगति होणार नाहीं. मध्यम वर्ग कोणत्याहि शारीरिक कष्टाच्या कामास नालायख आहे आणि खालचा वर्ग लुटालुटीस प्रवृत्त होऊन मध्यम वर्गास सहज चिरडून टाकील. पुढारी लोकांस अजून मेहनत करीत रहाणे आणि काम करण्याची संधि अधिक वाढविणें यांचें महत्त्व कोठें कळलें आहे तर ते सामान्य वर्गांत पसरवितील. कनिष्ट वर्ग परिश्रमाच्या संधीचें महत्त्व न समजतां लुटालुटीसच प्रवृत्त होईल. उन्हाची तिरीप मोठी त्यामुळे लोक घराबाहेर पडण्यासच नाखूष रहाणार व एकमेकांस फारसे भेटणार नाहींत त्यामुळे लोकांत दळणवळण जास्त असणे ही प्रजासत्ताक राज्य सुरळीत चालण्यास अवश्य असलेली गोष्ट साध्य होणार नाहीं. प्रत्येक मनुष्य काम चुकवू पहातो व वर जो अधिक उत्साही यूरोपीयन असतो त्याच्या अस्तित्वामुळेच हिंदुस्थानांत जबाबदारीची कल्पना कांहीं तरी राहते, वरचा यूरोपीअन निघून गेला तर सर्व लोक आळशी होतील,कारभार अव्यवस्थितपणाने चालेल आणि लोकांची प्रगति होणार नाहीं. इतक्या सर्व गोष्टी आपणास कांहीं दिवस निरुत्साही करीत होत्या. आणि हिंदुस्थानी लोकांपैकीं ज्या लोकांनां संपन्नतेचा व त्याबरोबर मेहनतीचा आयुष्यक्रम घालवावयाचा असेल त्यांनां मार्ग एकच. त्यांनीं हिंदुस्थान सोडून थंड प्रदेशांत जाऊन वसती करावी हा होय असे आपण म्हणूं लागलों.

आणि तसें आपण म्हणूं लागल्यामुळें लंडनमधील स्वदेशाभिमानी मंडळींत आपले नांव मंदु झालें. आपणांस कोणी पेसिमिस्ट म्हणत तर आपणावर कोणी त्याहूनहि मोठाले आरोप करीत. स्वामींचा धंदा म्हणजे धर्माच्या निमित्तानें परदेशी यावयाचें आणि धार्मिक गोष्टी सांगून देखण्या पोरींनां भुरळ घालावयाची हा धंदा आहे आणि हा धंदा मनुष्य करूं लागला म्हणजे त्यास गोऱ्या शिष्यिणीच आवडूं लागतात इत्यादि गोष्टींचा आरोप झाला. डॉ. नदिकेच्या डोक्यांत अजूनहि असेंच आहे कीं, गोऱ्या शिष्यिणी मलों फार आवडतात म्हणून मी अमेरिकेस व इंग्लंडमध्यें इतकीं वर्षे राहिलों.

लोकांनीं आपली स्वदेशाभिमानाच्या अभावाबद्दल निर्भत्सना केली पण त्या निर्भत्सनेनें आपली मतें कोठें पालटलीं? इतर मंडळी अजाण; आपणांला जें भवितव्य दिसतें ते त्यांनां दिसत नाहीं म्हणून त्याच्याबद्दल आपल्याला कींव वाटली. देशाच्या भवितव्यतेविषयीं आपलें मन निराश झाल्यामुळें इंग्लंडमधले १९२० साल आपण अगदीं विषण्ण स्थितींत घालविलें. त्यावेळेस आपल्या मनःस्थितीची कोणासच कल्पना करतां येणें शक्य नव्हते. तरी रहावें. ब्रिटिशम्यूझिअममध्ये दुपारी कोठे वाचीत बसावें. हिंडतांनां जेव्हां इंग्लंडमध्ये मोठ्या करामतीची गोष्ट दिसेल तेव्हां ती करामत आपल्या लोकांनां कधींच करतां येणार नाहीं असे वाटून पुन्हां खिन्न व्हावें; संध्याकाळीं सिनेमा पहावा, आणि कधीं कधीं टेम्स नदीच्या एम्बांकमेंटवर बसून सिगार फुंकीत बसावें ही वृत्ति आपली झाली, आणि स्वतःच्या पलीकडे जो मनुष्य विचार करतो, जो देश किंवा समाज यांच्यासारख्या आगंतुक गोष्टींनीं मनाला विनाकारण भंडावून सोडतो तो मनुष्य मूर्ख आहे असे मनाला वाटूं लागलें. आणि तो देशविषयक किंवा समाजविषयक बेफिकीर वृत्तीचा मार्ग खरोखर चांगला नाहीं काय असे मनांत अजूनहि येते.

तथापि काळी ढगेंच आपण किती दिवस डोळ्यासमोर ठेवणार? प्रत्येक ढगास रुपेरी झालर

असतेच एका दिवशी आपल्या घरवालीची मोलकरीण गात होती; ती म्हणत होती–

Every cloud is silverlined
Cheer up Nellie you will
soon be dead
Life is short but a gay one

हें गाणे आपण ऐकलं तेव्हां त्या मोलकरणीचा आपणांस हेवा वाटू लागला. आपण मरणारच आहो तर जे दिवस जगांत आपणांस घालवावयाचे आहेत ते दुसऱ्याच्या दुःखाविषयीं फाजील विचार करून आपण दुःखाचे कां करावेत, हा एपिक्यूरिअन विचार देखील मनांत आला. गाण्याचीं तींच कडवीं आपण गात होतों आणि देशविषयक विचार निग्रहानें मारून टाकावेत, आणि जगांतील भौतिक सुखांत खुशाल पोहावयास लागावें असें मनानें ठरविण्याचा प्रयत्न केला. पण ते देखील शक्य कोठून होणार? आनंदी व्हावे म्हटल्याने आनंद होत नाही, त्याप्रमाणे अमुक गोष्ट विसरावें असें म्हटल्याने विसरली जात नाहीं विसरावयास पाहिजे ते विसरणे ही गोष्ट जवळ जवळ अशक्य आहे. तथापि काळ्या ढगाची रुपेरी झालर कांहीं असेल काय हा विचार देखील आपल्या मनांत आला आणि जी स्थिति आपणांस टाळता येण्याजोगी नाहीं तिची अनिवार्यता पूर्णपणे लक्षांत घेतली तर आपणांस कांहीं तरी दुसरा मार्ग सुचतोच. त्याप्रमाणे येथे हि झालें. जेव्हां कोणताहि देश स्वयंपूर्णता ठेवू शकणार नाहीं तेव्हां त्या प्रदेशाच्या स्वयपूर्णतेसाठी नवीन प्रदेश जोडणे अवश्य होतें; इग्लंडने हिंदुस्थान काबीज केला पण हिंदुस्थान स्वयंपूर्ण होऊ शकणार नाहीं म्हणून त्यास आपण इग्लंड जोडलें असे म्हणण्यास काय हरकत आहे? हिंदुस्थानाच्या हितासाठीं ज्या क्रिया अवश्य आहेत आणि ज्या क्रिया हिंदुस्थानांत होऊ शकणार नाहींत, या क्रिया अर्थात हिंदुस्थानाबाहेर झाल्या पाहिजेत ही जाणीव होऊन हिंदुस्थानाला प्रगमनशील देशाशीं कायमच्या मैत्रीचा संबंध ठेवावा लागला असता. आज झालें आहे ते खरोखर त्या स्वरूपाचेंच नाही काय?

हिंदुस्थानचा सर्व कारभार चांगल्या प्रगमनशील तऱ्हेनें चालल्यास उत्साही मंडळीची आवश्यकता आहे, व सध्यां देशांतील कार्याचा प्रेरकवर्ग इग्लंडमध्येंच आहे. नवीन कार्याच्या प्रेरणेची क्रिया इग्लंडमध्यें करवून हिंदुस्थानची राज्यव्यवस्था चालत आहे. तथापि जर हिंदुस्थान आणि इंग्लड यांचा राजकीय संबंध कायम राहिला व देशांतील राज्यव्यवस्था देशांतील लोकांच्याच हातीं राहिली तरी प्रेरकत्वाची हिंदुस्थानची गरज इंग्लंड पुरवूं शकेल. देशांतील लोकांनां प्रगतीच्या मार्गावर रहाण्यासाठीं जी टोचणी रहावयाची ती राहील आणि पारतंत्र्य भासणार नाहीं. हिंदुस्थान इंग्लडला जर कच्चा माल पुरवील तर इंग्लड हिंदुस्थानला नेहेमीं शास्त्रीय प्रगती पुरवीत जाईल. या दृष्टीने जेव्हां मी पाहू लागलो तेव्हां मी पुन्हा आशावादी बनूं लागलो. मला असे वाटू लागलें की हिंदुस्थानांतील प्रगमनशील आणि सुशिक्षित वर्गानें थड हवेच्या जागीं मुलें वाढवून त्यांच्यामध्यें कार्यकर्तृत्व उत्पन्न करावें आणि नंतर त्या मुलानीं हिंदुस्थानचे नेतृत्व घ्यावें, म्हणजे हिंदुस्थानी रक्ताच्या पण कर्तृत्व, उत्साह, जगभर व्यापक दृष्टि आणि खुल्या कल्पनांपासून अलिप्तता या बाबतींत इंग्रज बनलेल्या लोकांनीं हिंदुस्थानच्या प्रगतीची धुरा आपल्या हातीं ठेवावी.

ही कल्पना आपणांस जेव्हां आली तेव्हां आपणांस आयुष्य पुन्हां सुखदायक वाटलें पण ही गोष्ट जेव्हां आपण दुसऱ्या लोकांपुढें मांडली तेव्हां त्यांस तें मोठें भेसूर चित्र वाटले. प्रगतीचें असे चित्र रेखाटल्याबद्दल आपली निंदाहि झाली. कांहीं लोक म्हणूं लागले कीं निराशेच्या चित्रापेक्षां देखील हे तुमचे आशेचें चित्र भेसूर आहे. आज

भाषण हिंदुस्थानांत आलों तरी देखील आपला हिंदुस्थानच्या प्रगतीविषयीं सिद्धांत बदलला नाहीं. मी अंतःचक्षूपुढें भावी कालाचें चित्र रेखाटतों आहे तें असें. येत्या पंचवीस वर्षांत हजारों हिंदुस्थानी मंडळी परदेशीं जातील. त्यांतील अनेक मंडळी व्यापारांत पुढें येतील. जे व्यापार स्वतः करीत असतील त्यांच्याकडे कांहीं तरुण मंडळी नोकरी करतील. ज्यास जो उद्योग मिळेल तो उद्योग करील. त्या मंडळीचा हिंदुस्थानशीं संबंध राहिल्याने तो मनुष्य कोणत्याहि धंद्यांत शिरला तरी हिंदुस्थानशीं संबंध ठेवीलच. जे व्यापारी असतील ते हिंदुस्थानांत गिऱ्हाइकी मिळविण्यासाठीं प्रवास करतील आणि ते नवीन यंत्रांस अगर नवीन प्रकारच्या सुधारणांस हिंदुस्थानचें गिऱ्हाइक करतां करतांच हिंदुस्थानला अर्वाचीन संस्कृतीच्या रस्त्यावर आणतील. जे उच्च प्रकारची व्यवहारोपयोगी विद्या शिकतील ते हिंदुस्थानांत ती विद्या घेऊन जातील. यूरोपांत वारंवार येणाऱ्या हिंदुस्थानी लोकांनां आपल्या कर्तृत्वाबद्दल जाब आपल्याच धंद्यांतील यूरोपांतील लोकांनां द्यावा लागल्यामुळें त्यांच्यामध्ये हिंदुस्थानबद्दल जबाबदारी वाटूं लागेल. एवंच हिंदुस्थानची सुधारणा यूरोपीभवन झालेल्या हिंदुस्थानी लोकांच्याकडून होत जाऊन सुधारणेचा प्रवाह अखंड राहील आणि हिंदुस्थानची अशी सुधारणा होत गेली म्हणजे त्यांची संपत्ति वाढत जाईल.

जों जो देशातील मंडळीच अशी पुढें येत जातील तो तों त्यांच्यावर देशाच्या शासनव्यवस्थेची जबाबदारी टाकण्यास देखील इंग्लंडची वृत्ति अनुकूल होईल. हिंदुस्थानी लोकांच्या हातीं कारभार दिला तरी इंग्लंडने जो पैसा खर्च केला आहे त्या पैशाचें व्याज मिळण्यास अडचण पडणार नाहीं असे इंग्लंडांतील लोकांस वाटूं लागून हिंदुस्थानाला स्वराज्य देण्यास देखील त्यांनां हरकत वाटणार नाहीं.

देवीदासपंतास याशिवाय ज्या अनेक आठवणी झाल्या त्या सर्व त्यांच्या आठवणीच्या भाषेत न देतां त्यांचें पूर्ववृत्त म्हणून पुढें देतों.

स्वामींस देशाच्या भवितव्यतेसंबंधानें जी एक-प्रकारची आशा वाटूं लागली त्या आशेमुळें त्यांचें १९२०।२१ साल आनंदांत गेलें. तथापि त्यांस हिंदुस्थानांत परत जातां आलें नाहीं. त्या वर्षी एक निराळें प्रकरण उपस्थित झालें होतें. त्यांनां एक शिष्यीण मिळाली ती त्यांस म्हणूं लागली कीं, हिंदुस्थानची सेवा देशाबाहेर राहूनच तुम्हांस अधिक करतां येईल. तुम्ही हिंदुस्थानांत जाल तर तेथे कोठें तरी कोना कोंपऱ्यांत जाऊन पडाल. तुमचा उपदेश कमी योग्यतेच्या तरुणांच्या कानीं पडेल. हिंदुस्थानांतील सर्व भागांतले तरुण येथें येतात आणि त्यांचे विचार बदलणें सोपें असेल अशा वयांत ते येथें येतात. शिवाय बरेचसे विद्यार्थी हिंदुस्थानांत मिळणारें शिक्षण घेऊन मग येथें येतात, तर हिंदुस्थानांतील सर्व भावीपिढीवर किंबहुना त्या पिढींतील अधिक सुशिक्षित वर्गावर जर तुम्हांस परिणाम घडवावयाचा असेल तर तुम्ही येथेंच रहावें हें चांगलें.

ही शिष्यीण लंडनमधील मिसेस मिकफो नांवाच्या एका श्रीमंत विधवेची एकुलती एक तरुण मुलगी होती, ती अनेक ग्रंथ वाचलेली असून चांगलीच सुशिक्षित होती. ती देखणी होती व स्वामींस देखणी शिष्यीण लाभली म्हणून कित्येक त्या दोघांच्या संबंधाकडे संशयित दृष्टीनें पहात. ती स्वामींबरोबर जिकडेतिकडे जाई. स्वामी ब्रह्मगिरींची ती शिष्यीण होती तरी कांहीं अशी त्यांस एखाद्या मुलाप्रमाणे वागवी. ती आपल्या आईबरोबर एका टुमदार घरांत रहात होती व ती स्वामींचा सर्वप्रकारें योगक्षेम पहात होती. ती स्वामींवर इतका ताबा चालवी कीं, एखाद्या थंडीच्या दिवशीं गळ्यांत मफलर घालावयास स्वामी

विसरले तर तिने त्याबद्दल त्यांच्यावर अनेक मंडळीच्या देखत रागवावें. स्वामी जर कधी कांहीं फराळ करीत असले तर तुम्ही अमूक खाऊ नका किंवा तमुक खाऊ नका असे ती सांगे, आणि आपल्या हितासंबंधानें ही फार दक्ष आहे असें स्वामींस वाटून तिचें म्हणणे स्वामी ब्रह्मगिरी निमूटपणें ऐकत असत. आणि तिची स्वामीवर इतकी हुकमत चालते तर या दोघांचे सबंध तरी कशा प्रकारचे असावेत यासंबंधानें बरीच चर्चा चाले. तेथील हिंदी विद्यार्थ्यांत आणि विद्यार्थिनींत स्वामी ब्रह्मगिरींविषयी थोडीशी कुचाळी सुरू झाली होती.

पण थोडक्यांत दिवस पालटले. ही स्वामींच्याविषयीं अत्यंत फिकीर बाळगणारी शिष्यीण पुढे बाहाई मताची झाली आणि तिचा अध्यात्मिक गुरु निराळा झाला. आणि कांहीं दिवसांनीं तिने दुसऱ्या एका गुरूची घरीं स्थापना केली. व एकदोन दिवसानी स्वामी ब्रह्मगिरींस निरोप द्यावयाचें ठरविलें. पण स्वामींना नवीन परिस्थितीची जाणीव होऊन ते तेथून निघाले. स्वामी ब्रह्मगिरींस फार दुःख झालें आणि जिच्यावर आपलें प्रेम जडलें आहे अशा प्रियकरणीने आपणांस गचू दिला म्हणजे जसे दुःख होतें त्यासदृश दुःख स्वामींस झाले. स्वामींनीं "शिष्यापरित्यक्त गुरु" म्हणून एक लहानसे काव्यहि केले होते. तें काव्य ते कोणासहि दाखवीत नसत. पण त्या काव्यांतले कांहीं श्लोक लंडनमधल्या महाराष्ट्रीय मंडळीत कांही नैमित्तिक कारणामुळे पसरलेच

इ. स. १९२२ चें वर्ष चालू होते. आणि इंग्लंड सोडावे असे स्वामींस वाटत होतें. पर्ले मिकर्फो हिच्यापासून कोठे तरी दूर जावे आणि तिला विसरावे असे स्वामीस एकदां वाटत होतें तर प्रसंगीं बहाई धर्माची उदार तत्त्वे आपणांस कशी मान्य आहेत, खरोखर बहाई धर्मात वेदांतापलीकडे काहीं नाही असें दाखवून पर्ल मिकर्फो हिला आपल्याकडे पुन्हां ओढून घ्यावे असे वाटे. अनुयायी मिळवण्याचें धार्मिक दृष्टया महत्त्व किती आहे हे स्वामी ब्रह्मगिरींस यावेळेस जसें पटले असेल तसे केव्हांहि पटलें नसेल स्वामी ब्रह्मागिरींस इंग्लंड सोडून आयर्लंडमध्यें जाऊन बसण्याचे आणखी एक कारण झाले.

मिकर्फो मंडळीस सोडून स्वतंत्रपणे स्वामी ब्रह्मगिरि राहूं लागल्यानंतर एका महाराष्ट्रीय मासिक समेलनाच्या प्रसंगीं स्वामीच्या हातांत एक पुस्तक होतें. नंदिका त्यावेळेस एडिबरोहून मुद्दाम लंडनला आली होती व स्वामींच्या हातांत एक पुस्तक पाहून तिने ते पुस्तक सहज वाचावयास मागितले आणि स्वामी ब्रह्मगिरिनीं तें पुस्तक दिलें. त्यावेळेस या पुस्तकाच्या पोटांत कांहीं आपले कागद असले तर ते आपण काढून घ्यावेत याची देखील स्वामी ब्रह्मगिरींस आठवण झाली नाहीं. त्यानीं तें पुस्तक नंदिकेस दिले. नंदिकेने तें पुस्तक घरीं नेऊन उघडून वाचावयास सुरवात केली तेव्हां तिच्या हातीं एक कागदाचा कपटा पडला त्या कागदाच्या कपटयावर खालील दोन श्लोक लिहिलेले होते.

**माझ्या हृदीं वसतसे मधु तोच सेवी**
**त्याचीच विकृति असे इतरीं सरोजीं**
**ऐसे वदे कमलदंड परंतु मूढा**
**अन्यत्र जाई मधुपान करावयातें**
**वेदांत धर्म जगतीं जन सर्व मानो**
**अंशें मतें इतर यांतुनियां विचार**
**चोरोनियां मतशरीरहि मंडवीती**
**शिष्योत्तमे त्यजि तुझा भ्रम दूर सर्व**

हे दोन श्लोक पेन्सिलीनें बरीच - खोडाखोड करून त्या कागदावर लिहिलेले होते आणि त्या खोडाखोडीवरून ती त्या श्लोकलेखनाची पहिलीच आवृत्ति आहे हे स्पष्ट दिसत होते. हे श्लोक त्या पुस्तकांतच राहून गेले होते. कांहीं दिवसांनंतर जेव्हां महाराष्ट्रीय मासिक समेलन

झालें त्यावेळेस नंदिका त्या संमेलनाला हजर नव्हती पण ब्रह्मगिरी हजर होते. त्यावेळेस काय-द्याच्या एका तरुण विद्यार्थ्यानें नंदिकेनें स्वामींस परत देण्यासाठीं ठेऊन दिलेलें पुस्तक दिलें पण त्याच समारंभांत एक कविता वाचून दाखविली, आणि ती कविता नंदिकाबाईची आहे असें तेथें सांगण्यांत आलें.

**शिष्योत्तमे तव असे स्पृहणीय भाग्य।**

असा त्या कवितेचा मथाळा होता. ते श्लोक येणेंप्रमाणें होते.

**संन्यासधर्म अपुला म्हणवी सदा जो**
**काषायवस्त्र परिधान करी विरागी**
**ऐसें असोन गुरु शोक करी वियोगें**
**शिष्योत्तमे तव असे स्पृहणीय भाग्य**
**अध्यात्म बोध करीता गुरु शांतचित्तें**
**स्त्रीशिष्यमंडळ सुखें जमवी सभोंतीं**
**हें दृश्य होय अति सुंदर चित्रकारा**
**शिष्योत्तमे तव असे स्पृहणीय भाग्य**
**शिष्या बरोबर असे तिसरें न कोणी**
**ऐसा प्रसंग असतां गुरु शुद्धचित्त**
**अध्यामवादपर केवल शब्द बोले**
**शिष्योत्तमे तव असे स्पृहणीय भाग्य**

हे श्लोक संमेलनांत वाचले तेव्हां तेथें जमलेल्या मंडळीत हशा पिकला हें सांगावयास नकोच. अमेरिकेस जाण्यापूर्वी म्हणजे १९१३।१४ साली बरीच समवयस्क मंडळी इंग्लडांत असल्यामुळें त्या मंडळीस स्वामी ब्रह्मगिरि आपल्यांतलेच वाटत होते. पण १९२० च्या सुमारास जेव्हां स्वामीजी अमेरिकेहून परत आले तेव्हां ती स्थिति नव्हती. अमेरिकेंत स्वामी असतां त्यानी शांततेच्या रक्षणांत जो भाग घेतला होता त्याचा इंग्लंडांतील पत्रांत उल्लेख आल्यामुळे इंग्लंडांतील हिंदी तरुणांस स्वामी ब्रह्मगिरी म्हणजे एक सामाजिक कार्य करणारे शिष्ट गृहस्थ या नात्यानेंच ठाऊक होते. त्यामुळे स्वामी ब्रह्मगिरि जेव्हां परत आले तेव्हां आपल्यापेक्षां जरा शिष्टपणा करणारे हे गृहस्थ आहेत म्हणून त्यांच्याकडे लंडनमधील तरुण मंडळी पहात होती, तरुण मंडळींनां कांहीं तरी व्यक्ती विरुद्ध टीका करण्यासाठीं लागतातच ती गरज स्वामी ब्रह्मगिरि पुरवीत. स्वामींचें प्रवासामुळे ज्ञान बरेंच वाढलें होते. अनेक मोठया मंडळींशीं ओळखी झाल्या होत्या व त्यांचें नांव वर्तमानपत्रांतून वारंवार येई. असला मनुष्य जर विद्यार्थ्यांनां विरुद्ध चर्चा करण्यास साधन म्हणून उपयोगी पडला नाहीं तर दुसरा कसल्या प्रकारचा मनुष्य उपयोगी पडणार? स्वामींचीं व्याख्यानें होत. स्वामींचे राजकारणावर मत विचारण्यासाठीं वर्तमान पत्रकारांचे रिपोर्टर येत पण त्या सर्व गोष्टीमुळे आपल्यांतील शिष्टपणा करणारे एक टिकोजी या दृष्टीनेच तरुण मंडळी त्यांच्याकडे पहात होती. याचकालांत आलेल्या मडळीत नंदिकेचाहि अतर्भाव करतां येईल. नंदिका जरी विद्यार्थी मंडळीतली होती तरी इतर विद्यार्थ्यांपेक्षां जरा वयाने मोठी असल्यामुळे व पूर्वीच्या ओळखीमुळें ती अधिक बरोबरीच्या नात्याने स्वामीशीं बोलि. प्रसगी स्वामीची ती थट्टाहि करीत असे. तुम्हाला अमेरिकेत शिष्यिणी कशाप्रकारच्या मिळाल्या. असले प्रश्न विचारण्यास देखील ती डरत नसे. आपल्यामध्ये स्वामीची थट्टा करण्य मध्ये देखील पुढाकार घेणारी एक विद्यार्थीनीं आहे हे पाहून विद्यार्थी मडळींनां देखील मोठा हुरुप येई. नंदिका ही विद्यार्थ्यांमध्ये बरचि लोकप्रिय होण्यास तिचा थट्टा करण्याचा गुण उपयोगी पडे.

असो शिष्योत्तमेच्या भाग्यावर कविता वाचली गेल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं लडन सोडून आयर्लंडमध्ये स्वामी ब्रह्मगिरी गेले आणि तेथील राजकारणी मंडळींत त्यांची ओळख झाली पण आयर्लंडमध्ये जाण्याचा एक इष्ट परिणामहि झाला थंड हवा आणि कर्तृत्व यांची जी सांगड स्वामीनीं आपल्या मनांत घातली होती तीविषयीं त्यांच्या मनांत संशय उत्पन्न झाला. आयर्लंडमधले लोक

थड हवेंत रहात असून देखील त्यांच्यामध्यें कार्य करण्यासबंधी उत्साह कसा उत्पन्न होत नाहीं असा त्यानां प्रश्न उत्पन्न झाला आणि त्या प्रश्नाचे उत्तर त्यांनीं आपल्या मनाशीं असे दिले कीं, ज्या लोकांनां आपल्या स्थितीबद्दल दोष दुसऱ्या कोणाला द्यावयाची सोय आहे त्यांची प्रगति कधींच व्हावयाची नाही. आयर्लंडला होमरूल पाहिजे असे त्याचे मत होते कारण प्रत्येक राष्ट्रास होमरुल पाहिजे असे त्यांचे मत होते. आयर्लंडची स्थिती पाहून त्यांस असे वाटले कीं, आपल्या हाती कांही नाहीं म्हणून जे नैराश्य उत्पन्न होते ते नैराश्य लोकांनां आळशी बनवितें. हिंदुस्थानच्या लोकांचे हे नैराश्य जर काढून टाकलें तर त्याच्यामध्ये अधिक कार्यकर्तृत्व उत्पन्न होईल यांत शंका नाही. आणि यासाठी आपण त्यास आशावादी बनविले पाहिजे.

आशावादी आपण व्हावयाचे आणि हिंदुस्थानाला आशावादी करावयाचे ही गोष्ट सोपी आहे काय? असा विचार स्वामीच्या मनांत आला आणि स्वामी त्याच्यावर विचार करू लागले. "खिस्ती संप्रदायाचा प्रसार जगभर झाला अनेक लोक खिस्ताच्या उपदेशास चिकटून आहेत याचे कारण तरी काय? आशा, आशा, दुसरें कांही नाही. जगांत जे लोक गांजले असतील त्यांचे अनुयायित्व मिळाविण्यास त्यांनां आशा उत्पन्न करणे आणि त्या आशेचे पूरक आपण आहोत म्हणून जाहीर करणे हा एकच उपाय आहे. येशूख्रिस्त लोकांनां ईश्वराचे राज्य आणून देणार होता, पण यहुदी लोकांमध्ये त्याला जो जोराचा पाठिंबा मिळाला होता त्याचे कारण काय? केवळ परलोकाची आशा हे खास नाहीं. लोकांनां त्यांची इहलोकची कष्टमय स्थिति नाहींशी होईल म्हणून आश्वासन पाहिजे. तसलें आश्वासन देणें आज आपणास शक्य आहे काय? जो देईल तो अनुयायी मिळवील महात्मा गांधींनी लोकांमध्यें प्रेरणा करण्याची निदान अनुयायी मिळविण्याची गुरुकिल्ली ओळखली आहे आणि एका वर्षात आपण स्वराज्य देतो अशी लोणकढी दिली. महात्मा गांधींनीं लोकांनां थाप दिली त्याच्याबद्दल आपण त्यांस दोष देऊ काय? खास नाहीं एखाद्या डॉक्टरने तूं दोन दिवसांत बरा होशील म्हणून आश्वासन देणे आपण गैर समजू काय? अर्थात नाहीं. तर समाजाच्या व्यंगाचा जो डॉक्टर आहे किंवा होऊ पहातो त्याने समाजास असे खोटे आश्वासन द्यावयास काय हरकत आहे? गांधींनी समाजाला वर्ष दीड वर्ष झुलवून त्यांच्यामध्ये कांहीतरी आशेची भावना उत्पन्न केली तर त्यास आपण गैर कां म्हणावे? आतां आपलें कर्तव्य एवढेच आहे कीं, महात्मा गांधींनीं समाजास खोटे आणि अप्रज्ञतेचे उपाय सांगून आशा उत्पन्न केली ती आशा आपण अधिक प्रज्ञतेचा उपाय वापरून वृद्धिंगत केली पाहिजे. वैदूच्या खोट्या औषधानी आशा उत्पन्न होऊन रोगी जिवत राहिला तर वैदूने रोग्याचा जीव कांहीतरी दिवस ठेवण्याचे काम केले म्हणून खऱ्या डॉक्टरने देखील त्या वैदूचे आभार मानले पाहिजेत पण त्याबरोबर त्या वैदूला हांकलून योग्य निदान व चिकित्सा म्हणजे औषधियोजना अधिक प्रज्ञ मनुष्यानें केली पाहिजे. समाजाचे भवितव्य चागलें आहे ही लोकांना भावना ठेवलीच पाहिजे, आणि जो उन्नतीचा खडतर मार्ग आहे त्या मार्गानें लोकांनीं जावें यासाठी त्यांचे मन वळविले पाहिजे. गांधी हा केवळ वैदू आहे समाजशास्त्रज्ञ नव्हे किंवा राजकारणांतील प्रज्ञ मनुष्य नव्हे. मांत्रिक, ज्याप्रमाणे सोपेसे मंत्र सांगून रोग बरे करण्याचे ढोंग करतो आणि शेवटी तुमचा माझ्या मंत्रावर विश्वास नाही म्हणून रोग्यालाच दोष देऊन आपण चालता होतो त्या थोतांडी मांत्रिकापेक्षां या महात्म्याची किंमत जास्त काय आहे?

या प्रश्नाला स्वामी ब्रह्मगिरींनीं नाहीं असेंच उत्तर दिलें, पण पुढें ते आपल्याशीं म्हणूं लागले कीं आपण गांधींस दोष देऊन आपण आपला औषधोपाय तरी कोणता सांगणार आहांत. त्या प्रश्नाला देखील स्वामी ब्रह्मगिरींनीं आपल्याशीच उत्तर दिलें. तें उत्तर म्हणजे ब्रह्मगिरींचे जे विशेष सिद्धांत होते तेच होत. त्याच सिद्धांतानीं त्यांस आशावादीपणा उत्पन्न झाला. ते आपल्या आशावादित्वाची मीमांसा करूं लागले.

आपणांस आशावाद उत्पन्न होण्याचे मुख्य कारण असे आहे कीं, एकमेकांचे हित एकमेकांवर अवलंबून आहे ही आपली खात्री झाली आहे. आणि हिंदुस्थानला लुबाडण्यांत इंग्लंडचा फायदा नाहीं हे तत्त्व इंग्लंडमध्यें पसरवून देतां येण्याजोगे आहे.

सर्व जगाचा अन्योन्याश्रय मला समजला. जेव्हां हिंदुस्थानामध्ये एखादी सुधारणा होऊन शेतकीचे उत्पादन किंवा अर्धेमुर्धे पक्क्यामालाचे उत्पादन वाढूं लागेल तेव्हां त्याबरोबर तो माल स्वस्त होईल आणि यामुळे हिंदुस्थानांत जी सुधारणा होईल तीमुळें बाहेरच्या जगाचा म्हणजे अधिक सुसंस्कृत जगाचा फायदाच होणार आहे. त्यामुळे हिंदुस्थानच्या औद्योगिक विकासाला सुधारलेलें जग प्रतिकूल असणारच नाहीं. जमिनींतून निघणाऱ्या कच्च्या मालाचीं त्याच्या मनुष्यास उपयोगी पडणाऱ्या वस्तु तयार होण्यापूर्वी जी अनेक रूपांतरे व त्यांवर क्रिया होतात तीं रूपातरे व त्या क्रिया इतक्या आहेत की, वस्तुनिष्पादनाच्या मधल्या अनेक पायऱ्या जर हिंदुस्थानाने आक्रमण केल्या तर पुढच्या पायऱ्या आक्रमण करणे जगाच्या अधिक प्रगत भागास सोपेच जाईल. हिंदुस्थानची जसजशी सुधारणा होऊ लागेल तसतसें हिंदुस्थान बाहेरच्या मालाचे गिऱ्हाईक होऊं लागेल, व त्यामुळे देखील इंग्लडसारख्या देशांचा फायदाच होईल. म्हणजे इंग्लड हिंदुस्थानच्या प्रगतीविरुद्ध असणेंच शक्य नाहीं. ही जी आपली खात्री पटत चालली तीच आपल्या आशावादास कारण झाली. आपणांस जो निरोप सांगावयाचा होता तो एवढाच कीं हिंदुस्थाना, जग तुझ्याविरुद्ध असणे शक्यच नाही, तर उगाच नैराश्यवादांत आपले मन ठेऊन हतबाल होऊं नकोस. हिंदुस्थानी मंडळीमध्ये जी स्वातंत्र्याची आवड उत्पन्न होत चालली आहे ती देखील पुरी करणें इंग्लडला क्रमप्राप्तच आहे. एकाएकी स्वराज्य मिळत नाहीं ही गोष्ट देखील नुकसानीची नाही. हिंदुस्थानी लोकांना इंग्लडसारख्या बलाढ्य राष्ट्राची कायमची मैत्री हितावहच होणार; आणि संयुक्त साम्राज्याचे एकंदर प्रश्न इतके गुतागुतीचे आहेत कीं हिंदुस्थानचे बरेचसे प्रश्न हिंदुस्थानी लोकांनींच सोडवून आपल्या देशाची सुसंपन्नता वाढवावी हे देखील इंग्लडला फायद्याचेच होईल, राष्ट्रक्षणाची जोखीम अंगावर घेण्याचे कांहीं अंशी काम राष्ट्रावरच पडणार तर तें कांहीं अंशी सर्व साम्राज्यावर पडणार. सर्व साम्राज्याच्या सरक्षणासाठीं साम्राज्यांतील राष्ट्रसघाचा एकत्वाने झालेला प्रयत्न हिंदुस्थानास खास नुकसानकारक नाही. आणि ज्याअर्थी बरीच वर्षे हिंदुस्थान हा कच्चा माल पुरविणारा देश राहणार त्याअर्थी हिंदुस्थान व इग्लंड याचे व्यापारविषयक सहकार्य दोघांच्याहि हिताचे होईल. अर्थात, आपणास इंग्लंडला बुडविण्याची चळवळ नको आहे तर दोघांचे सहकार्य एकमेकांस कसे जास्त किफायतशीर करतां येईल याची खटपट हवी आहे. आपला सर्व प्रकारे विकास होत जावा व तो एकसारखा होत जावा यासाठीं जे आपणांस स्वास्थ्य पाहिजे ते इंग्लडसारख्या बलाढ्य राष्ट्राच्या तब्यांत कांही दिवस सरक्षणाची सूत्रे असल्यानेच होईल. एकंदरीत आपणांस निराश होण्याचे कांहीं एक कारण नाही.

स्वामी ब्रह्मगिरींच्या मनांत वरील विचार आले आणि त्यांनीं ते इतरांस कळविण्यास प्रयत्न केला आणि इंग्लंडाला परत येऊन ते तेथें या विचाराचा प्रासर करीत एक दोन वर्षें राहिले. पण या विचाराचा फारसा प्रसार झाला नाहीं. पण ते २३-२४ साल होते. तरुणमडळीच्या मनांत इंग्लंड विषयीं प्रेम नव्हतें, आणि खादीनें स्वराज्य मिळेल असल्या खुळापासून तरुण मुक्त झाले नव्हते. हिंदुस्थानांतील ज्या तरुणांमध्यें पुढे स्वामी ब्रह्मगिरी हे विचार मांडूं लागले होते त्या तरुणांतच कांहींनीं स्वामी ब्रह्मगिरी हे सरकारचे हेर आहेत अशी बातमी पसरविण्यास सुरवात केली; तर कांहींनीं आपण काहीं एक करण्याचें कारण नाहीं, आपणांस लागणाऱ्या सर्व गोष्टी इंग्लंड करणारच आहे अशा तऱ्हेचे विचार बोलून आपले औदासिन्य दाखविले. तेव्हा आतां आपणांस जे कांहीं सांगावयाचें आहे ते आपण हिंदुस्थानांत जाऊन तेथील लोकांपुढे मांडूं हा विचार करून स्वामींनी हिंदुस्थानात जाण्यासाठीं मुबईचें तिकिट काढले.

---

## प्रकरण ३८ वें.

## आशावादी कीं प्रवाहपतित.

इंग्लंड सोडून हिंदुस्थानांत आल्यानंतर जे तीन महिने झाले त्या तीन महिन्यांतील आपल्या आयुष्यक्रमाविषयीं देवीदासपंत विचार करूं लागले आणि ते म्हणाले की, इंग्लंड आणि अमेरिका येथे जे आपण निरनिराळे अनुभव घेतले ते घेतांना हिंदुस्थानांत कार्य करण्यासाठी ही आपली पूर्व तयारी आहे असें म्हणून दिवस घालवीत होतों, व या समजुतीवर आपण अनेक वर्षें जो विदेशनिवास केला त्याचे समर्थन करीत आलों आहो, पण एकंदर विचार करतांना आपण केवळ कोणत्याहि कार्यासाठीं वीस वर्षें तयारी करीत राहिलो नसून केवळ प्रवाहपतित होतों हेंच खरें नव्हे काय? आपण आपल्या मनाची समजूत करून घेतली होती कीं, कांहीं निश्चित कार्यासाठीं आपली त्या अनुभवामुळें तयारीच हात आहे पण आपला अनुभव तरी काय आहे? यूरोपियन समाजांतील निरनिराळ्या वर्गाच्या मनोरचनेची आपणांस माहिती झाली आहे, व त्यावरून तेथील लोकांची व आपल्याकडील लोकांची मने भिन्न नाहीत ही आपणांस जाणीव झाली आहे. पण त्या जाणीवीने विशिष्ट कार्य असें कोणते साधणार आहे. मी स्वतःला एक प्रश्न विचारतों तो हा की आफ्रिकेहून इंग्लंडला मी कोणत्या हेतूने गेलो? कांहीं तरी मोठें कार्य करण्यास लायक होऊन लोकांच्या श्रद्धेचा आणि विश्वासाचा सदुपयोग करतां यावा याच हेतूने ना. पण आपण तिकडेच रंगलों नाहीं काय? आपण आतांपर्यंत विदेशीं वर्षें घालविलीं तीं या हेतूने कीं, निरनिराळे अनुभव घेऊन आपण कांहीं तरी मोठे सामाजिक कार्य करण्यास तयार व्हावे. आपण पुष्कळ संस्था पाहिल्या निरनिराळे कारखाने, मोठमोठालीं कामें हीं पाहिलीं आणि निरनिराळ्या प्रकारचे आयुष्यक्रमहि पाहिले; व त्यामुळे अनेक गोष्टी कराव्यात असे वाटूं लागले, आणि ज्या अर्थी अनेक गोष्टी करण्यास आपणांस अनेक शरीरें नाहींत त्याअर्थी आपण स्वतः कोणतेंहि काम हातीं न घेतां अनेक लोकांनां अनेक कार्ये करण्यास प्रेरणा करण्याचें काम करावें असा आपण आपल्या कर्तव्यासंबंधाने मनाशीं निर्णय केला. या हेतूनें प्रेरकाचें काम आपण स्वतःसाठीं निवडलें आणि लोकांनां कार्यप्रेरक बनविण्यासाठीं त्यांच्या मनांत जो निराशावाद परसला आहे तो घालविण्यासाठी आपण उद्युक्त व्हावे असें आपण ठरविलें. प्रत्येक मनुष्य लग्न करतो आणि त्यामुळें निश्चित धंद्यास चिकटून रहाण्यास त्याच्या लहानपणींच प्रारंभ होतो. आपला असा धंदा निश्चित

झाला होता पण बायको वारल्यानंतर लोककल्याणासाठी आपलाहि जन्म आहे आणि मोठें कार्य करण्यासाठी आपणांस अदृष्ट आज्ञा करीत आहे अशी आपण आपली समजूत करून घेतली. पण लोकांनां अनेक कार्यास प्रेरित करण्याविषयी आज कितपत विश्वास वाटतो? हिंदुस्थानातील लोकांपुढें ध्येय नाहीं. त्यांस आपले भविष्य पुढें चांगले आहे हें ठाऊक नाही म्हणून त्यास तुमचे भवितव्य चांगले आहे असे सांगितले तर चांगल्या ऐवजी विपरीत होणार नाही काय? आम्हांस कांहीच काम करावयास नको अशी भावना लोकांत उत्पन्न होणार असेच आपणांस वाटू लागले नाही काय? दैववादाची भावना उत्पन्न होऊ नये म्हणून आपण काय केले? आपण लोकांना एवढेच सांगू लागलो की, स्वार्थाचा मार्ग त्याज्य नाही. मनुष्यानें काहीं चांगलें काम केले पण ते स्वार्थासाठी केले म्हणजे ते वाईट झाले असे समजण्याची ही जी लोकांची मनोवृत्ति आहे त्या मनोवृत्तीस आपण जोरानें धक्का दिला व स्वार्थसाधनाची निंदा करणाऱ्या प्रकारच्या मनोवृत्तीस उत्पन्न करणारे गीतेसारखे ग्रंथ आहेत त्या ग्रंथावर आपण घसरलो. नागपुरातील तरुण मंडळींनां या विचारात कांही नाविन्य वाटले म्हणून ती मंडळी आपल्याकडे येऊ लागली. पण पुढे काय? लोकांना तुम्ही आपला स्वार्थ साधीत जा हेच सांगत बसण्यांत कितपत शहाणपणा आहे. आणि गीतेविरुद्ध ओरडण्यात तरी कितपत शहाणपणा होता? गीतेतील विचारच कितीं पसरला आहे? गीतेतील उपदेशाचा फारसा परिणामच होत नसेल तर आपल्या गीतेविरुद्ध व्याख्यानाचा उपयोग काय झाला, किंवा होणार? ज्या मानानें लोक स्वार्थ सोडून देत असतील त्या मानानें काय ती आपल्या उपदेशाची किंमत आहे. पण गीतेतील विचाराच्या योगानें लोकांची आयुष्येच चालत नाहीत तर त्या उपदेशाविरुद्ध जे मी बोललो त्याची तरी किंमत काय? मी गीतेविरुद्ध बोलल्यानंतर काही नाविन्यप्रिय लोकांनां माझे म्हणणे रुचलेहि असेल पण तीच गोष्ट जर मी अनेक वेळां बोलू लागलो तर माझी लोकांनां पिरपिर वाटेल या पलीकडे काहीं नाहीं.



आपण येथें आल्यापासून आपण काय संपादिले. आपण एक स्वतंत्र विचार करणारे साधु आहोत म्हणून आपली ख्याति करून घेतली. पण त्या ख्यातींत तरी अर्थ काय आहे. जे विचार संन्याशाच्या कपड्यांशीं विरुद्धगुणन्यासामुळें मौजेचे वाटतात तेच विचार साध्या कपड्यांतला मनुष्य बोलू लागला तर त्याचे स्वारस्य नाहिसें होते. मी गीतेवर जे विचार व्यक्त केले ते संन्यासी नसतांनां व्यक्त केले असते तर लोकांना कदाचित् त्यांचे कांहीच वाटले नसते. तर माझ्या विचारप्रसाराला साधन जे संन्याशाचे कपडे होते ते मी जाळून बसलो हे बरे केले काय? संन्याशाच्या कपड्यांची जोड प्रतिग्रहकारितावाद्यांस त्यांचे तुणतुणे गाण्यास पाहिजे होती, आणि महात्माजींचे जूं टाकून स्वतंत्रपणे वर्गणी मिळवून स्वतंत्र होण्यासाठी येथील वकिलांस एक छाटीवाला हवा होता. जर राजकीय क्षेत्रात काम करणाऱ्यांस छाटी हवी होती, तर लोकांच्या मानसिक वृत्तीतच फेरफार करण्याचे काम अंगावर घेणारास छाटीची जरूर नव्हती काय?

आपण इंग्लंड सोडून येथे आलो ते कार्य करण्यासाठी आलो, आणि कार्ये पुष्कळ करावींत असे वाटल्यामुळें आपण कोणत्याच कार्याकडे न गुंतता केवळ विचारप्रवर्तनाच्या मार्गात शिरावे असे वाटले आणि आशावादाच्या प्रसारास आपण महत्त्व दिले. आपल्या मनांत जी खळबळ उत्पन्न होऊन तात्पुरता निराशावाद उत्पन्न झाला तसला निराशावाद देशभर असेल अशा कल्पनेनें आपण आशावाद पसरविणें हेंच कार्य मुख्य समजलो लोकात आशावाद पसरवावा असे आपणांस वाटले. पण जर कार्यकर्तेच

देशात नसले तर आशावादाचा तरी उपयोग काय? तो लोकांस उलट निष्कर्तव्य बनवील. कर्तृत्वाचे अनेक मार्ग आपणास दिसत असेल व आपण ते सांगत बसलो तरी देखील फायदा नाहीं "कल्पना सांगणे सोपें आहे आणि करून दाखविणे कठीण आहे" असेच लोक म्हणणार व कार्य कोणीच करणार नाही. आपल्या मनांत अनेक कामें करवून घ्यावयाची होतीं. समाजांतील प्रत्येक व्यक्तीस महत्त्वाकांक्षा उत्पन्न व्हावी लोकांनी आपला आळस टाकून देऊन उद्योगाला लागावें, निरनिराळी धाडसाचीं कामे अंगावर घ्यावींत. समाजांतील सर्व प्रकारच्या अडचणी दूर करण्यास लोकांनी लागावे. लोकांत संघशक्ति वाढ, ण्यासाठीं निरनिराळे प्रयत्न करणारे उत्पन्न व्हावेत, यासाठीं प्रेरकाचे कार्य आपण करावें हा आपला हेतु होता. पण येथे आल्यावर काय दिसलें? समाजांतील इंग्रजी शिकलेला वर्ग सरकारी नोकऱ्या करीत आहे आणि जे कर्तृत्वाने फारच कमी योग्यतेचे लोक आहेत किंवा ज्यास कोणतीहि गोष्ट नेटाने करावयास नको तेच लोक काय ते करमणुकीसाठीं कांहीं नवीन निघते काय हें पहाण्यासाठीं आपल्या भोंवतीं जमत आहेत. जर आपण लोकांकडूनच काहीं तरी कार्य करविलें तरच आपल्या हेतूची पूर्ती होईल असे आपणांस वाटले. लोकांमध्ये आत्मविश्वास व मोठया कार्याविषयीं प्रेरणा व्हावी आणि अनेकानी आपापल्या परीनें लोकसुधारणेंचीं कामे घ्यावीत म्हणून त्यांच्यामध्यें आशा उत्पन्न करावी म्हणून केवळ त्या प्रयत्नाकडे लागलों. आपली अपेक्षा काय तर लोकांमध्ये आशा उत्पन्न झाली तर त्या प्रयत्नाकडे लोक वळतील. पण तसे होत नाहींसें दिसतें. कार्याकडे प्रवृत्ति व्हावयास केवळ आशावादच पुरा होत नाहीं. अनेक कामे जाणणारे लोक एकत्र व्हावे लागतात आणि त्या सर्वांच्या कार्यकर्तृत्वावर विश्वास उत्पन्न व्हावा लागतो केवळ आशा उत्पन्न झाली म्हणजे कार्यकर्तृत्व उत्पन्न होत नाहीं. आपण कोणत्याहि विशिष्ट व्यवसायात न गुंतता केवळ विचारप्रसाराच्या कामात आपण लक्ष कां गुंतविलें बरें? असे ठरविण्याचे प्रयोजन एवढेच कीं आपणांस ज्या अनेक गोष्टी कराव्याशा वाटत होत्या त्या सर्वच गोष्टींचें कार्यकर्तृत्व आपणांस करतां येणार नाहीं हे होतें. तथापि केवळ आशावाद प्रसृत करणे आणि ज्या अनेक गोष्टी आपणांस कराव्याशा वाटतात त्या गोष्टीच्या कल्पना लोकांस देणे, आपणांस कांहींतरी नवीन करायला पाहिजे म्हणून नवीन काम मागणारा मनुष्य पुढे आला म्हणजे एखादी गोष्ट घेऊन तिची योजना लोकांस करून देणें इत्यादि गोष्टी आपण करूं लागलो. पण काय झाले? काही एक काम झाले नाहीं! व लोकांकडून काम करवावे अशी कल्पना घेऊन बसलो तर आपल्या मनांतल्या अनेक कल्पनापैकी कोणतीहि कल्पना पुढे सरकणार नाही. तर यासाठी अनेक क्रियास प्रवृत्ति व चालना देण्याचा विस्तृत कार्यक्रम सोडून द्यावा. आणि कांही तरी निश्चित कार्यक्रम आपण घ्यावा असा मनांत विचार आला, आणि तो विचार आल्यावर आपण पुरे व्यवहारी व्हावे सन्यासीपणाचे ढोंगहि आपणांस नको असे म्हणून आपण आपली छाटी जाळून टाकली. त्याच दिवशीं डॉ. नदिकेकडून या मुलीची कांही सोय करावी म्हणून विनंति करण्यांत आली तेव्हां आपणास कोणता कार्यक्रम योग्य होईल हे भवितव्यच निश्चित करीत आहे असे वाटलें: आपले भवितव्य भोंवतालच्या परिस्थितीलाच निश्चित करूं देणे ही गोष्ट योग्य आहे असे पूर्वीच आपले मत होऊ लागले होते. आणि त्यामुळे त्या मुलीसाठीं पालक पाहूं लागल्यामुळे जी कार्यमालिका उत्पन्न होईल तीच आपल्या आयुष्याला दिशा लावील असे वाटले; पण ते गोदावरीस पसत नाहींसे दिसतें. गोदावरीचा सल्ला

व प्रोत्साहन हीं आपणास अनेक प्रसंगीं उपयोगी पडलीं आहेत. आज गोदावरी आपणास पुढील निश्चित मार्ग न सांगता आपल्या प्रवाहपतित्वाची निंदा करून निघून गेली तर तिचा हेतु काय बरें असावा?

विचार करता करतांच देवीदासपंतांस झोप लागली. दुसरा दिवस उजाडला. कापडी खुर्चीवरच रात्र काढल्यामुळे देवीदासपंतांचे अंग ताठरल्यासारखे झाले होते तरी देवीदासपंत उठले व प्रातर्विधि आणि स्नान करून नंदिकेकडे गेले. जातांना कपिलेची मूर्ति डोळ्यासमोर आली पण तशीच गोदावरीचीहि आली.

———————

## प्रकरण ३९ वें

## पद्मावती जोगीण होणार काय?

देवीदासपंत डॉ. नंदिकेकडे सकाळीं गेले तेव्हां जातांना रस्त्यांत पद्मावतीची मुलगी बाळगण्यासाठीं कपिलेला देण्यासाठीं प्रथम डॉ. नंदिकेचें मन कसें वळवावे आणि नंतर पद्मावतीचेहि मन कसें वळवावें इत्यादि विचार चालू होते.

पद्मावतीच्या मुलीला वेश्याकुलांत वाढलेल्या कपिलेस देण्याच्या बाबतींत आपलें मन जरा उशीरां किंबहुना नाखुशीनें तयार झालें आणि शेवटीं कपिलेचें तर्कशास्त्र आपणांस पुरें पटून आपण आतां तिच्या मताचे कसे बनलो याविषयीं त्याचें त्यानांच आश्चर्य वाटत होतें. तथापि आपल्या मनाची जी खात्री झाली ती खात्री प्रथम नंदिकाबाईच्या आणि नंतर पद्मावतीच्या मनांत कशी उतरवावी याची त्यांच्या मनांत थोडीशी काळजी उत्पन्न झाली होती व संभाव्य प्रश्न व त्यास उत्तरें ते मनांतल्या मनांत शोधून काढीत होते, पण ते डॉ. नंदिकाबाईच्या घरीं गेल्यावर ताबडतोब डॉ. नंदिकाबाईनें त्यास सांगितलें कीं, पद्मावती निघून गेली आहे, आतां आपणांस तिच्या मुलीला संभाळण्याचें कोण पत्करतो या चौकशीचें कारणच उरलें नाहीं आणि हें देवीदासपंतांनीं ऐकलें तेव्हां त्यांस प्रथम जरासा धक्का बसल्यासारखें झालें. ज्या कार्याकरितां आपण बराच खटाटोप केला त्या कार्याची आवश्यकता उत्पन्न झाल्यामुळे देवीदासपंतांच्या मनांत एक तऱ्हेचा हिरमोड झाला. तथापि त्यांच्या तात्विक मनांत एकदम निराळे विचार उत्पन्न झाले. ज्याप्रमाणें आपल्या मुलीची सोय कशी करावी यासंबंधानें पद्मावतीच्या पुढें जो प्रश्न उत्पन्न झाला तो प्रश्न उत्पन्न होण्यामागें अनेक सामाजिक अडचणींचें अस्तित्व होतें त्याप्रमाणें पद्मावती आमच्यासाठीं तुम्ही कांहीं सोय करू नका असें सांगून निघून जाण्याच्या मागें दुसरीं कांहीं सामाजिक व्यंगें असावीत असें देवीदासपंतांस वाटून त्यांनीं तिच्यासंबंधानें जास्त चौकशी चालविली. मुलीला कोठेंहि ठेवण्यास नेण्यांत पद्मावतीचा हेतु काय असावा, तिला तुमच्याकडे निवास गैरसोयीचा झाला काय इत्यादि प्रश्न देवीदासपंतांनीं नंदिकाबाईस विचारले. तेव्हा आपल्याला जी माहिती आहे ती सविस्तर देणें नंदिकाबाईस भाग पडलें.

"मिस् हंटर नावाच्या एका ख्रिस्ती बाईपाशीं पद्मावती जाऊन राहिली आहे. तिच्या मनांत हिंदुसमाजांत परत जावयाचें नाहीं, निदान ओळखीच्या मंडळीची भेट ज्या समाजांत होईल त्या समाजांत आपण मुळीं नसावेंच असें तिला वाटतें, इत्यादि गोष्टी डॉ. नंदिकाबाई यांनीं देवीदासबोवास समजावून दिल्या. आणि आपण पद्मावतीसाठीं जी खटपट चालविली त्या खटपटीबद्दल आपले तिनें आभार व्यक्त करण्यास मला सांगितलें आहे आणि "आपण माझ्या मुलीची सोय कोणत्या तरी हिंदु कुटुंबांत करण्याचा नाद सोडून द्या, त्यांत आपणांस यश यावयाचें नाहीं आणि आलें तरी जी मंडळी मला घरांत रहावयास घेतील त्यांच्यामध्यें जाऊन रहाण्याची

माझीच इच्छा नाही " हा आपला निरोप कळविण्यास मला सांगितले आहे."

पद्मावतीची अशी इच्छा होती कीं, आपण कोठे जात आहोत हे कोणासहि कळू नये आणि यासाठी मिस् हंटर यांच्या स्त्रियांच्या उद्योगमंदिरांत आपण जात आहोत याची बातमी कोणास न देतां एका ख्रिस्ती कानव्हेंटमध्ये आपण जात आहोत असें तिने सांगावयास सांगितले होते त्याप्रमाणे नंदिकाबाईंनी जेव्हा देवीदासपंताना सांगितले तेव्हा देवीदासपंत डॉ. नंदिकाबाईस म्हणाले कीं, " ही वेडी मुलगी आहे. ख्रिस्ती कानव्हेंटच्या कोंडवाड्यांत ही किती दिवस टिकेल? तिला हे आयुष्य कंटाळवाणेच होणार. जगाच्या एकंदर व्यवहारातून आपण पूर्णपणे बाहेर पडावें, ही इच्छा जगाचा अनुभव बराच घेतल्यानंतरच मनुष्य बोलू लागतो. जो कांहीं दु:खामुळे किंवा लज्जेमुळे एकांतवासांत पळून जातो तो तेथे अत्यंत हतभागी स्थितींत असतो. जर स्वत:ला गाडून घेण्यासाठी एखाद्या कानव्हेंटमध्ये ही मुलगी जाणार असेल, तर तिला त्या कानव्हेंटमधून सोडविणे, हे वेश्याव्यवसायातून सोडविण्याइतकेंच महत्त्वाचे आहे. स्त्रीने वेश्यागृहात असण्यापेक्षां कानव्हेंटमध्ये जप करीत रहाणे हे अधिक चांगले असे मी एवढ्याचकरता कबूल करीन की तेथे राहिल्याने उपदंशप्रमेहासारखे विकार होण्याचा संभव नाही. तथापि अशा स्त्रियानां मठवासी जोगिणी बनविणे हे मला खरोखरच चांगले वाटत नाही.

संन्यासवृत्तीशी जे कांही सदृश असेल त्याची आशावादी देवीदासपंतास अत्यंत चीड आली होती.

कानव्हेंटमध्ये रहाण्याविषयी इतके कठोरपणाचे भाषण ऐकून डॉ. नंदिकाबाईस आश्चर्यच वाटलं आणि त्या म्हणाल्या.—

"तुम्ही वेश्याव्यवसाय आणि मठवासिनींचे आयुष्य या दोहोंची एकाच मालिकेंत गणना करता काय?"

"मी दोन्ही गोष्टी अध:पातच समजतो."

"मी तुम्हांस सरळ विचारते की, तुम्ही पद्मावतीने कानव्हेंटमध्ये जाण्याविरुद्ध आहात की ती ख्रिस्ती होण्याच्या विरुद्ध आहात? तुम्ही नीतीचे प्रवक्ते आहांत, धर्मावर व्याख्यानें दिलीं आहेत, असे असून स्त्रियानी अनीतीमार्गाने जन्मभर रहावे या गोष्टीची मठवासिनी होण्याशीं तुलना करता हे पाहून मला जरा आश्चर्यच वाटते! स्त्रियांनीं प्रेमासाठी विवाहपाशाकडे लक्ष देऊ नये हे मत मी पुष्कळदां ऐकिले आहे. मला असे वाटते की जर नीतीचा बंध कधी कोणी स्त्रीने टाकून दिला तर ती गोष्ट माझ्या दृष्टीने कधीच योग्य होणार नाही. तथापि दुसऱ्याविषयी उत्पन्न झालेल्या प्रेमावेशामुळे जेव्हा स्त्री उत्पन्न झालेला बंध तोडून टाकीत असेल तेव्हा मी एवढेच म्हणेन की ती स्त्री, एक विवाह अयशस्वी झाला म्हणून दुसरा अधिक काल टिकणारा बंध स्वीकारीत आहे आणि या दृष्टीने तिचे वर्तन मी क्षम्यहि समजेन. पण केवळ शारीरिक सुखाना महत्त्व देणाऱ्या स्त्रीपेक्षा मला त्या सुखाचा त्याग करणाऱ्या स्त्रीचेच महत्त्व अधिक वाटेल."

"तुम्हास संन्यास धर्माची खरी योग्यता तुम्ही संन्यासधर्मी नसल्यामुळे अधिक वाटते. माझ्या आयुष्याची अनेक वर्षे संन्यासधर्मानेच गेली आहेत आणि यामुळे त्या धर्माचे हिताहित मी अधिक चांगल्या तऱ्हेने जाणतो. तथापि पुरुषसहवाससौख्याचा त्याग करणाऱ्या स्त्रीचे महत्त्व तुम्हास अधिक वाटते आणि त्यागाचे महत्त्व तुम्हांस वाटतच आहे त्याअर्थी विवाहित किंवा पुरुषान्वित स्थितीचे महत्त्व तुमच्या मनांत बाणले आहे हे स्पष्टच होते. व एखाद्या स्थितीच्या महत्त्वमापनास त्यागाची कसोटी लावली तिच्या ऐवजी

‘या स्थितीच्या अंगीं सुख देण्याची शक्ति किती आहे ही कसोटी लावली तर पुरुषाबरोबर रहाणे यास आपण अधिक महत्त्व देतां हे स्पष्टच होते. तिने ख्रिस्ती होण्याच्या विरुद्ध मी इतका नाहीं. मी तिने कान्व्हेंटमध्ये जाऊन मठवासिनींचा आयुष्यक्रम आचरण्याविरुद्ध आहे. का कीं ते आयुष्य म्हणजे संसारविषयक निराशेचं पर्यवसान आहे. हिंदु मुलीने ख्रिस्ती होणे म्हणजे एक समाज सोडून दुसरा समाज पसंत करणे आहे. पण मठांत जाऊन रहाणे म्हणजे सर्वच समाजाचा त्याग करणे म्हणजे निराशेच्या परमावधीला पोचणे आहे. निराशा हीच अनर्थपातकारक आहे, तर तिच्या निराशेचेच निर्मूलन झाले पाहिजे. जगाच्या निंदेच्या तीव्र स्वरूपास भिऊन जमीनींत गाडून घेण्यापेक्षां निंदकांपासून संरक्षण करून घेण्याचे धैर्य दाखविणे हे अधिक महत्त्वाचे आहे. असा धैर्याचा आयुष्यक्रम शक्य आहे काय, तर तो आहे असे मी म्हणतो. काय बरे तिचे नाव, पद्मावती आहे नाही. तर तिने जगास न भिता जगात रहावे, आपले मूल संभाळून रहावे, आणि सर्व जनतेशी धैर्याने व्यवहार ठेवावा. तिला मूल संभाळून जगात रहाणे इष्ट वाटत नसेल तर त्या मुलीची देखील काही तरी व्यवस्था आपण करू. तिला लग्न करावेसे वाटले व कोणी लग्न करण्यास तयार झाला तर तसे करावे, व तिला वाचवावे अशी बुद्धि जर मला, तिचे एकदा वाकडे पाऊल पडलें यावरून उत्पन्न झाली असली तर तिला वांचविण्याची इच्छा ती मठवासिनी होणार या कल्पनेने अधिकच तीव्र झाली आहे. मठात प्रविष्ट होणे म्हणजे जोगीण होणे ही गोष्ट मी अधिकच अनुकंपनीय समजतो. आयुष्यांत सुखाची आशा अजीबाद नष्ट झाल्यामुळे मनुष्य प्राणी एकांतवासांत आपले आयुष्य घालविण्यास प्रवृत्त होतो.’’

“तुम्ही पद्मावतीने मठवासिनी होणे ही गोष्ट केवळ निराशामूलक का समजता.’’

“हा विचार निराशामूलक समजावयाचा नाहीं तर दुसरी शक्यताच कोणती आहे. तिच्यामध्यें केवळ धार्मिक बुद्धि एकदम जागृत झाली असे समजता काय? तिला हिंदु मंडळींचे पुन्हां दर्शन नको हे कां, कारण एवढेंच कीं, हिंदुसमाज तिची कांहींहि सोडवणूक करूं शकत नाही म्हणून.’’

“तर तिने पुढे काय करावे असे तुम्ही म्हणता’’

“पद्मावतीने आपले तोंड लपवू नये. जोपर्यंत पुरुषानी फसविलेल्या स्त्रिया आपण होऊनच तोंड लपवू लागतील तोपर्यंत स्त्रियांच्या उन्नतीची आशाच नाहीं, पुरुषांनीं स्त्रियावर बळजबरी केली तर ती स्त्रियांचीच फजीती. स्त्रीला गुन्हेगार समजून स्त्रियानीच तोंड लपवीत अशी जोपर्यंत समाजात वृत्ति आहे तोपर्यंत स्त्रियांवर बळजबरी करण्यास समाज उत्तेजन देत आहे असे मी म्हणेन. पद्मावतीने एकतर तिला फसविणाऱ्या पुरुषाबरोबर लग्न करावे किंवा त्याचे चांगले पारिपत्य करावे. तिला ज्या मनुष्यापासून मूल झाले असेल त्या मनुष्याशीं तिचे लग्न लावण्याची तिची इच्छा असेल तर तसें करावयास तिला आपण मदत करावी, आणि तो मनुष्य लग्न करावयास तयार नसेल तर जो काय इलाज करावयाचा असेल तो करावा.’’

“आणि तिची त्या मनुष्याबरोबर लग्न लावावयाची इच्छाच नसेल तर–’’

“तर तिने मुलीला योग्य संरक्षकाच्या हवाली करून आपला धंदा पुढे चालवावा.’’

“पण अशा मुलीला कोण संभाळतो?’’

“मी संभाळण्याची योग्य व्यवस्था करण्याचे अंगावर घेतों पण त्या बाईची आणि माझी भेट झाली पाहिजे मी अजूनपर्यंत तिला भेटावयाची किंबहुना त्या बाईची जास्त चौकशी करण्याची तसदी घेतली नाहीं, याचे कारण जोपर्यंत मला मदत करता येईल, असा विश्वास वाटत नव्हता तोपर्यंत आपण दुसऱ्याचे गूढ उकलण्याचा कांहीं

अधिकार आहे असच वाटत नव्हते पण आता मी त्या बईला भेटू इच्छितों."

"आता तुम्हाला पद्मावतीला भेटण्याची संधि देणे माझ्या हातची गोष्ट राहिली नाहीं. पद्मावती ज्या ख्रिस्ती स्त्रीच्या संरक्षणाखालीं आहे तिलाच तुम्ही भेटले पाहिजे. आणि तिची परवानगी मिळविली पाहिजे."

------

## प्रकरण ४० वें

## ओळख.

डॉ. नंदिकाबाईनीं मिस हटर यास त्यादिवशीं दुपारीच कळविलें की ज्यांना आपण भेटू इच्छीत होता ते देवीदासपंत आपणांसच भेटावयास येऊ इच्छितात, पण पद्मावतीबाई हिरवे यानीं आपल्या आश्रयास जाऊ नये यासाठीं त्याचे मन वळवावे व प्रयत्न करवा हा त्यांचा हेतु आहे. पद्मावती कानव्हेंटमध्ये जाणार अशी त्याची समजूत आहे, व त्या समजुतीमुळे तिला कानव्हेंटमध्ये रहाण्याच्या आयुष्यक्रमापासून परावृत्त करण्याच्या हेतूने ते तिला भेटू इच्छितात. मिस हटर यानी उलट असा निरोप पाठविला की देवीदासपंत यांनी मला खुशाल येऊन भेटावे. पद्मावतीबाईची इच्छा असेल तर त्या भेटतील; मी त्यानां देवीदासपंताना भेटा म्हणून सांगणार नाही. त्याप्रमाणे भेटू नका असेंहि सांगणार नाही. डॉ. नंदिकाबाईनीं पत्र पाठविले तेव्हा त्यास मिस हटर याच्याकडून उत्तर त्याच शिपायाबरोबर आलें आणि ते उत्तर डॉ. नंदिकाबाईनीं देवीदासपंताकडे धाडल्यामुळे देवीदासपंत त्याच दिवशीं सध्याकाळी मिस हटर यांस भेटले.

मिस हटर यांनी जरी ख्रिस्ती पद्धतीचा पोषाख ठेविला होता तरी आज त्यांनीं पोषाख जरासा अधिक आकर्षक होईल असा केला होता "क्रेप द शीनचे" पातळ त्या नेसल्या होत्या आणि पातळाला जरीची किनार होती. पोषाकाच्या आकर्षकतेमुळे त्या शोभत होत्या; थोडेसें संयमित हास्य तोंडावर दिसत असल्यामुळें या जराशा खुलून दिसत होत्या.

मिस हटर यांच्याविषयीं डॉ. नंदिकाबाईनी विशेष माहिती दिली नव्हती ती त्यानीं मुद्दाम दिली नव्हती कीं विसरभोळेपणाने दिली नव्हती हे सांगता येत नाही. माहितीच्या अभावामुळे मिस हटर या कोणी तरी उग्र चेहऱ्याच्या यूरोपीअन मिशनरी बाई असतील अशी देवीदासपंतांनी कल्पना केली होती.

मिस हटर या एका प्राटेस्टंट मिशनरीच्या बंगल्यावर उतरल्या होत्या आणि त्या बंगल्यावर जेव्हा देवीदासपंत गेले तेव्हा एक उंची पोषाख केलेली नेटिव ख्रिस्ती स्त्री त्यांच्या नजरेस पडली आणि त्यावेळेस आपण हिला कोठे तरी पाहिले असावे असा भास झाला. त्यांनीं आपण कोण, कोणाकडे आलांत, असे त्या स्त्रीनें विचारलें तेव्हा देवीदासपंतांनी आपले नाव सांगितले व मिस हटर यांस भेटण्यासाठी आलो आहोत म्हणून सांगितले. तेव्हां मिस हटर हे माझेच नांव आहे म्हणून त्या स्त्रीने सांगितल्याबरोबर देवीदासपंत चपापले. पण आपला संभ्रम न दाखविता म्हणाले

"आपली परवानगी असेल तर पद्मावतीबाईस भेटू इच्छितो" तेव्हा मिसहटर यांनीं देवीदासपंतास सांगितले की, पद्मावतीबाई कोणासहि भेटण्यास नाखूश आहेत, तथापि आपला काही निरोप असेल तर तो मी त्यास आनंदाने कळवीन. देवीदासपंत जरासे अडल्यासारखे झाले आणि पुन्हा म्हणाले.

"त्यानां मी भेटावयाचं नाहीं फार तर निरोप पाठवावयाचा एवढेच मला करता येण्याजोगे असेल तर माझा निरोप एवढाच कळवा कीं, "भवितव्याविषयीं निराश होऊ नका आपले भवितव्य अंधःकारमय नाही. आपल्या मुलांची काळजी

घेण्याला लोक तयार आहेत; त्याप्रमाणेच आपल्या अपकारकर्त्यास शासन व्हावें आणि आपली नुकसानभरपाई व्हावी म्हणून प्रयत्न करण्यास देखील आपले अपरिचित मित्र तयार आहेत.''

"अपरिचित मित्र" म्हणजे काय? आपली आणि पद्मावतीबाईची प्रत्यक्ष ओळख नाहीं.''

"मुळींच नाहीं.''

"तरी आपण तिच्यासाठीं इतकी मेहनत घेतां.''

"अडचणींत जी स्त्री पडली असेल तिला साहाय्य करावे या हेतूपलीकडे दुसरें यांत काय असणार?''

"तर मग देवीदासपंत मी आपणांस विचारते की, स्त्रियांविषयीं तुम्ही इतके दाक्षिण्य दाखविता तर तुम्ही आपल्या बायकोसंबधाने इतकें दुर्लक्ष का दाखविता.''

"काय माझ्या बायको संबधाने! आणि मी दुर्लक्ष दाखवितो! माझी बायको वारल्याला मेला सतरा वर्षे झाली आणि आज मी तिच्यासंबधाने काय करावयाचे.''

"तुमची बायको वारली नाहीं.''

"असे कसे होईल. ती वारली हे मला पक्के ठाऊक आहे.''

"पण ती वारली नाहीं हे मी मानते, कारण ती आमच्या आश्रमात आहे.''

"मी कोण आहे? माझ्यासंबधाने आपली कांही गैर समजूत तर झाली नाहीं.''

"मुळींच नाहीं, आपले नांव देवीदासपंत अत्रे, आपण उमरावतीचे रहाणारे, उमरावतीला आपण आपली आई आणि थोरल्या बधूचे कुटुंब इतकी सर्व रहात होतां; आपल्या बायकोचे नांव गोदावरी आहे आणि ती खामगांवच्या एका मास्तरची मुलगी आहे.''

"तुम्हाला माहिती बरीच दिसते त्यावरून तुम्ही मला दुसरा कोणी मनुष्य समजत नाही असे वाटूं लागते पण गोदावरी जिवंत आहे असे तुम्ही निश्चयाने सांगतां पण गोदावरी वारली असें मी ऐकले!''

"तुम्ही तसे ऐकलें असलें तर तें अजीबाद खोटें होतें.''

"मग मी आल्यावर मला तुम्ही किंवा तिनें कधींहि कळविले का नाहीं—''

"आपणच तिची चौकशी इतके दिवस का केली नाहीं याबद्दल गोदावरीचा आणि तिच्या ओळखीच्या मडळीचा तुमच्यावर राग आहे आणि तुम्हीच मला दोष देतां! पण तुमची पत्नी वारली म्हणून तुम्हांस कोणी कळविलें?''

"मला गोदावरी वारली म्हणून माझ्या बधूचे पत्र आले, म्हणून आता कांही माझे उरले नाहीं असे मला वाटले आणि म्हणूनच पुढे मी सन्यास घेतला!''

"तुमचे गोदावरीवर प्रेम होते काय?''

"माझें प्रेम होतें की नाहीं हें मला सागतां येत नाही. प्रेमाच्या सस्कारांचा पूर्ण लाभ मला कधींच झाला नाही. ज्याप्रमाणे जे कांही आपले आहे असे मनाला वाटले म्हणजे त्याला जर कोणी धक्का लावला तर धक्का लावणाराचा राग येतो, त्याचप्रमाणे जे कांहीं आपले आहे ते आपल्याजवळ असावे असे वाटतें आणि त्यामुळे गोदावरीस आपण घेऊन जाण्यासाठी हिंदुस्थानांत यावे असेहि मला वाटत होते. तथापि जेव्हां मी भावाला पत्र लिहिले तेव्हां भावाचे उत्तर आले की, वडील आणि आई हीं वारली, बरावर कर्ज आहे आणि घर सावकार घेणार आहे, आणि गोदावरी वारली.''

"मग तुम्हांस काय वाटले!''

"मला वाईट तर वाटलेंच पण गोदावरी वारल्याचे तीव्र दुःख झाले नाहीं. मी गोदावरीला फारच थोडे वेळ पाहिले होतें. पण मी गोदावरीस अजीबात विसरून कधींच गेलो नाहीं. तिला मी

एकदोनदां हसताना चोरून पाहिले होते आणि त्यावेळेस तिच्या गालात खळगी पडे आणि तिचे मुख अत्यंत शोभिवंत दिसे. ते सुहास्यवदन मी कधींच विसरलो नाहीं. मी पुष्कळ लहान मुली पाहिल्या म्हणजे मला गोदावरीची आठवण होई. तिचे हास्य मला चोरून पहावे लागे. कारण हसण्यासारखी वाईट गोष्ट मुलीनें प्रत्यक्ष नवऱ्यासमोर करावी हे योग्यच नव्हते. मी घरीं आलो म्हणजे ती ओटीवरून माजघरांत जायची. आणि जेव्हा मी मुंबईला माझ्या दुसऱ्या वर्षी जाण्यासाठीं निघालों तेव्हा एकदां तिच्याशी बोलण्याचा प्रयत्नहि केला. तेव्हा ती माझ्याशी कांहीं बोलणार इतक्यात बाबा त्या खोलीत आले. तेव्हां मी तिच्या प्रत्युत्तराची वाट न पहाता खोलीच्या बाहेर पडलो. तेव्हा तिचे डोळे चटकन् अश्रुपूर्ण झाले, तेहि माझ्या दृष्टीस पडले. माझ्या गृहस्थ या नात्याने झालेल्या आयुष्यक्रमापैकीं बायकोच्या ठायी माझ्याविषयीं काही भावना असेल असा विश्वास उत्पन्न करणारा भाग तो एवढाच—"

"हा प्रसंग तुम्हांस अजून आठवतो काय? तुमच्या बायकोच्याहि लक्षात ती गोष्ट चांगलीच राहिली आहे. तिला तिच्या मैत्रिणींनी तुझ्या नवऱ्याचे तुझ्यावर प्रेम नसले पाहिजे असे जेव्हां म्हटले तेव्हां तिने देखील तुम्ही मुंबईला जाण्याच्या आधल्या दिवशी चोरून भेटावयास यायचा प्रयत्न कसा केला याची माहिती सांगितली."

"तर मग नवऱ्याचे आपल्यावर प्रेम होते याची तिला जाणीव आहे? तिने आणखी कांही सांगितले काय?"

"तुम्ही तिला वाचण्यासाठीं मुंबईहून कांहीं गोष्टीचीं पुस्तके पाठविलीं होती हेहि तिनें सांगितले."

"तर मग तुम्हांस माझ्या बायकोची माहिती चांगलीच असावी असे दिसतें. आतां गोदावरी जिवंत आहे असे तुम्ही सांगता त्या बोलण्यावर माझा विश्वास बसतो, चला तर तुमच्या आश्रमाकडेसच जाऊ तिची आणि माझी भेट करवा. तुमचा आश्रम कोठे नागपुरांतच आहे काय?"

"तुम्हांस अगोदर काम कोणते करावयाचें? पश्चात्तापसंबंधाचे कीं आपली बायको परत मिळविण्याचें? तुम्ही म्हणतां की गोदावरीला भेटायचे पण गोदावरीच तुम्हांस भेटूं इच्छीत नसेल तर?"

"भेटू इच्छीत नसली तरी तिने आपल्या इच्छेविरुद्ध पण एकदा भेटावे असें मी म्हणेन."

"गोदावरीला कांही गोष्टी अगोदर सांगितल्या पाहिजेत. बरे, तर मग तुम्ही सन्यास केव्हा घेतला—गोदावरी वारल्याचे तुम्हास कळले त्यावेळेस तुम्हास काहीच वाटले नाही काय?"

"असे कसे होईल—अमुक एक स्त्री आपली आहे, आपल्याविषयीं तिच्या मनात प्रेमभावना उत्पन्न झाली असणें शक्य आहे अशी कल्पना झाली असली म्हणजे तिच्या बरेवाईटाची बातमी कळल्यानंतर दुःख झाल्याशिवाय कसे राहील?"

'तर मग तुम्ही बायको वारली या समजुतीनेच सन्यास घेतला!"

"बायको वारली म्हणून मी सन्यास घेतला असे नाही—मला भवितव्याची आज्ञा झाली म्हणून मी सन्यास घेतला. आईबाप व बायको यांच्या मृत्यूच्या बातमीने माझे भवितव्य काय याची मला स्पष्ट कल्पना आली. मला भवितव्य आपले कार्य करण्यासाठी आज्ञा करीत होते आणि मी आफ्रिकेत असता तीन वर्षांनी थोडाबहुत द्रव्यसंचय करून जमीन विकत घेण्याच्या व बायकोला आणण्याची खटपट करण्याच्या विचारांत होतो.व ज्या दिवशी माझे आणि माझ्या मालकाचे भांडण झाले त्याच दिवशी मी स्वतःचा मळा करावा या कल्पनेंत होतों व आपण आणखी जग पहावे ही माझ्या इच्छा देखील

मनांत होती. पण ती तीव्र नव्हती. द्रव्य खर्च करण्यापेक्षां संसारसुखाच्या अपेक्षेने मी द्रव्य-संचय करीत होतो. मळ्यावर काम करणारे यूरोपीयन लोक आहेत त्यांच्या तोलाचे गृह आपण थाटावे ही इच्छा मनांत होती. संध्याकाळी मी मालकाच्या मळ्यावरून भांडण करून घरी येत होतो व बायकोला बोलावण्याचें व स्वतंत्र आयुष्यक्रम आचरण्याचे मनोराज्य करीत होतो तों काळोखात कोणी विकट हास्य करीत आहे असा मला भास झाला. आणि घरी येऊन पहातो तो घरची उध्वस्त स्थिति सांगणारे भावाचे पत्र, तर माझी नोकरी जाणं स्वतंत्रपणे शेती करण्याचा विचार केला असता विकट हास्य ऐकू येणे, आणि नंतर मला पाठीमागे कांही पाश उरले नाहीत म्हणून बातमी सांगणारे पत्र येणे हे सारे अदृष्ट भवितव्याचे खेळ आहेत आणि मला माझ्या आयुष्याचे खरे कर्तव्य कळण्यासाठी या गोष्टी झाल्या आहेत असे वाटू लागले. बायको वारल्याची बातमी वाचलीच होती तेव्हां मनांत एक विचार आला आणि तो हा की आपण आईबापांस सुख होईल अशा कांही गोष्टी केल्या, पण बायकोस सुख होईल अशा गोष्टी करण्याची संधीच आपल्याला मिळाली नाही. त्यादिवशीं मन वेडयासारखे झाले होते. त्याच रात्री गीताहि वाचली.

**देहिनोऽस्मिन् तथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥**

हाच श्लोक गीता उघडतांच दृष्टीस पडला आणि तो माझ्या आयुष्याला दिशा लावण्यासाठीच सांगितला जात आहे असे मला वाटू लागले. अदृष्ट कांही मला आदेश करीत आहे. पण तो आदेश कांही स्पष्ट शद्बांनी होत नाही असे वाटू लागले. पण त्याच वेळी मला प्लांचेट घेऊन मृतात्म्यास बोलविण्याचा नाद होता, तेव्हां मी आईला व बाबानां आव्हान केले. तसेच गोदावरीलाहि आव्हान केले. आई बाबा फारसे बोलले नाहीत. तूं सुखी आहेस ना ! एवढेंच त्यानीं विचारले. पण गोदावरीचें आणि माझे संभाषण मात्र बरेच झाले."

"तुम्ही मृतात्म्याशीं संभाषण करूं शकतां !"

"असे वाटतें."

"पण आपली पत्नी जर जिवंत आहे तर तिच्या आत्म्यास आपण कसे बोलावूं शकतां? तुमचे संभाषण कसे झालें?"

"कसा शकतों हे मला सांगतां येत नाही. गोदावरी मला भेटली होती हे खरें?"

"गोदावरी आफ्रिकेंत तुम्हास भेटली!"

"होय?"

"तुमचे आणि तिचे संभाषण झालें?"

"होय."

"आणि ते काय झाले?"

"ती म्हणाली मी खुशाल आहे. मी तुम्हांस कल्पना नाही अशा परिस्थितीत आहे. अत्यंत उच्च प्रकारच्या आत्म्याशी माझी ओळख झाली आहे. जे कार्य करण्याचे तुम्ही मनात योजलें आहे. ते तुम्ही करा. त्याच्या योगानेंच तुम्हांस शांति मिळेल. सुखें किंवा दु:खें यांविषयीं जेथे विचार नाहीं अशा ठिकाणीं मी आहे. तुमची व माझी पुन्हा भेट होईल. तेव्हा आपण मृत्युलोकांतील अनेक अज्ञानमूलक गोष्टींसंबंधानें बोलू. दु:ख पापमूलक आहे, पाप अज्ञानमूलक आहे अशी आमची या लोकात समजूत आहे म्हणजे गोदावरीनेच सन्यास घेण्यास व इतर लोकीं संचार करण्यास सूचना केली."

"या एकंदर भाषणावरून आपणास गोदावरी जिवंत आहे या गोष्टीचे आश्चर्य किंवा अविश्वसनीयता वाटत नाहीं काय?"

"मला आश्चर्य तर वाटतेच, कां की, ज्याअर्थी मी गोदावरीशीं संभाषण करीत होतो त्याअर्थी मला असे वाटत होते की, गोदावरी खरोखरच इहलोक

सोडून गेली आहे. आणि आपण म्हणतां त्याबद्दल मीं अविश्वास प्रथम दाखविला याचें कारण एवढेंच."

"गोदावरी तुम्हांस पुन्हां कधीं भेटली नाहीं काय?"

"ती वारंवार भेटत असे आणि मी अनेक ठिकाणीं संचार करीत असतां मला मोहाचे अनेक प्रसंग आले, त्या सर्व मोहान्या प्रसंगांपासून तिने स्वत: येऊन माझें संरक्षण केलेलें आहे."

"गोदावरी ही जिवंत आहे हे मी तुम्हांस सागते तर तिचा आत्मा आम्हांस भेटतो हा तुम्हांस केवळ संभ्रम झालेला आहे."

"तसेहि झाले असेल;कधीं कधीं एकास आह्वान केलें असतां दुसरेच कित्येक चावट मृतात्मे येऊन जातात असाहि अनुभव आहे."

"मला आपण एकेक गोष्ट सांगतां त्याचे आश्चर्यच वाटते."

"माझी बायको जिवंत आहे, तर ती वारली असें माझ्या बंधूंनीं कसें लिहिले? आणि तुमच्याकडे गोदावरी कशी आली?"

"आमचें मिशन कशासाठीं आहे हे ठाऊक आहे ना? ज्या स्त्रिया वाईट मार्गाला लागल्यामुळे समाजाकडून टाकल्या जातात त्याना आश्रय देण्यासाठीं आहे."

"मग?"

"ज्या गोदावरीला तुम्ही स्वत:ला मोहापासून परावृत्त करणारी आणि चांगला मार्ग दाखविणारी समजतां ज्या गोदावरीची वागणूक वाईट आहे म्हणून तुमच्या बधूनीं गोदावरीस घरातून घालवून दिलें, आणि अशा प्रसंगीं तिची आणि मिसेस हंटरची आगगाडींत गांठ पडली आणि तेव्हांपासून ती आमच्या आश्रमांत येऊन दाखल झाली आहे."

"गोदावरी ख्रिस्ती झाली आहे काय?"

"गोदावरी ख्रिस्ती झाली आहे. तिनें बाप्तिस्मा घेतला आहे."

"तिचें सध्याचें वर्तन कसें आहे?"

"हे तुम्ही कां विचारतां? तुम्हांला तिच्या वर्तनासंबंधानें चौकशी करण्याचा अधिकार काय आहे? ती ख्रिस्ती आहे, तुम्ही हिंदु आहांत तुमचा आणि तिचा सबंध काय उरला आहे. आणि तुमचा आणि तिचा सबंधच जर कांही नाहीं तर तुम्हांस तिच्या वर्तनासंबंधाने चौकशी करण्याचा अधिकार व नाहीं."

"तिचा व माझा सबंध काय उरला आहे हा प्रश्न बरोबर नाहीं, ती माझी बायको आहे. तथापि जर तुम्ही एवढेच म्हणत असला की, मला तिच्या वर्तनासबधीं चौकशी करण्याचाच अधिकार नाहीं तर तेंहि बरोबर होईल. जो मनुष्य आपल्या बायकोला टाकून देतो तोच तिला दुर्वर्तनाच्या रस्त्यावर सोडून देतो. ज्या नवऱ्याने पत्नीचें सरक्षण करण्याचें कर्तव्य केले नाहीं त्याअर्थी त्याला चौकशी करण्याचा अधिकारच नाहीं. तथापि इतकें असूनहि ती जिवत असेल तर ती माझ्यापाशी असावी असे मला वाटतें. माझ्या हृदयांतले सुखाशातंतू मेले नसून ते केवळ सुकून गेले आहेत, व ते आशेच्याच जीवनाने पुन्हा जिवंत होतील अशी भावना माझ्या हृदयांत स्फुरण पावू लागली आहे."

"पण याचा आज उपयोग काय? तुम्ही हिंदु आहात आणि ती ख्रिस्ती आहे. व ती अशी तशी ख्रिस्ती नाही. तर ती ख्रिस्ताच्या उपदेशापासून प्रेरणा पावणारी आहे. ख्रिस्ताचीं वचनें ती मोठ्या प्रेमानें वाचीत असते."

"तर मग तिची मजकडे येण्याची इच्छा नाहीं असे आपणांस वाटते काय? आपणांस जरी वाटत असलें तरी तेवढयानें मी चूप होईन असें नाहीं. मी तिची प्रत्यक्ष गांठ घेऊन तिला विचारीन कीं गोदावरी, तुला देवीदासाकडे परत यावयाचे आहे काय? तो तुला बोलावीत आहे—"

"तर मग काय, आपण ख्रिस्ती होणार?"

"मुळींच नाहीं!"

"गोदावरी कांहीं ख्रिस्तास सोडून द्यावयास तयार होईल असें वाटत नाही. आणि तुम्ही ख्रिस्त स्वीकारावयास तयार नाहीं तर तिनें तुमच्यापाशीं कां यावें?"

"ही सर्व चौकशी आज कशास पाहिजे. अगोदर गोदावरीचीच परत यावयाची इच्छा आहे हें आपणांस कोठे ठाऊक आहे. ते जर ठाऊक असेल तर हा मधला विचाराचा खड्डा कसा भरून काढावा याविषयीं विचार करतां येईल."

"बरें, पण गोदावरी कोणत्या कारणामुळें घरांतून हांकलली गेली त्याची पूर्ण जाणीव तुम्हाला असून तुम्ही तिला परत बोलावण्यास तयार आहांत काय? तुमच्या कल्पनातरंगांत तयार झालेली आणि अनेक मोहांपासून अदृश्य राहूनहि संरक्षण करणारी देवता गोदावरी खास नाहीं. तिच्यावर जो आरोप करून तिला घराबाहेर घालवून दिले तो आरोप तिच्या म्हणण्याप्रमाणे जरी खोटा असला, आणि ती ख्रिस्ताच्या उपदेशाचें मोठ्या प्रेमानें वाचन करीत असली तरी ती तुम्ही कल्पना केलेली देवता नाही हे तुम्हांस खात्रीने आढळून येईल."

"माझी संरक्षण करणारी देवता आजची गोदावरी नसेल पण सोळा वर्षांपूर्वीची आहे."

"तुम्हांस मोहाचे प्रसंग पुष्कळ आले होते काय?"

"अर्थात पुष्कळच आले होते."

"ते कोणते?"

"ते तुम्हांस कसे सांगावयाचे, मला असे वाटतें कीं, माझी फेरतपासणी करण्याचा तुम्हांस अधिकार नाहीं, जर गोदावरीनेच मला विचारलें तर मी या प्रश्नाचे उत्तर देईन."

हे देवीदासपंतांचे उत्तर ऐकून मिस् हंटर या घोटाळ्यांत पडल्या. आपण कोण आहो याचे स्पष्टीकरण याच वेळेस करावे किंवा नाहीं याबद्दल त्यांच्या मनांत शंका होती. आणि याक्षणीं त्यांच्या मनांत अत्यंत कोलाहल माजून गेला.

मिस् हंटर हिच्या मनांत आज बराच संभ्रम उत्पन्न झाला होता. आपला नवरा येणार तर त्यास ओळख द्यावी किंवा देऊ नये, द्यावयाची झाली तर ती कोणत्या निमित्तानें द्यावी, आणि ओळख देण्यापूर्वी नवऱ्याने आपल्याकडे जे दुर्लक्ष अनेक वर्षे केलें आहे त्याचे स्पष्टीकरण त्याच्याकडून कसें काढून घ्यावें इत्यादि विचार देवीदासपंत येणार हे कळल्यावर पण ते येण्यापूर्वीच तिच्या मनांत चालू होते. देवीदासपंत भेटावयास येणार हे समजण्यापूर्वी आपणच भेटण्याची खटपट करावी असे तिला वाटत होते. आपण पद्मावतीला येऊन आलो आहो पण आपण दोन दिवस कांहीं तरी सबब काढून जास्त रहावें, आणि देवीदासपंतांची गाठ घ्यावी निदान त्यांनां पहावे असें तिच्या मनांत होतें, आणि देवीदासपंतांचें व्याख्यान एक दोन दिवसांत होणार आहे किंवा नाहीं या संबधाने तिने चौकशी देखील केली होती. पण व्याख्यान झाले नाहीं. पण अनायासे भेटण्याची किंवा स्वतःची ओळख न येतां त्यांच्याशीं बोलण्यास मिस् हंटर हिला संधि मिळालीच नाहीं.

तिसऱ्या दिवशीं सकाळी आपणच देवीदासपंतास भेटावयास जावे असा विचार तिच्या मनांत आला. नागपूर पहाण्याच्या निमित्तानें ती टांग्यांतून बाहेर पडली होती आणि बर्डीवरून टांगाहि तिने हाकलला होता. देवीदासपंत बर्डीवर रहातात एवढें तिला कळलें होते पण ती जेव्हा बर्डीतून जात होती तेव्हां मनांत कांहीं तरी संभ्रम उत्पन्न होऊन देवीदासपंत अत्रे कोठें रहातात ही चौकशी करण्याचें धैर्य तिला झालें नाहीं. ज्यानां आपण भेटावयासाठीं खटपट करीत होतो. ते देवीदासपंत आपणांसच भेटावयास येणार आहेत असें जेव्हां

डॉ.नंदिकाबाईकडून मिस् हंटर यांस कळले तेव्हां तिला मोठा आनंद झाला किंवा तिच्या मनांत कांही व्याख्या न करतां येण्याजोगी वृत्ति उत्पन्न झाली. आपणांस भेटावयास आलेल्या आपल्या नवऱ्याची पूर्ण माहिती आपल्याला आहे व आपण कोण याची मात्र त्यास माहिती नाही हा प्रसंग तिला मोठा अपूर्व वाटला. देवीदासपंत आले तेव्हा ती त्यांना भेटली पण भेटल्यानंतर बोलतांना तिचे धैर्य खचत होते असे तिला वारवार वाटे. आपण कोणी तरी निराळ्या व्यक्ती आहोत म्हणून त्यास दाखविण्याचे नाटक जे तिने आरंभले होते ते पुरे पडेल की नाही यासंबधाने तिला शंका वाटत होती.

देवीदासपंतांनी आपणांस ओळखले नाही. तोपर्यंत आपले स्थैर्य धैर्य कायम राहील, पण त्यांनी ओळखून "गोदावरी" म्हणून हांक मारली आणि आपल्या बाहूंनी ओढून घेतले तर आपणांस त्यांना प्रतिकार करण्याचे धैर्य तरी राहील किंवा नाहीं याविषयीं तिच्या मनात अप्रत्यय वाटत होता. ही जी मनाची दुर्बलता उत्पन्न झाली ती सर्व आपल्याच सोत्कंठतेने झाली आहे आणि आपला अधिकार नवऱ्यावर रागावण्याचा आणि त्याची निर्भत्सना करण्याचा आहे असे असता आपली निर्भत्सना करण्याची तयारीच होत नाहीं या आपल्या मनोदौर्बल्याबद्दल तिला लाज वाटत होती.

मनांतला संभ्रम बाहेर दिसू न देणे आणि बोलणे चालू ठेवणे या क्रियाना लागणारे धैर्य मिस् हंटर यांनीं उत्पन्न केले आणि म्हणाल्या की, "मला आपणांस विचारण्याचा अधिकार आहे असे आपण समजण्यास हरकत नाही." मिस् हंटर असे बोलल्या आणि बोलतांना त्यांनीं कारुण्ययुक्त स्मित केले, ते स्मित देवीदासपंतानां ओळखीचें वाटले आणि तें स्मित करतांना मिस हंटरच्या गालांतल्या खळग्या देवीदासपंताना दिसल्या. आणि आपण तीस बावीस वर्षापूर्वी लहान मुलगी अशी पाहिलेली गोदावरी हीच नसेल ना अशी त्यांच्या मनात शंका उत्पन्न झाली तरी पण एकाएकी "तूच गोदावरी काय" म्हणून विचारण्याचे त्यांस धैर्य झाले नाही.

देवीदासपंत अत्यंत घोटाळून गेले, आणि म्हणाले "माझी आणि गोदावरीची भेट आपण ताबडतोब करवावी"

"तुम्ही गोदावरीला आज ओळखू शकाल काय?"

"मला वाटतें की, मी ओळखू शकेन"

"तर मग तुम्हीं अजून कसे ओळखले नाही? गोदावरी मीच"

देवीदासपंतांना अजून सुद्धा तिला कडकडून भेटण्याचे धैर्य झाले नाही. त्यांनी मिस् हंटरचे हात मात्र आपल्या हातानी घट्ट धरून मोठ्या प्रेमावेशाने दाबले.

---

## प्रकरण ४१ वें

## ओळख झाली पण पुढें काय ?

नवऱ्यास बायकोची ओळख पटली तेव्हां दोघांच्या मनस्थितीची कल्पना करणे म्हणजे कल्पनाशक्तीस बरीच तालीम देणे आहे. देवीदासपंतास जी गोदावरी अनेक मोहाच्या प्रसंगी येऊन भेटत होती ती गोदावरी आतां कशी दिसत आहे ते दिसलें. गोदावरी उर्फ मिस हंटर हिची तिशी उलटली होती तरी तिचे तारुण्य नाहीसे झालेले नव्हते आणि नियमित आहारविहार आणि नेहेमीं काम करण्याची आवश्यकता या दोन गोष्टींच्यामुळे तिचे शरीरचापल्य कायम आहेसे दिसत होतें. आणि तिचे यावेळेचे स्वरूप देवीदासपंतास आकर्षक झाले यात शंका नाही.

देवीदासपंत तेथेंच बसले. थोडावेळ दोघेजणहि स्तब्धच होती. काय बोलावे हे कोणासहि

सुचत नव्हतें. हें सर्व विचाराच्या अभावामुळे होत होतें असें नसून प्रत्येकाच्या मनांत जो विचाराच्या विपुलतेमुळें गोंधळ होत होता त्यामुळें होत होते. शेवटीं बोलण्यास देवीदास-पतांनींच सुरवात केली.

"तुमच्याशी कसे बोलावे हेच समजत नाहीं. मी आपली बायको म्हणून तुमच्याशी बोलूं कीं, मिस् हटर नावाच्या एक निराळया व्यक्ती आहात असें समजून बोलूं."

गोदावरीने उत्तर कांहीच दिले नाहीं.

मिनिट दोन मिनिटे थांबून देवीदासपतांनीं बोलावयास सुरवात केली.

"मी अनेक वर्षे बाहेर देशी राहिलो पण तुमची कांहींच काळजी केली नाहीं याबद्दल माझ्यावर तुमचा राग पुष्कळच असेल!"

"प्रथमत: राग पुष्कळच येई. पण काही वर्षांनीं तो येईनासा झाला. मला उलट माझाच राग येऊं लागला."

"तो कां?"

"मला असें तत्त्व पटूं लागलें कीं, मनुष्य जेव्हा नाहींसा होतो तेव्हां तो आपल्यावरील कांही आपत्तीमुळे नाहींसा होतो, आणि असे असता तुमच्या बद्दल मी चौकशी कांहींच केली नाहीं उलट तुमच्यावरच रागावत बसले होतें, व याबद्दल माझ्या मनांत एकसारखे खात होते."

हे गोदावरीचें उत्तर ऐकतांच देवीदासपतांच्या मनावर मोठा परिणाम झाला. त्याचे हृदय भरून आल्याचा त्यांनां भास झाला. ते कांही वेळ स्तब्ध बसले आणि म्हणाले.

"गोदावरी, तुम्ही आपल्या दु:खाकडे दुर्लक्ष करून आणि नवऱ्याने कर्तव्य केले नाही तर नवऱ्यावर न रागावतां उलट आपल्यालाच तुम्हीं दोष देतां या तऱ्हेची तुमची वृत्ति पाहून मला आनंद होतो की फार खेद हे सांगतां येत नाही. या आमच्या उत्तराने मी साधुत्वाच्या सहवासाला इतकी वर्षे मुकलों असे वाटूं लागलें आहे. या तुमच्या वृत्तीमुळे मला असेंहि वाटतें कीं, पूर्वेने पश्चिमेला अजून शिकविण्याजोगे पुष्कळच आहे."

"पण माझ्या मनाला जें हें तत्त्व पटलें त्याचे कारण मला जिनें मुलीसारखें मानलें अशी इंग्रज बाईच आहे तर माझ्या मनांत हे तत्त्व बिंबले ते पश्चिमेच्या शिकवणीचेच फल आहे."

"गोदावरी, तुमची सर्व हकीगत विचारून घ्यावयाची आहे, घरची जेवढी माहिती तुम्हाला असेल ती तुमच्यापासून ऐकावयाची आहे. तू जिवंत असता आमच्या बंधूनीं तू वारलीस असे का कळविले हे देखील ऐकावेसें वाटतें आणि तू आज इतकी वर्षे कशी काढलीस हेहि ऐकावेसे वाटते, तसेच आतां आपण पुन्हा संयुक्त व्हावे असे मला वाटूं लागले आहे पण तुला दुसरा कोणताहि प्रश्न अगोदर न विचारतां ज्या प्रश्नाच्या उत्तराविषयीं मला उत्कंठा फार आहे तोच प्रश्न म्हणजे तुला मजकडे परत यावेसे वाटते की नाहीं हाच विचारतों; बोलताना माझ्याने इत:पर बहुवचनी प्रयोग येतच नाही मी तुम्हांस एक वचनानेच बोलतों याबद्दल क्षमा करा."

गोदावरी उर्फ मिस हटर जरा बुचकळयात पडली. आपण अजून वियुक्त आहोंत व दोघामध्ये धर्माचे अंतर आहे आणि पूर्वीचा संबंध पुन्हा स्थापित होणे शक्य आहे काय, व शक्य असल्यास तो व्हावा काय याविषयीं अजून आपला निश्चय झालेला नाहीं, तर इतक्यातच पूर्वी नवरा असलेल्यानें एकदम सलगी करावी काय अशीहि तिच्या मनांत शंका उत्पन्न झाली. देवीदासपंत आपणांस परत बोलावीत आहेत पण ते सर्व गोष्टी लक्षांत घेऊन बोलावीत आहेत काय, असाहि प्रश्न तिच्या मनांत उपस्थित झाला. ती म्हणाली, "आज अनेक वर्षे गोदावरी नाहींशी झाली असून ती मिस् हंटर झाली आहे."

आपण हिला तू म्हणून संबोधिले यावर हिचा आक्षेप आहे, व ती आपला पूर्वसंबंध नाकारीत आहे असे देवीदासपंतांस वाटले पण त्यांनी विचारलें "गोदावरी नाईशीं झाली म्हणजे काय? तुम्हीं बापतिस्मा घेतला आहे काय?"

"होय"

"पण तुम्हीं माझ्याकडे येऊं इच्छित नाहीं? कीं तुम्हीं माझें पतित्व नाकारूं इच्छितां या माझ्या प्रश्नाचें उत्तर मिळावें यासाठीं मी अत्यंत उत्सुक आहे."

'तुम्ही मला हा प्रश्न विचारतां तो तुम्ही आपला हक्क सांगण्याच्या दृष्टीनें विचारतां की आपले कर्तव्य करण्याच्या दृष्टीनें विचारतां?"

गोदावरीचें यावेळेचें अंतःकरण वर्णन करण्याचें काम पूर्वी भवभूतींनेच केलें आहे. तें अंतःकरण वर्णन करण्यास लागणारी भाषा प्रस्तुत कथानक लिहिणाऱ्यास नसल्यामुळें तो भवभूतीच्याच शब्दाचें अवतरण करीत आहे. गोदावरीचें यावेळचें अंतःकरण

तटस्थं नैराश्यादपि च कलुषं विप्रियवशात्
वियोगे दीर्घेऽस्मिन् झटिति घटनोत्तंभितमिव
प्रसन्नं सौजन्याद्दयितकरुणैर्गाढकरुणं
द्रवीभूतं प्रेम्णा तव हृदयमस्मिन् क्षण इव

या वर्णनाप्रमाणे होतें–

गोदावरीच्या मनातील उत्कंठा व थोडा बहुत असलेला राग हा सर्व अधिकार आणि हक्क याच्या भाषेनें बाहेर पडला.

"मी कोणत्या बुद्धीने विचारतों हें मला सांगतां येत नाहीं. तुमच्याकडे मी दुर्लक्ष केलें, मी आपलें कर्तव्य बजावले नाहीं असे मला वाटत आहे आणि आतां देवानें मला चुकीबद्दल नुकसान-भरपाईची संधि दिली आहे असे मला वाटतें."

"या देवीदासपंतांच्या बोलण्यामुळे गोदावरी-बाई जरा शांत झाल्या आणि म्हणाल्या. तुम्ही त्याबद्दल बिलकुल खेद करूं नये. माझ्या मनांत तुम्ही असुखी असतां तुमच्याकडे मी दुर्लक्ष केलें असे जें वाटत होतें तें इतःपर वाटावयाचें कारण नाहीं आणि तुम्ही माझ्याशीं अन्यायानें वागला असे वाटून मला जे दुःख झालें त्या दुःखाचेंहि कारण नाहीं."

"तुम्ही आपले हृदय उघडे करून सांगत नाहीं. कर्तव्य या दृष्टीनें आपल्या बायकोचें पालन करावें या भावनेनेंच तुम्ही मला बोलावीत असाल तर मी तुम्हांस त्या जबाबदारीतून मोकळे करावयास तयार आहे."

"म्हणजे?"

"म्हणजे, बायकोला बाळगणें हे नवऱ्याचें कर्तव्य आहे म्हणून आपण मला बोलावीत असाल तर मी आपणांवर तो भार टाकूं इच्छीत नाहीं."

"गोदावरी, मला तुमची बालमूर्ति कालच रात्रीं येऊन भेटली होती, आणि त्यामुळे तुम्हीं आज जरी भेटला तरी अगदीं संबंध तुटलेल्या व्यक्तीस आपण भेटत आहों असें मुळींच वाटलें नाहीं. माझी गोदावरी रूपांतर पावली आहे एवढेंच मला वाटत आहे. पण त्या माझ्या संरक्षण कर्त्या गोदावरीचें शारीरिक दृष्ट्या रूपांतर झालें तसें मानसिक दृष्ट्या रूपांतर झालें की काय?"

"माझ्या बोलण्याचा अर्थ आपण समजला नाहीं."

"पण गोदावरी, हे बोलणें वरवरचें होतें. माझ्याकडे तुम्ही यावें अशी मी तुम्हास सूचना केली त्या सूचनेचें उत्तर मला मिळालें नाहीं."

"आपल्या बोलण्याचा अर्थ काय?"

"माझा मुख्य आशय असा आहे कीं जर मला आपण केवळ कर्तव्य म्हणून बोलावीत असाल तर आपणाकडे यावयास मी मुळींच खुश नाहीं. तथापि माझ्यावर आपले प्रेम आहे

म्हणून तुम्ही बोलावीत असाल तर मी त्यासंबंधानें विचार करावयास तयार आहे."

"गोदावरी," म्हणून तिला आलिंगन द्यावयास म्हणून देवीदासपंत पुढें सरले पण गोदावरी एकदम बाजूला झाली. अजून पुरुष आलिंगन द्यावयास पुढें सरल्यास वर्षानुवर्षं वैधव्य कौमार्यांत राहिल्यामुळे तिला विचित्रच वाटत होतें. तेव्हां देवीदासपंत पुन्हां म्हणाले "तुम्हाला माझ्या प्रेमाविषयीं शंका आहे काय!"

देवीदासपंतांचे हे शब्द ऐकतांनां देवीदासपंताच्या तोंडावर भावनायुक्त मुद्रा गोदावरीच्या दृष्टीस पडलीच. तरी ती म्हणाली.

"आज आपला व माझा परिचय नव्यानेच होत आहे तर आपल्या प्रेमाविषयी माहिती आपण मला जी सांगाल तेवढीच आहे."

हे शब्द ऐकतांच देवीदासपंत जरा हिरमुसल्यासारखे झाले, आणि म्हणाले "म्हणजे, माझ्या प्रेमाविषयी तुम्हाला शंका वाटते तर मी माझ्या प्रेमाची तुम्हांस खात्री कशी करून देऊं? कदाचित माझें तुमच्यावर प्रेमहि नसेल. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें माझ्या काल्पनिक गोदावरीवर माझे प्रेम असेल पण प्रत्येक विवाहामध्यें प्रत्येक विवाहबद्ध होऊं इच्छिणाऱ्या व्यक्तीस दुसऱ्या व्यक्तीच्या खऱ्या स्वरूपावर प्रेम असते कीं दुसऱ्या व्यक्तीविषयीं आपण जी मनांत कल्पना केली असेल त्या कल्पनेवर प्रेम असतें? माझे प्रेम माझ्या काल्पनिक गोदावरीवर जरी असले तरी तें खऱ्या गोदावरीवर देखील जडेल. प्रत्येक प्रेमामुळें संयुक्त होणाऱ्या स्त्री पुरुषांत हेंच दिसून येते. ज्याप्रमाणें विवाहेच्छु व्यक्ती विवाहापासून होणारा धोका पत्करतात त्याप्रमाणें आपणहि पुनर्मीलनापासून उत्पन्न होणारा सर्वच धोका पत्करूं."

"तुम्ही धोका पत्करावयास तयार होतां!"

"होय आणि तुम्हीहि तयार व्हावें असे माझें म्हणणे आहे."

"मला आपलें पुनर्मीलन होणें हें उभयतांच्या हिताचें होईल कीं नाहीं याविषयीं शंका वाटते. आपलें पुनर्मीलन झालें नाहीं तरी आपण सुरक्षित आहांत हें मला समजेलच आणि तेवढयानें मला व्हावयाचा आनंद होईलच."

"तुम्हांस मी जर सुखी असावें असें वाटतें तर आपलें पुनर्मीलन होण्याच्या विरुद्ध तुम्ही कां आहांत."

"पण मी ख्रिस्ती आहे. आणि मला तुम्ही पतित समजत असाल; व आज मी अंतःकरणानें ख्रिस्ती असल्यामुळें जो मनुष्य ख्रिस्ती नाहीं त्याच्याकडे आपण कसें जावें अशी मलाहि शंका वाटत आहे. मला ख्रिस्तास सोडावयाचे नाहीं."

"आणि तुमचा जर ख्रिस्तावर विश्वास असेल तर ख्रिस्तास सोडा असे मीहि सांगत नाहीं. जो उपदेश तुम्हांस आपल्या मनाची उन्नति करणारा वाटतो त्या उपदेशास तुम्ही खुशाल मान द्यावा."

"म्हणजे तुम्ही मला ख्रिस्ती धर्म न सोडला तरी बोलवावयास तयार आहात काय!"

"होय,"

"तुम्ही बोलावीत असाल पण माझ्या मनांतील किंतु गेला नाहीं."

"याचा अर्थ ख्रिस्त तुम्हांस लग्नाच्या नवऱ्यास नाकारण्याचा उपदेश करतो असें तुम्ही समजतां असा मी घ्यावयाचा काय? आणि ही गोष्ट योग्य आहे काय!"

"लग्नासारख्या किंवा स्त्री पुरुषांनीं एकत्र होण्याच्या गोष्टींविषयीं विचार करतांनां धर्माकडे दुर्लक्ष करावयाचें काय!"

"ख्रिस्ताचा लग्नाशीं संबंध काय!"

"मला या विषयावर विचारच करतां येईनासा झाला आहे. मला असें वाटतें कीं, मी यासंबंधानें निदान माझ्या पालनकर्त्या आईचा विचार घेतला पाहिजे."

देवीदासपंत हे उत्तर ऐकून कांहीं वेळ स्तब्ध बसले, आणि म्हणाले, "नवऱ्याचा नवरेपणा कबूल करण्याला देखील तुम्हाला तुमच्या गान-लेल्या आईचा विचार घेतला पाहिजे काय?"

"निदान आज तरी मला विचार घेणे अवश्य आहे असें वाटते."

"तुम्हाला अवश्य वाटत असेल तर मी त्यांस विचारूं नका असें म्हणत नाही." हे बोल तांना देवीदासपतांच्या तोंडावर एक तऱ्हेची निरुपायमूलक संमतीची छटा दिसत होती. व ती पाहून गोदावरीस एक तऱ्हेचा आनदच झाला.

ती पुढे म्हणाली "तुम्ही मजबरोबर मुबईस येतां काय?"

देवीदासपंताची त्याबद्दल एक तऱ्हेची नाखुषीची मुद्रा झालेली पाहून एल्मा हंटर उर्फ गोदावरी पुढे म्हणाली "का मी आईलाच इकडे बोलावू?"

"तसेच केल्यास फार चांगले होईल."

मिसेस हंटर यानां नागपूरला येण्यासाठी एल्माने तार केली.

देवीदासपत थोडयावेळाने घरी गेले, पद्मावतीसबधाचे बोलणे बोलावयाचे तसेंच राहून गेले.

दुसऱ्या दिवशीं देवीदासपंत गोदावरीस पुन्हा भेटावयास गेले. तो दिवस अधिक मोकळ्या मनाने संभाषण करण्यांत गेला. त्या वेळांत गोदावरीनें आपली सर्व हकीगत सांगितली आणि देवीदासपंतांची विचारून घेतली. देवीदासपतांचा इतके दिवस विदेशी निवास झाला याचे कारण गोदावरी वारली अशी त्यांची समजूत होती ही गोष्ट गोदावरीस समजल्यानंतर देवीपताच्या प्रेमाच्या चिरकालतेसबंधानें तिच्या मनांत मोठा विश्वास उत्पन्न झाला. देवीदासपंत म्हणाले मला माझें कोणी तरी आहे असें वाटू लागल्यास माझ्या मनाला खरी शांति मिळेल असें वाटूं लागलें आहे. ते असें म्हणाले तेव्हां आपली देवीदासपंतास खरोखरच गरज आहे असे गोदावरीस वाटूं लागले. देवीदासपंतांच्या अनेक गोष्टी देवीदासपतांनी सांगितल्या तेव्हां आपण त्या प्रसंगीं नव्हतो म्हणून तिला दुःख वाटू लागले आणि आपली आई जर आपल्या पुनर्मीलनास समती देईल तर किती चांगलें होईल असे तिच्या मनांत वाटू लागले.

---

## प्रकरण ४२ वें.

## मिसेस हंटरचें ख्रैस्त्य.

मिसेस हंटर नागपूरला आल्या, व जेव्हा देवीदासपत त्यांस भेटावयास आले तेव्हां त्यानी देवीदासपतांचे स्वागत चांगल्या तऱ्हेने केले. जिला आपण आपली मुलगी मानले तिचा प्रत्यक्ष नवरा तर तो आपला जांवईच आहे अशी भावना त्याच्या मनात उत्पन्न झाली. गोदावरीचा नवरा परत कधी तरी येईल अशी अधुक भावना त्याच्या मनांत होती. मनुष्याचे वय जसजसे वाढत जाते तसतसे ज्याला आपले म्हणतां येईल असे कोणी तरी असावे ही भावना त्याच्या ठायीं उत्पन्न होऊं लागते अशी जाणीव तिच्यामध्ये स्वानुभवाने वाढत होती आणि यामुळे गोदावरीचा नवरा त्याची बायको कोठे आहे हे कळल्याबरोबर येईल अशी आशा ती मनांत बाळगीत होती, आणि यासाठी जरी तिने लग्न झालें आहे हे विसर असे एल्माला म्हणजे गोदावरीला सांगितले तरी तिचें दुसरे लग्न व्हावे या खटपटीत ती पडली नाहीं. नवरा एल्माला परत घेईल याबद्दलहि तिला सदेह नव्हता. एल्माचा नवरा विदेशी गेला आहे तर त्याच्या मनांत आपल्या बायकोनें ख्रिस्ती मडळींचा आश्रय केला याबद्दल राग मुळींच येणार नाहीं, तो देखील अनेक वर्षे ख्रिस्ती मडळींतच राहिला असेल. जर त्याची इच्छा आपल्या बायकोस परत घेण्याची झाली तर तो तिचें मी इतकें दिवस सरक्षण केले याबद्दल आभार मानील

आणि मीं देखील इतक्या वर्षपर्यंत तिचे वर्तन पवित्र आहे याबद्दल खातरजमा देऊं शकेन. असे तिला वाटे. तिला हिंदु करावें म्हणून जर नवऱ्याची इच्छा असेल तर मुलीला "तूं हो हिंदू" असा सल्ला द्यावयास देखील शंका वाटली नसती. कां की, मिसेस हंटर ही अंतःकरणाने ख्रिस्ती होती तरी चर्च हे सर्व थोतांड आहे, केवळ भिक्षुकी चालविण्यासाठी एक संस्था आहे. तेव्हां त्या चर्चचें सदस्यत्व सोडावयाचें एवढाच ख्रिस्ती धर्म सोडल्याचा अर्थ होईल असे तिला वाटे पण हे तिने आजपर्यंत मनातच ठेवले होते, पण नवऱ्याचा जोपर्यंत पत्ता नाही तोपर्यंत या प्रश्नावर संवादच उत्पन्न होऊ नये असे तिला वाटे. ख्रिस्ताचा उपदेश जर गोदावरीच्या मनावर ठसला असेल तर तो आपले कार्य करीलच त्या उपदेशाच्या संरक्षणार्थ बापतिस्म्याचें पाणी कशास पाहिजे आणि कम्युनिअन कशाला पाहिजे, असे ती नेहेमीच म्हणत असे. तिने मिशन काढले होते व आपल्या कार्यास "ख्रिस्ती कार्य" असेहि ती म्हणत असे पण तिच्या ख्रिस्तीपणाविषयीं इतर मिशनऱ्यामध्ये अविश्वास होता, आणि त्यास अविश्वास असण्यास कारणहि होते. ती ख्रिस्ती म्हणवी पण प्रार्थनेस देखील जात नसे. घरात तिने येशू आणि मेरी यांच्या मूर्ती ठेवल्या होत्या एवढेच. याशिवाय तिचा मागचा वृत्तांतहि बऱ्याच जणास अवगत होता आणि यामुळे ते तिच्या संस्थेकडे साशंक दृष्टीने पहात असत, तथापि तिच्या मेहनतीची तारीफ करीत असत. त्यापैकी कित्येक असेहि कबूल करीत की, ही मेहनत करण्याची शक्ति खऱ्या विश्वासाशिवाय उत्पन्न होणार नाही.

देवीदासपंताची मिसेस हंटर याशी ओळख गोदावरीने करून दिली, आणि आपल्या मनांतील किंतु देखील गोदावरीने आपल्या धर्ममातेस स्पष्टपणे सांगितला. "नवऱ्यासाठी ख्रिस्ती धर्म टाकून देणे योग्य आहे काय, किंवा नवरा ख्रिस्ती नसता त्याशी संयुक्त होणे हे गैर नाही काय? हा माझ्या मनात मोठा संदेह पडला आहे, असे गोदावरीनें सांगितले, तेव्हां मिसेस हंटर म्हणाल्या,

"एल्मा, तुझ्या हृदयांत नवऱ्याच्या ठायीं प्रेम असले तर नवरा मला ओळखीत नाही म्हणून त्याच्याशी पुन्हा संयुक्त होऊ नको असे म्हणण्यास ख्रिस्त येत नाही."

"तर मग ख्रिस्ती लोकांनी ख्रिस्तास मानीत नाहींत त्याच्याशी लग्ने करावींत काय?" गोदावरीने विचारले.

"लग्न आणि ख्रिस्ताचा उपदेश याचा काय संबंध आहे?"

"कांहींच नाही काय?"

"कांहींच नाही, जो आहे तो केवळ ख्रिस्ताच्या नावाने भिक्षुकी करणाऱ्या लोकानी उत्पन्न केला आहे"

"तुम्ही कडक ख्रिस्ती नाही वाटते?" देवीदासपंत म्हणाले.

"मी कडक ख्रिस्ती आहे तथापि मला चर्च नको आहे."

"ते कां बरे?"

"चर्च अनेक खुळी मते लोकांवर लादीत आहे. ख्रिस्ताची सामाजिक मतें आणि त्याच्या ईश्वरविषयक कल्पना यांची एकत्र जुळणी चर्चने केली आहे, त्या जुळणीमुळे ख्रिस्ताचा धर्म लपला गेला आहे. ख्रिस्ताच्या मनांत ज्या कल्पना असतील त्या सर्व धर्म म्हणून त्याचा स्वीकार करणे अगदी वेडेपणाचें आहे. ख्रिस्ताच्या वेळेस जे भूगोलज्ञान वाढलं असेल त्याप्रमाणे ख्रिस्ताची भूगोलविषयक मते असतील तर त्या मतावर विश्वास ठेवणे हे अवश्य आहे काय? ते जर अवश्य धरलें तर प्रगतीच खुंटेल. त्याचप्रमाणे ख्रिस्ताचीं ईश्वरविषयक मते आग्रहाने उराशी बाळगणें अप्रयोजक होय. मेल्यानंतर काय होते आणि सृष्टीवर कोणी राज्य

करणारा आहे काय आणि तो कसा आहे याविषयींच्या ज्या कल्पना त्या काळच्या लोकांत असतील त्याच ख्रिस्ताच्या डोक्यात शिरल्या असतील. त्या कल्पनांस सत्य किंवा त्यांवर विश्वास ठेवणें हा धर्म समजून त्याचें दास्य करणें ही तर अत्यंत अनिष्ट गोष्ट होय."

"तर मग तुम्हांस ख्रिस्ताच्या ईश्वरविषयक कल्पना मान्य नाहीत काय? त्या जर मान्य नसल्या तर तुम्हांस ख्रिस्ताचे मान्य असे तरी काय आहे?"

"एखाद्या गुरूच्या भोंवतीं शिष्य अनेक जमतात त्यावेळी त्यांस गुरूचे सर्वच कांही आवडले नसते. कोणास गुरुचे भाषण विनोदी व सुश्राव्य वाटतें म्हणून तो गुरूकडे येतो, तर कोणी त्यास अनुकरणीय वर्तनाचा पुरुष वाटतो म्हणून त्याच्यापाशीं येतो. कोणास गुरूचे व्यक्तिस्वरुपच केवळ पवित्रतेची किंवा शांतपणाची मूर्ति आहे असे वाटतें म्हणून व तो त्या गुरूकडे आकर्षिला जातो, असे निरनिराळे लोक निरनिराळ्या कारणांनी गुरूभोंवती जमतात. ज्यास गुरूचे विचार आवडले त्यास गुरूची सांगण्याची पद्धत आवडलीच पाहिजे असे नाहीं. प्रत्येक व्यक्तीचे गुरूकडे आकर्षण होण्याचे कारण निरनिराळे असते, आणि त्यामुळे पुष्कळदा आपल्या व आयुष्यक्रमात गुरूस आपली मुख्य तत्त्वें सांगणे कठीणच जाते.

"तुम्ही ख्रिस्ती धर्मातले मुख्य तत्त्व काय समजतां?"

"मला मुख्य तत्त्व कोणतें हा विचार महत्त्वाचा वाटतच नाहीं."

"कां बरें?"

"मी तुम्हाला एक गोष्ट सांगते एकदां एक न्यायाधिश वकीलाला म्हणाला की, तुमचे मुख्य मुद्दे कोणते तेवढेच सांगा. वकील म्हणाला मला मुख्य मुद्दे कोणते ते कळतच नाही. ज्या मुद्द्यास मी कमी महत्त्वाचे असे समजे त्या मुद्द्यांचेच महत्त्व न्यायाधिशास पटल्यामुळे मीं अनेकदां केस जिंकली आहे. वकील हें जें बोलला त्यांत महत्त्वाचें सत्य आहे. ख्रिस्ताला प्रत्यक्ष जर विचारले असतें कीं तुझ्या विचारांतले मुख्य तत्त्व काय, तर ते त्यास सांगतां आलेच असते असे नाहीं. त्यास अनेक तत्त्वांचा अभिमान असेल. शिवाय त्याच्या काळांत ज्या विषयाची चर्चा विशेष होत असेल तेंच त्याला आपल्या पद्धतींतील महत्त्वाचे तत्त्व वाटले असेल. आणि जगाच्या प्रगतीस आणि सुस्थितीस जी खरोखर कारण झालेलीं अशीं तत्त्वें तो बोलून जाऊनहि त्याचे त्यास भान नसेल."

"पण याच्यावरून ख्रिस्ती धर्मातील मुख्य ग्राह्य भाग तुम्ही कोणता समजता याचे स्पष्टीकरण होत नाही."

"मी आतांपर्यंत जी चर्चा केली ती एवढ्याचसाठी कीं, ख्रिस्ताच्या धर्मातील मुख्य भाग कोणता याविषयी जशी चर्चेची मांडणी कबूल करणार नाही तशीच खुद्द ख्रिस्ताचीहि मांडणी कबूल करणार नाही. आणि यासाठी मी जो भाग अधिक ग्राह्य समजते तो भागच इतरानीहि ग्राह्य समजावा असाहि माझा आग्रह नाही."

"ख्रिस्ताच्या उपदेशांपैकीं कोणता उपदेश तुम्हास महत्त्वाचा वाटतो?"

"ख्रिस्ताची एकंदर आयुष्यविषयक दृष्टीच महत्त्वाची आहे असें मी समजतें आणि त्या वृत्तीस महत्त्व देते."

"तुम्ही ख्रिस्ती संप्रदायाच्या विशिष्ट अंगासच महत्त्व देतां. त्या अंगाचें महत्त्व तुम्हांस कां वाटते, आणि इतर अंगांचे कां वाटत नाहीं?"

"प्रथमत: मला सर्वांत त्याचा आशावादीपणा आवडतो. लोकांनीं पश्चाताप करावा म्हणजे त्यास भावी काल सुखकर होईल या त्याच्या विश्वासाचे महत्त्व वाटतें. तसेंच आणखी ख्रिस्त म्हणाला कीं "शाबाथाची उर्फ विश्रांतिदिनाची संस्था मनुष्यासाठी आहे, मनुष्य त्य

सस्थेसाठीं नाही," ही गोष्ट फारच महत्त्वाची आहे असे मला वाटते. येशू शाबात्थाविषयीं बोलला ते मला एकंदर धार्मिक किंवा राजकीय संस्थाविषयीं वाटतें. तसेच जेव्हां ख्रिस्त म्हणाला की मी सोवळ्यासाठीं नाही तर जे पतित आहेत त्यांना पश्चात्तापाच्या रस्त्यावर आणण्यासाठीं मी आहे हें देवील ख्रिस्ताचें तत्त्व मला आवडते. हे तत्त्व पुढाऱ्यास किंवा समाजसुधारकास फारच उपयोगी आहे. माझ्या मते समाजातील प्रत्येक जबाबदार मनुष्याने म्हणजे अधिकारावर असलेल्या मनुष्याने ते लक्षांत ठेवलें पाहिजे."

"या सर्व गोष्टी सामान्य व्यावहारिक नीतीच्या आहेत, या तत्त्वांचा स्वीकार करण्यास कोणाहि हिंदूस हरकत वाटावयाची नाही" देवीदासपंत म्हणाले.

"या सर्व गोष्टी जर तुम्हांला कबूल असतील तर तुम्ही आपणांस ख्रिस्ती म्हणावयास तयार आहांत काय?"

"अर्थात् नाही" देवीदासपंत म्हणाले.

"का बरें?"

"प्रत्येक मनुष्य अनेक व्यक्तींच्या किंवा अनेक ठिकाणांतून निघालेल्या कल्पनांचें ग्रहण करतो तर आपणांस अमुकच मनुष्याचे नांव मी कां चिकटवून घ्यावें?"

"घेतले तर काय बिघडलें?"

"सगळेच बिघडलें! आज ख्रिस्ती याचा अर्थ हिंदूंच्या उपदेशपरंपरेकडे, आणि विचारपरंपरेकडे दुर्लक्ष करणारा असा होतो."

"तसा अर्थ तुम्ही करता काय?"

"नाही, पण मी आपले ख्रिस्ती असें वर्णन करूं इच्छीत नाहीं."

"लोकानीं आपणाला ख्रिस्ती म्हणवून घ्यावे ही गोष्टहि मी महत्त्वाची समजत नाहीं. ज्या मनुष्याला ज्या मानाने ख्रिस्त आवडेल त्या मानाने तो आपणांस ख्रिस्ताचा म्हणवील व ख्रिस्त आपला म्हणेल, मिसेस् आडेलीन हंटर म्हणाल्या."

"जेव्हा आपण अनेक ठिकाणचा उपदेश किंवा विचार घेतो तेव्हां एखाद्याच विशिष्ट व्यक्तीच्या नांवाने आपण आपणांस जगाच्या बाजारांत कां मांडावें हा माझा मुख्य प्रश्न आहे" देवीदासपंत म्हणाले; व हे म्हणतांना त्यांच्या बोलण्यांत जरा आवेश दिसूं लागला.

मिसेस हंटर यांना तो आवेश पाहून मौज वाटली व त्या अगदी शांतपणाने म्हणाल्या "तुमचा आक्षेप बरोबर आहे. जगातील "ख्रिस्ती", "मुसलमान", "हिंदू" हीं नांवेच नाहीशी होतील तर अधिक चांगले होईल; तसे झाले तर येशूच्या उपदेशाला जगात फारच मोठी मान्यता येईल."

"माझी यासंबंधानेहि खात्री नाही, तुम्ही बोलता हा सर्व पूर्वसंस्काराचा आणि पूर्वशिक्षणाचा प्रभाव आहे असें मला वाटते," देवीदासपंत बोलले.

"तसेंहि असेल. मनुष्यास आपल्या पूर्वसंस्कारापासून अलिप्त राहणे शक्य वाटत नाहीं."

हे देवीदासपंतांनी ऐकले तेव्हा त्यास समाधान वाटले, व ते म्हणाले,

"तुम्हाला येशूच्या सामाजिक नीतीच्या कल्पनात काही वावगे वाटते काय?"

"येशू ख्रिस्ताचा सर्वच उपदेश मला मान्य नाहीं. येशू प्राचीन नीतिधर्माचें विस्तारण करण्यासाठीं आपला अवतार आहे असे सांगतो त्या प्रसंगी स्त्रियांस कसे वागवावें यासंबंधानेहि भाष्य करतो. त्यांत येशू म्हणतो की जो कोणी स्त्रीकडे कामदृष्टीने पहातो तो तिजशी व्यभिचार करतो या तत्त्वाला कोणी नावें ठेवणार नाहीं. "कोणी बायको टाकली तर त्याने तिला सूटपत्र द्यावे" या जुन्या नीतिनियमावर भाष्य करितो ते मात्र मला पूर्ण पटत नाहीं. त्या भाष्यांत येशू म्हणतो "जो स्त्रीस व्यभिचाराच्या कारणाशिवाय टाकतो, तो तिला व्यभिचारिणी करतो" हे हि सत्यच आहे. पण पुढे येशू जे

बोलतो कीं जो टाकलेलीशीं लग्न करतो तो व्यभिचार करतो हें मात्र येशूचे म्हणणें मला मुळींच पटण्याजोगें नाहीं. उलट मीं येशूमच असे सांगितलें असतें कीं, जे धर्मशास्त्रकार टाकलेल्या स्त्रियांना पत्नीपदप्राप्तीची पुन्हा संधि देत नाहींत ते धर्मशास्त्रकार स्त्रियांना व्यभिचारिणी करतात. येशूचे हें काडी मोडून दिलेल्या स्त्रीशीं लग्न करण्याच्या निषेधाचे वाक्य येशूच्या एकदर उपदेशपद्धतीशीं विरुद्ध आहे; आणि मला असे वाटते कीं हे वाक्य येशूने कोणा तरी ब्राह्मणापासून उचललें असावे. का की व्यभिचाराच्या गुन्ह्यात सांपडलेल्या एका स्त्रीचे त्याने रक्षण केले, आणि तिला तू पुन्हां पाप करू नको असा उपदेश केला आहे."

देवीदासपताला वाटायला लागले की हीं बाई पुन्हां जातीच्या वळणावर गेलीच. येशूचा जो उपदेश आपल्याला आवडत नसेल तो दाखवून द्यावयाचा पण त्याच्या प्रतिपादनाच्या दोषातून येशूला मुक्त करावयाचे, आणि तो उपदेश पसरविल्याचा दोष ब्राह्मणांच्या माथीं मारायचा आणि तो तसा मारण्यास प्रमाण काय? तर " मला वाटते ". देवीदासपताची धार्मिक वादविवादाची आणि आर्यधर्माच्या म्हणजे ब्राह्मणी विचारपरंपरेच्या श्रेष्ठतेची भावना पुन्हा उसळी मारू लागली. पण त्यांनीं स्वतःच आत्मसंयमन केले व ते मनाशीं म्हणाले येथे रागावता कामा नये; या बयाच्या सल्ल्याने गोदावरी माझ्याकडे परत यावी किंवा येऊ नये हे ठरणार आहे, तर आतां जरा बेतानेच घेतले पाहिजे. आता आपण तिलाच व्याख्यान देण्याची संधि द्यावी, पण विषय बदलावा. हा विचार मनांत येऊन तो म्हणाला—

"संप्रदाय जर मूळच्या उपदेशापासून दूर गेला असेल तर पुढे त्याच्या अनुयायांनी काय करावें, आणि मूळचा उपदेश कोणता हे जर पुरेशी ऐतिहासिक प्रमाणे नसल्यामुळें काढतां येण्याजोगे नसले तर काय करावे?"

"संप्रदायांत ज्या गोष्टी शिरल्या असतील त्यापैकी ज्या कांही उपयोगी वाटत असतील त्या ठेवाव्यात पण त्यांची बंधनकारकता नसावी. जसे एखाद्या गुरूची अमुक गोष्ट आवडणे आणि याविषयी गुरूच्याच काळांत स्वातंत्र्य असते, कोणत्या गोष्टीमुळें गुरुकडे आकर्षिले जावे हे ज्याच्या त्याच्या स्वेच्छेनेच ठरते तसे गुरूच्या निधनानतर का नसावे? पण तसे होत नाही. गुरूच्या अनेक शिष्यांपैकी कित्येकांस गुरूचे विशिष्ट अंगच आवडले असते आणि तो त्या अंगाचेच वर्णन लिहितो कोणी गुरूने सांगितलेल्या कथा किंवा दृष्टांत हीच लिहितो, तर कोणी गुरूने केलेले चमत्कार लिहितो, तर कोणी त्याची ईश्वरविषयक वृत्ति कशी होती ते वर्णितो. हीं सर्व निरनिराळ्या अशी वर्णने झालीं, म्हणजे त्यात दिसून येणाऱ्या गुरूच्या मता—विचाराची आणि आचारप्रायश्चित्ताची ती सर्व अंगे अवश्य आणि महत्त्वाचे भाग आहेत असे लोक बोलू लागतात आणि त्या सर्वांचा परस्पर संबंध कसा आहे ते दाखविणारे वाङ्मय तयार होऊ लागते आणि त्या सर्व गोष्टी म्हणजे तो गुरूचा धर्म असे होऊ लागते आणि त्या उपदेशांत किंवा विचारसंप्रदायात जेथे काहीं संदिग्धता रहाते तेथे ती पुरी करण्याचा प्रयत्न केला जातो. या सर्व गोष्टी लक्षात ठेवाव्यात आणि वागावे म्हणजे, धर्मवचन म्हणून मांडलेल्या गोष्टीस किंमत बेताने द्यावी म्हणजे झाले."

वादविवाद फार वाढेल अशी देवीदासपतास पुन्हा भीति वाटू लागली आणि आतां आपण मुद्यावरच यावे असे वाटले आणि तो म्हणाला.

"तर मग तुमचा गोदावरीस सल्ला काय आहे?"

"तुम्ही तिला परत घ्यावयास तयार असला तर तिने परत जावे; ही संधि गमावू नये. नवऱ्याचे आमंत्रण खरोखरच उपेक्षणीय नाही."

गोदावरीच्या तोंडावर उल्लसित वृत्ति दिसूं लागली.

देवीदासपंत तिच्याकडे पाहून म्हणाले "आतां तर मग तुमचा मार्ग मोकळा झाला आहेना !"

गोदावरीने आपली संमति आनंदयुक्त स्मितानें दर्शविली.

पुढें मिसेस हंटरनीं आणखी स्मितयुक्त होऊन विचारलें कीं, "आतां तुम्हाला गोदावरीची शुद्धि करायाची असेल?"

"शुद्धीची आवश्यकता मी कांहीं एक समजत नाही" देवीदासपंतांनीं उत्तर दिलें.

पुढें कांहीं तरी निमित्त काढून गोदावरी आणि देवीदासपंत यांस तेथेंच सोडून मिसेस हंटर दुसऱ्या एका खोलींत गेल्या.

---

## प्रकरण ४३ वें.

## दादासाहेबांच्या घरीं.

विश्वमित्राची उमेदवारी जाहीर झाली. नागपूर व कामठी या दोन शहरांच्या तर्फे कौन्सिलासाठी स्वराज्यपक्षातर्फे विश्वमित्र उमेदवार उभा राहिला याचें प्रतिसहकारवाद्यांपैकीं कांहींस आश्चर्य वाटलें. विश्वमित्र तर सरकारसंस्थेचा लोकांसाठीं उपयोग कसा करून घ्यावा यासंबंधानें फार विचार प्रदर्शित करणारा आणि लोकांनी आतां राष्ट्रशासनाची जबाबदारी पत्करली पाहिजे आणि कार्योत्सुक मंडळींनीं आपल्या कल्पना राज्य चालविण्यांत आणण्यासाठीं दिवाणगिऱ्या पत्करल्या पाहिजेत, एवढेंच नव्हे तर जर त्या त्यांस मिळणार नसल्या तर धडपड करून मिळवाव्यात अशाच मताचा होता, आणि त्यानें प्रतिसहकारवाद्यांपाशीं तशा प्रकारचे उद्गारहि काढले होते, असें असतां तो दिवाणगिऱ्या पत्करण्याच्याविरुद्ध असलेल्या पक्षातर्फे उभा राहिला हें पाहूनच नारायणराव अलंकार यास आश्चर्य वाटलें.

दादासाहेबांनी इतर मंडळींस सांगितलें कीं, "विश्वमित्र हा स्वराज्य पक्षाला मिळाला यांत मला आश्चर्य मुळींच वाटत नाहीं. सर दामोदरराव हा पक्का काफर आहे, तो पुरा कोकणस्थ आहे. कोकणस्थ म्हणजे लुच्चा. त्याच्या मनांत दुसरें तिसरें कांहीं नाहीं; आपल्या प्रतिसहकारपक्षाला दिवाणगिरी मिळूं नये असें आहे. कोकणस्थ हे लबाड आहेत. हे वाटेल तेव्हां राष्ट्रीय बनतात, व वाटेल तेव्हा माडरेट बनतात !"

"पण आपल्या पक्षांत कोकणस्थ आहेतना? तुम्ही कोकणस्थांवर विश्वास ठेवूं नये असें कसे बोलता" नारायणराव अलंकार बोलले.

"आपल्या पक्षात कोकणस्थ आहेतच, त्यांनां मी म्हणतो ते सांगायचें नाहीं, कारण त्यांनां आपण आपले खरे विचार कधींच कळूं देऊं नयेत. त्यांनां आपण झुलवीतच ठेवलें पाहिजे. ते आपल्या पक्षाला जरी मिळाले तरी त्यांनां पुढें येऊं देतां कामा नये. नाहीं तर हे लेकाचे आहेत हुशार, आपण कोणताहि पक्ष काढला तरी त्याला हे कोकणस्थ येऊन मिळतील आणि त्या पक्षाचे पुढारी होतील म्हणजे आयता तयार झालेला पक्ष ते वापरतात. ते दुसऱ्या पक्षाच्या कोकणस्थांविरुद्ध व्याख्यानें देतील व त्यामुळें दोन्ही पक्षांतल्या कोकणस्थाच्याच नांवाचा डंका होतो. हे लेकाचे देशस्थाला शिव्या देखील देणार नाहींत, कारण ज्या देशस्थाला शिव्या मिळतील त्या देशस्थाला महत्त्व येईल आणि ही गोष्ट ते ओळखतात."

"विश्वमित्राविषयीं बऱ्याच लोकांनां आदर आहे. तो लोकसुधारणेच्या बऱ्याच गोष्टी बोलतो!"

"अरे, त्याला जागा पटकावयाची आहे म्हणून तो त्या गोष्टी बोलतो. तो आपल्या बापाचे सर्व डाव शिकला आहे. पण त्या विश्वमित्राला म्हणावें बच्चंजी, लक्षांत ठेव; हा गेंगणे तुझ्या बापाचा बाप आहे."

"विश्वमित्र हा भयंकर उमेदवार आहे असे आपणांस वाटतें काय?" विषय बदलून नारायणराव अलंकार यांनीं विचारलें.

"अरे हा भयंकर तर होणारच. याच्यापाशीं लोकसुधारणेच्या कल्पना आहेत पण लोकांनां त्या कल्पना समजतील आणि लोक त्या कल्पना पार पाडायला मदत करतील असें नाहीं. पण लोकांना एवढे वाटेल कीं उमेदवार बरा आहे कांहीं काम करील. शिवाय त्यानें घरीं ॲट होम वगैरे दिला म्हणजे गांवांतील मंडळी त्या पार्टीला जाण्यासाठीं धडपडतील. त्याची बायको एकदा एका गृहस्थांच्याकडे हळदीकुंकवासाठीं आली होती. तेव्हां ती मोटारींतून परत जाईपर्यंत तिला पहाण्यासाठीं लोक उभे राहिले होते. शिवाय हा सरकार पक्षाचा बापाच्या मुलगा असून सरकारला जोराच्या शिव्या देणाऱ्या पक्षाला मिळाला एवढयाबद्दलच काहीं लोक झुलून जातील."

"तर मग आपल्याला विश्वमित्राला नादान ठरविलेच पाहिजे?" नारायणराव अलंकार बोलले.

"ते कसें ठरविणार?" दादासाहेब विचारतात.

"येथल्या असिस्टंट लीगल रिमेंब्रन्सरच्या जागेसाठीं विश्वमित्र खटपटत आहे, असे ठरविता येईल आणि स्वराज्यपक्षालाच सरकारची फूस आहे हेंहि लोकाना पटवून देता येईल. आणि प्रतिसहकार पक्षाला हाणून पाडण्यासाठी सरकार स्वराज्यपक्षालाच मदत करीत आहे आणि याचे मुख्य कारण सुधारणाचा फायदा लोकांनां मिळू नये; नेटिवांनां मोठाले पगार मिळू नयेत; दिवाणगिऱ्या नेटीवानीच नाकाराव्यात म्हणजे नोकरशाहीला वाटेल ते करण्यास संधि मिळेल, हे सरकारला दिसत आहे, आणि स्वराज्य पक्षाचे लोक हेच खरोखर नोकरशाहीचे हस्तक आहेत आणि ते लोकांनां फसवीत आहेत अशी मांडणी करता येईल, आणि या गोष्टी साधण्यासाठींच मुद्दाम विश्वमित्रास स्वराज्यपक्षाला जाऊन मीळ असें दामोदररावांनी सांगितले असेहि लोकांनां भासवून देतां येईल."

"वाहवा नारायणराव, आहेस! देशस्थाच्यात मुत्सद्दीपणा नाहीं असें कोण म्हणेल! मला वाटले नाही तुझ्या डोक्यांतून अशी शक्कल निघेल. मला वाटले कीं तू केवळ फुसकल्या सोडणारा आहेस, पण नाहीं. तू देखील व्यूहरचना करू शकतील."

नारायणराव खुलून गेले. आपल्या हुशारीबद्दल त्यानाच धन्यता वाटू लागली पण आपण मोठी हुशारीची सूचना केली असे आपण समजत नाहीं तर एकादी साधीच गोष्ट केली असे समजतो असे त्याना दाखवावयाचे होते. ते म्हणाले "मला एवढयाच सूचनेवरून मुत्सद्दी ठरवितां? यांत काय आहे? अहो मी जन्मभर वकीली केली की झक मारली?"

तेव्हा नारायणरावाला देखील फारसे फुशारू देऊ नये आपल्या शाबासकीचे महत्त्व त्यास वाटलेच पाहिजे असे वाटून दादासाहेब म्हणाले, "अरे वकीली आणि पॉलिटिक्स या निरनिराळया गोष्टी आहेत. वकीली करण्याच्या बाबतीत तू कायरे मोठी कमाई केलीस. तेवढयावरून मी तर तुला नादान ठरवीत आहें."

थोडयाशा वेळाने चर्चेचा विषय बदलला. आणि विश्वमित्र जाऊन ब्रह्मगिरी चर्चेचा विषय झाला.

स्वामी ब्रह्मगिरींची बायको वारली नसून जिवत आहे व स्वामी ब्रह्मगिरींनी छाटी जाळल्यापासून एक आठवडयाच्या आंतच त्याची बायको नागपूरला आली ही बातमी चोहोकडे पसरली होती. स्वामी ब्रह्मगिरि उर्फ देवीदास अत्रे यांनी छाटी जाळून टाकली ती सन्यासधर्माचा अस्त झाला म्हणून जाळून टाकली हे खरें नसून त्यांची बायको त्याना सापडली व त्यानां पुन्हां स्त्रीसुख पाहिजे होतें म्हणून त्यांनी छाटी जाळली, इत्यादि प्रकारचें

भाष्य दादासाहेब गेंगणे यांच्या घरीं नारायणराव अलंकार, बापूसाहेब भोंगळवार आणि खुद्द दादासाहेब या तिघांनीं केलें. एका विधवेच्या मुलीची सोय करण्यासाठी ब्रह्मगिरी उत्सुक होते आणि त्यासाठीं ते अनेकांकडे आले होते ते दादासाहेबांनीं सांगितले व या सर्व वृत्तांताचा अर्थ या त्रयीने येणेंप्रमाणें काढला. प्रथम दादासाहेब म्हणाले:

"अरे ब्रह्मगिरी काय नांवाचाच सन्यासी; तो रोज दाढी करीत होता, व मटनचे जेवण देखील आवडणारा हा मनुष्य होता. हा सन्यासी कसचा? याला बायको पाहिजे होती. इग्लंडमध्यें वेदांतान्या गोष्टी सांगून तिकडच्या स्वैर पोरी नादी लावून त्याचा उपभोग घ्यायची याला सवय पडली असेल; इकडे आल्यापासून त्याची गैरसोय होऊं लागली होती.त्यामुळे हा तरफडतच होता.आमच्या घरांतल्या सुद्धा मोलकरणीकडे याचे लक्ष होतेच. पण सुद्धा याला दाद कसची देते? शिवाय माझे लक्ष तिकडे जाईल म्हणून हा वचकत होता. इकडे आल्यानतर त्याला बायकोची जरूर लागली. इतक्यांत याला कळले असेल कीं, आपली आपण टाकून दिलेली बायको जिवंत आहे. हे पोरगे बायकोची काळजी कोठें करतात? पळून जातात, वीस वीस वर्षे परदेशीं रहातात, आणि इकडे आल्यानतर कोणी बायको मिळाली नाही म्हणजे यांनां मग आपल्या जुन्या बायकोची आठवण होते. आपल्या बायकोला आपल्या पाठीमागे मूल झाल्याचे देखील या लेकाला कळले असेल. तर मूलाची कोठे तरी वासलात लावावी आणि आपली बायको घरांत घ्यावी अशी त्याची वृत्ति झाली असेल."

इतक्यांत बापू भोंगळवार बोलले "यांनीं खोली तरीच मारू जागेवर घेतली होती. अगदीं गर्ल्स स्कूल समोर. ते संन्यासी असतांनाच मुलींची शाळा पहात गेले होते.मला ठाऊक आहे कीं त्यांनां तेथल्या मास्तरणीची ओळख करून घ्यावयाची होती. त्यांनीं आपल्या खोलीतून तेथल्या मास्तरणींनां बिनतारी विद्युत्संदेश पाठविण्याचा प्रयत्न केला होता असे मला त्याच्याखालीं असलेल्या शिष्यानें सांगितलें होते. तो शिंपी आपल्याच पार्टीचा आहे.

"पण" पुढें नारायणराव म्हणाले, "त्याची बायको ख्रिस्ती झाली होती आणि तो आतां पुन्हां तिला परत घेणार आहे असें ऐकतों."

"अरे तर मग आपल्याला एक "शुद्धि" करतां येईल आणि त्यावेळेस आपण भाषण करून सांगू कीं आमचा आणि देवीदासपतांचा अनेक धार्मिक प्रश्नांच्या बाबतींत जरी मतभेद आहे तरी शुद्धीच्या बाबतीत आम्ही त्यांच्याशीं सहकार्य करतो."

"पण देवीदासपतांनां आपल्याकडून शुद्धीची गरज नसेल तर!"

"तरी आपण हजर राहू व त्या वेळेस अभिनंदनाचे भाषण करूं आणि हा शुद्धिसमारंभ आपणच घडविला आणि आपली बायको परत घेण्यास देवीदासपतांस सल्ला दिला अशी बाजारगप्प उठवू." गेगणे म्हणाले.

दादासाहेब पुढे म्हणाले अरे बापू तूं बर्डीवरच रहातोस. जा एकदां लोकांच्याकडे. आणि शुद्धि वगैरे करावयाची असल्यास आपण मदत करावयास तयार आहो असे सांग.

बापू भोंगळवार दादासाहेबाच्या घराहून निघून परत बर्डीवर आपल्या घरीं यावयास निघाले. रस्त्यावरच त्यांची आणि देवीदासपंताची गांठ पडली. तेव्हां बापुराव म्हणाले "काय देवीदासपंत, मी आपल्याविषयीं शुभवर्तमान ऐकलें आहे, आपली पत्नी जिवंत असून तिचा पत्ता लागला आहे व तुमची दोघांची भेटहि झाला आहे."

"होय बातमी अगदीं खरी आहे, पण तुम्हाला कशी कळली?"

"इतके दिवस त्या कोठें होत्या?"

"मिसेस हटर नावाच्या एका बाईने त्यास आपली मुलगी समजून इतकी वर्षे त्याचे सरक्षण केलें."

"म्हणजे त्या काय खिस्ती झाल्या असतील?"

"होय."

"तर मग आपण काय करणार? त्यांना परत घेणार काय?"

"होय त्या परत आल्या तर."

"त्यांची यायची तयारी दिसते काय?"

"येतीलसे वाटते?"

"तर मग आपणाला शुद्धीचा विधि करतां येईल. आपण हा विधि प्रत्यक्ष शकराचार्यासमोर करू, आणि मग तुम्ही त्यांस परत घ्याच. माझी खात्री आहे कीं शकराचार्यास मूळच्या एका ब्राह्मण स्त्रीस परत हिंदु केल्याबद्दल फार आनद होईल."

"परत हिंदु करायचे म्हणजे काय करायचे? ती हिंदूच आहे"

"हिंदु" करायचे म्हणजे "शुद्धि" करावयाची."

"शुद्धीच्या फार्साची काही एक जरूरी नाही."

"शुद्धीला तुम्ही फार्स कां म्हणतां? आणि शुद्धि केल्याशिवायच तुम्ही तिला घरांत घेणार?"

"होय, ती अशुद्ध झालेलीच नाही."

"तुम्ही शुद्धि केल्याशिवाय त्यांचा परत स्वीकार करणें हे आम्हांस पसंत नाही."

"नसेल!" त्यांच्या पसतीची आपल्याला किमत काय ही कल्पना मनांत येऊन, व त्यामुळे हसे येऊन देवीदासपत बोलले.

"त्यांच्या मनांतील आशय बापुरावांनी ओळखला आणि ते म्हणाले आमच्या पसतीची गोष्ट राहू द्या, पण खिस्ती बायकोचा शुद्धीशिवाय स्वीकार करणे ही गोष्ट धर्मशास्त्राविरुद्ध आहे."

"तुम्ही धर्मशास्त्रज्ञ केव्हां बनला?" देवीदासपंतांनीं स्मितपूर्वक विचारले.

"मी धर्मशास्त्र पढलो नसेन; पण शुद्धीचा विधि आवश्यक आहे" बापूराव मोंगळवार म्हणाले.

"मला त्या विधीची किमतच नाही. माझी बायको आहे, तिनें एक नवीन मत घेतले किंवा नवीन गुरु केला, म्हणजे काय तिचे आणि माझे नवरा बायकोचें नाते तुटून गेले?"

"होय जेव्हा ती खिस्ती झाली तेव्हां ते तुटले."

"हे धर्मशास्त्रांत कोठे आहे."?

"धर्मशास्त्रांत नसले तरी रूढिशास्त्रांत आहे."

"रूढीचाच प्रश्न ना, तर मग मी नवीन रूढि सुरू करतो."

"शुद्धि न करतां खिस्ती झालेल्या बायकोला घरांत घेणे हा आपल्या समाजाचा अपमान आहे, आपली सस्कृति याने लयाला जाईल."

"मला यात समाजाचा अपमान वाटत नाही, आणि सस्कृतीचा याने लोप होईल असेहि वाटत नाहीं."

"तुमचा "शुद्धीला" इतका आक्षेप का असावा?"

"मी आपल्या बायकोविषयी असे म्हणतो की—

उत्पत्ति परिपूतायाः किमस्याः पावनांतरैः
तीर्थोदकंच वान्हिश्च नान्यतः शुद्धिमर्हत

"शुद्धीलाच माझा पुष्कळ आक्षेप आहे. हे सर्व विधी मनुष्यामनुष्यात अंतर वाढवितात"

"तें कसे काय?"

"शिवाय शुद्धि करायची म्हणजे काय, बापतिस्म्याच्या अगी हिंदूचे हिंदुत्व नाहीसे करावयाची शक्ति आहे असे कबूल करावयाचे आणि आमच्या नवनिर्मित शुद्धीने ते हिंदुत्व परत जागेवर येते असें म्हणावयाचे. म्हणजे "शुद्धि" हा सस्कार बापतिस्म्यास मान्यता देणारा आहे. बापतिस्माने हिंदूचे हिंदुत्व जाते हेच मी कबूल करीत नाही."

"तुमच्यासारख्या तत्ववेत्त्यांच्या दृष्टीनें बापतिस्म्यानें हिंदुत्व नाहीसें होते ही गोष्ट मिथ्या

असेल पण सामान्य लोकांच्या दृष्टीने बापतिस्मा घेतला कीं, हिंदुत्व गेलें."

"तर ती समजूत काढून टाकावयाचा विचार करावयाचा की, नवें खूळ उत्पन्न करावयाचें?"

"कांही असो अलीकडे स्थापन झालेल्या धर्मशास्त्राप्रमाणें शुद्धि करून समाजांत प्रवेश करूं देणें चांगले."

"शुद्धीचा परिणाम चांगला होतो यासाठीं हा नवीन विधि उपयोगांत आणावा असे आपण म्हणतां?"

"होय."

"पण शुद्धीचा परिणाम काय होतो, शुद्धीने कोणीहि "शुद्ध" झालेला मुसलमान किंवा ख्रिस्ती जुन्या हिंदु समाजात मिसळत नाही. मुसुलमान किंवा ख्रिस्ती माणसापैकी हिंदु झालेल्या लोकांना अजून विवाहदृष्ट्या जुन्या हिंदुसमाजांत प्रवेश होतच नाहीं, म्हणजे आज शुद्धि म्हणजे तू आमच्यांतला झालास म्हणून तोडानें सांगावयाची आणि हाताने काम विरुद्ध करावयाची फसवणूक आहे. पण माझ्या बायकोला या फसवणुकीची जरूर नाही. तिचे पत्नीपद तिला मिळणारच आहे मी तिला पत्नीपदीं ठेवणारच आहे शुद्धीचे सर्टिफिकीट तुम्ही शुद्ध करणारी मंडळी मोठी असे समजणारेच मानतील. ज्या लोकांच्या मनात किंतु असेल अशा लोकांचे विशिष्ट व्यक्तीचा स्वीकार करावा म्हणून मन वळविण्यासाठीं तुमच्या शुद्धीचे सर्टिफिकीट उपयोगी पडेल पण स्वीकार करणारी व्यक्ति मी आहे आणि माझ्या बायकोची स्वीकारार्हता ठरविण्यास मी समर्थ आहे. तुमच्या शुद्धीच्या सर्टिफिकाटाचा या बाबतींत कांहीं एक उपयोग होणार नाहीं.

पुढच्या इलेक्शनसाठीं ही शुद्धीची जाहिरात फारशी उपयोगी पडणार नाहीं म्हणून बापू भोगळवारांस दुःख झालें.

———————

## प्रकरण ४४ वें
## उपसंहार.

आतांपर्यंत दिलेला वृत्तांत म्हणजे स्वामी ब्रह्मगिरी हिंदुस्थानांत आल्यानंतर तीन साडेतीन महिन्यांइतक्याच अवधीचा आहे. स्वामी ब्रह्मगिरींना आपण हिंदुस्थानांत आल्यानंतर कांहीं तरी विलक्षण विचारक्रांति घडवूं असा जो विश्वास वाटत होता तो ब्रह्मगिरीचे देवीदासपंत झाले तरी त्यांस अजून कायम आहे. त्यांच्या कार्याचें फल मात्र अजून दिसावयाचे आहे. एवढें मात्र खरें कीं, अत्यंत अवलोकनाच्या विविधतेमुळें, व पौष्कल्यामुळे जी व्यापक दृष्टी उत्पन्न झाली तीमुळें आपल्या समाजाचीं अनेक व्यंगें त्यांस दिसत आहेत; पण त्याच्या हातून कोणतें काम निवडलें जाईल व ते निवडल्यानंतर नेटानें पार पाडलें जाईल हे आजच सांगतां येत नाहीं. पुनर्मीलनानतर ते प्रथम मुंबईस गेले आणि तेथ कांहीं दिवस त्यांनीं संसारसुखाचा अनुभव घेतला. त्यांचे व ब्यारिस्टर सुतार यांचे मुंबईस बरेच संवाद झाले आणि त्या संवादांत ब्यारिस्टर सुतारांनीं "जितकी दृष्टी व्यापक तितके कार्यास विघ्न" असें तत्त्व पुढें मांडले तें तत्त्व त्यास निराळा विचार करावयास लावीत आहे, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. तथापि त्यांना अजून सर्व तऱ्हेची व्यंगे आपण दूर करावींत हा मोह सुटला नाहीं. त्यांना लोकांच्या विचारांत क्रांति करावयाची आहे, आणि ती क्रांति समाज नैराश्यातून आशावादीपणाकडे ओढण्याच्या स्वरूपाची आहे. समाजांतील स्वार्थबुद्धि समाजास घातुक नसून तीच आपल्या उन्नतीचा पाया आहे असे ते समजतात तर या स्वार्थबुद्धीनेंच आपला उद्धार होईल हें त्यांस जगास पटवावयाचें आहे. हिंदुसमाज आज जो असंघटित आहे तो संघटित करण्यासाठीं प्रयत्न करण्याचा त्यांचा विचार आहे. हिंदूंतील प्रत्येक

जात आपल्या जातीकरितां पचायत उत्पन्न करा, असें ते म्हणतात आणि ब्राह्मण जातीस पचायत नाहीं याबद्दल त्यांस फार दु:ख होते. ब्राह्मण जातींत जर पंचायत उत्पन्न झाली तर आपणांस व जातींतून प्रथम अर्धचंद्र मिळेल याची कल्पना देखील देवीदासपंतांस पुरी आहे. तरी देखील ब्राह्मण जातीस आत्मसुधारणेसाठी पचायत उत्पन्न झाली म्हणजे ती जात आपल्या उन्नतीसाठीं खटपट करण्यास अधिक समर्थ होईल आणि अनेक पचायतींचे पुढे एकीकरण करून हिंदु समाजाची सर्व सामान्य पचायत करता येईल इत्यादि विचार ते स्नेह्यापुढे मांडीत असतात. तसेच हिंदु लोकांच्या देवळांचा पैसा व मठांचा पैसा, जर लोकसुधारणेकडे लागला तर कितीतरी चांगले होईल असे ते म्हणतात. हिंदु समाजातील दु:ख शोधून काढले पाहिजे, आणि त्या दु:खाचे परिमार्जन करण्याकरिता प्रयत्न केला पाहिजे असे ते सांगतात, आणि हिंदु समाजास आपल्या लोकांच्या निष्ठेची जर जरूर असेल तर त्याने सुसंघटित होऊन आपली लायकी सिद्ध केली पाहिजे असे ते म्हणतात. देवीदासपताच्या कल्पनाचे पुढे भवितव्य काय होणार आहे हे आज गूढच आहे.

देवीदासपत पुन्हा नागपुरास गेले. पद्मावतीची व देवीदासपताची भेट गोदावरी मार्फत झालीच होती. नागपुरास ते यावेळेस डॉक्टर नदिकेकडेच कांही दिवस राहिले होते आणि पद्मावती देखील नदिकेकडेसच होती. गोदावरीच्या मुलीचा बाप कोण हेहि पतास कळले. आणि देवीदासपतांनीं पहिली कामगिरी केली ती ही की, सामादि उपायांनी त्यांनी शेवटी डॉ. परमानद याचे पद्मावतीशीं लग्न करण्याविषयी मन वळविले. एकदा देवीदासपत व परमानद महाराजा बागेतील क्लबांतबसले असतां देवीदासानी डॉ. परमानंदास एक काल्पनिक गोष्ट सांगितली आणि त्या गोष्टीत एका मनुष्याची मुलगी तिच्या बापानें तिच्या कडे दुर्लक्ष केल्यामुळे पुढे अधागतीस कशी गेली याची हकीकत सांगितली. त्या प्रसंगीं डॉ. परमानंदांनीं आपले नीतीच्या आवेशाचे उद्गार काढिले आणि बापाच्या बेजबाबदारपणाबद्दल बापास दोष दिला. आणि एखाद्या मनुष्याने जर एखादी वाईट गोष्ट केली तर त्या गोष्टीमुळे येणारी जबाबदारी त्याने पत्करलीच पाहिजे अशा तऱ्हेचे उद्गार काढिले. त्या नंतरचा कार्यक्रम सोपाच होता.

देवीदासपतानी काहीं सधी साधून त्या पद्मावतीच्या मुलीला डॉ. परमानदांनी पहावें असा योग आणला, आणि त्या मुलीचा तोंडावळा आपल्या सारखाच आहे हे जेव्हा परमानदांना दिसून पडले तेव्हां त्यांचे पितृत्व जागृत झाले आणि त्यानतर पद्मावती व परमानद यांचा विवाह जुळवून आणण्याचे श्रेय देखील देवीदासपतास मिळाले.

विश्वमित्र हा स्वराज्यपक्षास मिळाला आणि सुधारणा करा फोल आहेत म्हणून व्याख्याने देऊ लागला. आणि आपल्याला जरी अनेक विधायक गोष्टी करावयाच्या आहेत तरी त्या सुधारणा कौन्सिलमार्फत पार पाडण्याचा मला विश्वास वाटत नाहीं असे तो सांगू लागला व तो असे दाखवू लागला की, प्रतिसहकारपक्षाची मडळी फक्त आम्ही पगार घेऊ एवढेच सांगतात, लोकहितासाठीं काय करूं हे सांगत नाहीत. म्हणजे प्रतिसहकारपक्ष केवळ पगार खाऊ आहे हे लोकास इतके पटले की, विश्वमित्र पुढे निवडून आला. विश्वमित्र निवडून आल्यामुळे विहगमेच्या मनांत त्याच्या विषयीं आदर अधिक वाढला. अलकनंदा व तिचा नवरा यांच्यामधलें भांडण पुढे विकोपास गेले आणि अलकनंदा अलीकडे विश्वामित्राच्याकडे येऊन राहिला आहे.

स्वराज्यपार्टीचे पुढें धोरण बदलेल व तिची अधिकारग्रहणास अनुकूलता होईल अशी विश्वमित्रास आशा वाटत आहे. विश्वमित्राचे अनेक लोकहिताचे कार्यक्रम आज लोकांपुढे आहेत, आणि त्यांचा परिणामहि झाला आहे. फुकट पगार खाऊ दिवाण लोकहिताच्या योजना मांडीत नाहींत व हा साधा सभासद मात्र मांडीत आहे तर विश्वमित्रच दिवाण झाला असता तर किती तरी बरे झाले असते? तो भलत्याच पक्षाला मिळाला; त्याने स्वराज्यपक्ष सोडला पाहिजे किंवा स्वराज्यपक्षाने तरी दिवाणागिऱ्या पत्करण्याचे धोरण स्वीकारले पाहिजे असें लोक म्हणू लागले आहेत.

डॉ. नंदिका आणि लालनाथ यांचा आयुष्यक्रम अधिकाधिक आनंदाचा होऊ लागला आहे. नंदिकेच्या आयुष्यांत जी मोहाची व आणीबाणीची वेळ आली होती ती टळली. उत्पन्न झालेल्या मोहापासून आपण बचावलो याबद्दल आज नंदिकेस आनंद होत आहे. आपल्या बायकोचा विनोदप्रिय त्याचप्रमाणे प्रेमप्रदर्शनप्रिय स्वभाव लालनाथानी ओळखिला आणि तो त्यास आवडू लागला आहे. आतां त्यांस आपल्या प्रेमाचे प्रदर्शन करण्याची लाज वाटेनाशी झाली, आणि त्यामुळे त्यांच्या मनांत देखील प्रेमाची गाढ भावना असली पाहिजे असे नंदिकेस वाटू लागले. नंदिकेने विरहावस्थेत म्हणजे एडिंबरोला असताना जी आतुरतेची काव्ये केली होती त्यापैकीं कांही तिने लालनाथांनां पाठविलींच होतीं तथापि प्रेमाचे प्रतिदर्शन न दिसल्यामुळे नंदिकेने पुढें पुढें केलेली काव्ये त्यांच्या दृष्टीस पडलीं नव्हतीं तीं देखील पुढें त्यांच्या दृष्टीस पडलीं. लालनाथांकडून भावनात्मक प्रत्युत्तर न मिळाल्यामुळे आपलीं अत्यंत भावनात्मक काव्यें लालनाथांस दिसू देण्याचीच नंदिकेस लाज वाटत होती तीहि पुढें नाहीशी झाली. नुकतेंच नंदिकेस अपत्यहि झालें आहे. आतां दोघांच्या समारंभास दिशा उत्पन्न झाली आहे.

दादासाहेब गेगणे अजून नव्या मूर्ख लोकांवर चरफडत आहेत; आणि बापू भोंगळबार आणि नारायणराव अलंकार यांच्या मनांत त्यांच्या नेतृत्वाविषयी अविश्वास उत्पन्न झाला आहे.

स्त्रियांचे "उद्योगमंदीर" सुव्यवस्थित तऱ्हेनें अजून चालू आहे. तथापि गोदावरी तेथून गेली तर आपल्याला तितकी कळकळीची दुसरी बाई मिळणार नाहीं असे वाटून मिसेस हंटरनें आपली सर्व संस्था देवीदासपंतांच्या हातीं द्यावयाचा विचार केला आहे.

एकंदर हिंदुसमाज सुधारण्याऐवजी एक निश्चित काम घेऊन तें चांगल्या तऱ्हेने पुरे पाडावे अशा तऱ्हेचा उपदेश देवीदासपंतांना करण्याची गोदावरीची प्रवृत्ति झाल्यास त्यांत नवल ते काय?

पण मिसेस हंटर या तऱ्हेचा उपदेश देवीदासपंतास बिलकुल करीत नाहींत. त्या असें म्हणतात की, देवीदासपंताची आकाशास गवसणी घालण्याची आकांक्षा व्यर्थ आहे असें जेव्हां त्यांचे त्यांनांच वाटेल तेव्हां देवीदासपंत या निश्चित कार्यक्रमाकडे येतील.

---

